ती पानेंफुले तोडीत नसे; तसेच देवयानीचेहि हे बोल आहेतः—"कचदेवा, माझ्या सुखासाठीं या मधुकराना फुलावरून का बरें उठविता ? मधुकराच्या वियोगामुळें कोमेजून गेलेलीं हीं फुले पाहिलीं कीं, माझ्या मनात चर्र होतें ! दुसऱ्याचा वियोग करणाराचे कपाळीं सयोग नसतो.—हे कायहो कचदेवा, मी सागते ना तुम्हाला, अशा रीतीनें मधुकराच्या आनदाचे आड येऊन तोडलेले एकहि फूल मीं वेणींत घालायची नाहीं. "

## प्रसादाचा अभाव

खाडिलकराच्या या गुण-विशेषामुळेंच काहीं ठळक दोषहि त्याच्या नाट्य-कृतींत आले आहेत. सूर्याचा प्रकाश स्वच्छ, पण चद्राप्रमाणे शीतल कोठे आहे ? खाडिलकराच्या उग्र प्रकृतीला गुलगुलीत विनोद कोठला मानवावयाला ? शृगाररस इतका ते खुलवूं शकले हेच विशेष. त्यामुळे 'केसरी' कार खाडिलकर व 'नाटककार' खाडिलकर एकच होते काय ? असा वाद पुढे निघणे जसा शक्य आहे, तसाच गभीर नाटके रचणारे व संगीत शृगारमय नाटके फुलविणारे खाडिलकर दोन होते काय ? असाहि प्रश्न उपस्थित होणे संभवनीय आहे. पदाना रागदारीच्या तालींच्या चौकटींत बसविण्याचे जसे एक बधन, तसेच त्या पदाच्या चौकटींत आपल्या मनातील काव्य-कल्पना बसविणे हे दुसरे बधन. केवळ 'कर दूर करा तुम्ही' असे पाटणकरी 'काव्य' त्याना करावयाचे नव्हते. 'नमवी पहा भूमि हा चालतांना' किंवा 'नभिं विहरत भास्कर तापत' अथवा 'श्री-नवोनव' अशा गीर्वाण कविवराच्या—आणि आपल्या स्वतःच्याहि—रम्य कल्पना पदाच्या लहानशा नळींत टाकूनठोकून बसविताना खाडिलकराना फार क्लेश होत-आणि त्यामुळे त्याचीं पदे क्लिष्ट झालीं आहेत. त्यातील 'प्रेमा', 'मजा' वगैरे शब्दाचे हालहि अनुकपनीय आहेत. 'पक्की मालकीण,' 'प्रेमाचा तगादा,' 'माझ्या नवऱ्याकडे न्या' इत्यादि पुष्कळ शब्द रसाला बाधक व कानाला कटु असे आहेत हें खरे, पण त्याचे कारण 'पिटा' धिष्ठित प्रेक्षकांची नाडी खाडिलकरांनीं बरोबर ओळखली होती हेच असावे.

## प्रणयाचे मंत्र

सोप्या शब्दांनीं पात्रांची मनोवृत्ति प्रगट करणारीं काहीं काहीं पदें खाडिलकरानीं सुंदर रचलीं आहेत. त्यातील सुप्रसिद्ध पदे म्हणजे— " सुजन कसा ? मन चोरी ! अग हा—चोरी—यदुकुलनदन ॥ सहज नेत्र भिडे; सहज मोह पडे, सहजींच करी मम हृदय हे वेडे; विलीन—लोचन—मार्गे शिरत घरी, मन चोरी ॥ " असे एकएक पद बालगधर्व अर्धाअर्धा तास घोळघोळून गात व त्यातील महत्वाचा एकएक चरण पन्नासपन्नास वेळा निरनिराळ्या ढगाने म्हणत, त्यामुळे तीं तीं पदे श्रोत्याच्या अंतःकरणात अत्तराप्रमाणे दीर्घकाळ दरवळत. प्रणयाचा उत्कर्ष साधणारीं पद्ये तर तरुणाना अमृताप्रमाणे मधुर वाटत. उदाहरणार्थ, "एकला नयनाला विषय तो झाला॥ सकलहि स्थानीं अवघा भरला, न बघत इतरा डोळा ॥ अवयव सगळे नयनीं जमले, यदुवर दिसता मजला ॥ "

पुढील पद तर रसिकाच्या रसनेवर सदैव नाचत आलेले आहे. " नरवर कृष्णासमान । घेतसे जन्मा भाग्य उदेले, हें शिकवी सुकर्मा ॥ बहुत नृपति ते आले-गेले, परि मनाला । यदुवर झाला । मत्र महान ॥ "

तसेच 'मानापमाना'तील भामिनी धैर्यधराचे वर्णन पुढील लालित्यपूर्ण पदात करते, " नयने लाजवीत बहुमोल रत्ना ! जणुं धैर्यधर धरित धनदास धना ॥ नमवी पहा भूमि हा चालताना । सुचवीत तिज तूंचि मजपुढें निर्धना ॥ "

धन-वेष टाकून गरिबीचे सोग घेतलेली भामिनी छावणीच्या आसपास रात्रीं फिरत आहे, याचे धैर्यधराला नवल वाटले. तेव्हा गरिबाना चोरांचे भय काय ? असें ती त्याला कल्पनारम्य शब्दानीं विचारते. " मी अधना, न शिवे भीति मना । योग्या धना चौरचिंतना ॥ रवि-हिमकरहि भययुत ग्रहणीं, भय नच तें; दीपमना, समर्थी त्या दीपमना ॥ " ग्रहणाचें भय चंद्र-सूर्यांना, दिव्याला नव्हे, तसे चोरीचे सकट श्रीमंताना, गरिबाना नव्हे.

निरपेक्ष प्रेमाची महती भामिनीच्या मुखांतून खाडिलकर पुढील अलंकारपूर्ण पदात सागतात. जाता जाता सुख व प्रेम यांचे सिद्धातहि

सूत्ररूपानें ते माडतात, " खरा तो प्रेमा ना धरि लोभ मनी ॥ ध्रु० ॥ नभिं जनहितरत भास्कर तापत, विकसत पहा नलिनी ॥ पीडित जन देखता, स्वसुखा त्यागी दया । जनभयहरण होचि सुख सदया देवराया॥ दर्शन गुणवताचे नाचवी प्रेमलहरी । गुणरसपान होचि सुख, प्रेम तया नाव जनीं ॥ "

## पद्-लालित्याचा नमुना

शब्द-लालित्य किंवा वाक्य-सौष्ठव या बाह्य गुणाकडे खाडिलकर फारसे लक्ष देत नाहीत हे खरे, पण मधून-मधून त्याच्या लेखणींतून समतोल व लयबद्ध, अर्थपूर्ण व आवेशपूर्ण अशीं वाक्ये बाहेर पडतात. ' द्रौपदी 'तील भीम म्हणतो, " ह्या भीमाचा पाय जेथे पडेल, तेथे दैवानेहि हात जोडून उभे राहिले पाहिजे; ह्या भीमाची गदा जेथे संचार करील, तेथे दैवानेहि खेळत राहिले पाहिजे, ह्या भीमाला पाहिल्यावर फाशात लपून बसणाऱ्या दैवाने पोबाराच केला पाहिजे.— मी जिवत फासा आहे; मी जिवत जुगार आहे; मी जिवत दैव आहे." समतोल वाक्य-रचनेचा आणखी एक नमुना ' सवती मत्सरा 'त आढळतो. रामाची थोरवी सागताना दशरथ म्हणतो, " अयोध्येंत असा प्राणी नाहीं ज्याचे मन रामाने दुखविले आहे, अयोध्येत असें दुःख नाहीं जे माझ्या रामाने हलके केलेले नाहीं, अयोध्येत असे सुख नाहीं जे माझ्या रामामुळे प्रफुल्लित झालेले नाहीं, अयोध्येंत असा पराक्रम नाहीं ज्याचे तेज माझ्या रामामुळे चोहोकडे फाकलेले नाहीं, अयोध्येत असा मोक्ष नाहीं ज्यात माझ्या रामाची मूर्ति प्रत्यक्ष नाहीं.— अशा माझ्या रामाला कैकेयी, वनवासाला का पाठवितेस ? "

तशीच कौसल्येचीहि भाषा. हृदयात करुणरसाच्या ऊर्मि उचबळत असताना ती म्हणते, ' देव आणि धर्म–हा नारायण साक्षी आहे, पूजेअर्चेंत मीं काहीं कमी केले असेल तर–हा अग्नि साक्षी आहे, मी होमात काहीं कमी केले असेल तर–पुरोहित, हे ब्राह्मण साक्षी आहेत, माझ्या भक्तिभावात काहीं कमी असेल तर–मग मला असे फळ का ?—देवाला दोष द्यावासें वाटतें–अग्नीला विचारावेंसें वाटतें, गुरु पुरोहिताना बोलावेसे वाटते–माझेच नशीब

खोटे, उगीच दुसऱ्याला बोल लावून काय उपयोग?—लक्ष्मणा, राम वनवासाला खरेच जाणार काय?"

## अभिनय-पोषक भाषाशैली

विश्वामित्राच्या आश्रमातील ऋषिकुमाराना अप्सराचे नृत्य पाहून काय वाटले, हे खाडिलकरानीं 'मेनका' नाटकात पुढील सहज व परिमित शब्दानीं दाखविले आहे. [अभिनयाला अनुकूल अशा भाषाशैलीचा हा खासा नमुना आहे.

"माझ्या दरडावण्याने ह्याना नीट चालताहि येईनासे झाले? कशा लंगडत लगडत—ह्याचे वाकडे पाऊल—बायका हा प्राणी मूळचाच लगडा आणि वाकडा असतो वाटते.—कशा वेड्यावाकड्या लगड्या आहेत."

नाटकाच्या कथानकातील मध्यवर्ति कल्पना नटी-सूत्रधाराच्या सवादातूनच सूचित करण्याचे कौशल्य खाडिलकराचे ठायीं आहे. 'सावित्री' नाटकाच्या प्रारभीं नटी पुढील प्रवेशाचे सूचन करते तिचे शब्द किती सहज- किती तुटक—किती अभिनयायोग्य आहेत पहा—

"आणि सोन्याच्या रथात बसून नवरी मुलगी आली तर—म्हटले सोन्याच्या रथात—सोन्याच्या रथात—बाबूला तिच्यापुढे पायीं चालविणार—हो, पायींच चालविणार—असें काय पाहता?—बाबूला पायींच चालविणार—अगाखाद्यावर काही नाहीं. भिकाऱ्यासारखा उघडाबोडका माझा मुलगा पायीं चालणार—होय ना—सागा, सोन्याच्या रथात बसून—[ पडद्यात—"आली सोन्याच्या रथात बसून—आज तीन दिवस झाले, रोज याच वेळीं नेमकी सोन्याच्या रथात बसून ही कोण येत असते बरे?" ] कोण आली सोन्याच्या रथात बसून?"

## नाट्यपूर्ण उद्गार

'विद्याहरणां'तील देवयानी कचदेवाला आपल्यावर रागवावयास सांगत आहे. त्यावेळची तिची भाषा कोणत्याहि नटाला स्फुरण चढविणारी आहे. देवयानी म्हणते, "ही असली रागीट मुद्रा पाहिली—चढू देत, अशाच त्या भिवया वर चढूं देत, त्यामुळे माझ्या धिटाईला भरती येते.

फिरवा, असेंच तोंड फिरवा, विनति करण्याच्या धाडसाकडे माझे मन आपोआप फिरतें–टाका, असेच क्रोधाचे दीर्घ श्वास टाका."

कच–दहनानतर देवयानी शुक्राचार्यास विचारते, "असे कावरेबावरे का?–असे भयभीत का? कचदेव जिवत होणें अशक्य हेच ना तुम्ही मला सागणार? नका; इतक्यात ते शब्द उच्चारू नका;—

शुक्रा:–घात झाला! बाळे, घात झाला! सजीवनी–विद्येमुळे सर्व देवाना धुळीस मिळविणारा हा शुक्र स्वतः धुळीस मिळाला! मी कवडी-मोल झालो, देवयानी, मी कवडीमोल झालो!"

त्याहिपेक्षा अभिनयाला अत्यत अनुकूल व रसाचा उत्कर्ष घडविणारी भाषा शुक्राचार्यांच्या तोंडीं खाडिलकरानीं घातली आहे. दारूमुळें आपली संजीवनी विद्या कचाला मिळाली हे कळून वैतागाने तो गरजतो, "हसा, सर्व विद्यानो, या मद्यपी शुक्राला हसा! थुका, सर्व तपस्व्यानो, या मद्यपी शुक्राचे तोडावर थुका! धिक्कारा, ब्रह्मयज्ञ करणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांनो, या मद्यपी शुक्राला धिक्कारा! आणि अखिल दुनियेत द्वाही फिरवा कीं, दारू-मुळे बुद्धिनाश होतो, दारूमुळे शत्रूला पोटात शिरायला मिळतें, दारूमुळें शत्रूला हृदयात दबा धरून बसायला मिळते, आणि दारूमुळें सर्व विद्या शत्रूच्या ताब्यात जाऊन शत्रूच्या ओंजळीने पाणी पिण्याची पाळी येते! कार्यकर्ते तपस्वी हो, या शुक्राच्या अधःपाताचें उदाहरण नेहमीं डोळ्यापुढे ठेवून, कोणत्याहि मोठ्या कार्यांचा नेतेपणा किंवा कारभार व्यसनी पुरुषा-कडे ठेवू नका."

## चुटचुटीत वाक्यें

खाडिलकराचें शेवटचे नाटक म्हणजे 'त्रिदडी सन्यास'. पूर्वीं किर्लो-स्करानीं व पुढें वरेरकरानीं हाताळलेला सुभद्रा–हरणाचा पौराणिक विषय खाडिलकरानीं या नाटकांत रगविला आहे. पण भाषेच्या सोपेपणाशिवाय व धावतेपणाशिवाय यात दुसरे गुण फारसे नाहींत. सुभद्रा प्रारंभीं धनुर्बाणधारी य पुढे दंड–कमडलूधारी बनते, मौन व उपोषण करते, अशा गांधीवादाच्या छटा दाखविल्या आहेत, पण त्या स्पष्ट व सुरेख साधल्या

नाहींत–विकृत व हास्यास्पद छाया मात्र त्या भासतात. बलराम तर 'स्वयंवरा'तील रुक्मीपेक्षा सवाई दाखविला आहे—अद्वातद्वा बोलणारा व क्षणात पालटणारा असा रंगविला आहे. किर्लोस्कराप्रमाणें खाडिलकरानीं कृष्णाच्या कपट–नाटकाला किंवा सुभद्रेच्या प्रेम–भावनेला महत्त्व दिलेलें नाहीं. यामुळे रंगभूमीच्या पडत्या काळातील हें नाटक पडलेंच. मात्र यातील भाषा चुटचुटीत आहे. हें कृष्णाच्या पुढील चार वाक्यांवरूनहि कळून येते. "तसे नव्हे दादा—ह्याची ही शिष्यीण—मौननाथांचें अनुकरण करून मौनव्रत घेतले–गुरूचीं प्रसादचिन्हे–हे दंडकमंडलु आहे,–उगीच रागावू नका दादा—पोर आहे—खेळांतला हा संन्यास—हें धनुष्य—हे बाण—तशातलेच हे दंड—कमंडलु !"

## विनोदशून्यतेचा शाप

जसा पदात प्रसाद, तसाच नाटकात विनोद आणणें खाडिलकराना मुळींच साधले नाहीं. हास्यरसाचे व त्याच्या प्रतिभेचें जणु खडाष्टकच होतें. त्यानीं आपल्या नाटकात हास्यकारक पात्राच्या जोड्या घातल्या आहेत, पण त्या हास्यास्पदच ठरल्या आहेत. त्याच्या संवादात स्वाभाविकता नाहीं व त्याच्या कृतींत विनोद नाहीं. 'स्वयंवरा'तील दिनेश्वर–चंद्रेश्वर कोणापुढें काय बोलतील याचा नेम नाहीं. तसेंच 'भाऊबंदकीं'तील चमकशास्त्री व नमकशास्त्री. त्यातच देशस्थ-कोंकणस्थाचा क्षुद्र वाद मिसळलेला. 'मेनके'तील बालमूर्ति व वृद्धानंद हे हजारों वर्षांचे तपस्वी नसून तमाशातील उल्लू सोंगाडे वाटतात. 'विद्याहरणां'तील शिष्यवर व फुकट्या हेहि तसेच. 'त्रिदंडी सन्यासा'तील भैरवनाथ व मेघनाद या शिष्याची जोडीहि त्याच मालिकेंतील. 'द्रौपदीं'तील जुगाऱ्याचा राजा अक्षपाल हा 'निर्लज्जपणाचा अर्क' आहे आणि तशाच त्याच्या दोन बायका. 'या दोन कोंबड्या मी झुंजवीत आहें, तूं तिसरी कोंबडी व्हावयास तयार आहेस काय?' असा आचरट प्रश्न अक्षपाल शकुनीसारख्या राजकारण–धुरंधराला करतो व तो 'होय' असें उत्तर देतो ! तें उत्तर आपलें काम साधून घेण्यासाठीं शकुनीनें

दिलें असें मानलें, तरी त्या वेळच्या राजवाड्यांत किंवा राजदरबारांत आजच्या चावडीइतका किंवा फरासखान्याइतकाहि दरारा व शिस्त नव्हती असा अर्थ निघतो. आणि 'सावित्रीं'तील मत्री महामती व त्याचा पुत्र बहुबुद्धि याच्या सवादातील विनोद काय सागावा? "सावित्री होईल खुळी, द्या बाबा टाळी' अशीं सयमक, मूर्खपणाचीं वाक्ये तो बोलतो व खाडिलकराची विनोदाची अब्रू धुळीस मिळवितो! ती सावरण्या-साठींच कीं काय, 'मानापमान'मध्ये खाडिलकरानीं 'विनोद' या नांवाचेच एक पात्र घातलें आहे आणि त्याला आपली शेडी धरून इकडून तिकडे धावावयास लावले आहे! लहान मुले आपल्या वेड्या-वाकड्या चित्राखालीं 'गाय,' 'घोडा,' असें लिहितात, तसाच हा बालिश प्रकार नव्हे काय?

'भाऊबदकीं'तील कारुण्य व क्रौर्य याचे तीव्र आघात सोसण्याचें बळ श्रोत्यांना यावें, म्हणून विनोदाची फुंकर नाटककारानें थोडथोडी घातली आहे. लाळघोट्या नमकशास्त्रीची आढ्यता पहा, "मोठ्या कडाक्याचा वाद झाला. बाईसाहेब होत्या, श्रीमंत होते, रामशास्त्री होते, आणि मी होतोः—मोठा कडाक्याचा वाद झाला—त्रिभुवन हालून गेले असेल त्या वादाचे वेळीं—त्या वेळीं मी साफ जोरानें कडाडून बोललों."

'बायकांचें बंड' या नाटकात अर्जुन प्रमिलेच्या स्त्री-राज्यात शिरतो व स्त्री-पुरुष-प्रेमामुळें तें स्त्रीराज्य संपुष्टांत येतें असे दाखविले आहे. त्यात विनोदाला सहजच पुष्कळ वाव आहे. त्याचा मासला पुढील सवादात दिसतो.

"वाग्मती—पोटात एक आणि चेहऱ्यावर भलतेच, अशी ही पुरुषांची मेली फसवी जात!

रुद्रमाया—पुरुष मेले सोंगाडे! त्याचा लहानपणीं चेहरा बायकांसारखा असतो, तरुणपणीं मेले तोंड काळें करतात, आणि वृद्धपणीं तरुणपणच्या काळ्या पापावर सफेता चढवितात! एका आयुष्यांत चेहऱ्याचे तीन रंग!

बुद्धिमती—बायकांचा चेहरा कसा लहानपणापासून मरेपर्यंत जशाचा तसा! मिशी नाहीं, दाढी नाहीं, काळें नाहीं, पांढरें नाहीं, काहीं नाहीं.

पुरुष पक्के सोंगाडे ! ” अर्जुन सोंग घेऊन स्त्रियांच्या दरबारात आलेला असल्यानें ‘ सोंगाडे ’ शब्द विशेषच हास्य निर्माण करणारा झाला आहे.

## लक्ष्मीधराची विनोद-मूर्ति

‘ तुला विनोद साधणार नाहीं ’ असा जणु शापच नाट्य-देवीनें खाडिलकरांना दिलेला दिसतो; मात्र त्याचा उश्शाप म्हणूनच कीं काय, “ लक्ष्मीधरासारखे एकच एक पण एकमेव विनोदी पात्र तुझ्या हातून घडविले जाईल ” असाहि आशीर्वाद त्याना नाट्य-देवतेने दिलेला असतो. ‘ मृच्छकटिका ’तील शकारापेक्षाहि ‘ मानापमाना ’तील लक्ष्मीधर उजवा आहे. त्याच्या शब्दाशब्दाला नाट्यगृहात हशाचा स्फोट होतो. ‘ संशय-कल्लोळां’तील फाल्गुनरावाप्रमाणे त्याच्या स्वभावात अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. खानदानी श्रीमताचा किंवा माजी संस्थानिकाचा ऐदीपणा व भित्रेपणा याचा मूर्तिमंत पुतळा म्हणजे लक्ष्मीधर !

लक्ष्मीधराचा दागिन्याचा सोस, ऐदीपणातून जन्मणारा त्याचा भित्रे-पणा आणि वर पुनः आढ्यतेची भाषा-या सर्व गुणाचे प्रतिबिंब पुढील संवादात पडलेलें दिसतें. सेनापति धैर्यधराशीं आपली तुलना तो विलास-धरापाशीं करतो.

लक्ष्मी०—अगोदर माझ्या हातांतील आगठ्यावर दृष्टि फेका, नंतर त्याचीं बोटें न्याहाळा; त्याचे बुचे कान लक्षात घ्या आणि नतर माझा भिकबाळीचा कान धरा मनात; म्हणजे मग श्रीमतात आणि गरिबात किती अंतर असतें हें तुम्हाला समजेल.

विलास०—पाहून घ्या; हातात सलकडे, पोची, काहीं आहे ?

चंपा०—इश्श ! खरेंच बोटात एकदेखील अगठी नाहीं ! कुत्रेदेखील ज्या हाडकाला चघळणार नाहीं असल्या हडकासारखीं बोटें रुक्ष दिसतात !

मालती०—इश्श ! खरेंच गळा मोकळा आहे. एखाद्या विधवेच्या गळ्यासारखा अपशकुनी दिसतो बाई !

आपल्यावरून जग ओळखून लक्ष्मीधर विलासधराला म्हणतो, “ मी भामिनी झालों असतों तर बरें झालें असतें ! मजकडे पाहून तुम्हांला

नाहीं वाटत भामिनी व्हावेसे ? तुम्हाला नाही वाटत ? अहो, असला मज-सारखा नटलेला नवरा मिळण्याची पर्वणी साधावी म्हणून, या जन्मीं नाहीं तर पुढल्या जन्मीं तरी बायकाच्या जन्माला घाल म्हणून सर्व पुरुष परमेश्वराची प्रार्थना करण्यास चुकणार नाहींत !"

लक्ष्मीधराचा सारा आधार, सारें बळ काय ते त्याच्या श्रीमतींत. भामिनीला वश करण्यासाठी शौर्य गाजविण्याऐवजीं भारीभारी दागिने तिला दाखवावेत एवढेच त्याला कळते. तो विलासधरला आपला मोहनी-मत्र सागतो, "अहो, ही पेटी म्हणजे छोटी भामिनी समजा. मोठी भामिनी पाहिजे असेल तर ही छोटी भामिनी पुढें केली पाहिजे. मोठी आहे तेथे छोटी आहे, छोटी आहे तेथे मोठी आहे, असे हे त्रागड आहे."

लक्ष्मीधराचा आळस इतका पट्टीचा कीं, 'लोळणहि भूमिवरी मोक्ष वाटे मना' अशी त्याची स्थिति. तो परमेश्वराला विचारतो, "आमच्या अगावरील मास लोण्याच्या गोळ्याप्रमाणे मऊ आहे, हें ठीक आहे; पण हीं हाडे इतकी कठीण कशाला ? कशीं आतून टोचताहेत ! देवा, आमची हाडे सोललेल्या केळ्यासारखीं केलीं असतीस तर चालले नसतें का ? आतून हे हाडाचे भाले आणि वरून हे हिऱ्याचे खडे कसे माझ्या अगात खुपताहेत ! देवा, हिरे फुलासारखे कोमल का नाहीं केलेस ? श्रीमंताच्या अगाला चिकटून राहणाऱ्या पातळ तेलाचें रूप, देवा, सोन्याला का नाहीं दिलेस ? या जाजमाखालची कठीण जमीन चढावाच्या आतूनहि माझ्या पायात सलते आहे !"

श्रीमंतहि पराक्रम गाजवितात, पण तो केव्हां व किती, हें लक्ष्मीधराच्या तोंडून ऐका—"सूर्य अस्तास जाईपर्यंत त्याना झोंप काढावी लागते. सूर्य अस्ताला जातो आहे, रात्र पडते आहे, याच्या दरम्यान, घडी अर्धी-घडी, पावघडी, लढाई करणें आम्हासारख्या श्रीमंताच्या प्रकृतीला मानवते. हे श्रीमतीचे शोक शत्रूकडील सर्व सरदारांना माहीत आहेत. छाप्याची कल्पना दारिद्र्यांनाच सुचायची." शिळोप्याच्या वेळीं घरबैठें, बोलके राजकारण करणाऱ्या नेमस्तपक्षाला लोकप्रियता भाळणार नाहीं—

ती त्यागी व पराक्रमी राष्ट्रीय पक्षालाच माळ घालील, असें खाडिलकराना येथे सूचित करावयाचे असावें.

लक्ष्मीधरासारख्या ऐदी श्रीमंतांचे जन्म–कार्य पुढील शब्दानीं सागितलें आहे. " ठिकाठिकाणीं पागलेली संपत्ति एके जागीं गोळा करून पराक्रमी पुरुषाकडे ती वाहून नेण्याकरिता परमेश्वराने उत्पन्न केलेलीं गोजिरवाणी गाढवे म्हणजे असले लक्ष्मीपुत्र होत. "

## शाश्वत आदर्श

चालू राजकारण हे नदींतील पायाखालील वाळूप्रमाणे सतत घसरणारें असले, तरी त्यातील तत्त्वें चिरस्थायी असतात. अशा त्रिकालाबाधित स्वभावाचे शाश्वत टिकणारे थोर आदर्श खाडिलकरानीं आपल्या नाटकामध्यें रगविले आहेत. एकाद्या उद्यानात माडलेले कला–सुदर व भव्य-प्रचड असे अनेकानेक पुतळे आपण पहात आहों, असाच भास प्रेक्षकाना खाडिलकराचीं नाटके पाहताना होतो. भास कवीने आपल्या ' प्रतिमा ' नाटकात रामाला पूर्वजाचे पुतळे दाखविले आहेत व त्याच्या अतःकरणांत हर्षशोकादि भावना उठविल्या आहेत, त्याप्रमाणेच ' कवि कृष्णानें ' आपल्या नाट्य–सृष्टींत उदात्त गुणाचे उच्च आदर्श मराठी प्रेक्षकजनापुढे ठेवून त्याच्या हृदयात प्रेम, श्रद्धा, सेवा, सत्यनिष्ठा, तपस्या इत्यादि गुणाची भक्ति पेरली आहे. ही त्याची कामगिरी मराठींत तरी अतुल्य आहे.

'सत्त्वपरीक्षे'तील हरिश्चंद्राला कोण विसरेल? 'दिले हे पोट फेकून' म्हणणारा त्याचा पुत्र रोहिदास कोणाच्या स्मरणातून जाईल ? ' सवतीमत्सरा 'तील सत्यप्रतिज्ञ रामचंद्र प्रेक्षकाच्या काळजावर कायमचाच कोरला जातो. ' उपभोगाची वेळ येता स्वार्थत्यागी राहिला ' या गद्यमय पद्यात वर्णिलेली ' द्रौपदी 'तील श्रीकृष्णाची त्यागी मूर्ति कोणाच्या मनातून हलेल ? व्रतपालनार्थ स्वसुखाचा होम करणारा ' विद्याहरणा'तील कच कोणाच्या स्मृतींतून गळेल ? आणि तो रामशास्त्री, तो प्रतापराव, तो धैर्यधर, या साऱ्या व्यक्ति–रेखा आपापल्या ठसठशीत गुणानीं महाराष्ट्राच्या मनो–मदिरांत कायमचे घर करून राहिल्या आहेत.

अशा आदर्श पुरुषापेक्षाहि खाडिलकराच्या नायिका अधिक जिवन्त व उदात्त आहेत. त्या नृपकन्या असोत, सुख-विलासी असोत, शृंगार-राजाला करभार देत असोत, तरीहि पण त्या ‘ विनयहीन ’ नाहींत, तर द्रव्यापेक्षा गुणाना भाळणाऱ्या, रूपापेक्षा पराक्रमाला पूजणाऱ्या आणि स्वजनासाठीं सर्वस्वाचा त्याग करणाऱ्या तेजस्वी, बुद्धिमान्, करारी व ‘ स्व–कुल–तारक ’ अशाच आहेत. सावित्री आपला निर्धार अशा तीव्र शब्दांनीं सागते कीं, “ हे प्रेम, आई, मृत्यूमुळे असें असे बिलकुल वळायचे नाहीं. माझे प्रेम, मुनिवर, मृत्युसकट तिकडच्या चरणाचा स्वीकार करीत आहे. ” असाच अभेद्य निश्चय देवयानीचा, रुक्मिणीचा, द्रौपदीचा, मेनकेचा आणि मोहनेचा–व भामिनीचाहि. खाडिलकराच्या नायिका म्हणजे त्यागपूर्ण, निश्चयी व उदार अशा घवघवीत प्रेमाच्या ठसठशीत मूर्तिच ! त्या सरस्वतीदेवीपेक्षा कालिदेवीच अधिक भासतात. कमलातून निर्माण झालेल्या महालक्ष्मीपेक्षा महिषासुर–मार्दिनीचेच तेज त्याच्या अगावर खेळत आहे.

## रुक्मिणीचें स्वभाव-चित्र

कथेच्या ओघात, सवादाच्या प्रवाहात, मोठमोठीं तत्त्वे सहज गुफून देण्याची कला खाडिलकराइतकी दुसऱ्या कोणासच साधलेली नाही. रुक्मिणी म्हणते, “ त्याना जर समजलें मी बाबाचें मन दुखविले, त्याना जर समजले, मी आईच्या डोळ्यातून अश्रुधारा काढल्या, त्याना जर समजले कुडिनपुरच्या वशच्छेदास मी कारणीभूत झाले,–माझा स्वीकार ते कसा करतील ? सुकन्याच गृहिणीपदाला चढत असतात. ”

रुक्मिणी ही एक बुद्धिमान्, प्रेमळ व त्यागी अशी नायिका खाडिलकरानी दाखविली आहे. आपल्या घराण्याला रक्तपाताचा कलक लागू नये म्हणून ती आपला स्वयंवराचाहि हक्क सोडून देते. तेव्हा तिचा पिता तिची स्तुति करतो, “ मुली, तूं असे बोलूं लागलीस म्हणजे हृदय भडभडून येते !—‘ तुम्ही जसे सांगाल तसे ऐकेन.’—मुली, माझे सर्व अधिकार तुला प्राप्त झाले आहेत; तुझ्या शहाणपणाने ते सर्व अधिकार

तूं मिळविले आहेस. मी सागायचेऐवजीं तूं जसे सांगशील तसें मी ऐकेन. सांग, शिशुपालाशीं तुला लग्न करायचें आहे काय ? ”

रुक्मिणीच्या दैवी गुणाचे वर्णन भीष्मकानें केल्यामुळे तिचा विनय व रुक्मीचा उद्दामपणा या दोन्ही वृत्ति कशा उचंबळून आल्या पहा—

भीष्मक—मला वाटतें, श्रीकृष्ण विष्णूचा अवतार असून महालक्ष्मीच माझी मुलगी आहे.

रुक्मिणी—बाबा, ही काय भलतीच स्तुति !—ते अवतार आहेत, हें खरे पण मी–मी त्याच्या परसातली पत्रीहि होण्यास योग्य नाहीं.

भीष्मक—नाहीं, मुली, तसें नाहीं; तू महालक्ष्मीचाच अवतार असली पाहिजेस—

रुक्मिणी—नका बाबा, असें बोलू नका !—दादाने हें जर ऐकले तर तो रागानें लाल होईल.

भीष्मक—होईना लाल ! तुम्ही दोघेहि अवतार असून तुमचा छळ करणारे जरासंध, शिशुपाल, रुक्मि हे दैत्य— [ रुक्मि येतो.

रुक्मि—आम्ही दैत्य ! तो गवळी देव आणि ही चुरूचुरू बोलणारी जीभ देवी !

## मनःस्थितीचें शब्द-चित्र

श्रीकृष्णाच्या दर्शनानें रुक्मिणीची मनःस्थिति किती बावरली-गागरली याचें शब्दचित्र खाडिलकरानीं ‘ स्वयंवरात ’ बारकाईनें कसे काढलें आहे, पहा—

कृष्ण—रुक्मी, शिशुपाल, जा तुम्हाला सोडून दिलें आहे. ह्या शुभागीच्या प्रथम दर्शनाचे महोत्सवाचे वेळीं तुम्हाला बंधमुक्त केलें आहे.

रुक्मिणी—( स्वगत ) मी अशी गोंधळून कशी गेलें आहे !—बाबा येथें नाहींत—मी बोलूं तरी कशी याच्याशीं ?

कृष्ण—जा, तुम्हांला बंधमुक्त केलें आहे—असे उभे कां ? असे भाबावल्यासारखे का ? असे वेड्यासारखे—

रुक्मिणी—आपलें दर्शन कोणाला वेड लावणार नाहीं ?

कृष्ण—हें दर्शन सर्वांना वेड लावील.—जा, रुक्मी, तुझ्या बहिणीनें तुला बंधमुक्त केलें आहे. जा शिशुपाला, ह्या त्रैलोक्य-सुंदरीच्या कोमल अंतःकरणानें तुझ्यावर दया केली आहे. नाजुक अबलांनीं लावलेले वेड कठोर वृत्तींना मर्यादित करीत असतें.

आपल्याला श्रेष्ठ, पूज्य वाटणाऱ्या थोर माणसाची गाठ पडली, म्हणजे आपलें चित्त कसें गलबलून जाते व आपण काय बोललो हेंहि कसें पुढे आठवत नाहीं, या अनुभवाचे मानसशास्त्रीय दर्शन खाडिलकरांनीं पुढील उद्गारानीं घडविले आहे—

रुक्मिणी—ते काय बोलले ते मला आठवते; पण मी काय बोलले, हें मला आठवतच नाहीं—त्याचे पाहणे, त्याचे वागणे, त्याचे बोलणे सर्व सर्व आठवतें-आता मी त्याना पाहत आहेसे वाटतें, आता ते माझ्याकडे येताहेतसे वाटते, पण बाई, माझे मला काही आठवतच नाहीं!—माझी स्वतःबद्दलची शुद्धच तेव्हापासून नाहींशी झालेली दिसते; नाहींतर मी इतकी निर्लज्जपणाने वागले असते का?

आनंदाने बेभान झालेली रुक्मिणी आपल्या दासीला आपले अंतःकरणच जणुं उघडून दाखवीत आहे. हा भावनेचा उकाला, हा रसाचा विस्तार त्या त्या प्रसंगाला किती उठाव देतो! रुक्मिणी दासीला सागते, "अग, ते आल्याची बातमी सर्वांच्या अगोदर मला समजली; अग, हे बघ कीं नाही, सर्वांच्या अगोदर मीच त्याना पाहिले. आणि मी अगोदर ओळखले तेच ते म्हणून. अगोदर ओळखले; सर्वांच्या अगोदर मीं ओळखलें; दादाच्या अगोदर मी त्याना पाहिले, आईच्या अगोदर मीं त्यांना पाहिले; बाबाच्या अगोदर मी पाहिले, सर्वांच्या आधीं मीं पाहिलें. दुसरे कोणी नाहीं प्रथम पाहिले; प्रथम मीं पाहिले."

रुक्मिणीच्या प्रणयी मनातील आदोलनें खाडिलकरानीं अत्यंत कौशल्यानें रेखाटलीं आहेत. 'कृष्ण जळाला!' अशी कुवार्ता कानीं येताच तिच्या हृदयात कल्पनेचे कोणते तरंग उठले हें तिच्या पुढील काव्यमय शब्दानीं ध्यानीं येते. "त्यांचे दहन झाल्यावर ह्या लताना नवीन पालवी का फुटावी? ह्या नव्या कळ्या फुलझाडावर कशा दिसाव्या? आम्रमंजरीचें

सुगंधी द्रव्य वाहणारा वायु दिमाखानें कां फिरूं लागावा? ती मदनमूर्ति जळून खाक झाल्यावर हा वसंतकाळ कसा जिवंत राहिला?—काय म्हणता, मी त्याच्या प्रेमाशीं बेइमानी करून शिशुपालाच्या गळ्यात माळ घालीन म्हणून मजवर सूड उगविण्याकरितां तुम्ही पृथ्वीवर रेंगाळत आहा?—"

त्याच प्रेममय तन्मयतेत रुक्मिणी निसर्गाला उद्देशून म्हणते, "फुलानो, तुम्ही खुशाल फुला; श्रीकृष्णाच्या यशाच्या फैलावाशिवाय तुम्ही दुसरें-तिसरे कोणते कार्य फुलून करणार? वायो, खुशाल वाहा; श्रीकृष्णाच्या गुणाशिवाय दुसरे द्रव्य तुझ्यापाशीं कोणते असणार?—कोकिले, खुशाल गा; श्रीकृष्णाच्या लीलाच तूं गाणार ना? ये वसंता, खुशाल ये; सर्व सृष्टि कृष्णमय झाली आहे, तेव्हा तूंहि कृष्णमयच असला पाहिजेस, आणि श्रीकृष्णाची आनंदाची बातमी तू सागणार असला पाहिजेस."

आपला प्रियकर खुशाल आहे हे कळताच रुक्मिणीला जो हर्ष झाला, त्याचे चित्रण खाडिलकरानीं पुढील सवादाने केले आहे.

रुक्मिणी—चंद्रेश्वरा, तुम्हीं आनदाची बातमी सागितली म्हणून तुम्हांला मी द्वारकेस तेथे सुवर्णाचे घर बक्षीस देईन.

स्नेहलता—आणि मला ग रुक्मिणी?

रुक्मिणी—तुला हिऱ्यामोत्याचे घर बक्षिस देईन; झाले?

स्नेहलता—ह्याना सोन्याचे, मला हिऱ्यामोत्याचे, आणि तू ग कोठें रहाणार?

रुक्मिणी—द्वारकेस प्रेमाचे घरात, श्रीकृष्णाचे प्रेममंदिरात.

करिन यदुमनीं सदना, रुचिर सदन पति-मन सतींना ॥
अशुभ मणिमय भुवन अबलाना, जरी नाथ रमेना ॥

आपल्या बुद्धि–चातुर्यानें रुक्मिणी आपल्या भावाला वादात कशी निरुत्तर करते, हें पुढील चार ओळीवरूनहि कळून येते, "दादा, तूं मनात आणलेंस तर स्वयंवराच्या मडपाचा विध्वंस होऊ देणार नाहींस. विदर्भ देशाचे शौर्य इतकें जाज्वल्य आहे कीं, माझ्या स्वयंवराचा मडप जाळण्यापोळण्याच्या शिशुपालाच्या वल्गना माझा दादा क्षणात फोल

करून सोडील. मंडपाचा विध्वंस होण्यानें आमच्या घराण्याची होणारी बेअब्रू वाचविण्याचें सामर्थ्य, दादा, तुझ्या मनगटात असताना, मंडपाचें संरक्षण कसे करावे, हें मला का विचारतोस ? ”

## प्रेम व वैराग्य यांची मूर्ति

‘स्वयंवरा’तील रुक्मिणीप्रमाणेच आपल्या प्रेम-साफल्याच्या स्वप्नात दंग झालेली सावित्री म्हणते, “ मला आमंत्रण —घरच्या घरीं कोण कोणाला आमंत्रण देणार ? जेथली मी मालकीण— मनाने झालेच आहें, जनाच्या दृष्टीनें व्हावयाची आहे—जेथली मी मालकीण व्हावे म्हणून रोज जगदंबेची प्रार्थना करितें, तेथले आमंत्रण मला कशाला ? मला कोणी बोलाविलें नाहीं म्हणून मीं म्हटले, बरे झाले—बोलावले नाहीं, जरूरी आहेसें वाटते ?—नाहीं हो नाहीं—रात्रंदिवस आपल्या पायाची सेवा करणे हाच जिला मोक्ष वाटतो तिला कशाला पाहिजे आमंत्रण ?—आमंत्रणाची जरूरी नाहीं असे आपण म्हटलेत, पदरीं घेऊन मला पवित्र केलेत, महापूजेच्या मालकीचा हक्क सासूबाईंच्याइतकाच माझ्याहि पदरात टाकलात आणि दुसऱ्याना आमंत्रण देणारी आपल्या घरची मी मालकीण झाले—आपण परत आला म्हणजे मीच पाहिजे तर आपणालाहि आजच्या महापूजेचें आमंत्रण देतें.” प्रेमी हृदयाचे हे ठळक छायाचित्रच नव्हे काय ?

सावित्री व सत्यवान याचा एक प्रेम-संवाद नमुनेदार आहे. त्यात दोघाच्याहि मनाची उतावीळ स्पष्ट झाली आहे. तो संवाद असा—

सावित्री—असली सून पाहिजे, असे उद्गार ज्यावेळीं ऋषिपत्नींच्या तोंडून निघाले त्यावेळीं त्या काय म्हणाल्या—आठवत नाहीं काय ?

सत्य०—मी त्यावेळीं गुरुजींशीं बोलत होतों. आई काय म्हणाली मला ऐकूं आले नाहीं—सांग आई काय म्हणाली ते. सांगना आई काय म्हणाली—

सावि०—सांगूं ?—सांगू ?—सासूबाई—म्हणाल्या—सासूबाई—

सत्य०—सासूबाई नको म्हणूं—माझी आई काय म्हणाली ?

सावि०—आपल्या मातुःश्री—माझ्या सासूबाई म्हणाल्या—होय, सासूबाई म्हणाल्या—ऐकायचे नाहीं वाटते मी काय बोलतें ते—म्हणाल्या—सासूबाई म्हणाल्या—नाहीं ऐकावयाचे तर मी तरी कशाला सागू ?

सत्य०—साग ना आई काय म्हणाली तें—साग ना—

सावि०—सासूबाई म्हणाल्या—सासूबाई काय म्हणाल्या तें ऐकायचे असले तर सागते, नाहीं तर नाहीं--सागू सासूबाई काय म्हणाल्या तें ?

सत्य०—साग ना—साग—बरे साग, सासूबाई म्हणाल्या—

सावि०--सासूबाई म्हणाल्या, अशी सून मिळायचे भाग्य कोठें आहे आमचे ? होय ना, असेच म्हणाल्या ना ?—होय—त्यावेळीं ऐकणे झालें होते—माझ्या तोंडून वदवायचे होते म्हणून आठवण नाहींशी झाली होती होय ना ? असेच ना ? ”

सावित्रीचा निर्धार म्हणजे वज्रलेप ! सत्यवानाच्या मृत्यूचे भयानेहि तो भंगत नाहीं. ती आपल्या आईबापाशीं किती बुद्धि-चातुर्याने युक्तिवाद करते पहा,

“ मृत्यूला न भिणे, हाच तर मृत्यू तरून जाण्याचा उपाय आहे—मृत्यु नाहीं कोणाला ? आम्हा सर्वांना मरण आहे; आमचा मरणाचा दिवस समजला नाहीं, तिकडचा समजला, एवढाच फरक ना ? त्या एवढ्या फरकासाठीं मी मृत्यूपुढें हार का खाऊ ? ”

पुनः दुसरा कोटिक्रम—

“ त्याना सोडून दुसऱ्या कोणालाहि मी वरिले तरी माझे सर्व आयुष्य दुःखातच जाणार; मग सुखाचे एक वर्ष तरी मी हातचे का दवडू ? ”

शेवटीं सावित्री असा सूक्ष्म प्रश्न टाकते,

“ एक वर्षानंतर मृत्यूने त्याना गाठल्यावर मीहि मृत्यूला माझे प्राण अर्पण करीन, ह्यात आई, बाबा, जराहि सदेह मानू नका.-एक वर्षाने मी मरावे का आजच मरून जावे ? बाबा, आपल्या मनात येईल ते खरं ” साबरमतीच्या तुरुगात शिक्षा भोगीत असताना १९२९ सालीं खाडिलकरानीं निर्माण केलेल्या सावित्रींचे तोंडून ‘ गोड सत्याचे धडे ’ ऐकूं यावे यात नवल काय ? चातुर्य, निर्धार, श्रद्धा, भक्ति आणि त्याबरोबरच

प्रणय, वात्सल्य, इत्यादि गुणाची मूर्ति अशा नायिका निर्माण करण्यात खाडिलकर यशस्वी झाले आहेत.

## द्रौपदीचा तेजस्वीपणा

'द्रौपदी' हें नाटक १९२० सालीं खाडिलकरांनीं लिहिले. नाना रसाचे कल्लोळ उठविणारा द्रौपदी-वस्त्र-हरणाचा प्रसंग ! त्यावर गोविंदराव टेंबे यानीं 'पट-वर्धन' व ब्रामणगावकर यांनीं 'आत्म-तेज' हीं नाटके लिहिलेलीं आहेत. पण त्याच्यापेक्षा खाडिलकराचे 'द्रौपदी' नाटक अधिक रसपूर्ण, तत्त्वनिष्ठ व परिणामकारक झाले आहे. द्रौपदीचा आत्म-विश्वास किती आहे, पहा. " बायकाना जसें कुंकू, तसें पुरुषाना स्वातंत्र्य आहे. स्वतत्र आणि सशस्त्र झालेले पाडव पुनः पराक्रम गाजवून नवे वैभव संपादन करतील. " तशीच तिची कृष्ण-भक्तिहि. ती म्हणते," श्रीकृष्णाच्या पूजेतल्या फुलाच्या प्रत्येक पाकळीगणिक जीव खर्चावा लागला, तरी ही द्रौपदी जीव खर्ची घालील. " कोणत्याहि स्त्रीची अब्रू ही सारखीच पवित्र, सारखीच महत्त्वाची, सारखीच रक्षणीय हे पुत्रप्रेमानें अध झालेल्या धृतराष्ट्राच्या चित्तावर ठसविताना खाडिलकराची द्रौपदी चैतन्यपूर्ण उद्गार काढते. ती म्हणते, " मातेचा स्त्रीपणा—बहिणीचा स्त्रीपणा—कन्येचा स्त्रीपणा—सर्व स्त्रीपणा सारखाच;—त्या स्त्रीपणाच्या लाजेची मर्यादा ह्या राजसभेने मानायची नाहीं तर कोणी मानायची ? आई, बहीण, मुलगी, धर्मपत्नी ह्यांच्या स्त्रीपणाची ओळखच नाहीं, आणि बाजार-बसवीच्या स्त्रीपणाची तेवढी माहिती आहे, इतकें नादान, भीष्मानीं वाढविलेले हें कुरूचें कूळ कधीं झालें ? धृतराष्ट्रमहाराज, आपल्या मातोश्रीचा आणि आपल्या आजीचा—सत्यवतीचा—जो स्त्रीपणा, तोच ह्या द्रौपदीचा स्त्रीपणा; सुयोधनमहाराज, गाधारी सासूबाईचा जो स्त्रीपणा तोच ह्या द्रौपदीचा स्त्रीपणा, ह्या राजसभेंतील सर्व पुरुषानो, तुम्हा सर्वांच्या मातांचा जो स्त्रीपणा तोच माझा स्त्रीपणा; त्या स्त्रीपणाला ह्या लाजिरवाण्या स्थितींतून सुटून जाण्याची परवानगी द्या. "

हें झालें सर्वसामान्य स्त्रीत्वाचें स्वरूप; पण स्वतःविषयीं बोलताना तर

ही पिंजऱ्यांत कोंडलेली सिंहीण गर्जते, “ मी दासी नाहीं, स्वतंत्र आहें.– मी जर दास्य कबूल केलं तर माझी पुण्याई, हंबरडा फोडून आईला बोलावल्याप्रमाणे विश्वातल्या पुण्याईला माझ्या मदतीला कशी आणील ? सर्व अणुरेणूत भरलेल्या विश्वाच्या स्वतत्र पुण्याईला दासाकडे पाहून पान्हा फुटत नाही; स्वतःचे तान्हुलें हे नव्हे, असे त्या विराटस्वरूपी स्वतंत्र शक्तीला वाटते !–मातेला पान्हा न फुटेल असले तान्हुले ह्या नव्या कृष्णजन्माचे वेळीं ह्या सभेच्या दृष्टीला कसे पडेल ? ” भावना व तत्त्व-विवेचन याचा किती सुदर मेळ !

## भामिनीची स्वभाव-रेखा

रुक्मिणी, द्रौपदी, तारामती या तर पुराणांतच तेजस्वी स्त्रिया म्हणून रंगविलेल्या आहेत. तेव्हा त्याची छायाचित्रे आपल्या नाटकात चमकदार रंगाने रगविणे खाडिलकराना सोपें होते. पण कल्पित कथानकातील ‘ धनी मी ’ म्हणणारी ‘ मानापमाना ’तील श्रीमत कन्या भामिनी हिचाहि स्वभाव त्यानीं बाणेदार व उदार असाच रेखाटला आहे. ती स्वतःविषयीं म्हणते, “ ही भामिनी दुसऱ्याचे उदाहरण पाहून वागणारी नाहीं. माझ्या वर्तनाचा कित्ता इतराना घालून देण्याकरता मी जन्मास आलें आहे. ” भामिनीचा हा जसा स्वाभिमान, तसाच दुसऱ्याचाहि स्वाभिमान जपण्याइतका तिचा स्वभाव दिलदार आहे. दरोडेखोराच्या वेषात येऊन आपल्यावर हल्ला करू पाहणाऱ्या लक्ष्मीधर-विलासधराना ती सागते,— “ तुमच्या या अशा धमकावणीला मी भीक घालणार नाहीं; पण तुमचीच काय, कोणाचीच बेअब्रू चारचौघात व्हावी अशी माझी इच्छा नाहीं. ” भामिनीच्या पराक्रमामुळें खूष झालेला धैर्यधर तिला लक्ष्मीधराचे सारे दागिने बक्षीस देऊ करतो, तेव्हाहि तिचें औदार्य असेंच प्रगट झालें आहे. ती धैर्यधरास म्हणते, “ साप्रतच्या युद्धांत आपल्या घरचे कर्ते पुरुष पडल्यामुळें जीं कुटुंबें अनाथ झालीं असतील त्याना मदत करण्याकडे हे दागिने विकून येईल ती रक्कम खर्च करण्याची मला परवानगी असावी.”

खाडिलकराची लेखणी संगीतात कितीहि रंगली, शृंगारात कितीहि

गुंगली, तरी ती धैर्य–औदार्य–सत्यादि गुणाचा गौरव करण्याचे आपलें कुलव्रत कधींच सोडीत नाहीं. भामिनीचा रंगभूमीवरील प्रथम प्रवेशच ऐटीचा व बाणेदारपणाचा आहे! 'मी साफ येणार नाहीं' अशी कुर्रेबाज भाषा बोलतच ती पडद्याबाहेर येते. हेच शब्द आधीं नटीच्या तोंडीं खाडिलकरानीं घातले आहेत. नाटकातील मध्यवर्ती कल्पना नटीनें बोलावयाची व तोच धागा घेऊन नायिकेनें प्रवेश करावयाचा, अशी साधे–जोड करण्यात खाडिलकराचा हातखंडा आहे. 'ही मी आले जळायला' अशी निश्चयी वाणी उच्चारीत मेनकाहि येते. 'नेमली अबला–काया। पतित उद्धराया।' अशी स्त्रीत्वाची महति खाडिलकर सर्वत्र गातात.

## वीर–रमणीचें चित्रण

'काचनगडच्या मोहने'तील प्रतापरावाची स्वातन्त्र्य-निष्ठा जितकी अढळ, तितकीच त्याची पत्नी मोहनेची पति-निष्ठा अभंग. तिच्या असहाय स्थितींत तिच्या अब्रूवर उठलेल्या फितुरांना ती म्हणते, "कसायानो, चाडाळानो, हरामखोरानो, दगा करून आमचा सर्वांचा केसानें गळा कापलात का? चाडाळा, पाप्या, पतिव्रतेचा तूं छळ माडिला आहेस. काचनगडच्या पूर्वेच्या त्या बुरुजाप्रमाणे तुझ्या शरिराचे कळपे कळपे तुटून पडून मेल्या तुझा नाश होईल. दारूच्या कोठारात सापडून, जळून होरपळून, तुला मृत्यु येईल! जगदबे, काचनगडाबरोबरच तिकडचे सर्व बेत कोसळून गेले ना? आणि हे सर्व माझ्या पायीं!"

हा सर्वनाश आपल्यामुळें ओढवला हें जाणून मोहना शोक करते, "शत्रूला जिंकून तुम्ही गडावर परत आला म्हणजे रत्नखचित निराजनाची आरती हातात घेऊन तुमच्या यशाचें शुभ्र तेज तुमच्यापुढें ही दुर्दैवी मोहना आतां आणीत नाहीं, तर मोहनेच्या पायीं तुमच्या गडाचे तुकडे तुकडे होऊन, त्यांतून निघणारा हा काळाकुट्ट धूर, ह्या भयंकर ज्वाळा आरतीचे ऐवजीं तुम्हांला पहाव्या लागणार! देवा, मला जन्माला घालून, माझ्यामुळें, माझ्यापायीं, त्याच्यासारख्या नरवीराच्या

हालअपेष्टेस प्रारंभ केलास, त्यापेक्षां मला जन्मालाच घातली नसतीस तर फार बरें झालें असतें ! ”

## सेवेचा ध्येयवाद

क्रोधाचे आहारीं गेलेल्या विश्वामित्राला आपल्या भक्तीच्या व सेवेच्या बळावर जिंकूं पहाणारी ‘ मेनका ’हि उदात्त स्वभावाची दाखविली आहे. ती म्हणते, “ नवी सृष्टि उत्पन्न करण्याच्या पायरीला ज्याची तपश्चर्या चढली आहे, त्याचे मन प्रसन्न करून घ्यायला सेवेशिवाय दुसरा मार्ग कोणता आहे ? ” या सेवेचा, तिच्यातील श्रमाचा आनंद स्वर्ग–सुखा-पेक्षाहि श्रेष्ठ का आहे, याची मीमासाहि मेनकेच्या तोंडीं खाडिलकरांनीं घातली आहे. ती अशी, “ येथे शरीर राबविणे हेच सुखाचे साधन मुख्य आहे. येथें मृत्युलोकीं क्षणाक्षणाला शरीर मरत असतें, आणि प्रत्येक क्षणाला मनुष्य स्वतःचे श्रमाने तें ताजेतवानें करतो; म्हणून स्वतःच्या पराक्रमाचें सुख मनुष्याला मिळतें.–स्वर्गांत पराक्रमाचें सुख नाहीं.······ सेवेकरिता राबवायला लागल्याबरोबर ह्या मानवी देहाच्या अणुरेणूंतहि स्वर्गसुख सांठलें आहेसे मला वाटते. मनोभावें राबणे म्हणजेच पृथ्वीवरचा स्वर्ग. क्षीरसागरातल्या सुखाला दूर सारून परमेश्वरहि मृत्यु लोकाच्या ह्याच राबण्याच्या सुखासाठीं अवतार घेत असतो. ”

## राजकीय रूपक

अशा तात्त्विक व शाश्वत विचाराची बैठक ‘ मेनके ’ला खाडिलकरांनीं जशी दिली आहे, तसेंच तात्कालिक राजकारणाचें रूपकहि त्यात गोंवलें आहे. त्या वेळचीं पोकळ कौन्सिलें म्हणजे मायावी इद्रसभा, त्यात अप्सरांच्या नादीं लागलेले संधिसाधु पुढारी याना वृद्धानद. बालमूर्ति वगैरे शिष्यांच्या रूपानें खाडिलकरानीं लुगडीं धुणारे, पाणी वाहणारे, बैल-रेडे-कुत्रीं इत्यादि स्वरूपें देऊन झणझणीत टीका केली. कॉंग्रेसनें बहिष्कार घातला हें विश्वामित्र अंतर्धान पावतो या घटनेवरून सूचित केलें. इंद्रासनावर बसण्याची शिष्यांची घाई म्हणजे मंत्रिपदें बळका-वण्याची हावरी उतावीळ. पांढऱ्या दाढीचा त्यानीं केलेला त्याग म्हणजे

संधिसाधूंनीं पाढरी गाधी-टोपी टाकणे. अशा सद्यःस्थितीच्या चौकटींत शाश्वततेचें तत्त्वज्ञान माडणे आणि तरीहि कलापूर्ण कृति निर्माण करणें हें तिहेरी कौशल्य एकट्या खाडिलकराचेच !

## सत्यनिष्ठेचीं दैवतें

सत्याचा महिमा खाडिलकरानी आपल्या नाटकातून वारवार गाइलेला आहे–गाधीजींचे शिष्यत्व स्वीकारण्यापूर्वींहि. त्यातहि ‘ सत्त्वपरीक्षा ’ व ‘ सवती-मत्सर ’ हीं त्याचीं दोन नाटके म्हणजे तर सत्य-नारायणाचीं स्तुतिस्तोत्रेंच होत. सत्य-प्रतिज्ञ हरिश्चद्राचे करुण चरित्र ‘ सत्त्व-परीक्षे ’-मध्यें प्रेक्षकाच्या डोळ्यातून पाणी काढते, पण त्याच्या कानामनात ‘ प्रतिज्ञेसाठीं ! प्रतिज्ञेसाठीं ! प्रतिज्ञेसाठीं ! ’ हा मंत्रघोष घुमविते. तसाच ‘ सवती-मत्सरा ’तील रामचद्र. तो तर, स्वताच्या नव्हे पण, पित्याच्या प्रतिज्ञा-पालनार्थ राज्यत्याग करतो. या अलौकिक प्रसगावर किर्लोस्करांनीं ‘ राम-राज्य-वियोग ’ हे नाटक लिहिलें, पण तें अपुरेंच राहिलें. खाडिलकरानीं ते कार्य पूर्णतेस नेले–आणि अत्यंत प्रभावी रीतीनें. राम व लक्ष्मण या दोघाचीहि स्वभाव-चित्रें त्यानीं इतकीं सुरेख रेखाटलीं आहेत कीं, किर्लोस्करानींहि कौतुकाने मान डोलवावी. आपली अभंग सत्य–निष्ठा किती नम्र भाषेनें राम व्यक्त करतो आहे—“ आई, ज्या सत्याच्या तपश्चर्येवर विश्वाची जोपासना अवलंबून आहे, तें सत्य इतकें सोपें आहे कीं, सत्याच्या पालनाकरिता दशरथमहाराजासारख्या नामाकित वीरांनींच कंबरा कसल्या पाहिजेत, असें मुळींच नाहीं.–बाबाच्या तेजापुढे राम म्हणजे एक काजवा आहे–पण सत्याचें पालन काजवाहि सहज करूं शकतो ! ”

सामर्थ्यापेक्षांहि सत्याला राम अधिक किंमत देणारा आहे. तो म्हणतो, “ लक्ष्मणा, माझ्या बाहूतील शक्ति म्हणजे सत्याची शोभा होय.–मनुष्य मेल्यावर त्याच्या शरिरावरचे वस्त्रालंकार जसे टाकाऊ ठरतात; त्या-प्रमाणेंच सत्य सोडल्यावर शक्ति टाकाऊ ठरते. सत्य सोडून शक्तीचा नाद धरणें म्हणजे प्रेतावरील कपड्याकरितां टपून बसणें होय. प्रसंग आला तर अलंकार काढून ठेवावेत, पण प्राण देऊन आत्महत्या करूं नये.”

तसेच राम दशरथाला आपल्या जीवनाचें तत्त्वज्ञान सांगतो, " बाबा, ह्या वनवासी झालेल्या रामाबद्दल दुःख करूं नका—जन्मापासून तुमचा राम तपस्वी आहे. अयोध्येचे सिंहासन आणि दंडकारण्यातील वनवासाचें दर्भासन दोन्ही आपल्या रामाला सारखींच सुखाचीं आहेत."

## बंधुप्रेमाच्या छटा

भरताचे गुण-ग्रहण किती उदार भावनेने राम करतो, " रामाच्या पराक्रमातील दोष भरताच्या यज्ञाने पवित्र व सुशोभित होणारे आहेत. ब्रह्मादिकानीं कष्टतर तपश्चर्येने सिद्ध केलेलीं सर्व शस्त्रास्त्रे इक्ष्वाकु—कुलाची कीर्ति पराक्रमात वाढावी म्हणून विश्वामित्र ऋषींनीं मला व लक्ष्मणाला दिल्यानंतर पुनः बजावून सांगितले. राक्षसाचा संहार करताना तुम्हा दोघांचे जर कोठे चुकले तर ते न्यून भरून काढून तुमचा पराक्रम पवित्र करण्याचे सामर्थ्य पृथ्वीतलावर आज एकट्या भरतात आहे. म्हणून म्हणतो आई, हा मुकुट भरताच्या मस्तकावर ठेवल्याशिवाय रामाला हा मुकुट पवित्र करील किंवा कसे हे समजणार नाही."

जरूर तर, भरताशींहि वैर करून, रामाचा वनवास चुकविण्यासाठीं लक्ष्मणानें कंबर कसली आहे. त्यावेळीं रामाचा निर्धार चार वाक्यातच पण वज्राप्रमाणे कसा असतो हें खाडिलकरच दाखवू शकतात. राम-लक्ष्मणाचा संवाद असा—

लक्ष्मण—आई, आशीर्वाद देऊं नकोस—लक्ष्मणाचे बाण दादांना वन-वासाला जाऊं देणार नाहीत—दादा, तुमच्या बाहूतल्या पराक्रमापुढे ह्या लक्ष्मणाची शक्ति काही नाहीं हें मला माहीत आहे, पण तुम्हाला अडथळा करताना तुमच्याशीं लढणाऱ्या ह्या लक्ष्मणाचें शिर एकबाणी रामानें धडा-पासून वेगळे करून, आपल्या ह्या सौमित्राचें मस्तक पायाखालीं ठेंचाळून, दंडकारण्याचा मार्ग आपणाला आक्रमावा लागेल—

राम०—तसे नाहीं व्हावयाचे—युद्ध करूनच मला अडथळा करावयाचा असेल—तुझ्या हट्टाला मी कोण आळा घालणार ?—सौमित्रा, तुझ्या बाणानीं विव्हळ झालेला राम वनाकडे तोंड करून जमिनीवर मरून पडलेला दृष्टीस

पडेल. रामाचा बाण, लक्ष्मणा, तुझ्याशीं लढण्याकरिता भात्यातून बाहेर पडणार नाहीं, पण वनाकडे वळलेले रामाचे पाऊल एक रेसहि मागें येणार नाहीं." लक्ष्मणावरील अपार प्रेम आणि त्याहून अधिक असे आपल्या प्रतिज्ञेवरील प्रेम रामाने किती योग्य शब्दांनीं मूर्तिमत उभे केले आहे! अशी उग्र तत्त्वनिष्ठा केवळ खाडिलकराचीच लेखणी लवू शकते. त्यानीं रंगविलेला लक्ष्मण हा उत्तम पुरुष आहे, पण राम हा पुरुषोत्तमच आहे.

## प्रतिज्ञा-पालनाचा आदर्श

हरिश्चंद्राचे चारित्र्य तर कोणाचेहि डोळे दिपविण्याजोगेच आहे. सत्यनिष्ठेचा, प्रतिज्ञापालनाचा त्याने अगदीं अतिरेक केला आणि त्यापायीं आपले हालहाल करून घेतले. ही सारी चिरपरिचित कथा खाडिलकरानीं 'सत्व-परीक्षा' या नाटकात अत्यत परिणामकारक रीतीने रंगविली आहे. वीर, करुण व उदात्त या रसाच्या अखड धाराच जणुं या नाटकातून वहात आहेत. 'प्रतिज्ञा पाळण्याकरिता!' हे शब्द घुमविणारा जणु हा गोलघुमटच आहे द्रौपदीनें मयसभेत दुर्योधनाला हिणविले, म्हणून तिला पुढे वस्त्र-हरणाचा अपमान सोसावा लागला; त्याप्रमाणे वशिष्ठ-शिष्य हरिश्चद्र काशीच्या विश्वामित्राची तपश्चर्या चंचल म्हणतो व 'जो कोणी स्वतःचे शब्दास जागणार नाहीं त्याला राज्यातून हाकलून देण्यात येईल' अशी आपली 'सत्याचरणाची द्वाही' पिटतो. त्यामुळे विश्वामित्र हरिश्चंद्राच्या राशीस लागला, असा कार्यकारणभाव नाटककारानें जोडला आहे.

"वज्र लवेल पण हरिश्चंद्राचे मन खंबीर राहील; हरिश्चंद्र एकच वाचा बोलेल व हरिश्चंद्राचे पाय एकच वाट चालतील" अशा अचल तत्वनिष्ठेचा पुतळा म्हणजे हरिश्चंद्र! त्याला दया नको, दान नको, भीक नको. 'स्वकष्टाची भाकरी' मिळविण्यासाठीं तो 'लाकडे फोडून हाडाचीं काडें करतो' दीनपणा, लाचारी, वचनभंग याचा मार्ग तो प्राणातींहि स्वीकारीत नाहीं. अशा खडकासारख्या कठीण हृदयातून प्रेमाचे व वात्सल्याचे झरे कसे वहातात हें दाखविण्यात खाडिलकरांची

सारी प्रतिभा पणास लागली आहे. बाल रोहिदासाचे एक एक उद्गार कानांवर पडले कीं श्रोत्याच्या डोळ्यातून टिपें गळतात! करुणरसाची कमाल खाडिलकरानीं या नाटकात केली आहे—आणि ते कारुण्यहि उगाच केकाटणारे, छाती पिटणारे नाहीं; तर अत्यत सयमी, त्यागपूर्ण व कलात्मक असे आहे.

## कारुण्याची धार

"आई, आई, माणसे विकावयाचीं म्हणजे काय ग?" हे रोहिदासानें तारामतीला पुनः पुनः केलेले सवाल म्हणजे त्यावेळीं तरुण भारतीयाच्या अंतःकरणात गुलामगिरीची जी चीड पेटली होती, तिच्याच ज्वाला होत. काबाडकष्ट करून व स्वतः उपाशी राहून हरिश्चद्राने, आपण गुलामगिरींत शिरण्यापूर्वीं, जी करपलेली भाकरी रोहिदास—तारामतीसाठीं आणलेली असते, ती कारुण्याची गंगोत्रीच वाटते. 'मातेच्या स्तनपानाहूनहि' तिच्यातून अधिक अमृत स्रवते. 'करपलेल्या भाकरीचे कोळसे मिष्टान्ना-प्रमाणे मिटक्या मारीत' तीन दिवसाचा भुकेला रोहिदास खातो व "माझी जीभ तर अमृताच्या झऱ्याला बिलगली आहे!" असा आनंद दाखवितो, ते पाहून कोणाच्या हृदयाला पाझर फुटणार नाहीं? त्याहून हृदय पिळून काढणारा त्या चिमुरड्याचा सवाल म्हणजे "आई, आज मी म्हटले का ग तुला, मला भूक लागली आहे म्हणून! मग तू का रडतीस?" शेवटीं 'भूक! भूक!' 'अन्न! अन्न!' करीत रोहिदास मरतो. परतत्र हिंदुस्थानातील अन्नान्न करणाऱ्या बालकांचे हे चित्र त्यावेळीं कोणाचे हृदय भेदून जात नसेल?

## मरणाचें तत्त्वज्ञान

आपल्या मरणाचे दुःख आपल्या आईला वाटूं नये, म्हणून रोहिदास तारामतीला म्हणतो, "मातीने पान व्हावें, पानाने फूल व्हावें, फुलानें फळ व्हावें, फळातून पाखरूं निघावें, पाखरानें काजवा व्हावें, लहान काजव्यानें चादणी व्हायचे, चादणीने चंद्र व्हावयाचें, चद्रानें सूर्य व्हावयाचें, ह्यालाच मरण म्हणतात.—आई, मी मरत नाहीं, तर चिमुकला

रोहिदास थोरला हरिश्चंद्र चट्दिर्शी होत आहे." आणि रोहिदासानें प्राण सोडल्यानंतर त्याचें कारण कोतवाल तारामतीला विचारतात. तेव्हा 'बाळ कसा मेला?' असा पुनः पुनः हबरडा फोडून तारामती जो विलाप करते, तो दगडालाहि पाझर फोडण्यासारखा आहे. तसाच स्मशानात तारामतीच्या तोंडून रोहिदासाच्या मृत्यूची वार्ता कळताच हरिश्चंद्राने केलेला शोकहि हृदयाचे पाणी पाणी करणारा आहे. "माझ्या बाबा रोहिदासा, गुरो रोहिदासा, देवा रोहिदासा!" असे म्हणून हरिश्चंद्रानें जो टाहो फोडला, तो कोणाचेहि काळीज करपविणाराच आहे. तारामतीच्या लिलावाचे वेळींहि "माझ्या दुसऱ्या प्राणा, माझ्या दुसऱ्या मना, माझ्या दुसऱ्या शरीरा' अशा हरिश्चंद्राने मारलेल्या हाका हृदय हलवून सोडतात. एकाहून एक मोठमोठ्या व उच्च उच्च अशा शोक-सागराच्या लाटा नाटकात एकसारख्या उठत असतात. पार्श्वभूमि म्हणून काशींतील पंड्याच्या लीला, गोसावी, भिक्षुक व गपूशेठ याचा खादाडपणा आणि चित्रगुप्ताचा कारकुनी कावा याचा विनोद माडलेला आहे. 'राजसन्यासा'तील जिवाजीच्या कलमेश्वराच्या मानाने 'कारकुनी दौतीचा महिमा' सुमारच वाटतो. 'दुबळे शरीर, भित्रे मन आणि कुचकी बुद्धि' ही कारकुनी वृत्ति चागली रगविली आहे. पण मुख्य ठसा उमटतो हरिश्चंद्रादींच्या त्यागमूलक तत्त्वनिष्ठेचा. 'गुलामगिरी म्हणजे अक्रूला येणारा मृत्युच' हे आपले राजकीय तत्त्वज्ञान खाडिलकरानीं या नाटकात गोवले आहे आणि 'सत्यमय पृथ्वीची स्थापना' करण्याचे दिव्य स्वप्न रंगविलेले आहे.

## सेवा व प्रेम यांचें द्वंद्व

सत्यवानाचे स्वभाव-चित्र सुस्पष्ट आहे. पितृभक्त, सेवापरायण व पराक्रमी असा हा वनवासी तरुण सावित्रीच्या प्रेमपाशांत सापडूं लागला, तेव्हा तो मनात म्हणतो, "प्रदक्षणा वटवृक्षाला, पण दृष्टि एकसारखी माझ्याकडे! पण मी काय म्हणून येथे उभा रहावे? माझे पाय आश्रमाकडे वळलेले पण माझे डोळे वटवृक्षाकडे! उशीर का झाला म्हणून बाबानीं

मला विचारलें, तर मी काय सागूं ?—आईच्या सेवेंत अंतर पडले, तर हा नवा ससार मला कसा तारील ?—पण ही का प्रत्येक वळणाचे वेळेला मजकडे पाहून माझे प्राण माझ्या डोळ्यातून बाहेर ओढून नेत आहे ?—नको, नको, सावित्री, सकटात दिवस काढीत असलेल्या माझ्या वृद्ध आईबापावर दया कर आणि प्रेमपाशात मला बाधून त्याच्यापासून मला दूर दूर नेऊं नकोस.–अजून सपल्या नाहींत. हिच्या प्रदक्षणा–प्रत्येक प्रदक्षणेला माझ्याभोवतीं एक एक बधनाचा वळसा पडत आहे व माझ्या शीलाचा कोडमारा होत आहे, असे मला वाटते.”

सत्यवानाचे गुण सावित्रीच्या नजरेस पडले आणि म्हणून ती त्याचे वर्णन करते, “ मातापितराच्या सेवेला वाहून घेतल्यामुळे परपीडेच्या पापाचे भय ह्याना पावलोपावलीं वाटते ! पृथ्वी पादाक्रात करण्याची मनगटात धमक, परोपकाराची स्वयभू हौस, आणि परपीडेचे पातक लागू नये म्हणून अहिंसेचे स्वीकारलेले व्रत–असल्या गुणाचा समुचय म्हणजे पृथ्वीवरील स्वर्गच होय.”

## श्रीकृष्णाचें स्वभाव–चित्र

श्रीकृष्णाचे शौर्य व औदार्य हे दोन्ही गुण प्रगट करणारे त्याचे पुढील भाषण रसपूर्ण आहे. तो रुक्मिणीला म्हणतो, “राजकन्येची इच्छा असेल, तर शिशुपाल, जरासध, किंवा रुक्मी, ह्या तिघापैकीं, पाहिजे त्याच्याशीं, किवा एकदम तिघाशी मिळून ह्या मडपात द्वद्वयुद्ध करण्यास मी तयार आहे. इतकेच नव्हे तर ह्या तिघापैकीं पाहिजे त्याच्या–किवा तिघाच्याहि–रक्ताचा सडा ह्या मडपात घालून, किंवा तिघाच्याहि शरिरातील एक बिंदुहि जमिनीवर न साडता, तिघानाहि हतवीर्य करून, जमिनीवर पाडून, तिघाच्याहि डोळ्याना स्वयवराची माळ ह्या छातीवर लोळलेली पहावयास लावण्याचे मला सामर्थ्य आहे. पण रुक्मिणी, तुला जर हा शिशुपाल पसत असला, तर खुशाल त्याच्या गळयात माळ घाल; तुझा ससार दुःखाचा करावा म्हणून मी कोणाशींहि युद्ध करणार नाहीं, असे तुला आश्वासन देतो. ”

श्रीकृष्णाचा सत्यप्रिय स्वभाव पुढील मोकळ्या शब्दानीं व्यक्त झालेला

आहे. " महाराज, मी गवळ्यात लहानाचा मोठा झालो, मी गवळ्यात नाचलो बागडलों, मी गवळ्यात पैलवानी करून धष्टपुष्ट झालो; तेव्हा मला गवळी म्हटल्याने जितका आनद होतो, तितका आनंद सम्राट किंवा देवेंद्र म्हटल्यानेहि होणार नाहीं. "

तो अभिमानाने सागतो, " माझा धंदा राजाचा आहे. उत्तम गवळी ज्याप्रमाणे गाईंना सहज वळवितो, त्याना बाधतो, त्याचे दूध काढतो, त्याप्रमाणे मी राजाना सन्मार्गावर आणतों, नीतिबधार्नी राजाना बाधून ठेवतो, आणि सौख्यशातीच्या दुधाचे रतीब सर्वांच्या घरीं मी घालतो. मी गवळी म्हणून स्वयवराला आलो नसून, माझा धदा राजाचा ह्या नात्याने रुक्मिणीच्या स्वयवराला आलो आहे. "

नायक व नायिका हे कोणताहि नाटककार थोर गुणाचेच दाखवितो, पण खाडिलकरानीं ' द्रौपदीं 'तील विपक्षाचा कर्ण, हादेखील किती उदात्त दाखविला आहे, पहा. मत्स्यवेधाचे चित्र पाहताना तो दुर्योधनास सागतो, " चित्रातल्याहि बायकावर हा कर्ण शरसधान करीत नसतो. "

तसेच, कौरवाचा कैवारी असूनहि तो म्हणतो, " मी कृष्णाची निंदा आजपर्यंत कधींच केली नाहीं, आणि करण्याचेहि प्रयोजन मला नाही. कंस, जरासध आणि शिशुपाल ह्याना साहसाने मारणाऱ्याची किंमत ओळखण्याइतकी वीरवृत्ति ह्या कर्णाच्या अगात खात्रीने आहे. "

## ओजोगुणाचा पुतळा

' काचनगडची मोहना ' हे नाटक गद्य असूनहि काव्यपूर्ण आहे. सोळावे शतकाचे अखेरीस प्रतापराव आपला किल्ला स्वतत्र ठेवण्याचा प्राणपणाने प्रयत्न कसा करतो, पण तो घरभेद्याच्या फितुरीमुळे तो धुळीस कसा मिळतो याची ही वीर–करुण–मिश्रित कहाणी आहे. १८९८ सालीं स्वातत्र्याचे वारे पर्यायाने पसरून देण्यास प्रतापरावाची एकाहून एक आवेशपूर्ण व कल्पनापूर्ण भाषणे उपयोगीं पडली. त्यातील शब्दन्शब्द ओजोगुणानें कसा रसरसलेला आहे–निखारेच आहेत ते जणु ! प्रतापराव छातीठोक मार्गाने जाणारा तेजस्वी तरुण. तो उसळून म्हणतो,

" मानगुटीवर बसून शत्रूचे नरडे दातानी कडाकड फोडण्याची जी वेळ, त्यावेळीं कसला गनिमी कावा ? खानाच्या छावणींत एकटा सापडलो असतो, तरीदेखील आमचे रक्तशोषण करून फुगलेल्या ह्या विजापूरच्या दुष्मनापुढे माझे डोकें केसभरहि लवले नसते. गनिमी कावा लढवून ह्या चोराना पचवीसतीस वर्षें विजयनगरचे उरावर थयाथया नाचू दिलेंत— बस्स झाली इतकी गुलामगिरी ! "

त्याच्या वाणींतून अग्निकण कसे निघतात, पहा—

" माने, कोण कोणाला भाकरी चारतो ? विजापुरास ठेचून खेचलेली संपत्ति ह्या चोराच्या बापजाद्यानीं आपल्याबरोबर आणिली होती वाटतें ! अहो, ही आमचीच सपत्ति ! तो सोनेरी महाल, तें हिरेजडित सिंहासन— सर्व—सर्व—आमचे, आमच्या आजापणजानीं कित्येक वर्षे श्रम करून संपादन केलेले ! तो गोलघुमट बाधताना किती हिंदु गुलामाना त्या चोराच्या चाबकाचा मार दररोज खावा लागे, हे तुम्हास माहीत आहे काय ? त्या भव्य मशिदीच्या छतावर सोन्याचा मुलामा चढविताना, तुमच्या आमच्या आयाबहिणींना भ्रष्ट करून त्याचे किती दागदागिने ह्या चोरानीं हिसकावून घेतले ह्याची तुम्हाला कल्पना तरी करिता येते काय ? माने, तुम्ही स्वतःचेच नोकर आहा ! विजयनगरच्या तक्काचे तुकडे तुकडे जरी झाले, तरी अद्याप त्याच तक्ताची तुम्ही भाकरी खात आहा हे विसरू नका. "

## भाषेचा कडवेपणा

आपला पोलादी निर्धार निश्चयी शब्दानीं व्यक्त करताना प्रतापराव गरजतो, " सताजीराव, आमची मान तुटेल, आमचीं हाडें चिंबून चिंबून जाऊन त्याचा चुराडा होईल, पण सकटाना केसभरहि आम्ही हार जाणार नाहीं, हे शत्रूला आज पक्के समजूं द्या. म्हणजे आम्ही जिवंत राहून जे कार्य आमच्या हातून पार पडणें अशक्य आहे, तें काम आमच्या मरणानें आपोआप होईल. आमचा काटकपणा, आमचें शौर्य, शरिरांत जिवाची धुगधुगी असेतो आमची लढण्याची हौस, हीं विजापुरच्या पादशहाला

कळूं द्या. लाखो फौजेने विजापुरास गराडा दिला असता पादशहास जी भीति वाटेल त्याहून अधिक भीतीने आमचे नाव निघण्याबरोबर पादशहा कापूं लागेल ! ”

तोच वज्रकठोर निर्धार प्रतापराव पुनः जाहीर करतो ! “ माझा हाच निश्चय, हीच प्रतिज्ञा, कीं तरवारीच्या तीक्ष्ण धारानी माझ्या शरिराचे तुकडे तुकडे होवोत, भाल्याच्या माऱ्यामुळे माझ्या शरिरातून रक्ताचे हजारो प्रवाह वाहोत, बदुकीच्या गोळ्याच्या तडाक्याने माझ्या मस्तकाचे कळपे कळपे तुटून पडोत, ही माझी भयकर तलवार वज्राप्रमाणे शत्रुसैन्यावर पडेल, आणि ह्या चोराची राखरागोळी झालेली ह्या डोळ्यानीं पाहिल्याशिवाय किंवा कानानी ऐकल्याशिवाय प्रतापरावाचीं हाडे काचनगडच्या मैदानावर कधीच पडावयाचीं नाहींत. ” मराठी भाषेतून वीररस वाहविण्याची शिकस्त खाडिलकरानी केलेली आहे.

अपयश आ वासून पुढे आले, तरी राष्ट्रस्वातत्र्यावर प्रतापरावाची भक्ति इतकी अलोट कीं, तो प्रार्थना करतो, “ परमेश्वरा, आज आमची सर्वांची कत्तल झाल्यावर माझ्या या शूर, प्रामाणिक, पुण्यवान् सेनेला ज्या ठिकाणीं जन्मास घालशील, त्याच ठिकाणी ह्या अभागी, दुर्दैवी प्राण्यालाहि पुनः जन्माला घाल, अशी माझी मरणापूर्वीची तुला प्रार्थना आहे. माझ्या पदरीं जर काहीं पुण्य असेल तर त्याबद्दल मला स्वर्गसुख नको, नदनवनातील सुखोपभोग मला नकोत, पादशहाचे जाचातून विजयानगरास मुक्त करण्याचे कामी माझे सर्व पुण्य खर्च होऊ दे. पुढील जन्मीं पुढारी—सरदार होण्याइतके जर माझे पुण्य नसेल, तर मराठ्याचे जे सैन्य विजापूरची राखरागोळी करील, त्या सैन्यातल्या अतिशय क्षुल्लक दर्जाच्या नोकराचे जन्माला, मला देवा घाल. परमेश्वरा, मनुष्यकोटींत पुनः जन्मास घालण्याची जर माझी योग्यता नसेल, तर ज्या घोड्यावर स्वार होऊन मराठे विजापूरचा दरवाजा फोडतील, त्या घोड्याच्या तरी जन्माला मला जाऊं दे. हा मानहि पुढील जन्मीं जर मला मिळावयाचा नसेल तर विजापुरावरील मराठ्याच्या स्वारीची सामग्री वाहून नेणारा बैल तरी निदान मला कर.” शिवरामपत पराजपे यांच्या विचाराचेच हे जुळे भावंड !

## भाऊबंदकींतील रूपक

'भाऊबंदकी 'चा पहिला अंक तर नमुनेदारच आहे. तो स्वयपूर्णहि आहे. नारायणरावाचा खून हा कथानकाचा उत्कर्ष–बिंदु पहिल्या अंकांतच खाडिलकरानीं गाठला आहे. त्यापुढे प्रेक्षकाच्या जिज्ञासेची तार खेचून धरणें हें कलेचे केवढे कसब ! पण त्या खुनापेक्षाहि उत्कठापूर्ण समर-प्रसग खाडिलकरानीं निर्मिले आहेत. रामशास्त्री राघोबाला देहात प्रायश्चित्त सागतो व नाना बारकाईचा कारभार सुरू करतो हे दोन प्रसग अधिकाधिकच रगत जातात. शृगार, वीर, करुण, हास्य व उदात्त या पाची रसाच्या लाटा या नाटकात एकसारख्या आदळत-गर्जत असतात.

हें नाटक विलक्षण परिणाम घडविणारे आहे. ते पाहिल्यावर–वा वाचल्यावर–त्याची छाप दीर्घकाळ मनावर राहते. १९०९ सालच्या भीषण कालात हे नाटक रगभूमीवर आले. लो. टिळकाची रवानगी सरकाराने मडालेच्या तुरुगात केलेली होती. निःस्पृह व स्पष्टवक्ते रामशास्त्री प्रभुणे रगभूमीवर आले कीं, प्रेक्षकाना लोकमान्याचेच दर्शन झाल्यासारखे वाटे आणि त्याचे सत्याचे व निर्भयतेचे एकएक भीमशब्द ऐकले, म्हणजे प्रेक्षकाचे हात सहजस्फूर्तीने टाळ्याचा कडकडाट करीत. ज्यावेळी सखाराम बापू–" खून, अन्याय, व पाप याच्या पायावर उभारलेल्या सत्तेचा वरून परमेश्वर व खालून लोक धिक्कार करीत असतात. " असा सिद्धात बोलतात, तेव्हाहि श्रोत्याना ' केसरी 'च्या गर्जनेचाच हा पडसाद आहे असे वाटे. आणि जेव्हा राघोबा, " राज्यसत्तेला निर्माल्यवत् करण्याची शक्ति एखाद्या बुद्धिवान तपस्व्याच्या अगीं असावी, अ ! " असे आश्चर्य व्यक्त करतो, तेव्हा ते दडपशाही करणाऱ्या ब्रिटिश सरकाराच्या मनःस्थितीचेच चित्र आहे असे श्रोतृवृदाला वाटत असे.

रामशास्त्र्याच्या न्यायनिष्ठुरतेने आनदीबाईचे महत्त्वाकाक्षी मन चडफडून जाते. तेव्हा ती शास्त्रीबुवाना टाकून बोलते, " स्वतःच्या मोठेपणाच्या फाजील गर्वाने, तुमची बुद्धि कुजली आहे. मुख्य न्यायाधीशाची जागा मिळाल्यामुळे तुमचें मन नासले आहे ·· ·····तपश्चर्या आता अधारकोठींत ! " हे कुत्सित शब्द ऐकताना महाराष्ट्रीय श्रोत्याना न्या. दावरच

लो. टिळकाना उद्देशून अकारण उद्दाम उद्गार काढीत आहे असा भास झाल्यास नवल काय? आणि दावराची सारी तुच्छता गिळून टाकणारी जी नृसिह–वाणी लोकमान्यानीं न्यायमदिरात काढली, तिची स्मृति होण्यासारखी भाषा रामशास्त्री काढतात. "बाईसाहेब, ह्या जिभेनें ह्यावेळीं सत्य भाषण केले आहेः पुढे कदाचित् खोटें बोलण्याचा मोह तिला उत्पन्न होईल; तेव्हा ह्याचवेळीं तिला काटून टाकून सत्य बोलण्यात ह्या जिभेची समाप्ति आपण केली तर त्यात मला समाधानच आहे— राघोबा, पेशव्याच्या गादीचा नोकर नसलेला हा रामशास्त्री तुला देहात प्रायश्चित्त सागत आहे." यावेळी दहा वेळा 'देहात प्रायश्चित्त' हा शब्द नाटककाराने पुन:पुन घुमविला असल्याने प्रेक्षकाच्या हृदयाचे गाभाऱ्यात त्याचाच प्रतिध्वनि एकसारखा होत रहातो. "न्याय, निःस्पृहता व विद्वत्ता याचा प्रत्यक्ष अवतार' असणारे रामशास्त्री आपली मृत्युजयी सत्यनिष्ठा पुन: घोषितात, "बाईसाहेब, पाहिजे तर माझी जीभ छाटून टाकण्याचा हुकूम करा, पाहिजे तर अधारकोठडींत काट्याच्या पिंजऱ्यात मला कोंडून ठेवा, पाहिजे तर ज्या ह्या तलवारींनीं नारायणरावाचे तुकडे तुकडे केले त्याच ह्या तलवारी माझ्याहि शरिरावर पाहिजे तशा चालवा; मला कोठेहि न्या, कसाहि ठेवा, शब्द उच्चारण्याची जिभेत शक्ति असे तो मोठमोठ्याने ओरडून सर्व दुनियेला मी जाहीर करणार, 'नारायणरावाचा खून राघोबाने केला आणि या पातकाला देहात प्रायश्चित्ताशिवाय दुसरे प्रायश्चित्त नाहीं.'

'डोगरी किल्यावरील अधारकोठडी' असा स्पष्ट उल्लेखच आनंदीबाई करते, तेव्हा मुबईजवळील डोगरीच्या तुरुगात एकशेएक दिवस काढलेले लोकमान्य प्रेक्षकाच्या डोळ्यासमोर उभे कसे न राहतील?

## कीचकवधांतील राजकारण

'कीचकवध' नाटकाचे राजकीय कर्तृत्व इतिहाससिद्धच आहे, पण नाट्यकलेच्या दृष्टीनेहि त्याचे महत्त्व असामान्य आहे. अत्यंत बाधेसूद असे सविधानक, त्यात एकाहून एक तीव्रतर संघर्ष-प्रसंग साधलेले, प्रवेशा-

प्रवेशाला रसाचा परिपोष वाढत गेलेला आणि दासीपासून द्रौपदीपर्यंत सर्वांचे स्वभाव सुस्पष्टपणें व सुसंगतपणे रेखाटलेले–यामुळें हे नाटक मराठी नाट्य-सृष्टींत उच्च स्थान मिळवून बसले आहे. कर्झनशाहीविरील आपले रूपक सत्य भासविण्यासाठीं खाडिलकरानीं प्रस्तावनेंत विराट पर्वातील आधार सविस्तर दिले आहेत आणि "माझे पदरचे कांहींच नाहीं, जे कांहीं आहे ते सारे मूळ महाभारतातलेच" असें भासविले आहे.

असा पारदर्शक पडदा आरंभीं सोडून, मग त्यानीं तत्कालीन स्थितीचे पडसाद नाटकात खूपच उमटविले आहेत. 'इभ्रत,' 'सहानुभूति' या ब्रिटिशाच्या लाडक्या शब्दाची चेष्टा त्यानीं केली आहे. "राज्यकर्ते ते ते राज्यकर्ते आणि दास ते दास' ही कर्झनशहाची आढ्यता त्यानीं कीचकाचे तोंडीं घालून चव्हाट्यावर मांडली आहे व निंद्य अशी दाखविली आहे. 'नवीन राज्ये भरभराटीस आणणे आणि जुनी नावाजलेलीं लयास नेणे, ही ज्याची रोजची सहज लीला' असा डलहौसीचा उद्धार केला आहे. "माझ्या नाटकशाळेत सर्वांना सारखाच मान व सारखाच दर्जा दिलेला आहे." ही कीचकाची गर्वोक्ती ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या कांगावखोर समतेचाच पडसाद नव्हे काय? "प्रजेनें कितीही मुकाट्याने जुलूम सोसला, तरी परमेश्वराचे दरबारात त्या जुलमाच्या प्रायश्चित्तापासून राज्यकर्त्यांची सुटका होणे शक्य नाहीं.' हे धर्मराजाचे आश्वासन तेव्हाच्या त्रस्त भारतीय जनतेस किती समाधानाचे वाटत होते! "अमर्याद वाटणारी तुझी सत्ता हा हा म्हणता ढासळून पडेल, सर्वांचा न्याय करण्यास परमेश्वर बसला आहे." ही द्रौपदीची भविष्यवाणी परतंत्र भारतीयाना किती आशादायक वाटे! अथपासून इतिपर्यंत अखंडपणे वाढत्या श्रेणीनें रंगत जाणारीं जीं पाचसात नाटकें मराठींत आहेत, त्यात 'कीचकवधा'चे स्थान उच्च आहे.

## खलनायकाचें चित्र

'सवाई माधवरावाचा मृत्यु' हे खाडिलकराचे पहिले नाटक असूनहि सरस आहे. शेक्स्पीयरचा हॅम्लेट जसा संदेहावर आंदोलने घेतो, तसा

माधवरावांचा स्वभाव दाखविलेला आहे. त्याचे मन नाना फडणिसाविषयीं कलुषित करण्यासाठीं केशवशास्त्री श्रीमतांच्या कानात भलभलते संशय ओततो. शेक्सपीयरच्या आयोगाचीच ही मराठी आवृत्ति. १८९३ सालीं खाडिलकरानीं लिहिलेले हे नाटक प्रथम 'विविध–ज्ञान–विस्तारा'त प्रसिद्ध झाले. पुढे रगभूमीसाठीं दोन-तृतीयाशाहून अधिक भाग खाडिलकरानीं नव्याने लिहून काढला. माधवरावाच्या मनाचे हेलकावे कसकसे वाढत गेले, हे अत्यत कौशल्याचे कार्य तरुण खाडिलकरानीं उत्तम प्रकारें पार पाडले आहे. आयागोचा मिष्किलपणा व दुष्टपणा केशवशास्त्र्यामध्ये भरला आहे. खल-नायक रगविण्याकडे खाडिलकरानीं इतके लक्ष दुसऱ्या कोणत्याच नाटकात पुरविले नाहीं.

"सर्व जग नानाचा शब्द झेलते आहे! नानानी वटारून पहाण्याबरोबर सर्व पृथ्वी कापते आहे !" असे केशवशास्त्री म्हणतो आणि दुसऱ्या बाजीरावाच्या पक्षाचे लोकाना नानाविरुद्ध चिथवतो. पण त्याचे खलत्व हे कीं, माधवरावाची मातोश्री व सासू या दोघींशीहि नानाचा अनैतिक सबध होता असे विष तो माधवरावाच्या कानात हलकेहलके ओततो. त्या विषाचे परिणाम माधवरावाच्या कोवळ्या मनावर कसकसे होत गेले हे त्याच्या उद्गारावरून स्पष्ट दिसते. त्याचे सासरे बाबासाहेब याचा निरोप म्हणून केशवशास्त्री विषाचा पहिला थेब टाकतो. माधवरावाच्या हृदयाला डिवचणारा तो निरोप असा- " श्रीमताप्रमाणे मी काहीं नानाच्या ताटाखालचे माजर होऊन राहणार नाहीं—ज्याना गादीची हाव असेल त्यानीं पाहिजे तर नानाची थुंकी झेलून रहावे, वेसणीच्या बैलाला वळवितात त्याप्रमाणे नाना वळवितील तिकडे पेशव्यानीं पाहिजे तर वळावें. "

निरोपाप्रमाणेच एक खोटें पत्र रचून केशवशास्त्री विषाचा दुसरा थेब श्रीमताच्या कानात टाकतो. त्याच्या मते, " ही चिठी म्हणजे नानाच्या वाड्याला लागणारी मूर्तिमत आग, शनिवारवाड्याला चाटून जाणारा प्रत्यक्ष विजेचा लोळ, —माधवाच्या शरिरातील सर्व रक्त तापविणारे रसरसलेले हे निखारे संधि साधून माधवाच्या डोक्यावर मी ठेवणार ! "

ही चिठी आपण नाखुषीनें दाखवीत आहो अशी बतावणी कपटी

केशवशास्त्री करतो, त्यामुळें तर माधवरावाच्या हृदयातील आग भडकतेच. तो संवाद पुढीलप्रमाणे—

माधव—कोठें आहे ते पत्र मला दाखवा, माझ्याहि संशयाची शहानिशा होऊ द्या.

केशव०—स्त्रीजातीसबंधाने पुरुषांचीं मने स्वभावतः संशयखोर असतात, —तेव्हा म्हणतो महाराजाना काय करावयाची ही उठाठेव करून ?

मा०—दाखवा, ते मला अगोदर दाखवा.

के० —नको सरकार, मी नाही दाखविणार.

मा०—आमचा हुकूम आहे, जर पत्र दाखविलेत नाहीं, तर नागनाथाची अवस्था झाली ती तुमची होईल.

के०—आणि सरकाराना पत्र दाखविले व नानाना कळले, तर पत्र दाखविल्याबद्दल मला देहात शिक्षा भोगावी लागेल.

मा०—पेशव्याच्या गादीवर मी आहे, नाना नाहींत. माझा हुकूम पाळल्याबद्दल जर तुम्हाला नाना शिक्षा करू लागले, तर प्रथम ह्या माधवाला हत्तीच्या पायात चिरडून मारणे नानाना भाग पडेल, मग तुमच्या केसाला ते धक्का लावतील—दाखवा ते पत्र.''

## मार्मिक मनोविश्लेषण

नानानीं हत्तीच्या पायाखालीं दिलेल्या नागनाथाच्या तोंडून, सुग्रीव-ताराच्या पौराणिक दाखल्यातून, पोवाडेवाल्याच्या कवनातून—चोहोंकडून नानाविरुद्ध कंड्या पिकविण्याचा सपाटा केशवशास्त्री लावतो. त्यामुळे माधवरावाची दृष्टि विकृत होते व नानाचे प्रत्येक चागले कृत्यहि त्याना विपरीत भासूं लागते. आपल्या विवाहाच्या टोलेजंग समारंभाची जुनी आठवण होऊन माधवराव म्हणतात, “ माधवा, वरात ? नव्हे ती वरात, एखादा नीच मुत्सद्दी आपल्या पापाची घाण धन्याच्या अंगाला कशी सारवतो ह्याचें प्रदर्शन करण्याकरिता ती धिंड काढली होती धिंड !—पेशव्याच्या दरबारांत भयंकर अपराधी शिक्षेवाचून कसा निसटतो, तें पाहून घेतल्यावांचून मी राहणार नाहीं.''

प्रत्येक संवादातून माधवरावाच्या मनाची स्थिति नाटककाराने उभी केली आहे.

जन्माआधींपासून नानांनी आपल्याला पित्याप्रमाणे संभाळले—वाढविले हे जाणून माधवराव त्यांच्याविरुद्ध जीभ उचलत नसत. पण नाना हे दुष्ट आहेत असा त्याचा ग्रह झाल्यामुळे हळुहळु ते त्याना विरोधहि करूं लागले. प्रथम ते चाचरत म्हणतात, " मला वाटते, मी सांगतो—माझा असा हुकूम आहे कीं–खासगी व्यवस्थेत आपण कोणत्याहि प्रकारची ढवळा ढवळ करता कामा नये."

पुढे सरदाराच्या दरबारात जाऊन माधवराव त्याना स्पष्टच बजावतात, " सरदार हो, तुम्ही मला पेशवा समजू नका. बाजीराव ज्याप्रमाणे शिवनेरीस कैदेत आहेत त्याप्रमाणे—मी जिवावर उदार आहे.—उघड उघड तुमच्या तोंडावर बोलतों—शनवारवाड्यात मी नानाचा कैदी आहे, आणि माझ्यावर पहारेकरी कोण म्हणाल ? तर आमच्या त्या मानलेल्या सासूबाई !—त्या बाईची परवानगी घेतल्याशिवाय मला कोठे जाता येत नाहीं, येता येत नाहीं, माझी कोणाची गाठ पडत नाहीं !—मी दरबारला येणार नव्हतो, पण माझ्या सरदाराना माझ्या कैदखान्याची गोष्ट सांगण्यास पुनः संधि आईसाहेब व नाना देणार नाहींत म्हणून मुद्दाम आलो."

शेवटी ' आपले जीवित व्यर्थ ' असे माधवरावाना वाटू लागले. ते स्वतःशीं म्हणतात, " ह्या बागेतल्या झाडाप्रमाणे निश्चळ व स्थिर असा मी जन्माला आलो असतों,—कैदखान्यात असतानाहि ह्या वेलीप्रमाणें मीं हात हलविले असते, ह्या फुलाप्रमाणे आनंदानें हसलो असतो !—मनुष्याचा जीव माझ्या शरिरात ओतला असता. ह्याना कापणाऱ्या, कापणाऱ्या, तोडणाऱ्या माळ्याकडे पाहून हीं फुलझाडें जशीं डोलतात, बागडतात, हंसतात, तसे मींहि नानाना, आईसाहेबाना खूष केले असतें !"

अखेर आपले जीवित व आपला संसार–सारेंच घाणींतले आहे, अशा भ्रमानें पछाडल्यामुळें माधवरावाचे मन आत्महत्येस प्रवृत्त होते. त्याना सर्वांचाच वीट किती आला होता, हें खाडिलकरानीं पुढील शब्दानीं

दाखविले आहे. " हे घाणेरडे पुणे शहर सोडून—मला लाब कोठे तरी गेले पाहिजे.— ही पापी जागा जाळून राखरागोळी केली तर ?—छे—कोठून हा वाडा स्वच्छ व्हावयाला ?—जाळल्यावर राहणारी ती राख, ते कोळसे, त्याच्या काळ्याकुट्ट पापाचा तो अस्सल गाळ अजीबात नाहींसा कसा करता येईल ?—गगेसारख्या महानदींत ती राख टाकली, तर तो पवित्र ओघ पापमय होऊन जाईल, जमिनींत त्या राखेला गाडून टाकलें तर वसुधरेच्या पोटात असलेले सर्व हिरे काळेकुळकुळीत कोळसे बनतील, आकाशात ही राख फुंकली तर तेजोमय तारे काळेठिक्कर पडतील !"

## उत्कट पेंचप्रसंग

रसोत्कट प्रसग निर्मिण्यात खाडिलकराची प्रतिभा यशस्वी आहे. आनदीबाई म्हणजे मूर्तिमत राक्षसी महत्त्वाकाक्षा ! तीच ' भाऊबदकी 'ची खल-नायिका. आपल्या पित्या अर्भकालाहि दगडावर ठेचून मारण्यास धजावणाऱ्या लेडी मॅक्बेथची बहीणच ! ती तुळाजीपासून राघोबापर्यंत सर्वांना प्रेमानें, लोभाने, धाकाने नारायणरावाच्या खुनास प्रवृत्त करते. कधीं सरळ तर कधीं छद्मी बोलून, कधीं पडते घेऊन तर कधीं कुर्रेबाजी गाजवून, राघोबाला कधीं शृंगाराची भुरळ घालून तर कधीं आपल्या कपाळींचे कुंकू पुसूनहि, ती आपल्या मनाप्रमाणे नारायणरावाचा खून घडवून आणते. प्रत्यक्ष खुनाचे वेळीं राघोबाच्या कमरेला एकीकडे नारायणराव विळखा घालतो व प्राणाची भीक मागतो, तर दुसरीकडे आनदीबाईहि मिठी मारून त्याला ठार करण्याचा हट्ट धरते—हा प्रसग किती नाट्यपूर्ण ! तसाच ' विद्याहरणा 'तील शुक्राचार्यांच्या कमरेला एका बाजूस देवयानी व दुसऱ्या अगास राजपुत्र लगटून कचाच्या प्राणाविषयीं परस्पर—विरुद्ध मागणी करतात हा केवढा पेंच-प्रसंग ! असे सग्राम ( Conflicts ) उभे करण्यात खाडिलकराचे यश आहे, असा अचूक अभिप्राय लो. टिळकानींहि एकदा दिला होता.

आनंदीबाईचा कपटी व क्रूर स्वभाव शब्दाशब्दातून प्रगट होतो. ' आम्ही कैदेंत आहों तेंच चागलें ' असें आरभीं उपरोधिकपणें बोलून ती तुळाजीला खुनास चिथावते. पुढें नाना फडणीस आले. तर लगेच

कागावखोरपणानें म्हणते, —" जाणाराचे काय ? तो सुखानेंच स्वर्गात जातो, त्याला नेण्याला स्वर्गातून विमाने आली असतील, आम्ही हतभागी येथें राहिलो. लोक आम्हाला काय म्हणतील, ही भीति इकडे मरणाहून अधिक वाटते."

## मनाच्या आंदोलनांचीं चित्रें

पण खुद्द राघोबादादाची स्थिति काय झाली होती ? खून चढलेल्या त्याच्या मनात नाना तऱ्हेचीं भुते नाचत असतात. आरशात त्याला तींच भुते दिसतात. तो आनदीबाईला म्हणतो,

" पहा, अजून त्या आरशात पहा—इगळासारखे लाल झालेले बाबाचे डोळे मजकडे रागाने पहात आहेत—पहा, अजून पहा—आनदी, रणागणावर एकट्या मजवर चालून आलेल्या हजारों पठाणाच्या तलवारी म्यानातून बाहेर झळकलेल्या पाहिल्यावर भीतीचा लवलेशहि माझ्या मनात कधी शिवलेला नाही. पण लहानपणीं बाबाना रागावलेले पाहिल्यावर जसा मी भित्र्या मुलीप्रमाणे कापत असे, तसा आताहि—ते आरशातले त्याचे–ते पहा–ते गुंजेसारखे लाल डोळे पाहून मी गर्भगळित झालो आहें."

खून झाल्यावर तर राघोबाची मनोवृत्ति बेभानच झाली. तिचे चित्रण खाडिलकरानीं ठसठशीतपणे केलें आहे. राघोबा म्हणतो, " काय वरच्या सर्व देवता नारायणस्वरूपी होऊन 'काका, काका' म्हणून मला हाका मारीत आहेत !–ह्या पृथ्वीच्या पोटातूनहि तोच शब्द कसा येतो !–अहो, कोणी तरी मी राघो भरारी पेशवा झालो म्हणून माझ्या नांवाची द्वाही फिरवा, माझ्या नावानें कर्णे कुका, माझ्या नावानें तासे बडवा, डंके, नौबदा, सर्व रणवाद्ये खूप जोराने पिटा; तुमच्या ह्या नव्या पेशव्याच्या नांवाचा जयजयकार ह्या वाड्याभर, सर्व पुणे शहरभर, सर्व महाराष्ट्रभर एवढ्या मोठ्याने करा कीं, माझ्या ह्या फितुर कानाच्या किंकाळ्या बसून 'काका, काका' हे शब्द मला ऐकविण्याची त्याना शक्तीच राहू देऊं नका."

'काका ! मला वाचवा !!' ही नारायणरावाची–त्या निष्पाप कुमाराची–किंकाळी कोणाचेंहि काळीज करवतीप्रमाणें कापतच जाते.

हृदय पिळून काढणाऱ्या करुण रसाने थबथबलेले त्याचे उद्गार, " रावसाहेबानीं मरण जवळ आलेले पाहून थेऊरास गजाननाचेसमोर माझा हात आपल्या हातात दिला; आणि हा आपला मुलगा आहे, असे आपणास बजाविले; आणि, काका, बाबा, मला आपण जवळ ओढून घेऊन पित्याच्या नेत्रातून निघणाऱ्या प्रेमाश्रूनीं मला न्हावू घातलेत. त्या वेळचे प्रेमाश्रु–बाबा, ते पहा पुनः तुमच्या डोळ्यात दिसू–नका, असे तोड फिरवू नका. मी गारद्याच्या तरवारीने कापलाच जाणार असलो, तर बाबा तुमच्या त्या प्रेमाश्रूनें माझें शरीर पुनः भिजू दे. त्यामुळे ह्या तरवारी माझे तुकडे करीत असताना शरिराचे हाल कमी होतील व शरिरातून बाहेर पडणाऱ्या माझ्या प्राणाना प्रेमसिंचनानें थडोसा मिळेल."

अशाच उत्कट व विरोधी प्रसंगातून विविध रसाच्या पंचगंगा वाहतात.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) ' खाडिलकरानीं नाट्यकलेची मंजुळ सतार जितक्या कुशलतेने वाजविली, तितक्याच हिंमतीने स्वातंत्र्याची समशेरहि चालविली, ' हे विधान स्पष्ट करा.

( २ ) " खाडिलकराच्या नाटकातील राजकारणी भूमिकानीं महाराष्ट्र गदगदा हालून जाई " काही उदाहरणे देऊन हें विधान सिद्ध करा.

( ३ ) " बालगंधर्वासारख्या नटश्रेष्ठामुळे खाडिलकराचीं नाटकें यशस्वी झाली " हे मत तुम्हास संमत आहे का ? उत्तर कारणासह लिहा.

( ४ ) " खाडिलकरानी आपल्या नाट्यसृष्टींत उदात्त गुणाचे आदर्श मराठी प्रेक्षकापुढे ठेविले " आदर्शभूत अशा कोणत्या व्यक्ति तुम्हाला आढळतात ? त्यास आदर्श का म्हणावें ?

( ५ ) ' कीचकवध ' किंवा ' भाऊबंदकी ' यातील नाटय–विशेष स्पष्ट करा.

( ६ ) ' नाटयाचार्य ' ही पदवी खाडिलकरानाच फक्त शोभते. का ?

**अधिक अभ्यास**

दे. भ. काकासाहेब खाडिलकर लेखक–का. ह. खाडिलकर.

## न. चिं. केळकर : : : २

खाडिलकर व केळकर—दोघेहि 'केसरी'चे सपादक—राजकीय कार्यकर्ते—लो. टिळकाचे दोन हातच! पण या दोघानींहि आपली लेखणी ललित क्षेत्रात चालविली व कीर्ति कमावली. खाडिलकराची लेखणी



मुख्यतः नाट्य-लेखनात रमली व मोठी प्रतिष्ठा पावली, केळकराचे कलम साहित्याच्या सर्व शाखाना स्पर्श करून गेले व विविध फळे देऊन गेले. 'नाटककार' या एकाच नात्याने खाडिलकरानीं गरुडाप्रमाणे सर्वात उच्च असे उड्डाण केले, तर प्रत्येक विषयात थोडथोडे गुण मिळवून एकूण बेरजेत अधिक गुण कमावणाऱ्या कष्टाळू विद्यार्थ्याप्रमाणे, केळकरानीं ललित वाङ्मयाच्या सर्व भागात यश संपादिलें. केळकर मुख्यतः 'टीकाकार,' पण ते कवि होते, कादंबरीकार होते व नाटककार पण होते.

श्री. नरसिंह चिंतामण केळकर याचा जन्म ता. २४ ऑगस्ट १८७२ रोजीं झाला. मिरज संस्थानातील मोडनिंब हें त्याचे जन्मगांव. सातव्या वर्षापासून ते मिरजेच्या सरकारी शाळेंत शिकू लागले. त्याची बुद्धि तरतरीत होती. वर्गांत त्यांचा क्रमाक पहिला—दुसरा असे. श्री. खरेशास्त्री यांच्यासारखा इतिहास—संशोधक व नाटककार हा शिक्षक म्हणून त्यांना

लाभलेला होता. ते कधीं आपले एकादे नाटक विद्यार्थ्याकडून वाचून घेत किंवा कधीं सस्कृत श्लोक रचून घेत. १८८८ सालीं केळकर मॅट्रिक झाले. व १८९१ सालीं बी. ए. परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. फर्ग्युसन, राजाराम व डेक्कन या तीन कॉलेजाचा लाभ त्यांना घडला. डेक्कन कॉलेजात त्यानीं टेनिस, क्रिकेट व नौकाविहार हे खेळ खेळून आपले शरीर निकोप व खबीर बनविले. कॉलेजात मृच्छकटिक या संस्कृत नाटकाच्या प्रयोगात केळकर व कोल्हटकर या भावी नामांकित नाटककारानीं नट म्हणून काम केले. १८९४सालीं केळकर एल्‌एल्. बी.ची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले.

## लोकमान्यांचा लोहचुंबक

केळकर वयाच्या तेविसाव्या वर्षीं साताऱ्यास गेले. तेथे त्यानीं वकिली सुरू केली. पण लोकमान्य टिळकाच्या लोहचुंबकाने त्याना पुण्यास ओढून नेले. त्या वेळीं टिळकाना आपला वकिलीचा वर्ग व ‘ मराठा ’ हें इग्रजी पत्र चालविण्यासाठीं एका मदतनिसाची गरज होती. केळकर हौसेनें तिकडे गेले. विष्णुशास्त्र्याच्या त्या सस्थेत त्यानीं पाऊल ठेवले तें शास्त्रीबुवाच्याच पुण्यतिथीच्या दिवशीं. ता. १७ मार्च १८९६ रोजीं केळकर टिळकाकडे गेले, त्याचे घरींच राहिले, जेवणखाणही काहीं दिवस त्याच्याकडेच त्यानीं केले. या वेळीं ते ‘ मराठा ’ पत्रात इग्रजी लेखन करीत असत. १८९७ सालीं टिळकावर राजद्रोहाचा खटला झाला. त्यामुळें त्यानीं केळकरानाच ‘ केसरी ’ व ‘ मराठा ’ या दोन्ही पत्राचे संपादक म्हणून काम पहाण्यास सागितले. १९०८ सालापर्यंत केळकर ‘ मराठ्याचे ’ संपादक होते व इग्रजी लेखन करीत होते. पण त्यांना हौस होती मराठी लेखनाची.

## ‘ केसरी ’ चें संपादकत्व

१९०८ सालापर्यंत त्यांनीं ‘ केसरींत ’ तीसपस्तीस लेख स्वेच्छेनें लिहिले. १९०८ सालीं टिळकाना शिक्षा दिल्याबद्दल मुबई हायकोर्टावर केळकरानीं ‘ मराठ्यांत ’ काहीं टीका केली. त्यामुळें हायकोर्टाची बदनामी

झाली, असे म्हणून केळकरावर खटला झाला. त्यात चौदा दिवसाची शिक्षा भोगून केळकर बाहेर आले आणि १९१० साली ते 'केसरीचे' सपादक झाले. त्या वेळीं टिळक मडालेस होते व देशात दडपशाहीचे थैमान चालू होते. अशा बिकट काळात केळकरानी 'केसरी' कौशल्याने चालवून आकर्षक केला. राजकीय जहालपणाची उणीव साहित्यिक लालित्याने त्यानी बरीच भरून काढली. १९३२ सालापर्यंत केळकर 'केसरी'चे सपादक होते.

## राजकीय कामगिरी

पुणे नगरपालिकेचे ते सुमारे पचवीस वर्षे सभासद होते. त्यातील सहा वर्षे तर ते अध्यक्षच होते. तसेच दिल्लीच्या मध्यवर्ती विधिमडळाचे सभासद म्हणूनहि त्यानी सहा वर्षे काम केले. त्याचे कार्यक्षेत्र पुणे, मुबई किंवा दिल्ली एवढेच मर्यादित न राहता, थोडा वेळ का होईना, पण ते लडनपर्यंत पोहोचले. १९१७ साली लोकमान्य टिळकाबरोबर 'स्वराज्य सघाच्या शिष्टमडळाचे' सभासद म्हणून ते इग्लडकडे निघाले. त्यासाठी त्यानी "हिंदी स्वराज्याची कैफियत" या नावाचे माहितीने भरगच्च भरलेले इग्रजी पुस्तक झटपट लिहिले. पण इग्रज सरकारने या शिष्टमडळाला कोलबोपाशीच अडविले. पुढे १९१९ साली केळकर इग्लडला गेले. तेथील कॉग्रेस कमिटीचे मुखपत्र "इडिया" हे त्यानी काही महिने चालविले. पुढे टिळकाच्या पश्चात १९३२ साली केळकर परत इग्लंडला गेले. या वेळी ते स्वतत्रपणे गोलमेज परिषदेचे सभासद म्हणून गेले होते. सुमारे दीड महिना ते तेथे राहिले होते.

## साहित्यांतील मान

१९३२ सालीं त्याच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झालीं; म्हणून निरनिराळ्या सस्थानीं त्याचा मोठा सत्कार केला 'भारत इतिहास सशोधक मडळात' "श्रीमहाराष्ट्र शारदा मदिरातर्फे" झालेला सन्मान विशेष महत्त्वाचा होता. या प्रसंगीं त्याना जे मानपत्र अर्पण करण्यात आले, त्यात त्याच्या साहित्यसेवेचे यथार्थ गुणवर्णन केलेलें आहे. सदभि-

रुचि, औचित्य व प्रसाद या केळकराच्या तीन लेखनगुणाचा गौरव या मानपत्रात केलेला आहे. " सात्त्विकपणा, उदात्तपणा, रजकता, बोधपरता व ज्ञानसग्राहकता हे अभिजात वाङ्मयाचे प्रधान गुण आपण निर्मिलेल्या वाङ्मयात चहूकडे दृष्टीस पडतात. " असे स्तुतिस्तोत्र या " अष्टपैलु ग्रथकाराचे " त्या मानपत्रात गाइलेले आहे. बडोदे येथे १९२१ साली भरलेल्या साहित्य–समेलनाचे अध्यक्षपद त्याना लाभले.

केळकरानी १९३७ साली केसरी सस्थेचा–आणि त्याबरोबरच महाराष्ट्रातील चाळीमपन्नास सस्थाचा-सबध सोडला. अशी आपखुषीची निवृत्ति त्यानीं स्वीकारली, तरी ते वाचन लेखनात आमरण सदैव गुग असतच. पण या शेवटच्या आयुष्यात त्याची वृत्ति " आज मी अत्यत समाधानाच्या मन.स्थितीत आहे, मन शात आहे—हात जोडले आहेत—हाकेची वाट पहात आहे. " अशी होती. ती हाक त्याचे कानी १९४७ च्या १४ ऑक्टोबर रोजीं आली. त्या रात्रीं मृत्यूवर दोन कविता करून शात चित्ताने ते जे निजले, ते कायमचेच !

केळकराच्या नाटकाचा कालानुक्रम पुढीलप्रमाणेः—सरोजिनी (१८९७), नवरदेवाची जोडगोळी (१८९८), तोतयाचे बड (१९१२), चद्रगुप्त (१९१३), कृष्णार्जुन युद्ध (१९१५), अमात्यमाधव (१९१५), वीर विडबन (१९१९), सत भानुदास (१९१९).

## प्रमाणबद्ध रचना

केळकराची नाट्य-सृष्टि अष्टकोनी आहे. त्याच्या आठ नाटकापैकीं ' नवरदेवाची जोडगोळी ' हे एका इग्रजी नाटकाचे व ' सरोजिनी ' हें एका बगाली नाटकाचे भाषातर होय. चद्रगुप्त, अमात्यमाधव व तोतयाचें बड हीं ऐतिहासिक असून कृष्णार्जुनयुद्ध, वीर विंडबन व सत भानुदास हीं पौराणिक म्हणता येतील. यातील शेवटचीं दोन नाटकेच त्यानीं सगीत रचलीं. पुढे 'कृष्णार्जुनयुद्धा 'लाहि सगीताचा पोशाख चढविण्यात आला. कृष्णार्जुनयुद्ध व तोतयाचे बड हीं दोन नाटकें म्हणजे केळकराच्या नाट्य–

गुणाचे स्मारक–स्तंभच होत. पैकीं पहिले नारदाच्या कळलाव्या भूमिकेमुळे जितकें हमरें झाले आहे, तितकेंच दुसरे नाना फडणिसाच्या कुशाग्र चातुर्यामुळे बुद्धीला हलवून सोडणारें झाले आहे. दोन्ही नाटकाची रचना अत्यत बाधेसूत व प्रमाणबद्ध आहे आणि दोन्ही नाटके रंगभूमि अखड फुलवीत असतात. सूक्ष्म बुद्धीचा रम्य विलास या दोन्ही नाटकात पाहताना रसिकाची सुसस्कृत अभिरुचि सतृप्त होते.

## संयमाचा अतिरेक

नाट्याला अवश्य तो भावनाचा उत्कटपणा केळकरांच्या हृदयातच नसल्यामुळे त्याचीं नाटके पहाताना प्रेक्षक कधीं खो खो हसत नाहीं किंवा घळघळघळ अश्रु ढाळीत नाही–त्याच्या सभ्य व संयमित विनोदाने तो गालातल्या गालात हसेल व परिमित करुणरसाने तो आपल्या डोळ्याच्या कडा पुसण्यासाठीं खिशातील हातरुमाल बाहेर काढील इतकेच ! त्यातले त्यात, ‘ तोतयाचे बडा ’तील नानाच्या स्वभावाशीं केळकर बरेचसे एकरूप असल्यामुळे त्या नाटकात भावनेचे चिमणे झरेहि कोठे कोठे झुळझुळतात ! एकाद्या पटाईत बॅरिस्टराने प्रतिपक्ष्याचे मुद्दे आपल्या तीक्ष्ण बुद्धीने खोडून आपली बाजू सिद्ध करून दाखवावी, त्याप्रमाणे केळकराचे नाना फडणीस हे तोतयाची सारी लबाडी उघड करून आपले मत स्थापित करतात. भूमितींतील दोन समान त्रिकोणाप्रमाणे नाना व तोतया याच्या पक्षाची रचना केळकरांनीं सुव्यवस्थित केलेली आहे. भाऊसाहेबाचा हुजऱ्या हैबती व तोतयाची पत्नी अमला हीं नानाचीं हुकमी शस्त्रे, तर पार्वतीबाईचा भोळाभाबडा स्वभाव, रामचद्र नाईकाची स्वामिनिष्ठा व इंग्रज–हैदर वगैरे शत्रूचा पाठिबा या तोतयाच्या यशाच्या पायऱ्या. या दोन्ही बाजू केळकरानीं मोठया कुशलतेने माडल्या आहेत. विशेष हे कीं, या नाटकाचे चार अक केळकरानी अवघ्या दहा दिवसात लिहिले.

## अलौकिक स्वभाव-चित्रें

‘ तोतयाच्या बंडातील ’ नाना फडणीस, ‘ अमात्य माधवातील ’ माधवाचार्य व ‘ चद्रगुप्तातील ’ चाणक्य या केळकरांनीं रंगविलेल्या तीन

स्वभावरेखा समानधर्मी आहेत व त्या साऱ्या मोठ्या मार्मिकतेनें व कुशलतेनें रेखाटलेल्या आहेत. याचें एक कारण म्हणजे हे तिघेहि जसे कुशाग्र बुद्धीचे मुत्सद्दी होते, तसेंच खुद्द केळकरहि होते. त्यामुळें त्यांना हा 'पर-काया-प्रवेश' लीलेनें व यशस्वितेनें करतां आला. या सर्वांचे संवाद केळकरांच्या सूक्ष्म बुद्धिमत्तेनें व प्रखर तर्कशक्तीनें लखलखणारे आहेत. कोटीवर प्रतिकोटी करण्यांत व खलनायकाचें कारस्थान हाणून पाडण्यांत या तिघांहि मुत्सद्यांचें अलौकिक बुद्धिचातुर्य प्रगट होतें. त्यांचें प्रत्येक वाक्य युक्तिवादानें धारदार झालेलें आहे. फार काय? 'बंडांतील' हैबतीसारखा हुजऱ्यामुद्धां 'शहाणा, धूर्त व कारस्थानी' असाच दाखविला आहे. भटजी घ्या, दासी घ्या, पहारेकरी घ्या,— सर्वांचें बोलणें कसें रेखीव व कोटिक्रमानें फुललेलें. आणि नाना व पार्वतीबाई यांचा बुद्धिभावनासंपन्न संवाद तर मराठी नाट्य—वाङ्मयांत अद्वितीयच आहे.

## नानांचें शब्दचित्र

नानांच्या थोर स्वभावाला पार्श्वभूमि शोभण्यासारखें काळेकुट्ट असें त्यांचें चित्र बगंभट पार्वतीबाईजवळ काढतो. तोहि पुरावे देत देत म्हणतो, "एवढें म्हणे नाना कारस्थानी! एवढे धूर्त! सुतानें स्वर्गाला जाणारे! सगळ्या जगाची डाक बसल्या बैठकीला आणविणारे! जसे काय त्रिकालवेत्ते साधु! अतींद्रिय ज्ञानी! महंत! खोलींतलं नवराबायकोचं कुजबुजणं म्हणे यांना समजतं! मुंगीनं मुंगीच्या कानांत हळूंच बातमी सांगितली तर तिचा डंका म्हणे यांच्या खलबतखान्यांत ऐकूं येतो! आणि नाना सहस्राक्ष! यांना एवढे कान! सरकारवाड्यापासून हातभर अंतरावर, केवळ पेशव्यांच्या हिताकरतां घर बांधून हे राहिले! आणि यांना आपल्या पाठीशीं फंद-फितूर-कट होतात ते कळत नाहींत! गारदी वाड्यापुढं जमतात तें दिसत नाहीं ना!"

पण खरोखर पहातां, कोसळत्या पेशवाईला हात देऊन सावरणारे नानाच होते. पानिपतच्या प्रलयानंतर सुमारें पंधरा वर्षांनीं भाऊसाहेबांचा

तोतया उपटला. त्याचे नाव सुखनिधान. कनोजकडील कुप्रसिद्ध कब्जी कलुशाचा हा वशज. त्याचा चेहरामोहरा भाऊसाहेबासारखा आणि पार्वतीबाईच्या अधश्रद्धेला तर तोच खरा भाऊसाहेब वाटे. तोतयाच्या बाजूला बडीबडी मडळी जमू लागली. त्याचे पारिपत्य करणे हा केवढा बोजा आहे याचा विचार करताना नाना आपल्या मनाशीं म्हणतात, " एकूण होय नाही म्हणता म्हणता या थराला गोष्टी आल्या अ ! हरिश्चद्राच्या फुटक्या राजणासारखी या पेशवाईच्या यशाची गत मला तर दिसते. दुष्ट दुर्दैवरूपी विश्वामित्रान त्याला जे एकदा भोक पाडून ठेवल आहे त्यामुळ पुण्य, मेहनत आणि पराक्रम या तिहींचे गंगोदक त्यात कितीही ओतल तरी तो भरण्याच चिन्हच दिसत नाहीं ! पानपतापासून एकदा जी घडी बिघडली ती अजून बसत नाहीं. आणि सर्वात आश्चर्य हे कीं, या सर्वाला घरची भाऊबदकी कारण ! "

खाडिलकरानीं नारायणरावाच्या खुनाचा भिषण प्रसग भाऊबदकींत रंगविला. त्या अनर्थाला कारण होणाऱ्या आनदीबाईचा समाचार घेण्यास रामशास्त्रीसारखा निःस्पृह न्यायाधीश भेटला. पण केळकरानीं निवडलेल्या कथानकात नानाना पार्वतीबाईचा विरोध समजुतीने, युक्तीने मोडून काढावयाचा होता. ' पतिव्रतेच्या प्रेमाची विटंबना " करताना तोतयाचेहि मन कचरते, मग ' सत्त्ववीर ' नानाना पार्वतीबाईशीं किती कोमलपणाने वागावे लागे ! पार्वतीबाई व आनदीबाई या दोन स्त्रियाच्या स्वभावातील भेद नाना सागतात, " आनंदीबाई जितकी तामसी, तितक्या पार्वतीबाई सात्त्विक. आनंदीबाई जितकी स्वार्थसाधु, तितक्या पार्वतीबाई निःस्पृह आणि परोपकारी, एकीला खोट्याची जितकी आवड, तितकीच दुसरीला सत्याची चाड ! एक जितकी उद्दाम व गर्विष्ठ, तितकीच दुसरी मर्यादशील आणि विनयसंपन्न ! एक आपल्या पतीवर करडा अंमल चालविणारी राक्षसी, तर दुसरी मृत पतीला अहर्निश डोळ्यापुढ ठेवून त्याच्या स्मृति–समागमात सुख मानणारी देवता ! अहाहा ! कोण तरी या दोन स्त्रियात तफावत ! पण एकीच्या अवगुणानीं राज्यशकटाला जितकीं विघ्नं आणलीं, तितकीं दुसरीचे गुण आणणार ! कोण हे दुर्दैव ! "

## चित्ताकर्षक प्रारंभ

नाटकाचा प्रारंभच मुळीं अत्यत चित्ताकर्षक आहे. रत्नागिरी किल्लयाच्या तटावरून तोतया उडी घेत आहे. त्यामुळे तेथील किल्लेदार रामचद्र नाईक याना तोतया हाच भाऊसाहेब वाटतो आणि म्हणून ते स्वामिभक्तीमुळे त्याच्या पायातील बेड्या काढतात व स्वत. पुण्यास पार्वतीबाईच्या समोर जाऊन उभे राहतात. ही बंडखोरी व ही धिटाई सहन करण्याइतके नाना भेकड किंवा लेचेपेचे नाहींत. ‘ अर्धे शहाणे ’ असले तरी ते राज्यशासनात अत्यत कठोर आहेत. पार्वतीबाईच्या डोळ्यादेखत ते त्या रामचंद्र नाईकाना तडातडा बोलतात. एखाद्या कडव्या सेनापतीप्रमाणे कडक शब्दाचे आसूड नाना उडवतात. ते रामचद्र नाईकाना म्हणतात, “ नाईक, तुम्हाला शरम नाहीं वाटत असली कागावखोर मायावी भाषण बोलायला ? तुम्हीं भाऊसाहेबाना पानपताला जाण्याच्या आधीं पाहिलं होत काय ?·········किल्लेदार नेमतात ते हुकमाची तामिली करायला नेमतात, दयाधर्माची नसती उठाठेव करायला नेमीत नाहींत. तोतया काहीं आजकालचा कैदेत नाहीं. आज बारा वर्षे कैदेत आहे. या अवधींत या कृत्याच्या पापपुण्याचा भार ज्यानीं आपल्या माथ्यावर वाहिला ते तो यापुढेंहि वाहायला समर्थ आहेत, समजला ? शेषाचा भार हलका करायला सरड्यान धावण्याच कारण नाहीं. लाडे कारभार करून त्याना मोठे प्रतिष्ठित नाव दिल्यान गुन्हेगारी कमी होत नसते. उलट ती वाढते मात्र. समजल नाईक ! ”

## भावनेच्या छटा

नुसते करडे शब्द बोलूनच नाना थाबत नाहींत तर, पार्वतीबाईच्या समक्ष, त्याच्या विश्वासास पात्र झालेल्या व पेशवाईचा एकनिष्ठ आधार असलेल्या रामचद्र नाईकास ते तेथल्या तेथेच बेड्या घालून कैदेत टाकतात. पण हा सारा कठोरपणा पार्वतीबाईशीं बोलताना मावळतो. भाऊसाहेबांविषयींची कृतज्ञता आणि पार्वतीबाईविषयींची आदरबुद्धि - यामुळे नाना फारच जपून व नमून वागतात. ‘ मधात पडलेली माशी हलक्या हातानें

वर काढावी, तशी ही नाजुक कामगिरी आहे.' नानाच्या राजकारणावर असंतुष्ट झालेल्या पार्वतीबाई त्याना सयमाने पण मार्मिकतेनें टोंचून बोलतात. तरीहि नाना आपला शातपणा न सोडतां त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करतात. या स्वभावरेखेच्या छटा पुढील संवादात दिसून येतात.

पार्वती०—नाना, तुमच्या कुटुंबासारखा स्वभाव मिळायाचा नाहीं! तुम्हाला मोठं दुःख झाल, नाना! त्या इथ असताना त्याची मला मोठी करमणूक होती. तुमचं धोरण सभाळून त्यातल्या त्यांत माझ्याशीं त्या मोठ्या मोकळ्या मनानं वागत.

नाना—( स्वगत ) या बोलण्यात किती नाजूक खोच आहे हे ज्याचं त्यालाच कळणार. ( उघड ) तीं मोकळ्या मनाची तर खरीच. पण तिन साभाळण्यासारखं असं माझ धोरणं म्हणून मात्र कांहींच नव्हत! मींहि बाईसाहेबाशीं होईल तितक्या मोकळ्या मनानच वागत असतो. मग बाईसाहेबाना कसंही वाटो!"

संवादाची तार चढता चढता पार्वतीबाई असेहि म्हणाल्या, " मरण हातचं असत तर मी तरी अशी ही विटबना करून घ्यायला कशाला जगले असतें? ..... .....ते जिवत होऊन आले, तरी त्याची वाट काय लागणार, हे दिसतच आहे उघड." पार्वतीबाईचे हे दोन घाव नानाच्या अगदीं जहरी लागला. त्याच्या हृदयातील साऱ्या भावना खळबळून उठल्या व उसळल्या. डोळ्याना पाणी आणून, भावनापूर्ण भाषेने, नाना पार्वतीबाईना विचारतात,

"--हा नाना इतका नीच अधम झाला काय? मी लहान असताना पोटच्या मुलाप्रमाणं माझ्यावर प्रेम कुणीं केलं? भाऊसाहेबानींच ना? मला माधवरावाबरोबर आस्थेने शिक्षण कोणीं दिल? 'हा नाना पुढ मोठा होईल' म्हणून मला शाबासकी देऊन ममतेनं पाठीवरून हात कोणी फिरवला? पानपतच्या स्वारीवर निघताना मुद्दाम हौसेन विश्वासरावाबरोबर मला कोणी मागून घेतलं? वाटेत नर्मदा तीरावर मी आजारी पडून अत्यवस्थ झालो असता, "काकी, तुम्ही घाबरू नका." असं माझ्या

मातोश्रीला आश्वासन देताना स्वतःच्या प्रेमामुळं घाबरून जाऊन डोळ्याला पाणी कोणीं आणल ? "

असे अनेक पूर्वीचे अनुभव सागून, शेवटीं, " मी कृतघ्न, उलट्या काळजाचा मांग आहे असं आपण कस मानता ? " असा सरळ प्रश्न जेव्हा नानानीं टाकला, तेव्हा पार्वतीबाई म्हणतात, " नाना, तुमचे शब्द मला पटतात." नानाच्या चातुर्याचा व चारित्र्याचा हा विजय होय. तसेंच, नानासारख्या थोर पुरुषाच्या मनातील अत:सघर्ष दाखविणे हा केळकराच्या नाट्य—चातुर्याचाहि स्मारक-स्तभ होय.

## कोमल स्वभाव-रेखा

पार्वतीबाईचा स्वभाव अतिशय सरळ, भोळा व उदार असा दाखविलेला आहे. वैधव्याच्या सशयामुळे त्याचे मन अधिकच हळुवार झालेले. त्याची नानाकडे मागणी तरी किती सरळ ! त्या म्हणतात, " मी तेव्हांच सागितलं कीं, तोतया पुण्याला आणा. चारचौघासमक्ष परीक्षा होऊं द्या; त्याचा फडशा करा, मग आहेच बसलेली मी वैधव्याच्या दारात. सारच खोट ठरल, तर मग मीं नाहीं म्हणून तरी काय होणार ? मग तेव्हा तस का नाही झाल ? संशयाच मूळच खणून निघाल असत, म्हणजे मग कशाला पडला असता हा इतका गोंधळ ! "

तोतयाची बायको अमला हिच्याशींसुद्धा पार्वतीबाईचे वर्तन अत्यत प्रेमळपणाचे——सख्या बहिणीसारखे. " आपल्या प्रेमामुळे मी माझ दुःख जवळ जवळ विसरून गेले." असे ती पार्वतीबाईना म्हणते. शेवटी हीच अमला तोतयाला आपला पति म्हणून ओळखते. तसेच तोतया उत्तर हिंदुस्थानचा असल्यामुळे त्याचे कान भिकबाळीसाठीं टोचलेले नाहींत हेहि गुपित नानाचा नोकर हैबती उघडकीस आणतो आणि तोतयाचे सारे कारस्थान धुळीस मिळवण्यात " भले बुद्धीचे सागर नाना " यशस्वी होतात

## संमिश्र स्वभाव-चित्र

विजयनगरचे संस्थापक माधवाचार्य किंवा विद्यारण्य याचें स्वभावचित्र

म्हणजे परस्परविरुद्ध गुणाचे समिश्रण होय. त्याचे आयुष्य ब्रह्मचाऱ्याचे व वृत्ति सन्याशाची पण वर्तन राजकारणी मुत्सद्याइतके कारस्थानी. एकीकडे जगद्गुरु होण्याची पात्रता तर दुसरीकडे कौटिल्य-नीतीचा अर्कच—असें हें दुरगी स्वभाव–चित्र केळकरानीं कुशलतेने रेखाटले आहे. " शठाशी शठासारखे " वागूनहि आपली बुद्धि स्थिर व अलिप्त ठेवण्याची तयारी माधवाचार्यांची आहे. " राजकारणातील कारस्थानाचा आनद ब्रह्मानदाहून गोड " मानणारा हा विजयनगरचा प्रधान साध्या होमशाळेत ऋषीप्रमाणें राहतो. आणि ' जन्मभर विद्यासाधन व परोपकार ' करीत असतो. राजा हरदेवराय हा दुबळा असल्यामुळे त्याची राणी, तिचा भाऊ कृष्णदेवराय व एक कारस्थानी खल रुद्रदाम हे तिघेजण अम याविरुद्ध कारस्थान रचतात, किंबहुना म्लेच्छ शत्रूना स्वारी करण्यास पाचारण करतात. हा कट अमात्य उघडकीस आणतात आणि आपल्यावरील मारेकऱ्यालाच मित्र बनवून सोडतात. त्याचा हस्तक हनुमान हा निरनिराळीं वेषातरे करून त्याचे बेत सिद्धीस नेतो. अमात्याचे आपल्या मानलेल्या मुलीवर किती वात्सल्य होते, याचे प्रतिबिंब पुढील उद्गारात पडलेले आहे.

" तुझी प्रेमळ आई व मायाळू पिता हीं दोन्ही मीच ना ? पण एवढच काय ? तुझा विनोदी भाऊ आणि थट्टेखोर बहीणहि मीच अस समज. बाळे, या जगात एका विजयानगरीखेरीजकरून प्रेमाच स्थान जशी तू मला आहेस, तसाच सर्व जगात, निदान आज तरी, तुझ्या प्रेमाचं स्थानहि मीच आहे कीं नाहीं ? "

## अपूर्व नारद

केळकराचें अत्यंत हसरे व यशस्वी नाटक म्हणजे ' कृष्णार्जुन-युद्ध.' त्यात त्याचा सारा खेळकरपणा खेळत आहे, मिस्किलपणा मिसळलेला आहे, त्याची सारी रसिकता आणि कुशाग्र बुद्धीमत्ता सवादासवादातून ओसंडत आहे. एकापेक्षा एक अधिक उत्कठतेचे प्रसग गुफण्यात त्यानीं मोठे कौशल्य दाखविले आहे. दक्षिण हिंदुस्थानातील देवालयाच्या गोपुराप्रमाणें या नाटकाच्या कथानकाचे बाधकाम डौलदार झाले

आहे. नारदाची भूमिका तर केवळ अप्रतिम आहे. इतर कैक नाटकातून नारद म्हणजे केवळ एक उंचशेंड्या व कळलाव्या विदूषक दाखविलेला असतो. पण केळकरानी त्याला फारच वरच्या दर्जाला नेऊन ठेवले आहे. मुत्सद्याचे बुद्धिचातुर्य, साधूची विश्व-कल्याण-बुद्धी व बालकाचा खेळकर विनोद या तिन्ही गुणाचा सगम नारदाच्या स्वभावात केळकरानीं घडवून आणला आहे. त्याच्या कारस्थानाची यादीच कौशिक ऋषी नाटकाचे शेवटीं गालव ऋषीना सागतात, ती अशी, " चित्ररथान अपराध केला त्याला मूळ कारण नारद, श्रीकृष्णाकड जायला आपणाला सुचविल ते नारदान, श्रीकृष्णाकडून प्रतिज्ञा पक्की करविली नारदान, इद्रलोकात जाऊन चित्ररथाला भूलोकावर आणून सोडला नारदान, देवी द्रौपदीकडून चित्ररथाच्या स्त्रीला अभयवचन देवविल नारदान, आणि श्रीकृष्णान अजून आपली प्रतिज्ञा खरी केली नाही म्हणून आपल्याला चिडवायलाहि नारदच आला होता."

## कथेची रंगत

कौरव-पाडवाचें युद्ध सपल्यानतर पाडवाच्या श्रमपरिहाराकरिता वनदेवतानीं त्याना व श्रीकृष्णाला आपल्या क्रीडावनात बोलाविलें व मोठा उत्सव सुरू केला. तेथे यादव-पाडवाच्या स्त्री-पुरुषाचीं प्रेम-सभाषणे चालू असताना नारदमुनि अवतरले आणि तत्त्वज्ञान साग् लागले की, कोणाचेहि दुसऱ्यावर प्रेम असते ते स्वतःचे सुखासाठीं. त्यानी करता करता कृष्णाचे प्रेम निरपेक्ष असल्याचे इतरानीं ठरविले. तेव्हा ' कृष्णाच आत्मप्रेम ' कसोटीला लावण्याच्या कामाला नारदमुनी लागले. ऋषीचा अपमान मद्यपी चित्ररथ गधर्वाने केला व त्याचा बारा प्रहरात शिरच्छेद करण्याची प्रतिज्ञा श्रीकृष्णाने केली. उलट चित्ररथाच्या पत्नीने करुणा भाकल्यामुळे, त्याचा अपराध माहीत नसताना, त्याचे रक्षण करण्याची प्रतिज्ञा द्रौपदीने केली व ती तडीस नेण्याचे वचन अर्जुनानें दिले. त्यामुळे परिणाम मात्र विचित्र झाला. चित्ररथाचा प्राण घेऊ पाहणारा श्रीकृष्ण एका बाजूस व त्याचा प्राण वाचवू पाहणारा अर्जुन दुसऱ्या बाजूस—असा बिनतोड प्रसग

निर्माण होऊन मित्रामित्राचे युद्ध सुरू झाले. तेव्हा आपलें कारस्थान यशस्वी झालें या आनंदाने मोठमोठ्याने हसून नारद म्हणतो, "नारायण ! नारायण ! द्रौपदी, बोल आता कृष्णविजय कसा काय आहे तो ! हा श्रीकृष्ण आणि हा अर्जुन–एका आत्म्याचीं हीं दोन शकल ! असं असता अभिमानान आणि आत्मप्रीतीनं कशीं निकरावर आलीं आहेत पहा ! बस्स झाल ! माझं काम संपलं !"

## रहस्यपूर्ण गुंतागुंती

सस्कृतातील विशाखदत्ताचे मुद्राराक्षस आणि इंग्रजींतील स्कॉटची एक कादंबरी या दोघाच्या आधाराने केळकरानीं 'चद्रगुप्त' नाटक रचले. तें कोल्हटकराच्या नाटकाप्रमाणे रहस्यपूर्ण व गुंतागुंतीचे आहे. त्यात मुख्य स्वभावचित्र चाणक्याचेच आहे. पण त्याहिपेक्षा उदात्त स्वभाव दाखविला आहे बळिरामाचा. चाणक्य, चंदनदास व बळिराम हे तिघे गुरुबंधु. पण, चाणक्याने नद घराण्याचा अत करण्याची प्रतिज्ञा केली आणि चद्रगुप्ताला हाताशीं धरले. उलट चदनदासाची नद घराण्याविषयींची राजनिष्ठा अलौकिक होती. त्याचा मुलगा नद घराण्यातील शेवटच्या पुरुषाला–हरनंदाला–आपल्या घरीं स्त्रीवेषाने ठेवतो. त्याचे रक्षण चदनदासाची मुलगी तारिणी प्राणपणानें करते. तिचे प्रेम असते चद्रकातावर–आणि चंद्रकात म्हणजेच चंद्रगुप्त व चंद्रगुप्त म्हणजे नंद घराण्याचाच वशज ! अशी एकातून एक गूढे उकलत जातात. हरनदाचा शिरच्छेद करण्याची प्रतिज्ञा करणारा चद्रगुप्तच तारिणीच्या आग्रहामुळे, नकळत, स्त्रीवेषधारी हरनंदाचें प्राणरक्षण करण्याची प्रतिज्ञा करतो आणि ती शेवटास नेतो. कृष्णार्जुनयुद्धासारखाच हा बिनतोड प्रसंग आहे.

'सरोजिनी' या शोकातिकेचे मूळ बंगाली आहे. मेवाडचा राणा लक्ष्मणसिंह आपली कन्या सरोजिनी हिलाच देवीच्या यज्ञात बळी द्यावयास निघतो. तेव्हांचा त्याचा व त्याहून त्याच्या राणीचा शोक या नाटकांत बऱ्या प्रकारें व्यक्त झाला आहे. रहस्यपूर्ण कारस्थानें या नाटकाच्या कथानकांत गुंफलेलीं असलीं, तरी नाटकांतून कोणताच रस प्रभावीपणे निर्माण होत नाहीं.

## विसंगतींतील विनोद

केळकराचा स्वभाव जितका तार्किक, तितकाच विनोदी, जितका व्यासगी, तितकाच रसिक. त्याच्या विनोदप्रिय रसिकतेला खाद्य होण्यासारखा विषय त्याच्या चिकित्सक बुद्धीने शोधून काढला. तो म्हणजे उत्तराच्या युद्धाचा. ' बायकात बहु बडबडला ' अशी ख्याति या विराट राजाच्या पुत्राची. तोच वीर या नाटकाचा नायक. सगीत व सग्राम—केवढी विसगति ! तिचे चित्र केळकरानीं सुरेख रेखाटले आहे. उत्तराला सदासर्वदा ध्यान सगीताचे व नर्तनाचे. आपल्या भित्र्या स्वभावावर तो वीरश्रीच्या भाषेचे पाघरूण घालतो. विराट-नगरींतील गुप्त पाडवाचा शोध लावण्यासाठीं कौरवानीं व त्रिगर्त राजाने गोळवाडा लुटला अशी युद्ध-वार्ता ऐकल्यावर शब्दशूर उत्तर म्हणतो,

" अग आई, अशी घाबरतेस काय म्हणून ? कीचकमामा गेले म्हणून काय झाल ? त्रिगर्तांचा हा काळ, हा सवाई कींचक जिवत असताना भीति कशाची ? बाबासाहेब, हाच पहा मी आताच्या आता त्रिगर्तावर स्वारी करून आपल्या पायाशीं बाधून आणतो. " युद्ध जवळ जवळ आल्याची एकएक वार्ता कानीं पडताच उत्तर धडधडत्या अंतःकरणाने पण जोरदार शब्दानीं आपल्या नोकराना एकच उत्तर पुनः पुनः देतो. तें म्हणजे " जा, उत्तर जीवत आहे एवढा निरोप शत्रूला कळीव, तेवढा बस्स आहे."

संगितात रंगलेल्या उत्तराला रण-वाद्यातून सगीत-वाद्याचे ध्वनि ऐकूं आले, तर स्वयपाकघरात बल्लवाचार्य होऊन राहिलेल्या अज्ञातवासातील भीमाला प्रत्येक वस्तूंत युद्धच दिसूं लागले. तो म्हणतो,

" स्वैंपाक करिताना प्रत्येक गोष्टींत मला युद्धचमत्कार दिसूं लागले आहेत. भाजी चिरून झाली म्हणजे रक्तपाताशिवाय मी कौरवाचे कंठनाळ कसे चिरले अशा भ्रमानं मी भाबावून जातों. आमटी रटरट शिजताना डाळीचे दाणे वर उसळूं लागले म्हणजे मी मारलेल्या कौरवाचीं शिरविरहित कबंधेंच रणनृत्य करूं लागलीं आहेत कीं काय असं मला वाटतं."

एकाच प्रसगीं दोघाच्या दोन भिन्न वृत्ति केळकरानीं मार्मिकतेने रंगविल्या आहेत.

## विनोदाचें वातावरण

'तोतयाचे बड' या नाटकात करुणरसाबरोबरच हास्यरसहि समातर दिशेने वहात आहे. बगभटाचे सोग घेतलेला हैबतराव तोतयाला म्हणतो, "बुदीचे लाडू हेच आमचे तोफाचे गोळे. दर्भाच्या काड्या याच आमच्या तरवारी, भाले न् बरच्या! चौघड्याचा नगारा हेच आम्हीं आजवर ऐकलेलं रणवाद्य! आम्हालाहि चागला नेम मारता येतो; पण आतरपाटाच्या आड लपलेल्या वधूवराच्या डोक्यावर अक्षता नेमक्या टाकण्यापुरता!"

विनोदाचा दुसरा प्रकार बगंभट व विठाई याच्या सवादात व सबंधात दिसून येतो शब्दावर कोट्या करून बगभट विठाईस म्हणतो, "तुला थयमान करता येत हें मी रोज पाहतो, पण पवमान म्हणता येतो का? तुला पुरुषाला सुकविता येत, पण पुरुषसूक्त येत नाहीं! तू स्वतः चडी आहेस, पण तुला शतचडी कुट करता येते?"

भटजींचे सारेच सवाद खुसखुशीत आहेत. त्याचा विशेष गुण म्हणजे त्याच्या भाषेचे अस्सल कोकणी वळण. मराठी वाङ्मयात अशी प्रादेशिक भाषा-वैशिष्ट्ये क्वचितच दाखविलीं जातात. त्यामुळे केळकराच्या या बारकाव्याचे महत्त्व अधिकच. कोकणातील भटाचा एक सवाद ऐका.

पिकटभट—अरे चिकटभट, तू मेल्या करीत तरी काय होतास? मी तुला एक शभर हाक मारली असेल, पण आतून कोणी ओ देईल तर राम-शिवा-गोविंदा.

चिकटंभट—अरे, मी आगरात होतो नारळींच्या आणि पोफळींच्या झाडाना पाटाचे पाणी लावीत. तुझ्या साऱ्या हाका मी ऐकिल्या; आणि ओही देत होतो दर हाकेगणिक. पण तुला ऐकूं येईल तर ना! अरे चिकटंभट, तूं आपल्या कानातला मळ काढ जरा मळ.

पिकटंभट—एकूण तूं ओ देत होतास तर! पण तूं ओ देस ते कळेना कीं रेडकूं ओरडे तें कळेना, कीं रहाट करकर वाजे तें कळेना. अरे चिकटभट, तूं जरा आपल्या घशास ओगण घाल ओगण.

तसेच,

चिकटभट—आमच्या निऱ्या बंदरात शत्रूचे एखादे आरमार तर आले नाहीं ? तसे असेल तर खा-खाडींतून बसून हो-होडींतून पळून जाईल.

## पांडित्य-प्रदर्शनाचें विडंबन

'वीर-विडंबन' हे पौराणिक प्रहसन, तर 'नवरदेवाची जोडगोळी' हे काल्पनिक प्रहसन त्याचे कथा-बीज विलायती आहे. केवळ करमणूक करणे हाच त्याचा हेतु. त्यात प्रणय-लीला, वेषांतरे, द्वंद्वयुद्धे इत्यादि मालमसाला भरपूर आहे. विनोदासाठीं माणकुबाई हे पात्र घातलें आहे. नसलेले पांडित्य दाखविण्यासाठीं ही बाई अत्यंतऐवजीं अत्यज, अंतःस्थ-ऐवजीं पाथस्थ असे चुकीचे प्रौढ शब्द वापरते.

'संत भानुदास' हे नाटक रसपूर्ण आहे. अनागुंदीच्या राजानें पंढरीच्या विठ्ठल-मूर्ति द्रव्याच्या बळावर आपल्या राजधानींत नेल्या व भानुदासानें त्या आपल्या भक्तीच्या बळावर परत आणल्या, असे हें रसाळ कथानक आहे. त्यात भानुदासाच्या सुळाचा पुष्पवृक्ष होण्याचा चमत्कार आहे, भक्तीचा जिव्हाळा जाणणारे वारकरी आहेत आणि साक्षात् विठोबाहि प्रगट होतात. पण केळकराच्या लेखणींतून भक्तिरसापेक्षा हास्यरसच निर्माण झाला आहे. पोटभरू बडव्याचा पैशाचा हव्यास व आप्पयाची कानडी वळणाची मराठी भाषा यामुळे नाटकात विनोद निर्माण होतो. पण विठ्ठल-भक्तीने भानुदास रंगून गेले आहेत—तन्मय झाले आहेत, असा भक्तिरसाचा उत्कर्ष मात्र फारसा नाहीं. भानुदासाचा प्रथम प्रवेश पंढरपुरात होतो, तेव्हा स्वार्थी बडव्यानीं उपटसुंभपणानें जो कर बसविला, त्यासंबंधीं पुढील हास्यकारक संवाद होतो.

"भानुदास—काय हो, हा कर तुम्हीं कुणाच्या हुकुमान वसूल करतां ?

दग०—संस्थानच्या.

भानु०—संस्थान कुणी स्थापल ?

दग०—पंचांनीं.

भानु०—आणि पंच कुणीं नेमले ?

दग०—संस्थानन ! “ सुंदर तें ध्यान उभे विटेवरी । कर कटावरी ठोवियला ” असा अभगच आहे. कट म्हणजे दाराजवळची तिळ्याची मान्योंची जागा ! ” या नाटकाच्या जन्मवेळींच आळंदीस नवा कर बसला होता.

शाब्दिक कोट्या व मार्मिक युक्तिवाद हे बुद्धिचातुर्याचे खेळ केळकर हवे तितके दाखवू शकतात, पण प्रेक्षकांची हृदये हालवील, पाझरवील, प्रसंगीं फोडीलहि; असे भावनोत्कट प्रसग निर्मिणे केळकराच्या कक्षेबाहेरचेंच होते. बुद्धि-विलासाच्या दृष्टीने त्यांचीं नाटकें वाचनीय आहेत.

## अभ्यासाच्या वाटा

(१) “ केळकर स्वत कुशाग्र बुद्धीचे मुत्सद्दी होते यामुळें तोतयाच्या बंडातील ‘ नाना फडणीस ’, अमात्य माधवांतील ‘ माधवाचार्य ’ व चंद्रगुप्तातील ‘ चाणक्य ’ हीं स्वभावचित्रणें अत्यंत मार्मिकपणे रेखाटलीं आहेत.” चर्चा करा.

(२) ‘ तोतयाचे बंड ’ हे वाङ्मयीन दृष्ट्या व रंगभूमीवरील यशाच्या दृष्टीने एक श्रेष्ठ नाटक ठरले या नाटकातील वाङ्मयीन गुण स्पष्ट करा. रंगभूमीवरमुद्धा ते यशस्वी का झाले ते लिहा

(३) “ केळकराचा विनोद संथ व संयमित असल्यामुळें प्रेक्षक कधी खो खो हंसताना दिसत नाहीं, मात्र तो गालातल्या गालात हंसल्याविना राहत नाही,” विवेचन करा.

(४) केळकराच्या नाटकात आढळणाऱ्या कांहीं काव्यात्मक कल्पनाचीं उदाहरणे द्या.

**अधिक अभ्यास—**

केळकराचीं ६ नाटकें लेखक–प्रा. वि. पा. दांडेकर.

# वासुदेवशास्त्री खरे : : : ३

शिवनेरीच्या किल्ल्यावर, दरबारच्या दिवाणखान्यात, शहाजी, जिजाबाई, स्वामी इत्यादि मडळी जमली आहेत. रत्नजडित पाळण्यात बाल-शिवाजी पहुडले आहेत. स्त्रीपुरुषमडळी " जो जो जो जो रे । शिवराया । सुख पावो तव काया ॥ धर्मध्वज कडाडला । जन गडबडला । मोहमहार्णविं पडला । तो तूं ताराया । असहाया । येसि महाराष्ट्रा या । " हा पाळणा आनंदाने, अभिमानानें, आशेने गात आहेत आणि 'महाराष्ट्राच्या या छत्रपतीला मींच प्रथम मुजरा करतो ' असे म्हणून जाधवराव पाळण्यातील बाल-मूर्तीला वदन करतो—



हे रगभूमीवरील दृश्य पहाताच, ते खरेच आहे असें मानून, कोल्हापूरचे छत्रपति शाहूमहाराज, आपल्या पहिल्या रागेंतील खुर्चीवरून उठून उभे राहिले आणि उचंबळत्या स्वामिभक्तीने त्यानीं पाळण्यातील शिवछत्रपतीला मुजरा केला! इतका विलक्षण परिणाम घडविणारें नाटक म्हणजे 'शिव-सभव.' अर्थात् नाट्याचा विषय, रसिकाची भावना व नटाचें अभिनय-कौशल्य हेहि या यशाचे भागीदार आहेतच, पण त्या यशाचे मुख्य घटक म्हणजे नाटकाचे निर्माते—वासुदेवशास्त्री खरे.

## इतिहासाचें संशोधन

नाटक म्हणजे काव्याचे एक रम्य अग, आणि इतिहास हा तर प्रबधाचा रुक्ष प्रकार. पण या दोहोंची सागड खरेशास्त्री यानीं सुदरपणें घातली. पटवर्धनीं दप्तराचे सशोधन करून त्यातील कागदपत्र त्यानी ‘ ऐतिहासिक लेखसग्रह ’ या आपल्या मासिकातून प्रसिद्ध केले. त्यापायी त्याना मोठी झीजहि सोसावी लागली. तरी ऐतिहासिक लेखसग्रहाचे बारा खड त्यानी छापून प्रसिद्ध केलेच. पानिपतच्या युद्धापासून बाजीरावाच्या अखेरीपर्यंतचा इतिहास टीपा-प्रस्तावासहित त्यानीं उजेडात आणला. याशिवाय ‘ अधिकार-योग ’ हे नाना फडणिसावरचे पुस्तकहि त्यानी प्रसिद्ध केले. इचलकरजी सस्थानचा इतिहास, हरिवशाची बखर, मालोजी व शहाजी इत्यादि सशोधनपूर्ण व चिकित्सापूर्ण ग्रथहि त्यानी रचिले.

## नाट्यांतील ध्येयवाद

डोंगरात बोगदे पोखरण्याचे हे बिकट काम करणारे खरेशास्त्रीच तेथे नाट्यकलेची सतारहि वाजवीत होते हे विशेष. ऐतिहासिक किवा ऐतिहासिकासारखी कल्पित अशीं आठ नाटकें लिहून त्यानी ललित लेखन केले. इतिहासातील अद्भुत घटनाच्या पायावर खरेशास्त्र्यानी आपलें नाट्य-मदिर उभारले आहे. ‘ शिवसभव ’ हे तर प्रत्यक्ष इतिहासावरील नाटक होय. पण बाकीच्या कल्पित नाटकातहि ऐतिहासिक वातावरणच त्यानीं निर्माण केले आहे. ते जसे इतिहास-संशोधक, तसेंच कवीहि होते. आणि या दोन्ही गुणाचे प्रतिबिंब त्याच्या नाट्यसृष्टीत पडलेले आढळते. ‘ यशवतराव ’ नावाचे त्याचे महाकाव्य प्रसिद्ध आहे आणि ‘ जन्मभूमि ’ या कवितेतील ‘ पोटासाठी भटकत जरी ’ इत्यादि पक्ति तर शाळकरी मुलाला आनंदाने व बेकार तरुणाला दुःखाने सदैव आठवतात. ‘ आबे, पोफळी, साग, नारळि तटीं ’ इत्यादि त्यानीं केलेले कोकणचे वर्णनहि मराठी वाचकाना सुपरिचित आहे. सुदृढ संविधानक, प्रौढ भाषा व उत्कट रस या गुणानीं त्याची नाटकें रगभूमीवर लोकप्रिय झालीं. शृगाररसाला फारसा अवसर शास्त्रीबुवानीं दिलेला नसला, तरी वीर, अद्भुत व करुण हे रस

त्यानीं चागलेच खेळविले आहेत. पतिभाक्ति, राष्ट्रनिष्ठा, धर्मभक्ति, बुद्धि-चातुर्य इत्यादि गुणाचे पुतळे त्यानीं आपल्या नाट्य–सृष्टींत उभारले आहेत. तेजस्वी स्त्रियाचे उज्ज्वल आदर्श त्यानीं, खाडिलकराइतक्या कौशल्याने नसले तरी, तितक्याच प्रमाणात निर्मिले आहेत. रजन व उद्बोधन हीं दोन्ही कार्ये करण्यास समर्थ अशींच त्याचीं नाटके रगेल व रगेल आहेत. त्याच्या नाटकाचे एक गमतीचे लक्षण असे कीं, सर्व नाटकाची नावे पाच–अक्षरीं असून दोन चरणाचीं आहेत व तिसऱ्या अक्षरावर अनुस्वार असतो. ' गुणोत्कर्ष ' हे पहिलें नाटक तेवढे अपवाद आहे.

## विद्येसाठीं कष्ट

कृष्णाकाठावर नाट्याचें पीक काढणारे वासुदेव वामन खरे याचा जन्म समुद्रकाठच्या गुहागर गावीं ता. ५ ऑगस्ट १८५८ रोजी झाला. 'समुद्र' या काव्यात त्यानीं कोकणचे सृष्टिसौंदर्य रगवून आपल्या जन्मभूमीचे ऋण फेडले. त्याचे वडील शास्त्री होते. प्राथमिक शिक्षण झाल्यावर वासुदेवशास्त्री वयाचे अठरावे वर्षीं साताऱ्यास आले. तेथील एका साप्ताहिकात ते अग्रलेख लिहून देत. त्याचा मोबदला काय ? तर एक भाकरी व वाटीभर आबील ! गरिबी त्याच्या पाचवीसच पुजलेली ! वयाच्या आठव्या वर्षीच शाळेत बसल्याबसल्या त्यानीं मोरोपती थाटाची एक आर्या रचून आपल्या मित्राना चकित केले होते. सस्कृत पडित होण्याची त्याची महत्त्वाकाक्षा. त्यासाठीं ते बरोबर फक्त सहा आणे व थोडे पोहे घेऊन गुहागराहून पायीं निघाले शभर मैलाची मजल मारून ते मलकापुरास गेले. तेथे आपली कवित्व-शक्ति दाखवून उपाशी पोट भरले व कोल्हापूरला कूच केले. कोल्हापुरास सस्कृतचे अध्ययन करीत असता श्रीमंत कागलकराच्या दरबारात वासुदेवाने आपल्या कविता म्हणून दाखविल्या. त्या ऐकून सतुष्ट झालेल्या श्रीमतानीं त्याला शालजोडी-दक्षिणा वगैरे देऊन बहुमान केला. हें सारे कर्तृत्व झालें १५।१६ वे वर्षींच. साताऱ्यास त्यानीं सस्कृतचे विशेष अध्ययन केले. त्या भाडवलावर त्यानीं पुणें येथें संस्कृत शिक्षकाची नोकरी मिळविली.

## शास्त्रीबुवांच्या ग्रहमालेंत

शिक्षक झाले तरी त्याची विद्यार्थि-वृत्ति सुटली नाही. व्याकरणशास्त्राचा सखोल अभ्यास त्यानीं चालविला. त्याच वेळीं ' मालाकार ' विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या कर्तृत्वाचे किरण महाराष्ट्राला प्रकाशित करीत होते, सचेतन करीत होते. त्याच्या लेखनातून खरेशास्त्री याना इतिहास-सशोधनाची स्फूर्ति मिळाली. 'मालाकारांच्या' न्यू इग्लिशस्कूलमध्यें प्रारभींच ते शिक्षक म्हणून गेले. तेथे एक वर्ष काम केल्यावर ते लो. टिळकाच्या शिफारशीनें मिरजेस शिक्षक म्हणून गेले—आणि आमरण तेथेंच अध्यापन, सशोधन व लेखन करीत राहिले. फक्त पचेचाळीस रुपये पगारावर तीस वर्षे त्यानीं शिक्षकाचे काम केले. काव्य, नाटके व ऐतिहासिक ग्रथ अशी त्रि-विध साहित्य-सेवा करून यानीं मोठा लौकिक मिळविला आणि ता. ११ जून १९२४ रोजीं इहलोकीचा निरोप घेतला. विष्णुशास्त्र्याच्या ' केसरी ' पत्रावरील 'गजालिश्रेष्ठा या ' या श्लोकाचे समवृत्तातले भाषातर वासुदेवशास्त्र्याचेच. त्यानीच मूळ सस्कृत श्लोक सुचविलेला ' केसरी ' हे नावसुद्धा त्याच्याच मेदूतून निघालेले. शाळेतहि ते सस्कृत श्लोकाचे समवृत्त मराठी भाषातर हा हा म्हणता करून देत. सगीत कलेचा व बुद्धिबळाचा नाद त्याना होता.

## इंग्रजीचा अभ्यास

ध्येयनिष्ठा, उद्योगप्रियता, बहुश्रुतता व रसिकता या चार गुणाचा आदर्श शास्त्रीबुवाच्या जीवनात पहावयास सापडतो. मिरजेस गेल्यावर, प्रौढ वयात, इंग्रजी शिकण्याची जरूरी त्यांना जाणवली. लगेच रात्रींचा दिवस करून, केवळ स्वतःच्या प्रयत्नाने, त्यानीं इग्रजीचा अभ्यास केला; इतका कीं, पुढें ते इग्रजीतून व्याख्यानेंहि देऊ लागले. त्याची स्मरणशक्ति जबर होती. शाळेत सस्कृत नाटकाचा सबध अक ते म्हणून दाखवीत. मिरजेंतील ग्रंथालयामधील चारशे इग्रजी ग्रथ त्यानी वाचले. प्रसगीं उपास काढून, पाय-पिटी करून, पाच लाख ऐतिहासिक पत्रे वाचून, महत्त्वाच्या कागदपत्राच्या नकला स्वहस्तानें करून, गरिबींत राहून, शास्त्रीबुवांनीं पचवीस वर्षे जें

इतिहास-संशोधनाचे प्रचंड कार्य केले आहे, त्यामुळे त्याना राजवाडे–पारसनीसप्रभृतींच्या श्रेष्ठ श्रेणींत स्थान मिळाले आहे.

## पहिल्या सलामीलाच मात !

'गुणोत्कर्ष' हे शास्त्रीबुवाचे पहिले नाटक. कोल्हापूरच्या शाहू-महाराजाच्या राज्यारोहणानिमित्त कॉलेज-विद्यार्थ्यांना एक नाटक करावयाचे होतें. त्यासाठीं बक्षीस जाहीर करण्यात आले होतें. या बक्षिसाच्या स्पर्धेसाठीं १८८५ सालीं त्यानीं ते रचिले. त्या स्पर्धेत देवलांच्या 'दुर्गे'वर मात करून या नाटकानें पहिले बक्षिस मिळविले. विद्यार्थ्यासाटीं रचलेल्या या नाटकात स्त्रीपात्र एकच आहे. स्वामिभक्त जिवाजीपताचे साधेभोळे पण इमानी स्वभावचित्र आपल्या या पहिल्या नाटकातहि शास्त्रीबुवानी चागले रगविले आहे. त्याचबरोबर त्याचा मुलगा कृष्णराव याचाहि शूर व दिलदार स्वभाव स्पष्टपणे रेखाटला आहे. चागले आणि वाईट अशा दोन्ही प्रवृत्तींचे प्रवाह संभाजीच्या पात्रात त्यानी कुशलपणे खेळविले आहेत. तरीहि सर्वात ठसठशीत स्वभाव-रेखा म्हणजे शिवाजीमहाराजाची. वास्तविक नाटकाच्या कथानकात त्याचे स्थान गौण आहे. पण तरीहि महाराजाचे शब्द-चित्र शास्त्रीबुवानीं उत्तम रेखाटले आहे. 'धर्म्या' या नावाने मोतद्दाराची नोकरी करणारे महाराज लढाईचा प्रसग येताच कृतातकाळ बनतात आणि आनदाचा प्रसग येताच आपल्या सेवकाचा मुक्तकठाने गौरव करून आपले औदार्य अखड उधळीत असतात. त्याच्या या दुहेरी गुणसपदेचे वर्णन मोरोपत पेशवे पुढील शब्दानीं करतात, "जिवाजीपंत, महाराज जसे रणशूर आहेत तसेच ते दानशूरही आहेत. रणामध्ये शत्रूवर प्रहाराचा वर्षाव करीत असता तो "नको, नको" म्हणू लागला कीं, महाराज दयावत होऊन आपला हात लागलाच थाबवितात; परतु तीच कृपा दानामध्ये याचकावर होत नाहीं. तो "नको, नको" म्हणू लागला कीं, उलटा त्याजवर देणग्याचा वर्षाव मात्र होतो." शास्त्रीबुवाचे हें पहिलेंच नाटक असल्यामुळे त्यात खटकेबाज व सुटसुटीत सवाद फारसे नाहींतच, उलट नाट्याला बाधक व कादंबरीला शोभेशी लाबलचक वर्णने, क्वचित क्लिष्टहि, आलेलीं आहेत

## रहस्यपूर्ण कथानकें

रहस्यपूर्ण कथानके रचून त्यात उत्कंठापूर्ण प्रसग गुंफण्यात शास्त्रीबुवाचा हातखंडा आहे. 'उग्रमंगल' या नाटकात तर रहस्याच्या गुंतागुंती अधिकच आहेत. शृंगार, वीर, करुण, हास्य व अभ्दुत या रसाचे शिडकाव करणाऱ्या प्रसगांनीं या नाटकाचे कथानक गजबजलेले आहे. राणी पद्मावतीला आपल्या पतीवर एका महिन्यात प्राणसकट येऊन कोसळणार असे भविष्य कळतें आणि म्हणून ती त्याला त्या काळापुरतें प्रेम-विलासात गुंतवून ठेवते. परतु त्रस्त प्रजेने त्या वसंतोत्सवातून राजाला बाहेर पडावयास लावले. तेव्हा राणी तपश्चर्या करते, राजाला शत्रूने विश्वासघाताने कैद केल्यानतर ती स्वतः नर्तकीचा वेष घेऊन शत्रूला कैद करते आणि शेवटीं सेनापतीचा अधिकार हातीं घेऊन शत्रूचा निःपात करण्याचे शौर्य गाजविते. कपटास कपट व शटास शाठ्य अशा मुत्सद्दीगिरीनेहि ती वागते. विलासिनी, तपस्विनी व रणरागिणी या तिन्ही नात्यानीं राणीने जो स्वभाव प्रगट केला आहे, त्याचे मनोहर चित्रण 'उग्रमगल' नाटकात केले आहे. स्त्रिया व राजकारण, विग्रहवाद व सधिवाद याची मीमांसाहि संवादातून प्रसगोपात्त सहजगत्या केली आहे. रुप्याची बेडी, कट्यारींचा नाच, मानभंगासाठीं ठेगणा दरवाजा, कडेलोटासाठी आणलेला राजा इत्यादि चित्त थरारविणारे प्रसंग या नाटकात ठेचून भरलेले आहेत.

## संग्रामांतील नाट्य

शास्त्रीबुवाच्या नाट्य-रत्नहाराचा मेरुमणी म्हणजे 'शिवसभव.' ज्याला ज्याला म्हणून शिवरायाचा व त्याच्या स्वराज्याचा अभिमान वाटतो, त्या प्रत्येकाच्या अगावर क्षणाक्षणाला रोमाच उभे करील असेच हें नाटक आहे. अटीतटीचे पेचप्रसग चढत्या श्रेणीने त्यात गोंवलेले आहेत आणि कडोविकडीच्या संवादानीं ते रगविलेले आहेत. पहिला प्रवेशच मुळीं 'आनदाला पारावार नाहीं.' असा रसपूर्ण आहे. त्यात जिजाऊचे स्वप्न आहे, देवीचा दृष्टात आहे, स्वामींचे श्रीफल आहे—चमत्कारानी भरलेले प्रसंग त्यात जसे आहेत; तसेंच पतीची

मार्गप्रतिक्षा करणाऱ्या साध्वीच्या हृदयाची हुरहुरहि मूर्तिमत उभी केलेली आहे. त्यानंतर शहाजी आपल्या सासऱ्याकडे--जाधवरावाकडे--अखेरचे बोलणे करण्याकरता जातो, तोहि प्रसग तडातडीचा आहे. ' मोगल-बादशहाना शरण या ' असा उपदेश जाधवराव आपल्या जावयाला करतो, तर त्याना शहाजी भावी स्वराज्याचे दिव्य दर्शन घडवितो. या विचार–सग्रामाचे मूर्तिमत चित्र शास्त्रीबुवानी काढले आहे. यापेक्षा अधिक निकराचा सघर्ष दुसऱ्या अकातील दुसऱ्या प्रवेशात आहे. जाधवराव निजामाच्या दरबारात जातो आणि त्याला बजावतो, ' शहाजीला वजीर पदावरून काढून मला त्या जागीं काम करूं द्या. ' त्यावेळचा तिहेरी शाब्दिक सग्राम नाट्याला अत्यत पोषक आहे. शेवटीं जेव्हा जाधवराव ' शहाजीचा भावी पुत्र छत्रपती होणार ' अशी धमकी निजामशहाला घालतो, तेव्हा कोटीने कोटी झाडून निजाम उत्तरतो, " जर माझ्या वजिराचा मुलगा बादशहा होईल तर मी शाहेनशहा, म्हणजे बादशहाचा बादशहा होईन. " शाब्दिक चकमकीचा हा कळस पाहताना श्रोत्याच्या टाळ्याचा कडकडाट सहजच होतो.

जिजाबाईची ओटी भरण्याचा प्रसग या नाटकात मोठा रमणीय आहे. त्यावेळीं सर्व स्त्रिया आनंदाने गाणे म्हणतात. पण या आनदाची प्रतिक्रिया करण्यासाठीं जाधवराव तेथे येतो आणि जिजाबाईची ओटी पुनः पुनः उधळतो ! तो आपल्या कन्येशींहि विश्वासघात करतो ! ! या प्रसगाप्रमाणेच पुढें जाधवराव व जिजाई याची रणसग्रामावरील भेटहि रोमाचकारक आहे. अखेर तिचे रणचातुर्य पाहून जाधवरावाच्या अ्रात स्वामिभक्तीचा डोगर कोसळतो आणि गहिंवरून ' ये, वीरकन्ये ! ये ! ' असे म्हणून तो तिला आलिंगन देतो. अशा रसपूर्ण प्रसगाची मालाच या नाटकात शास्त्रीबुवानीं गुफली आहे.

## शहाजीचें स्वभाव-चित्र

'शिवसंभवा'तील शहाजीचे स्वभावचित्र अत्यंत धीरोदात्त आहे. छत्रपतींच्या जनकाला शोभेल असेंच वैराग्य त्यांच्या अंगीं आहे. ते म्हणतात,

" बापाच्या लहरीपासून जिने लहरी स्वभाव घेतला ती चचल लक्ष्मी ! तिच्या पाठीस कोण लागला आहे ? केवळ इंद्रियार्थांची तृप्ति करणारे पण वस्तुतः रोगाचे आगमन सुचविणारे जणूं काय त्याचे भालदारच, असे ते तुच्छ विषयभोग ! त्यांचा कोणाला हव्यास आहे ? जिथे मुळीं सुलतानाच्याच अधिकाराची शाश्वती नाहीं तेथे वजिरीच्या अधिकाराला काय किंमत आहे ? जिथें मुळीं देवच देव्हाऱ्यात रहाण्याची भ्रांति, तिथें पुजाऱ्याची वतनदारी कशी चालेल ? "

शहाजीचे वैराग्य व्यवहाराला विन्मुख नाहीं, त्याचप्रमाणे त्याची निजाम-सेवाहि स्वराज्याला बाधक नाहीं. तो जिजाबाईला आपला निश्चय सागतो, " आपलेच असे निराळे स्वतत्र मराठी राज्य निर्माण करण्याच्या उद्योगाला एव्हापासून लागले पाहिजे. त्याकरता मराठ्याची बुद्धि व पराक्रम एकत्र करून त्याचा ओघ या कार्याकडे वळवला पाहिजे. एकदर मराठमडळात आत्मविश्वास, साहसाची प्रीति व दृढनिश्चय हीं उत्पन्न केलीं पाहिजेत. "

## त्यागाची तयारी

स्वराज्य-संस्थापनाच्या कार्यात साऱ्या मराठ्याना एकत्र आणावें, यासाठीं शहाजीची स्वार्थत्यागाची तयारी फार मोठी आहे. तो जाधवरावाना आश्वासन देतो, " मी सुलतानाचा वजीर होईन आणि आपल्या तेजाला मालिन्य येईल, असे भय असेल, तर आपणच वजीर होऊन राज्य सभाळा, माझी हरकत नाहीं. मराठ्याचे नेतृत्व मी सपादन केले याबद्दल मत्सर वाटत असेल, तर आपणच आपल्या समाजाचे अग्रणी व्हा ! मी आपला आज्ञाधारक होऊन सागाल तसे वागेन. जाधव-भोसल्यानीं एकमेकांवर चढाओढ करण्याची झटापट आजपर्यंत केली, ती पुरे झाली ! माझ्या कुळाचा अभिमान मला आहे, माझ्या पराक्रमाचा अभिमान मला आहे, परंतु एका देशप्रेमाच्या पायीं मी सर्व प्रकारच्या अभिमानावर पाणी सोडायला तयार झालो आहे."

पण खोट्या स्वामिभक्तीने अंध झालेल्या जाधवरावांच्या डोळ्यांना हें नवे दिव्य तेज दिसूं शकले नाहीं. त्याची वृत्ति कशी होती याचें वर्णन शहाजीनें पुढील अलंकारिक शब्दांनीं केले आहे.

" तरवारीला पोलादाचे पाणी पाजण्यापूर्वीच त्यानीं स्वभावाला द्वेषाचें पाणी पाजले आहे ! धनुष्याला वक्रता येण्यापूर्वींच कौटिल्यानें त्याच्या मनाला वक्रता आली आहे ! समरांगणातल्या धुळीनें बहिरंग मलिन होण्यापूर्वींच राज्यलोभाने त्यांचे अंतरंग मलिन झालें आहे ! रणवाद्याच्या कर्कश नादानीं कानठळ्या बसण्यापूर्वींच ते हितोपदेशाला बधिर झाले आहेत ! "

## स्वराज्याचें नव-चैतन्य

असे काहीं अपवाद शहाजीच्या वाटेत धोंड म्हणून आले असले, तरी एकंदरीत सारा महाराष्ट्र त्याच्या स्वराज्य-सपादनाचे पाठीशीं उभा होता. महाराष्ट्रातील या नवचैतन्याचे चटके मोगल सरदाराला बसूं लागले; तेव्हा तो म्हणू लागला,

" या मुलखात शहाजी भोसल्याने जी धामधूम उठविली आहे तिला आगा ना पिच्छा ! हजारोलाखो मराठ्यानी झोपेतून एकदम जागें झाल्याप्रमाणे खडबडून उठावे, अतोनात आवेशाने आणि घाईने लढाईच्या तयारीला लागावे, शहाजी भोसल्याचा केव्हा काय हुकूम येतो इकडे उत्कठेने डोळे लावून बसावे, असे झाले आहे तरी काय ? काय या लोकाना एकदम वेड लागले म्हणावे, कीं भुताने पछाडले म्हणावे, कीं जादूने भारले म्हणावे ? शहाजीने असे कोणचे आमिष तमाम मराठ्याच्या डोळ्यापुढे धरले आहे, की जे मिळविण्यासाठी त्यानीं बेफामपणाने आगींत उडी घ्यायला तयार व्हावे ? "

शहाजीप्रमाणेच जिजाऊचेहि स्वभावचित्र शास्त्रीबुवानीं मोठ्या तन्मयतेने रेखाटले आहे. अथपासून इतिपर्यंत जिजाऊचे जीवन म्हणजे पतिनिष्ठा, धर्मश्रद्धा, स्वातंत्र्यभक्ति, बुद्धिचातुर्य, रणशौर्य, सेवकाविषयीं वात्सल्य इत्यादि अनेक गुणाची जणुं पुष्करिणी आहे. आपल्याला झालेला देवीचा दृष्टात सागताना ती शहाजी राजाना म्हणते, "वाटे कीं, देवीच्या अंगावर हिऱ्यामोत्याचे दागिने झळकत आहेत, त्याच्याच प्रकाशाचा हा लखलखाट नसेल ना ? अथवा तिनें शुभ्र वस्त्रें परिधान केलीं आहेत तीं

विजेच्या ततूनीं विणलीं असावीं, आणि त्याचाच हा देदीप्यमान प्रकाश असावा ! अथवा तिच्या कोमल हास्याचे ते चादणेच फाकले असावे ! ''

## धीरोदात्त स्वभाव-चित्रें

'गुणोत्कर्षा 'तील तरुण सभाजी भावनाशील व विकारवश असा दाखविला आहे, तसाच शौर्य-औदार्यादि आनुवशिक गुणाचा पुतळा रंगविला आहे. कुसगतीमुळे त्याचे पाऊल वाममार्गावर पडले असले, तरी त्याचे संस्कार त्याला अनाचाराच्या टोकापर्यंत जाऊ देत नाहींत. तो खलनायकाला क्रोधाने म्हणतो, '' दुष्टा ! ज्या वीराचे मन एवढे उदार कीं, ज्याने मी निःशस्त्र झालो असता मजवर हत्यार धरण्याचे नाकारले; तो मूर्च्छित पडला असता त्याचा खून करणे हें मागाचे काम, ते तूच करशील ! माझ्या हातुन ही गोष्ट कदापि घडणार नाहीं ! ''

'तारामडळ' या नावाचा रत्नहार सेनापतीच्या मुलाने जिकून आणला असताना दुर्जनसिंगाच्या कारवाईमुळे सेनापतीवर फितुरीचा आरोप येतो आणि राजा त्याला देहात शासनाची शिक्षा ठोठावतो. या दुष्ट चक्राचा भेद करण्यासाठीं शालिनी निरनिराळे व्यूह रचते. प्रीताई ही दाई वेडीचे सोग घेऊन खलनायकाचे कारस्थान उलथण्यास मदत करते आणि शेवटीं राजाला सत्य कळून येऊन शेवट गोड होतो. या नाटकातील सेनापती इतबारराव याचे स्वभावचित्र उदात्त आहे.

## दुर्बोध भाषा-शैली

बहुतेक सर्वच नाटकातील शास्त्रीबुवाची भाषाशैली संस्कृतप्रचुर व निबंधाजोगी आहे. काही काहीं ठिकाणीं तर ती दुर्बोधहि आहे. ती वापरताना त्यानीं पात्रापात्रविचारहि फारसा केलेला दिसत नाहीं. पुरुष असो-स्त्री असो, विद्वान असो-अडाणी असो, सर्वाची भाषा एकसारखी-म्हणजे शास्त्रीबुवासारखी ! '' असुख, महदन्याय, सौरस्य, महोदार, पुरुषायत्त, स्वाधीनभर्तृका, देशोच्छेद, दुर्मार्गाचे उच्छेदक, हतभागी फलत्यागी जीवित '' असे जाडे जाडे शब्द शहाजीच काय, पण जिजाऊ, आणि जिजाऊच काय, पण एखादी दासीसुद्धा सहज बोलून जाते.

गडकऱ्यानांहि अचंबा वाटावा अशा कल्पना–सौंदर्याने नटलेले वाक्य 'शिवसंभवा'तील जिजाबाई बोलते. ती म्हणते, 'विवेक-सिंधूचा पोहणारा, शेवटी स्त्रीमोहाने मूढ होऊन, क्षुद्र ममतेच्या गोष्पदात बुडाला.'' याच्याहि पुढे मजल मारून ती म्हणते, "अनेक अनर्थ व भये बगलेस मारून व ती झाकण्याकरता अधाराचे जगद्व्याळ वस्त्र पाघरून ही असंख्य वर्षे वयाची खोडसाळ म्हातारी–ही रात्र." त्याचप्रमाणे ती आपल्या माहेरचा महिमा "धर्माचे सागर, धैर्याचे मेरु, प्रतापाचे सूर्य" अशा अलंकारिक शब्दानी वर्णन करते. त्याचप्रमाणे स्वामीच्या वचनावरील आपली श्रद्धा व्यक्त करताना एखाद्या संस्कृत पंडिताप्रमाणे जिजाऊ म्हणते, "नद्यांचे ओघ परत फिरतील, पर्वत चालू लागतील, सूर्य पश्चिमेस उगवेल......"

जिजाबाईचे वडील जाधवराव हे तर पट्टीच्या शास्त्र्याचीच भाषा बोलतात, "हे भोसले भारी भारीच घमेंडखोर! बेट्याच्या व्याकरणात प्रथम आणि मध्यम पुरुष नाहीच! इथून तिथून उत्तम पुरुष! जिथे तिथे मी केले! मी जिंकले! मी मिळविले! अहं! आणि पूर्वीपासून पहातो आहे, हे भोसले फार फार लबाड! लोकावर पगडा बसविण्यासाठीं आणि स्वतःचे स्तोम माजविण्यासाठी काय काय कादंबऱ्या रचतील याचा नेमच नाही!" खुद्द शास्त्रीबुवांच्या मनावर संस्कृत विद्येचा पगडा मोठा होता हे एक याचे कारण असू शकेल. तसेच, त्या काळीं संस्कृतचा प्रसार घरीं दारीं, बायकापोरांतहि आतापेक्षा पुष्कळच होता हेहि आणखी एक कारण असू शकेल. पण नाटकाच्या सहजपणाला ही भाषा बाधकच ठरते.

## शब्द-लीलेचे चमत्कार

शास्त्रीबुवानीं आपल्या अडाणी पात्राकडूनहि केवळ संस्कृत शब्दच वदविले आहेत असे नव्हे, तर एखाद्या नवथर कवीप्रमाणे शब्दलीलाहि करून दाखविल्या आहेत. "सूर–भरणा–असुर-भरणा," असा श्लेष हुजऱ्यासुद्धा करतो. "सैन्याचा गोट—राणीच्या हातात गोट", "बंदुकीचा तोडा–हातांतील तोडा" "फौजेच्या बाजू बंद करणें–

बाजूबंद दृष्टीला पडणे ", " खजिन्याच्या पेट्या — गळ्यातील पेट्या, " इत्यादि श्लेषाची गर्दी मराठमोळा स्त्रीपुरुषानीं उडवून दिलेली आहे. एवढेंच नव्हे तर, " ककार—चकार, " " समोर—मोर, " अशा बालिश कोट्याहि विनोदाच्या निमित्तानें कांहीं पात्रें करतात. " गाण्यातला राग सारंग, साथ करणारी सारगी, ती वाजविणारा सारंग्या आणि श्रोतेसुद्धा सारगच ! असें हे सारगाचे चतुरग सैन्य पहाताच तिथल्या सारंग—नयनाची मोठी ताराबळ होईल. " इत्यादि शाब्दिक कसरती नाटकाच्या स्वाभाविकपणाला बाधक व रसाळपणाला मारक आहेत.

'देशकंटक' या नाटकाचा प्रारंभ किती रसपूर्ण प्रसंगानें होतो ! दोन बहिणी माहेरीं आलेल्या आहेत आणि आपापल्या संसारातील सुखदुःखें सागत आहेत. पण त्याचे संवाद म्हणजे रसशून्य चिपाडे आहेत. एवढेंच नव्हे तर, अस्वाभाविक शब्दलीलाहि त्यात आहेत.

मदाकिनी म्हणते, "जशी ईश्वराची माया, जशी सूर्याची छाया, जशी जीवाची काया, तशी मी तुमची जाया आहे—निरपराध, निष्पाप जाया आहे."

मालती तर आपत्तीच्या वेळींहि म्हणते, "संभावना ज्याच्या त्याच्या योग्यतेनुरूप होते, ती केवळ नात्यावरून होत नसते. समुद्रापासून जन्म पावलेले चंद्र आणि शख हे भाऊभाऊ खरे, पण चद्र हा गौरीच्या शिखरावर आरूढ होऊन पूजेचा सत्कार पावतो. आणि शंख त्या पूजेच्या वेळीं जणू काय मत्सरामुळेच—स्वतःचा ध्वनि करीत असतो !

भुजंग०—एकाला विनाकारण चंद्र म्हणून डोक्यावर घ्यावे आणि दुसऱ्याला शंख ठरवून कोकलायला लावावे, हा तुम्हा बायकाचा केवळ स्वच्छंदीपणा आहे !

'देशकंटका 'तील एक संवाद या शब्दलीलेचा अतिरेक दाखवितो. खलनायकावर चडफडतांनाहि हा संवाद होतो ही खेदाची गोष्ट होय.

भुजंग०—ते केवळ तपस्तेजाचे भास्कर !

मंदा०—स्त्रियाच्या पातिव्रत्याचे तस्कर !

भुजंग०—दयाशांतीचे सागर !

मंदा०—मायामदिरेची घागर !

भुजंग०—सुकृताचे मूर्तिमंत राशी !

मंदा०—पेढारपूरचे रहिवाशी ! धादलगावचे मिराशी ! अंधारनगरीचे रामोशी !

## प्रसंगोचित अलंकार

"अलंकारानीं तुझ्या सौंदर्याला शोभा येत नसून, तुझ्या सौंदर्यामुळें अलंकारानाच उलट शोभा येते." असे समयोचित अलंकार राजाच्या भाषेमध्ये आनदाच्या प्रसगीं जेव्हा येतात, तेव्हा ते शोभून दिसतात. "सरकारची तरवार आणि 'शत्रुपीडा' हा शब्द—हीं दोन्हीं आता कोशातच राहूं द्या." या वाक्यातील 'कोश' शब्दावरील श्लेष ते बोलणाऱ्या पात्राला शोभेसाच आहे. 'उग्रमंगला'तील हिरासिंग गवयाच्या हालचालींना मजेशीर उपमा देतो, तो म्हणतो, "मूर्खांचे कान पिळवटल्याप्रमाणे हे गुणी लोक गाणे सुरू करताना तंबुऱ्याच्या खुंट्या पिळवटीत असतात आणि दक्षिणेसाठीं पुढें घुसणाऱ्या उतावीळ आगतुकाच्या तोंडावर चापट्या माराव्या, त्याप्रमाणें तबल्याच्या तोंडावर थापट्या मारीत असतात."

'चित्र-वचना' हे शास्त्रीबुवाचें मोठ्या मौजेचे नाटक आहे. आपल्या पाणिग्रहणासाठीं आलेल्या राजपुत्राची परीक्षा करण्याकरिता राजकन्या आपल्या मैत्रिणीला राजकन्येचा वेष देते. प्रभावती व मदयती याचे प्रेम अलौकिक होतें. तें व्यक्त करताना मदयती म्हणते,—"आणि माझे वडील म्हणत असतात, माझ्या मदयंतीला उन्हाची तिरीप लागली, तर राजकन्येचें तोंड कोमेजून जाते, आणि राजकन्येला काटा लागला तर मदयंतीच्या डोळ्याला पाणी येतें !" शृंगारात्मक विनोदानें हें सारें नाटक फुललेले आहे. चपला-कंक याचा व आचाऱ्यांचा विनोद स्थूल असला, तरी सर्व दर्जाच्या प्रेक्षकांना हसविणारा आहे.

## विनोदाचे प्रकार

शास्त्रीबुवांचा विनोद कांहींसा ओबडधोबडच असतो. 'उग्रमंगला'तील

घटखर्पराचा विनोद याच मासल्याचा आहे. ' शिवसंभवां 'तील गाजेकस कमालखानाचा उपयोग विनोदासाठीं तर होतोच, पण त्याशिवाय कथानकाची घडामोड करण्यालाहि तो कारणीभूत होतो हे ठीक आहे. ' तारामंडळातील ' बेशकरावाचा मूर्खपणा, मार्तंडभटाचा हावरेपणा व भामिनीचा हट्टीपणा यामुळे बराच विनोद निर्माण होतो. विनोद–निर्मितीसाठीं वेशातर अनेक नाटकात योजलेले आहे आणि शब्दलीला तर सर्वत्र फुटाण्याप्रमाणे उडत आहेत. ' तिस्मारखान—चाळीस्मारखान ' अशा शाब्दिक कोट्याहि पुष्कळच आहेत.

' उग्रमंगलातील ' गणक आपल्यावरील आरोप उडवून टाकताना अशी विनोदी कैफियत देतो कीं, '' माझा पहिला मुद्दा असा आहे कीं, याने माझ्या हवालीं मुलगी मुळींच केली नाहीं. सबब ती देण्याला मी पात्र नाहीं. माझा दुसरा मुद्दा असा आहे कीं, याने माझ्या हवालीं जी मुलगी केली होती ती आपोआप याची याच्याकडे पळून गेली आहे, सबब ती देण्याची जोखीम माझ्यावर राहिली नाहीं. माझा तिसरा मुद्दा असा आहे कीं, याने जी मुलगी म्हणून माझ्या हवाली केली ती खरोखरीची मुलगी नसून मुलगा होता. ''

## स्वतंत्र रस

देशाभिमान हा जर स्वतत्र रस मानला गेला, तर त्याचा उत्कृष्ट परिपोष करणारे नाटक म्हणून ' शिवसंभवा ' कडे बोट दाखवावे लागेल. सारे सवाद, सारे प्रसंग, सारे वातावरण, या एकाच रसाने ओतप्रोत भरलेले आहेत. स्वराज्यासाठी तळमळणाऱ्या महाराष्ट्रीय जनतेला हे स्वराज्याचे उज्ज्वल दर्शन घडविणारे आशादायक नाटक अत्यत प्रिय व्हावे यात नवल काय ? त्याचे सुरवातीस लागोपाठ पन्नास प्रयोग झाले व त्यानीं नाटकमंडळीला तारले. 'कृष्ण-काचन' या नाटकातहि राष्ट्रधर्माचाच प्रकर्ष केलेला आहे. उज्ज्वला ही राज–भगिनी राष्ट्रासाठीं आपल्या प्रेमाचा होम करते. शास्त्रीबुवाच्या प्रत्येक नाटकात राष्ट्रभाक्ति, सत्यनिष्ठा इत्यादि गुणाचाच कलात्मक आविष्कार आहे आणि त्याचाच ठसा प्रेक्षकांच्या अंतःकरणावर

ठसठशीतपणे उमटतो. इतिहाससंशोधक शास्त्रीबुवांनीं नाटकें लिहिलीं, तीं मुख्यतः स्वतःच्या द्रव्यार्जनासाठीं व रसिकाच्या रंजनासाठीं हे जरी खरे, तरी समाजाच्या स्थैर्याला व प्रगतीला मूलाधार असणाऱ्या सद्‌गुणाचे सिंचन करण्यास ते कधी चुकले नाहींत. नाट्यकलेमार्फतहि त्यानीं राष्ट्र-मातेचीच सेवा केली. ते जसे तत्त्वज्ञ व संशोधक होते, तसे कवि व नाटककार होते—पण सर्वत्र होते देशभक्त !

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) " विद्येच्या उपासनेसाठीं आजन्म कष्ट करणारे वासुदेवशास्त्र्यासारखे विरळाच " शास्त्रीबुवाच्या चरित्राच्या आधारे हें विधान स्पष्ट करा

( २ ) इतिहास-संशोधन-क्षेत्रात वासुदेवशास्त्री खरे यानीं कोणतें कार्य केले ?

( ३ ) आपल्या नाटकासाठीं शास्त्रीबुवानी सामान्यत कशा प्रकारच्या घटना निवडल्या आहेत ? त्यानीं लिहिलेलीं नाटके कोणती ? त्या नाटकाच्या नावात कोणतें वैशिष्ट्य आहे ?

( ४ ) ' शिवसंभव ' नाटकानें महाराष्ट्राला वेड लावलें, याची कारणे कोणतीं ? त्या नाटकातील पात्राचे स्वभावपरिपोष कसे काय साधले आहेत ?

( ५ ) 'शास्त्रीबुवाची भाषासरणी संस्कृतमय व कोटिबाज आहे, " नाटकातील आधार देऊन या विधानाची स्पष्टता करा.

( ६ ) ' चित्रवंचना,' ' तारामंडल,' ' गुणोत्कर्ष ' या नाटकाबद्दल थोडक्यात टिपणी लिहा.

### आधिक अभ्यास

गु. वा. वा. खरे, लेखक—दा. मो. भट

## भा. वि. वरेरकर : : : ४

'कादंबरीकार' म्हणून वरेरकर जितके प्रसिद्ध आहेत, त्याहून अधिक 'नाटककार' म्हणून ते विख्यात आहेत. सुमारें पस्तीस नाटकें लिहून त्यांनीं मोठी कीर्ति कमावली आहे. विशेष हें कीं, त्याची नाट्यसृष्टि बहुरंगी आहे. गेल्या शंभर वर्षांत मराठी नाट्यकलेचीं जीं जीं म्हणून स्थित्यंतरें झालीं, त्या सर्वांचीं प्रतिबिंबें वरेरकराच्या नाट्यसृष्टींत दृष्टीस पडतात. कलेकलेनें विकास पावणाऱ्या चद्राचीं प्रतिबिंबें एखाद्या स्वच्छ सरोवरात दिसावींत, त्याप्रमाणें पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक वगैरे भिन्नभिन्न विषयाचीं नाटकें वरेरकराच्या लेखणींत प्रतिबिंबित झालीं आहेत. नाटकाच्या बाह्यांगातहि एकांकिका, एक-प्रवेशी



नाटिका, श्रुतिका वगैरे जे जे बदल मराठींत झाले, त्या सर्वांचीं प्रतीकें वरेरकराच्या नाट्यसृष्टींत पहावयास सापडतात. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, नाटकाचा विषय व स्वरूप या दोन्ही बाबतींत जे जें कांहीं नवें असेल, तें ते प्रथम हस्तगत करण्याची धडाडी वरेरकराची आहे. मराठी नाट्यकलेचे ते आघाडीचे वीर आहेत. राष्ट्रीय विचार किंवा समाजवादी तत्त्वज्ञान नाटकातून मांडणारे ते बिनीचे स्वार आहेत. एखाद्या टेबलावर असलेला पृथ्वीचा गोल आपण हळूहळू फिरविला म्हणजे पृथ्वीवरील सर्व

स्थळाचे दर्शन होतें, तसे वरेरकराच्या नाट्य–सृष्टीचीं विविध अंगे पहाणा-ऱ्याला मराठी रंगभूमीचीं बहुतेक सारीं बदलतीं स्वरूपे पहावयास सापडतात.

## विषयांची विविधता

'कुंजविहारी' हे वरेरकराचे पहिले नाटक १९०७ सालीं रंगभूमीवर आले व खूप गाजलें. त्यांतील 'त्यजी भक्तासाठीं लाज' यासारखीं कृष्णाचीं पदे दीर्घकाळ रसिकाच्या जिव्हाग्रावर खेळत होतीं. 'करीन ती पूर्व' या नाटकात त्यानीं शिवाजीचे उज्ज्वल चरित्र झगझगीतपणे रेखाटले आहे. 'सत्तेचे गुलाम' व 'सोन्याचा कळस' यानाटकात मालक–मजुराचा लढा आवेशपूर्ण रीतीने मांडलेला आहे. हुंड्यासारख्या दुष्ट चालींचा निषेध 'हाच मुलाचा बाप' या नाटकातून त्यांनीं केला आहे. पतितपरावर्तनाला वाचा फोडणारे त्याचे 'संन्याशाचा संसार' हें नाटक फार यशस्वी झाले. स्त्रियाच्या दुर्दशेला तर त्यानीं आपल्या बहुतेक सर्व नाटकातून अग्रस्थानच दिलेले आहे. खेड्यातील देवस्कीचे दुष्परिणाम रंगविणारें एक नाटक त्यानीं रचिले. 'सारस्वत' हे केवढे चिमुकले नाटक! पण त्यातहि साहित्याने श्रीमंत परंतु द्रव्याने दरिद्री अशा लेखकाची करुण कहाणी त्यानीं हृदयद्रावक रीतीने मांडली आहे. त्याच्या डोळ्यापुढे अन्नान्नदशेस पोचलेले कैक वृद्ध साहित्यिक होते. त्याचें जीवन, नाट्य-स्वरूपाने, परिणामकारक रीतीने त्यानीं समाजापुढे उभे केले. १९५२ सालच्या दिवाळीमध्ये 'भूमि–कन्या सीता' नावाचे नाटक लिहून वरेर-करानीं वार्धक्यातहि आपली प्रतिभा ताजीतवानी असल्याची साक्ष पटविली आहे. घरगुती भाषा, संग्रामपूर्ण प्रसंग, खटकेबाज संवाद, आणि जिव्हाळ्याच्या विषयासंबधीं जळजळीत विचार, या गुणानीं वरेरकराची नाट्य–सृष्टी नटलेली आहे.

## धंदा व छंद

श्री. भार्गवराम विठ्ठल वरेरकर यांचा जन्म १८८३ सालीं चिपळूण येथें झाला. मालवण, दापोली व रत्नागिरी येथें त्याचे शिक्षण झाले. मॅट्रिक होण्यापूर्वींच त्यांनीं पोस्टखात्यांत नोकरी धरली. पगार तीस रुपये.

१९०५ सालीं ते रोहे येथे पोस्टमास्तर होते. पुढे ती नोकरी सोडून ते मुंबईस गेले तेथें नाटके, कादंबऱ्या, लघुकथा, पटकथा, रहस्यकथा असे विविध व सहेतुक वाङ्मय त्यानीं लिहिले. तोच त्याचा जीवनाचा छंद व तोच त्याचा चारितार्थाचा व्यवसाय. केवळ लेखनावर पोट कसे व किती भरू शकतें याचे उदाहरण म्हणून वरेरकराकडे बोट दाखविता येण्यासारखे आहे. ' दुनिया ' नावाचे साप्ताहिकहि त्यानीं कांहीं काळ चालविले. त्याना १९४५ सालीं धुळे येथील साहित्य-समेलनाच्या अध्यक्षपदाचा मान देण्यात आला. त्याशिवाय मुंबई सरकारच्या ' कला-पथका 'चीं सूत्रे त्याच्या हातीं देण्यात आलीं होतीं. भारत सरकारच्या ' नभोवाणी सल्लागार मंडळात 'हि त्याचा समावेश करण्यात आला आहे.

## कोल्हटकरी संप्रदाय

खाडिलकर-कोल्हटकरासारख्या पदवीधर व प्रतिभाशाली नाटककाराच्या ऐन अमदानीचा तो काळ ! त्या वेळी, कोणतीहि पदवी नसलेले व 'कड-कट्ट'ची नोकरी केलेले वरेरकर आपले एकेक विशिष्ट गुणाचे नाटक घेऊन महाराष्ट्रीय रसिकासमोर उभे राहिले व त्यानी मोठे यश कमावले, हे विशेष. गडकऱ्यानी सहा वर्षांच्या अल्पकाळात आपल्या नाटकातील प्रतिभेने सारी मराठी रंगभूमि झळाळून टाकली, तरी वरेरकराच्या नाट्याची दीप्ति कांहीं कमी झाली नाही. कोल्हटकराच्या संप्रदायातील काही गुण-दोष वरेरकराच्याहि नाटकात शिरणे हा त्या कालाचा प्रभावच ! मात्र पुढे पुढे शब्दलीला करणे, अवजड भाषा वापरणे—इत्यादि कृत्रि-मतेची कवचे त्यानीं पार फेकून दिली आणि देवल-हरिभाऊसारखी साधी, सरळ, घरगुती भाषा ते लिहू लागले. हीच स्वाभाविकता कथानकातहि त्यानीं पुढे पुढें आणली.

## गडकरीय भाषाशैली

' कुंजविहारी ' नाटकाची भाषा संस्कृतप्रचुर आहे. श्रीकृष्णानें केलेल्या कालिया-मर्दनाचा विषय त्यात रंगविला आहे आणि कृष्णा-पेंद्याच्या गोकुळांतील क्रीडा व खोड्या त्यांत खुलविल्या आहेत. पेंद्या

नारदाचे वर्णन ज्या पद्धतीनें करतो, ती कोल्हटकर–सप्रदायाला साजणारी आहे. तो म्हणतो, " असल्या या साधु म्हणवून घेणाऱ्या लोकावर विश्वासायचा हा काळ नव्हे. दर्शनी दिसतात बिनदाताचे, पण माजरीच्या मऊ पजातल्या नखासारखे याचे दात मऊ दाढीखालीं छपविलेले असतात. दाताच्या बनतात दाढा, जटेची होते सटा, विण्याची होते तरवार आणि हे साधु नसून नुसते कार्यसाधु असल्याचे उघडकीस येते."

'करीन ती पूर्व' या ऐतिहासिक नाटकाची बहुतेक भाषा गडकरी थाटाची आहे. 'राजसंन्यासा'तील उत्तुग कल्पकता गडकऱ्याची गडकऱ्यानाच लाभली, पण त्याच्या भाषेचा डौल वरेरकरानीं उचलला आहे. पुतळा गजरेला म्हणते, " हे पहा वहिनी, तुझा स्वभावच अगदीं थंड. अगदी पचगंगेच्या डोहाच्या पाण्यासारखा. खळ नाहीं कीं खळबळ नाही. वहायचा पण वाजायचा नाहीं. म्हणूनच दादाच आणि तुझ एवढ जमल आहे."

'फुक्या फुकरीचे भक्कम मनोरे,' 'पुण्याईचे पाप' इत्यादि विरोधाभासात्मक शब्दाचे खेळहि वरेरकरानीं पुष्कळ केलेले आहेत.

हिरोजीला शिवाजीच्या वेषाने गनिमाच्या छावणींत तहाच्या वाटाघाटीस पाठवावयाचे म्हणजे उघड्या डोळ्यानीं त्याला मृत्युमुखात लोटावयाचे. ती भीक बाजींनीं मागितली असता हिरोजीची स्वराज्यभक्त पत्नी गजरा गडकऱ्याच्या भाषेत उत्तर देते,

" घरचा लोभ तोडला–घरवालीचा हात सोडला–दौलतीची साथ सोडून धन्यानी वैऱ्याशीं हात जोडला, पण या पायाच्या कृपेन फिरून आज धनी थाऱ्यावर आले. ते जर दौलतीच्या रक्षणाला कारण होत असतील, तर काय सागू सरदार?—डोळीं आसव येतात, बोली जीभ ढळते, पण घरीं आल्या धन्याला दौलतीच्या मोली पुनः आपल्या पदरात घालते."

आपले व आपल्या पतीचे प्राण स्वराज्यासाठीं कुरवडून टाकणाऱ्या गजरेचा गौरव करताना बाजी जी भाषा वापरतो, ती 'राजसन्यासा'त सहज खपून जाण्यासारखी आहे. तो म्हणतो,

" अहाहा ! धन्य ! धन्य ! ! मुली. या अलौकिक स्वार्थत्यागानं तूं रणधुरंधरानाही लाजिवलस ! वडीलकीच्या मायरक्ताची ओजळ वाहून पुढच्या पिढीची आई झालीस—महाराष्ट्राच्या उघड्या राउळीची रखुमाई राई झालीस. वीराच्या वीर पत्नी, हा बाजी प्रभु तुला साष्टाग दडवत करतो."

## शब्दांचें जंजाळ

'सन्याशाचा संसार'मधील डेव्हिड कशी अतिशयोक्तीची भाषा वापरतो पहा. "निराशेच्या प्रलयकाळाला तोड देण्याइतक चिरजीव मार्कंडेयाच धैर्य माझ्या अंगीं असत, बारा योजन जळत रान गिळून टाकणाऱ्या कृष्णा-इतका मी हिमहृदयी असतो, असख्य योजन समुद्र ओलाडणाऱ्या मारुती-सारखा मी एखादा बलभीम असतो, तर एका शब्दान—एकाच निःशब्द शब्दानं मी तुमची वाचा बद करून टाकली असती."

तोच डेव्हिड निराशेमध्ये शब्दाच्या अशा काहीं उलटापालटी करतो की, त्यातील अर्थ कोणालाहि कळणे कठीण तो म्हणतो,

"धाव धाव निराशे, धाव. आणि आशेच्या दुबळ्या बळाने बलवान होऊं पाहाणाऱ्या या सजीवाला निर्जीव करून टाक. आशा म्हणते, आशा नाहीं. पण बाई निराशे, तू का मला थाबबून धरतेस ? जगण सपावं म्हणून मी जिवत होऊ पहात होतो, पण जिवात जीवच का रहात नाही ? काय करू ? मराव तर जगण्याच भय वाटतं ! जगाव म्हटल तर जगायला जागाच राहिली नाहीं."

## शिवाजीची व्यक्ति-रेखा

'करीन ती पूर्व' या एकाच ऐतिहासिक नाटकाने वरेरकरानीं यशाचा गड जिकला. खरेशास्त्री यानी 'शिवसभव' नाटक लिहून आपला विजय-ध्वज नाचविला होता आणि गडकऱ्याचे 'राजसन्यास' सुवर्ण-कमलाप्रमाणे फुललेले होते. तरीहि १९२७ सालीं जन्मास आलेले वरेरकराचे 'करीन ती पूर्व' हें नाटक रसिकांची मने जिकीत चालले होते. शिवछत्रपतींचे नुसते नावहि महाराष्ट्रीय भावनांच्या तारा छेडण्यास पुरेसे आहे. ज्या पुण्यश्लोकाच्या स्मृतीभोवतीं मालाकारानीं आपल्या निबंधाचीं निराजने

लावली आहेत, हरिभाऊ आपट्यानी आपल्या कादबऱ्याची कमले वाहिलीं आहेत, बॅ. सावरकरानीं आपल्या काव्याची कस्तुरी माखलीं आहे व प्रा. शिवरामपंत पराजपे यानीं आपल्या वक्तृत्वाचें वीणा–वादन केले आहे; त्याच्यावर महाराष्ट्राचे पित्यासारखें प्रेम, गुरुसारखी श्रद्धा व देवासारखी भक्ति जडलेली आहे. या साऱ्या भावनाना भरती आणणारे एकामागून एक प्रसंग वरेरकरानीं आपल्या या ऐतिहासिक नाटकात घातलेले आहेत. फार काय, 'संन्याशाचा संसार' या सामाजिक नाटकातहि महाराष्ट्राच्या या आराध्य दैवताविषयी त्यानीं भावना उचंबळविणारे उद्गार काढले आहेत. त्या नाटकातील साक्षात् शकराचार्यच म्हणतात, "जे शंकराचार्य तेच श्रीशिवाजीमहाराज. त्या श्रीशिवरायाची स्मृति हीच आमची स्मृति, त्याच गुणश्रवण हीच आमची श्रुति, त्याचा इतिहास हींच आमचीं पुराण आणि त्याची प्रत्येक कृति हेच आमच मानवधर्मशास्त्र. एवढ्याच आधारावर डेव्हिड जोशी याच परिवर्तन झालं पाहिजे."

## वीर-रसाचा उठाव

शिद्दी जोहाराने पन्हाळ्यास वेढा दिला आणि त्यांतून शिवाजीमहाराज हिकमतीने निसटून गेले व त्याच्या रक्षणार्थ बाजी प्रभूनें पावनखिंड लढविली, हा रोमाचकारक कथाभाग 'करीन ती पूर्व' या नाटकात वरेरकरानीं कौशल्याने रंगविला आहे. ऐतिहासिक दृष्टीने 'यथातथ्य' ठरणारेच प्रसग त्यानीं निवडले आहेत, पण त्याची गुंफण उत्कंठा वाढविणारी केली आहे. एकापुढे एक संघर्ष ठेवून त्यानीं उत्सुकता वाढविली आहे. हिरोजीचा उपयोग तोतया शिवाजी बनविण्यासाठीं करावयाचा हे रहस्य शिवाजीने आगाऊच फोडले नसते, तर नाटकातील औत्सुक्य आणखी वाढले असतें. एका बाजूला फितुर काळूजी व त्याची महत्त्वाकाक्षी बायको पुतळा, तर दुसऱ्या बाजूला स्वामिनिष्ठ हिरोजी व त्याची पत्नी गजरा याचे द्वंद्व जिज्ञासा वाढविणारे आहे. शिवाजी-बाजी-प्रभृतींचीं शब्द-चित्रे उठावदार आहेत. भाषा वीरश्रीची व परिणामकारक आहे. शिवाजीची वाणी ठिणग्या पाडणारी कशी आहे

पहा—" समशेरीला समशेर, हाताला हात, खांद्याला खांदा भिडवून वैऱ्याशीं निकराचं तोड देत देत या झुंजेत एक जयश्री तरी मिळवूं किंवा जगदंबेची तशीच इच्छा असेल तर दोघेहि इथंच धारातीर्थी देह तरी साडूं. पण माघार ?—केव्हाही नाहीं."

असा राजा-आणि असे सेवक ! त्याचे मोठेपण कोणी, कसे वर्णावे ? जिजाबाई मोजक्या चार शब्दातच त्या उभयताचा गौरव पुढीलप्रमाणे करतात, " तुमचीं माणसं तुमच्याइतकींच मोठीं आहेत. तीं मोठीं आहेत म्हणूनच तुमच्यासाठीं जीव टाकतात. आणि मोठीं माणसं अशीं तुमच्यासाठीं जीव टाकतात म्हणूनच तुम्ही सर्वांहून मोठे आहात. "

## स्वामिभक्तीचा कळस !

' राजसंन्यासा 'तील केवळ भाषाच नव्हे, तर काहीं काहीं प्रसगहि 'करीन ती पूर्व'मध्ये अवतरल्यासारखे वाटतात. तेथे शिवागी येसूबाईचें सोंग घेताना बावरते, येथे हिरोजी शिवाजीचा वेष परिधान करताना बिचकतो. ती त्याची मनाची गजबज वरेरकरानीं कुशलतेने रेखाटली आहे. हिरोजी विचारतो, "आणि ही पैजार ! बाजी प्रभूजी, काय हा प्रसग ? या आमच्या देहाचं कातडं सोलून ज्याच्या पायींची पैजार करावी—त्या राजाच्या पायानीं पावन झालेली ही पैजार—बाजी प्रभूजी, हिला पाय कसा लावू ? अशी उराशीं कवटाळावी, डोळ्यानीं न्याहाळून भाळीं धरावी—पादुका म्हणून पूजा करावी—ती ही मराठ्याच्या मायबापाची पैजार माणसा-पायींच्या चढावागत पायीं कशी तुडवू ? नाहीं, सरदार ! नाहीं.—सर्वां-परीस ऊर फुटतो तो इथ ! " शिवछत्रपतींच्या भक्तीचे दुसरे स्तोत्र कोणतें असूं शकेल ?

## स्त्री-मनाचें चित्रण

स्त्री-हृदयाचे पापुद्रे हलक्या हाताने उलगडण्याची कला जशी वरेर-कराच्या ठायीं आहे; तशीच त्या हृदयातील भावनाचे चित्रण यथार्थपणें करण्याची शक्तीहि त्याच्या साध्यासोप्या व घरगुती भाषेमध्ये आहे. ' सत्तेचे गुलाम ' मधील रेखा स्त्री-मनाचे वर्णन करताना म्हणते, "मनाची

राखरागोळी करावी आणि दुसऱ्याच्या दारीं तिची कणारागोळी घालावी. दुसऱ्याचं अंगण रंगवावं आणि आपल भंगलेल घर मनात उभारावं. मला विधवेला हें वैभवाच कुकू काय करायचं आहे ? त्यापेक्षा ससाराच्या उगवत्या क्षितिजावर पाऊल ठेवू पाहणाऱ्या त्या प्रेमळ पोरीच्या वाट्याला तें आलेल बरंच नव्हे का ? उगवत्या वैभवसूर्याची प्रभा बिचारीचं निढळ उजळ करो."

तसेच नलिनीच्या घरीं काम करणारीं वैकुंठाची वहिनी रेवा हिला लागण्यासारखे काहीं शब्द नलिनीच्या तोंडून जातात. तेव्हा नलिनी तिचे सात्वन पुढील हृदयस्पर्शी शब्दाने करते. "का डोळे पुसतेस ? क्षमा करा वहिनी. तुमच्या दुःखाची किमत मी कमी समजते अस समजू नका गडे. पण दुःखाच्या गोष्टीच मुळी मला ऐकवत नाहींत. हे काय ? अस ओक्सा-बोक्सी रडूं नका गडे. उगी–उगी. माफ करा म्हणते ना ? चूक झाली माझी. हे पहा–अगदीं आनदात रहाव—अगदीं हसतखेळत असाव. तुम्हाला काय बर कमी आहे इथ–अगदीं तुमच्या गळ्याची शपथ. हें वैभव माझ नव्हे, तुमचच आहे. अस समजा. आता जरा हसा पाहू–अस्सं–अस्सं–आता कस गोड वाटल !" आणि ते वैभव खरे असते रेवाचेच !

कज्जेदलालीमुळे साफ बुडालेला हेरब अखेर वेडा होतो–बेपत्ता होतो. तेव्हा त्याची पत्नी रमा त्याची वाट पहात उपाशी राहते. वैकुठाने तिला जेवावयाचा आग्रह केला असताना ती जे उत्तर देते, ते किती स्वाभाविक, किती करुण आहे पहा. "तिकडे काय स्थिती आहे हे कळल्याशिवाय मला अन्न कसं गोड लागेल ? मीं इथ सुखान चार घास खावे आणि तिकडे उपाशीच असाव ! भावोजी, मी त्यांची पत्नी आहे. उष्टया ताटा-तलं माझं जेवण माहेरवासाशिवाय कधी चुकलं नाही. तुम्ही कितीही समजूत घातली तरीं येण झाल्याशिवाय मी अन्नाचा घास तोंडाशीं नेणार नाहीं."

## वेषांतराचा अस्वाभाविक प्रकार

प्रेक्षकाची उत्सुकता वाढविण्यासाठीं नाटकात काहीं तरी गूढ ठेवावे,–रहस्य ठेवावे, ही कोल्हटकराची परपरा. त्यासाठीं कोल्हटकराचे नायक

असलेले राजे वेषांतर करून दुसऱ्या राजाच्या घरीं नोकर म्हणून राहतात. तसाच असंभाव्य प्रकार वरेरकरानीं 'सोन्याचा कळस' या नाटकात घडविला आहे. मुबईतील एका कापड–गिरणीच्या लक्षाधीश मालकाचा मुलगा विठ्ठलदास हा काश्मीरच्या सफरीवर जाण्यासाठी म्हणून निघतो. पण तो जातो परळच्या गिरणगावात–विठू कृष्णा या नावाने तो तेथील गिरणींत मजूर म्हणून काम करतो–मजुराच्या चाळीत राहतो, जेवतो, वावरतो. एका प्रवेशात तो ज्या बिजलीशीं मजूर म्हणून भाषण करतो, तिच्याशींच दुसऱ्या प्रवेशात, गिरणी–मालकाच्या बगल्यामध्ये, विठ्ठलदासाच्या पोशाखात बोलतो–आणि कोणी कोणाला ओळखीत नाहींत, असें प्रेक्षकानीं मानावयाचे !

## मामांची मानस-कन्या

हा अस्वाभाविकतेचा दोष सोडला, तर 'सोन्याचा कळस' हें नाटक वरेरकराच्या नाट्यमंदिरावर सुवर्ण-कळस शोभण्यासारखेच आहे. 'धांवता धोटा' या त्याच्या कादबरीचेच हे यशस्वी नाट्यरूप आहे. प्रारंभीच विठू-कृष्णाचा प्रवेश होतो तो औत्सुक्यपूर्ण भूमिका तयार झाल्यानंतर. तसाच बिजलीचा प्रवेश. प्रेक्षकाच्या अपेक्षा आधी खूपच उचावून ठेवलेल्या असतात. आणि मग ती येते ती विजेप्रमाणे कडाडतच ! ती मामांची मानस-कन्या शोभते खरी ! अथपासून इतिपर्यंत सर्व नाटकात एकाहून एक चढ असे सग्राम आहेत. खटक्याशिवाय सवाद व सघर्षाशिवाय प्रसग फारसा नाहींच. हसा व बिजली हीं श्रीमतीचीं दोन टोकें. तीं एकत्र आणण्यात नाटककाराचे चातुर्य दिसून येते. हसाच्या अंगावरील विलायती माल पाहून त्यावर बिजली जी टीका करते, ती फारच मार्मिक आहे. हे नाटक जेव्हा रंगभूमीवर आले तेव्हा, १९३२ सालीं, गाधीजीची कायदेभंगाची चळवळ देशात दुमदुमत होती. विदेशी मालावरील बहिष्काराचे नगारे सर्वत्र जोरजोराने वाजत होते. त्यामुळे त्या वेळच्या प्रेक्षकाना बिजलीची ही टीका विशेषच आवडे आणि ती त्यांच्या हृदयाला जाऊन भिडे. बिजलीचा हंसाशीं झालेला संवाद असा.—

“ बिजली—( तिच्या साडीचा पदर पाहून ) काय छान माल निघतो हा तुमच्या गिरणींत !

हसा—आमच्या गिरणींत ? ही साडी आमच्या गिरणींतली नव्हे.

बिजली—तुमच्या गिरणीतली नव्हे ? तर मग कुठली ?

हसा—मला वाटत-मॅचेस्टरची असेल किंवा पारिसची.

बिजली—मॅचेस्टर आणि पारीस ? कुठलीं गाव हीं ? गुजरात-काठेवाड, की कच्छातलीं ? ( हसा मान खालीं घालते ) हसाबेन, तुमच्या गिरणीतल कापड तुमच्या अंगावर नसाव, हे तुम्हाला कससंच नाही वाटत ? कापडाच्या गिरणीचे मालक तुम्ही-तुमच्या अगावर पर-देशींचं कापड ? एकूण आम्ही गरीबच बरे म्हणायचे ! ”

## खल-नायकाचा नमुना

वरेरकराच्या साऱ्या नाटकात खलनायकाची कोरीव मूर्ति म्हणजे केरोपत. खादीचे अभ्रे अगावर चढवून व देशभक्तीची भाषा मुखातून काढून केरोपत वकिलीचे सर्व वाममार्ग चोखाळीत असतो. असा अट्टल खलनायक असलेले ‘ सत्तेचे गुलाम ’ हे नाटक १९२२ साली रगभूमीवर आले. तो असहकारितेचा काळ ! असहकारितेच्या लाटेमुळे भलेबुरे सारेच लोक वाहून गेले होते. शेकडो वकिलानी वकिली सोडली होती. आणि न्यायमदिराऐवजी कारागृहात ते सक्तमजुरी करीत होते. पण सबध कळपात एखादुसरी ‘ काळी मेढी ’ असावयाचीच काहीं ढोंगी वकिलानीं देशभक्तीच्या या वाहत्या गगेत आपले हात धुऊन घेतले. त्याचे प्रतीक म्हणजे केरोपत. उलट, वकिलीची परीक्षा झालेली असूनहि सनद न घेतलेला वैकुठ हा सच्चा देशभक्त आहे. गाधीजींप्रमाणे तो स्वतःला ‘ नागऱ्या कोष्टी ’ म्हणवतो. तो स्वतः शेतीत राबतो व हातसुताची खादी वापरतो. त्याची भाषा फटकळ असली तरी ती सत्याची व हिताची असते आणि त्याचे हृदय तर त्यागाने व प्रेमानें तुडुंब भरलेले आहे. त्यावेळी असहकारितेच्या वृक्षाला जीं अमृतफळे व विषफळें आलीं, त्याचे नमुने म्हणजे वैकुंठ व केरोपत.

केरोपंताच्या पाषाण-हृदयाची कल्पना पुढील संवादावरून येते. नलिनीला पस्तीस लाखांची जिंदगी मिळत नाहीं असे कळताच तो तिच्याकडे पाठ फिरवितो, पूर्वीचीं वचने मोडतो आणि तिला खडखडीतपणे व तुच्छतेने नकार देतो.

“ नलिनी—केरोपंत, या तुमच्या शब्दप्रहारानीं माझ्या हृदयाच्या कशा चिंधड्या उडताहेत, याची तुम्हाला कल्पना तरी आहे का ?

केरोपंत—त्या चिंधड्या गोळा करून मी घाणीच्या मोरींत फेकून देईन. जा. वेडे पोरी, झाले एवढ नाटक पुरे झाल. तुला देशभक्ताशीं लग्न करायचं आहे ना ? जा, वैकुंठाशीं लग्न कर. ”

## खऱ्या देशभक्ताचें शब्द-चित्र

केरोपंताच्या कुटिल कारवाईमुळे वैकुठाचे वडील भाऊ धुळीस मिळाले. वकिलीच्या या अनर्थाचे वर्णन वैकुठाने मूर्तस्वरूपात केले आहे. ‘ एकच प्याला ’ मध्ये सुधाकर ज्याप्रमाणे दारूच्या दुर्दशेचे दारुण चित्र रामलालच्या डोळ्यापुढे उभे करतो, त्याचप्रमाणे कर्जेदलालीमुळे कोणकोणते अनर्थ ओढवतात, त्याचे चित्र वैकुठ पुढील शब्दानीं काढतो, “ हे पहा सॉलिसिटरचं ऑफिस. हीं त्याची बिल. हे पाढऱ्या टोपीचे बेलीफ. हे त्याचे ग्वाल्हेरच्या गगाजळीसारखे खिसे. हे त्या खिशात गेलेले दादाचे पैसे. ही पहा वकिलाच्या काव्याचीं काळीकुट्ट काव्यं. ही त्या काव्याची प्रतिभा. हीं पहा मारवाड्याचीं दुकान. या त्याच्या खातेवह्या. हे त्याच्या व्याजाच निर्व्याज भूत-प्रत्यक्ष दादाच्या मानगुटीला बसलेल.’ हे रमा-वहिनीचे गहाण पडलेले दागिने. लिलावाला काढलेलीं हीं घरातलीं हाडीं-मडकीं. ही पहा कान्होबाच्या वीस हजाराची तिरपिट-त्रेधा. किती हुबेहुब –ही सर्वांना गिळून बसलेली नारळाची आई ! ”

## प्रभावी प्रचार

‘लोक-जागृतीसाठीं कला’ या मताचे वरेरकर आहेत, हे त्याच्या प्रत्येक कृतींतून दिसते. ‘संन्याशाचा संसार’ या १९१९ सालीं लिहिलेल्या नाटकात त्यानीं पतितांच्या परावर्तनाचा विषय ठाशीव रीतीने माडला

आहे. आंग्लविद्या शिकलेले शंकराचार्य आपल्या मठात 'मानवसमाजाला मुक्तद्वार' ठेवतात. त्याचेविरुद्ध सनातनी शास्त्रीपंडित बंड करतात. तेव्हा शंकराचार्यांच्या गादीचाहि त्याग श्री करतात आणि पुढे ' लोकनियुक्त शंकराचार्य ' म्हणून निवडून येतात व धर्ममंडळाच्या सल्ल्याने जन-सेवेचे कार्य करतात. नदीला पूर येऊन हजारो लोक निराश्रित झाले, तेव्हा त्यांच्या साहाय्याला खिश्चन मिशनरी धावले, तसेच हे श्रीहि धावले. त्यासाठी त्यांनीं आपला मुकुट, आपले हत्तीघोडे, आपला देव्हारा, फार काय, सोन्या-चांदीचे देवसुद्धा विकले. या क्रांतीचे स्वरूप वर्णन करताना श्री म्हणतात, "शंकराचार्यांच्या मठाचा तुरुंग कोसळला जाऊन फल-पुष्पित लतावृक्षांच निसर्गरमणीय असं हे उद्यान बनलं. कडी-कुलपांचीं दारं कोसळून पडली, भिंतींच व्यवधान नाहींसं झाल, सिंहासनाचा उच्चपणा जमीनदोस्त झाला, मुकुटाचा घोडा हवेत उडाला, भालदार चोपदारांचीं ओरड बंद झाली, भरदिवसा पाजळलेली अभिमानाची दिवटी मालवली, वैभवाचा शृंगार सजविणारे हत्तीघोडेदेखील बंधमुक्त होऊन स्वैरसंचार करू लागले."

खेड्यात अद्याप गुलामगिरी कशी घर करून राहिली आहे, याचे भीषण चित्र वरेरकरांनी 'स्वयंसेवक' नाटकात रंगविले आहे. 'चिमणी' कादंबरी याच कथानकाची. कॉलेजमध्ये शिकत असलेल्या जगन्नाथाला तीनशे रुपयांच्या कर्जापायी त्याचे आईबाप रघोजीला एका वर्षापुरते विकतात आणि रघोजी त्याला चाबकाने बडवून काढतो असे या नाटकात दाखविले आहे. वारली लोकांवरील खोतांचे अत्याचार आता उजेडात आल्याने वरेरकरांनीं रघोजीचे पात्र रंगविण्यात अतिशयोक्तिक केली असे कोण म्हणेल ? 'आम्ही कसाबांनीं तुला गहाण टाकलं' हा जगन्नाथाचा आईचा करुण स्वर ' सत्वपरीक्षे 'तील तारामतीच्या आक्रंदनाप्रमाणेच काळीज कापीत जातो.

## समाजवादाचा पुकार

**मजुरांच्या यातनांनीं जळणारी 'सोन्याचा कळस'मधील बिजली ही**

बाबा शिगवण या पहारेकऱ्याची शिष्यीण. त्याचा स्वभाव जितका करडा, तितकाच सयमी दाखविलेला आहे. ' खरे बोलण्याचा गुन्हा ' केल्यामुळे तो हलक्या दर्जाची नोकरी करतो, पण त्याला सारे मजूर सर्वांत उच्च मान देतात. भाडवलदाराच्या निर्दय हृदयाची त्याला पक्की चीड आहे. तो हंसाला म्हणतो, " नाहीं उघडायचे बर पोरी ! तुम्हा लोकाचे डोळे उंघडायला नुसत बोलण पुरेस होत नाहीं. चागला चिमटा घ्यावा लागतो तुमच्या काळजाला ! आणि तुमच काळीज असतं तुमच्या खिशात ? खिशाला चिमटा घेतल्याशिवाय श्रीमताच्या मस्तकाला कळ पोचत नाहीं."

केवळ भाडवलदाराचीच चीड त्याला आहे असे नव्हे, तर श्रीमंताचे नाना अनाचार पाहिल्यामुळे श्रीमतीचाच त्याला तीव्र तिटकारा वाटतो. तो म्हणतो, "सोन्याची पिवळी चकती समोर आली, कीं डोळ्यावर लाली चढते, दिसेनास होत, आठवणी बुजतात, उपकार मरतात, जुन्या गाठीं सुटून पडतात. हसाबेन, हें जस आमच गरिबाच भाग्य आहे, तसंच तुम्हा श्रीमताच दुर्भाग्य आहे."

सप होण्याच्या आधीं बाबा जेव्हा मजुरांचें शिष्टमंडळ घेऊन गिरणी-मालकाच्या घरीं जातो, तेव्हा एक ' गृहस्थ ' या नात्याने तो तेथल्या खुर्चीवर बसतो. एका मजुराचे हें ' अतिक्रमण ' कारखानदाराच्या दृष्टीला असह्य वाटते. तेव्हा ' श्रम हेच खरें भाडवल ' आणि ' गिरणीवर खरी मालकी मजुराचीच ' हीं समाजवादी तत्त्वे बाबा त्या कारखानदाराना सडेतोड शब्दानीं पढवितो. तो त्याना बजावतो, " गिरणींचा मालक मी ! हा हरबा–हा शिवबा–हा धोंडू–रामा–सोमा–हेच खरे गिरणीचे मालक ! तुम्ही आमचे नोकर आहात. आमची गिरणी तुम्हाला चालवायला दिली आहे. तुम्ही ती चालवता आहात. चालवायचा मेहनताना वाजवीपेक्षा फाजिल घेऊन तुम्हीं गबर झाला आहात. आम्हा मालकाना कगाल करून ठेवतां आहात, म्हणून ही भाषा तुम्हाला सुचते आहे. "

या नाटकातील बाबा, बिजली, हंसा, विठू इत्यादि स्वभावचित्रें अत्यंत ठसठशीत व परिणामकारक आहेत.

## सामाजिक प्रश्नाला वाचा

देवलाच्या शारदेनें बाला–वृद्ध—विवाहाची रूढि चव्हाट्यावर माडली. तशीच स्त्रियाना जाचक असणारी दुसरी रूढि म्हणजे लग्नातलि हुड्याची. तिच्यावर वरेरकरानीं आपले नाटकाचे हत्यार उचललें आणि ' हाच मुलाचा बाप ' हे नाटक रचले. मात्र ' शारदे 'प्रमाणे हे नाटक हृदयाला पीळ पाडणारें नसल्याने समाजात तितकी खळबळ उडवू शकलें नाहीं. उलट गुलाबची दीड लाखाची थापेबाजी, वसताने केलेली बापाची चोरी आणि बँक बुडाल्याची खोटी तार—यामुळें या नाटकातील सत्याचा आत्मा नाहींसा होतो आणि हे एक कल्पनारम्य रंजनप्रधान ' प्रहसन ' आहे असा ग्रह बळावत जातो. त्या दृष्टीनें रगभूमीवर तें नाटक चागले रगलें. वास्तविक या नाटकाचे सुमारास सर्व देशाला धक्का देणारी एक शोकजनक घटना घडून आली होती. स्नेहलता नावाच्या चवदा वर्षे वयाच्या एका बंगाली मुलीने केवळ हुड्यापायीं स्वतःला जाळून घेतले होते ! ही हृदयद्रावक घटना घडली १९१४सालीं. आणि वरेरकरानीं हें नाटक लिहिले १९१६ सालीं. पण त्यात यावा तितका जळजळीतपणा आलेला नाहीं. १९१८ सालीं या नाटकाला सगीत जोडण्यात आले. प्रेक्षकाच्या अभिरुचिमुळे आपण हें नाटक आनदपर्यवसायी केलें अशी कैफियत वरेरकरानीं एके ठिकाणीं दिलेली आहे. पण ती फारशी समाधानकारक नाहीं. ' शारदे 'चाहि शेवट आनदीच दाखविलेला असला तरी त्याचे सर्व कथानक करुणरसाने ओलेचिंब झालेले आहे; उलट ' हाच 'चे सारे वातावरण विनोदाने थबथबलेले आहे.

हुंड्यासारख्या दुष्ट चाली नाहींशा करण्याचा प्रयत्न करणें हाहि एक देशभक्तीचाच मार्ग आहे, हे सागताना गुलाब आवेशाने विचारतो, " आमच्या उपवर वधूंचा उद्धार कोण करणार ? भारतभूमींतील पुढील पिढ्याच्या माताची आज सुखासमाधानाने लग्नें लावून कोण देणार ? हुंड्याच्या पायीं जर्जर झालेल्या मुलींच्या बापांना कुठल्या मोफत दवाखान्यातलं औषध देणार ! कसायाप्रमाणं मुलींच्या बापांचा छळ करणाऱ्या

व्याघ्ररूपी मुलांच्या बापाच्या अजस्र जबड्यातून आमच्या उपवर गरीब गाईचं रक्षण कोण करणार ? ज्या पुढील पिढीसाठीं सर्वांची सारी खटपट चाललेली आहे, तिच्या माताच्या दीनवाण्या स्थितीकडे कुणीहि नजर देत नाहीं. ''

## विनोदाचीं साधनें

भक्ति व हास्य या दोन रसानीं ' कुंजविहारी ' हे नाटक तुडुंब भरलेले आहे. पेद्याचे स्वरूप, वर्तन व भाषण हे सारेच प्रेक्षकाना हसविणारे आहे. नंदमहाराजाच्या भर दरबारात कृष्णाविरुद्ध एक एक गोप गाऱ्हाणे सांगत असता कृष्णाच्या बाजूनें बचाव करण्यासाठीं पेद्या तेथें टपकतो. तो कसा ? तर—तो सांगतो,

" महाराज, ह्या आमच्या ग्रामस्थ मंडळींनीं मुंगीचादेखील रिघाव होणार नाहीं इतका दरवाजा गच्च भरून टाकिला आहे. तेव्हा गर्दी करून आंत शिरताना माझ्यासारख्या गरीब लगड्या प्राण्याची हत्या त्याच्या माथीं बसून राजद्वारीं आताच प्रेतयात्रेचा समारंभ होऊं नये, म्हणून छपरावरून वळचणींतून उतरून खालीं आलो. ''

याहिपेक्षा विनोदाचा उठाव वरेरकरानीं केला तो 'संन्याशाचा संसार' या नाटकात. बाटून खिस्ती झालेल्या हिंदूना परत हिंदुधर्मात घेण्याचा विषय त्यानीं या नाटकात तीव्रतेने मांडला आहे. बाल्याच्या बेगरूळ भाषेतून त्यांनीं खूप विनोद निर्माण केला. रेव्हरंड गुलेलू म्हणतो, " हिंदुधर्मांची महती मला सागू नका. का कीं मी खिस्ती आहे; आणि खिस्तच जगाला तारणारा असून त्यालाच देव प्रीत झाला आहे. त्यालाच गायनवादन करा. '' तो जेव्हा जेव्हा ' बुद्धीला हाय हाय ' म्हणतो, तेव्हा हशाच्या लाटा उसळतात. तसेच त्याचे प्रेम ज्या मुलीवर बसलें आहे, तिचे वर्णन तो आपल्या मोडक्यातोडक्या भाषेने पुढीलप्रमाणें करतो, " ही सौंदर्यदेवता उंचावलेली आहे. हिचे भजन करा. गौरवानें गौरवित होत असलेली ही. हिच्यापुढें गुडघे टेकायास मी आनंदाने, प्रीतीनें मला जन्मविलें आहे. म्हणून मी माझ्या पावित्र्याला कुजूं देणार नाहीं. पहा, या

सौदर्यिकेला स्तोत्र करा. यासाठीं कीं, तिने प्रसन्नवून माझी अनुकारी व्हावे. " पुढें तो म्हणतो, " भटकलेल्या कोंकरे, हे काय भाषण ? तूं मला शिकवण द्यावी काय ? मी तुझे केव्हाही न ऐकावे. जा—घरीं जा. आढ्यता मिरवू नकोस. का की, मी तर प्रभू येशू ख्रिस्त याच्या वधस्तंभाच्या आढ्यतेशिवाय कशाचीहि आढ्यता मिरवावी असे न होवो. त्याकडून मला जग व जगाला मी वधस्तभी दिलेला आहे. " ही सारी घेडगुजरी मराठी ऐकताना श्रोतृवृंदातून हास्याच्या लाटावर लाटा उसळत. त्यावेळीं मराठी बायबलची भाषाच मुळीं अशी हेंगाडी होती. या नाटकातील टीके-मुळे ती पुढें काहींशी सुधारली गेली.

## विनोद–साधनाच्या पायऱ्या

'सत्तेचे गुलाम' मध्यें विनोदाचीं लहानमोठीं हत्यारें वरेरकरानीं वापरलेलीं आहेत. 'चहा,' 'समर्थ,' 'वैकुठवासी,' 'अशील,' इत्यादि शब्दावर तर मामुली कोट्या आहेतच. पण त्याशिवाय 'मॅन—मॅनर,' 'कोर्टींगसाठीं कोर्ट–फी,' इत्यादि इंग्रजी शब्दहि त्यानीं विनोदासाठीं राबविले आहेत. 'नर्सोपत'सारख्या सकर शब्दातून हीन व्यजना व्यक्त करूनहि त्यानीं हंशा उत्पन्न केला आहे. यापेक्षा वरच्या दर्जाचा विनोद म्हणजे कान्होबा व मार्तंडराव याचा. कान्होबा हा वैकुठाचा भाऊ पण धद्याने मास्तर—अगदीं भोळाभाबडा, किंबहुना बावळट. 'दादा काय म्हणतील ?' हें त्याचे भित्रें पालुपद. 'सेंटिमेट' या शब्दाचा भलता उपयोग करणाऱ्या कान्होबाच्या रूपानें वरेरकर लो. टिळकाच्या निष्क्रिय अनुयायावर टीका करीत आहेत, असें दिसतें. कान्होबा जेव्हा आपले एकामागून एक मुद्दे सागतो आणि शेवटीं, 'बाबासाहेब म्हणून कोणी व्यक्ती होतीच कीं नाहीं ?' असा बिनतोड मुद्दा माडतो, तेव्हा त्याच्या बावळटपणातून विनोदाचे फवारे उडूं लागतात.

मार्तंडराव मंगळमूर्ती हा एक अर्धवट बुद्धीचा वकील आहे. त्याला हाताशीं धरून केरोपत आपली कारवाई लढवीत असतो. मार्तंडराव आपली पाचवी बायको बरोबर घेऊन प्रवेश करतो, तेंच मुळीं हास्याला

कारण होते. याच विनोदी कल्पनेवर अत्रे यानीं आपले ‘लग्नाची बेडी’– मध्ये गोकर्णांचे पात्र उभारले आहे. घरावर जप्ती आली असताना मार्तंडराव म्हणतो, “ अहो रमावहिनी, तिला जरा जागी करा. नाहीं तर या ताबेगहाणात तीहि सामील केली जायची. ”

याहिपेक्षा श्रेष्ठ प्रतीचा विनोद हेरबरावाच्या सवादातून निर्माण होतो. पूजेचा एकएक सस्कृत मत्र तो म्हणत असतो आणि त्याचवेळीं केरो-पंताशींहि बोलत असतो. या दोहोचा उत्कृष्ट मेळ नाटककाराने घातला आहे. ‘ त्वमेव शरण मम ’ हे हेरबाचे उद्गार देवापेक्षा त्या सैतानालाच अधिक लागू होतात ! त्याचप्रमाणे हेरबाचे वैकुठाशी जे बोलणे होते आणि शेवटीं ‘ शंखान शखाला मारल, ’ असा जो प्रकार होतो; तो सतापाचा व दुःखाचा असूनहि हास्य निर्माण करतो हे विशेष.

आपल्या भावानें रागाच्या भरात देव्हाऱ्यातील शखाने मारले असता वैकुंठ विचारतो, ‘ कुणी विचारल तर शखान मारल अस कस सागू ? ’ यातील श्लेष हास्यकारक आहे. ‘ मला तुमची क्षमा मागावयाची आहे ’ यातील क्षमा शब्दावरील श्लेषहि सुदर आहे.

## नाटिकांचा नवसंप्रदाय

पाश्चात्य पद्धतीचीं, थोड्या वेळात आटोपणारीं, नाटके लिहिण्याची प्रथा वरेरकरानी रूढ केली. सदा बदिवान, नामानिराळा अशा नाटिका त्यानीं रचल्या. ‘तुरुगाच्या दारात’ या नावाने लिहिलेले त्याचे नाटक अवघ्या पंचावन्न पानाचे आहे. आठ वर्षांनीं, १९३१ सालीं, ‘ पतित-पावन ’ या नावाने तेच नाटक ‘ ललित-कलादर्श मडळी ’च्या पुरोगामी रंगभूमीवर उभे राहिले. अस्पृश्यता–निवारणाचा प्रश्न या नाटकात माडला आहे. ‘ पुण्याच्या पाडुरगाने ’–लो. टिळकानीं–अस्पृश्याचा गणपती मिरवणुकींत घेतला, याचा उल्लेख वरेरकरानीं मोठ्या आदराने केला आहे. शेवटीं सर्वजण खादीचा पोशाख घालतात आणि गांधीजींचा अस्पृश्यता–निवारण्याचा मत्र आचरणात आणतात, असे दाखविले आहे. पण एकंदर नाटकात विशेष प्रसंग नाहींत, उत्कट भावना नाहींत व

समर्पक युक्तिवादहि नाहींत. यापेक्षा याच विषयावरील बॅ. सावरकरांचे ' उश्शाप ' हे नाटक अधिक परिणामकारक आहे. कलेची झिल्ई कमी झाली म्हणजे केवळ प्रचार कसा उघडा पडतो, याचा हा नमुना आहे. मात्र एकातिक प्रचार ठाशीव भाषेने करण्यात वरेरकर कुशल आहेत. या नाटकातील सतु चाभाराच्या तोडीं त्यानीं पुढील विचार घातल आहेत, "दुसऱ्याच्या नावावर मोठेपणा मिरवण, हे आमच्या हिदूच्या ब्रीदाला शोभत नाहीं. चाभार असलो तरी मी हिंदु आहे आणि स्वर्गाच राज्य जरी कुणी माझ्यासमोर आणून ठेवल तरी चाभारपणा लपविण्या-साठीं मी माझा हिदूपणा केव्हाही सोडणार नाहीं."

' सारस्वत ' हे नाटक तर दोन–अकीच आहे—आणि ते दोन्ही अंकहि आहेत स्वतत्र व स्वयपूर्ण ! साहित्य-समेलनाचे अध्यक्षपद पावलेले व डॉक्टर ही पदवी लाभलेले बाबासाहेब हमालाला दोन आणे देण्यासहि समर्थ नसतात. कारण, 'मुकेमिळ्याच्या' कादबऱ्या किवा नोटस् लिहिण्यात ते आपली लेखणी खर्चीत नाहींत. त्याचा गरीब जावई त्याना लेखणीचा विक्रा करण्याचा सल्ला देतो, तेव्हा तो ते झिडकारतात व म्हणतात, ' मी निर्ढावलोय–माजलोय–मस्ती आलीय मला... ..मला विक ना ! " साहित्यिकाच्या दारिद्याचे करुणरम्य चित्र या छोट्या नाटिकेत वरेरकरानीं अत्यत कौशल्याने काढले आहे.

## नव्या चौकटीत जुनें चित्र

' सौभद्रा 'ची अवीट गोडी कोणाहि दुसऱ्या नाटककाराला हेवा वाटण्यासारखी आहे. त्याच कथानकावर खाडिलकरानीं ' त्रिदडी सन्यास ' लिहिले आणि तसेच वरेरकरानींहि ' सन्याशाचे लग्न ' रचले. त्याला रगभूमीचे सौभाग्य लाभण्यापूर्वीं ध्वनिमुद्रिकेचे नवे वाहन मिळालें. तीन ध्वनिमुद्रिकावर सुभद्राहरणाचे वरेरकरी कथानक कोरले गेले. अवघ्या वीस मिनिटात सारे नाटक ! १९४५ सालीं वरेरकरानीं जे नाटक रगभूमीवर आणलें, तेंहि असे सुटसुटीत आहे. त्याचे तिन्ही अक एक-प्रवेशी असून, एकाच स्थळीं व एकाच दिवशीं घडलेले आहेत. किर्लो-

स्करानी सुभद्रेला प्राधान्य दिले, तर वरेरकरानी अर्जुनाला अधिक वाव दिला. खाडिलकराचा अर्जुन आध्यात्मिक आहे, तर वरेरकराचा अर्जुन नृत्यकलाप्रेमी आहे. अर्जुन, नारद, बळराम यापैकीं कोणाचाच स्वभाव-परिपोष वरेरकराना नीट साधला नाही. त्यामुळे हे नाटक नासले ! खाडिलकराच्या विद्याहरण नाटकाच्या कथेवरच रचलेले ' सजीवनी ' हे वरेरकराचे नाटकहि असेच हिणकस आहे. ' मी उणा पडलो ' अशी कबुली खुद्द वरेरकरांनींच दिली आहे. त्याचा हुकमी प्रात म्हणजे सामाजिक विषय आणि त्याचे विजयी शस्त्र म्हणजे खटकेबाज सवाद. समाज-सुधारणेची, राष्ट्रीय स्वातंत्र्याची व समाजवादी अर्थकारणाची त्याना मनस्वी तळमळ आहे. ती त्याच्या नाटकातून ओसडत असते.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) ' मराठी नाट्यक्षेत्रातील आघाडीचे वीर,' असे श्री वरेरकर याच्या बाबतीत का म्हटले जातें ?

( २ ) नाट्यक्षेत्रातील कोणत्या संप्रदायात श्री वरेरकराचा समावेश करता येईल ? का ? त्याच्या नाटकात विषयाची विविधता कशी दिसून येते तें लिहा.

( ३ ) ' करीन ती पूर्व ' या नाटकाची वैशिष्टयें कोणती ?

( ४ ) 'श्री वरेरकर स्त्रीमनाचे वर्णन मोठ्या कुशलतेने करतात ' हे विधान साधार स्पष्ट करा

( ५ ) ' सत्तेचे गुलाम ', ' सोन्याचा कळस ' या नाटकात कोणत्या सामाजिक प्रश्नाचा प्रामुख्यानें ऊहापोह झाला आहे ?

( ६ ) ' खलनायकाची कोरीव मूर्ति म्हणजे केरोपंत ' कोणत्या नाटकात हें खलपुरुषाचे चित्रण आले आहे ? ते परिणामकारक का झाले ?

### अधिक अभ्यास

माझा नाटकी संसार लेखक—भा. वि वरेरकर.

# मो. ग. रांगणेकर : : : ५

एखाद्या बागेतील फुले व फळे थडीच्या कडाक्याने करपून गेलीं, म्हणजे कागदी फुलावर व लाकडी फळावर त्या बागेच्या मालकाने सतोष मानण्याची पाळी येते, तशी स्थिती मराठी रगभूमीची १९४० सालापासून झाली. चित्रपटाचे आक्रमण इतक्या झपाट्याने व जबरदस्तीने नाट्य-कलेवर झाले की, त्यामुळे नाट्यदेवतेच्या नाड्याच आखडल्या गेल्या. ज्या महाराष्ट्रात एका वेळीं चाळीस-पन्नास नाटकमडळ्या खेळ करीत असावयाच्या, तेथे पाचसात कपन्याहि टिकाव धरू शकत नाहीत. मराठी रगभूमि जिवत ठेवण्यासाठीं ज्या दोनचार नाटककारानीं प्रयत्नाची पराकाष्ठा केली, त्यात श्री. रागणेकर याची गणना होते.



## नवें नाट्य-तंत्र

‘ मृतप्राय रगभूमीला नवजीवन ’ देणारे आपले ‘ कुलवधु ’ नाटक रागणेकरानीं १९४२ च्या ऑगस्टमध्ये रगभूमीवर उभें केलें. त्याचे ओळीने शभर प्रयोग झाले. १९४३ मध्यें त्या नाटकाचा सुवर्ण-महोत्सवहि झाला. रसिकाच्या झुडी खेचण्याची जी जादू प्रथम ‘ सौभद्रानें ’ व

नतर ‘ स्वयवरा ’ने दाखविली, तीच यावेळीं ‘ कुलवधू ’ने प्रगट केली. सदैव रगणारे असे हे नाटक नव्या नाट्यतंत्राप्रमाणे लिहिलेले आहे. एका प्रवेशातच एक अक सपविणे हे या तत्राचे एक वैशिष्ट्य आहे. पूर्वीच्या ‘ सौभद्रा ’दि नाटकामध्येहि काहीं काही अक एकप्रवेशात्मक आहेत, पण ते अपवाद म्हणून, सहजगत्या साधलेले. नव्या नाट्यतत्रांत तो काटेकोर सक्त नियमच होऊन बसला आहे. काही वेळा त्याचा अतिरेक होऊन, एका प्रवेशातील पात्रे जेवणाची वेळ झाली म्हणून किंवा काहीतरी आठवले असे भासवून, रगभूमीवरून एकदम पसार होतात व दुसऱ्या पात्राना जागा करून देतात ! अशा एकप्रवेशी अकाच्या माडणीमुळे रगभूमवरील देखाव्याचा खर्च पुष्कळ वाचतो आणि त्याबरोबरच वास्तवतेचे वातावरण निर्माण होते.

## वास्तवतेवर भर

वास्तवता वाढविण्यासाठीं नेपथ्याच्या सूचना ( Stage directions ) प्रत्येक अकाच्या आरभीं सविस्तर देण्याची पद्धत आहे. शॉ--इब्सेन प्रभृति नाटककार तर पानपानभर अशा नेपथ्य- सूचना देतात. त्यामुळे नाटक-मडळीला तर मार्गदर्शन होतेच, पण शिवाय नाट्यग्रथाच्या वाचकापुढेहि तो तो देखावा मूर्तिमत उभा राहतो. या वास्तवतेला शोभेल अशीच अगदी ताजी, व्यवहारातील बोली पात्राच्या तोंडी घातलेली असते. कथानकाचे विषयहि चालू घडीचे गरमागरम असतात माणूस नित्याचे व्यवहार काही गात गात करीत नाहीं--क्वचित् हर्षाच्या वा शोकाच्या उद्रेकाच्या क्षणी त्याचे तोंडून करुण सूर निघतात. हे जाणून नव्या नाट्य-तंत्रात पदाना अत्यत संक्षिप्त स्वरूप दिलेले असते. किर्लोस्कर-देवलांची दोन शतकापर्यंतची पदाची धाव आता अत्रे-रागणेकराच्या नाटकात आठ-दहावर येऊन ठेपली आहे.

## कारागिरीवर भर

चिमूटभर कथानक, त्रुटित संवाद आणि माफक स्वभावपरिपोष–असा सारा आटोपशीर ससार रांगणेकराच्या नाट्यसृष्टीचा आहे. भाषेची झग-

झगीत आतषबाजी, कल्पनेची गगनचुंबी गरुड-भरारी, किंवा रसाचे तुफान कल्लोळ याचा मागमूसहि त्यांच्या नाट्यसृष्टींत आढळत नाहीं, मग एखाद्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार किंवा एखाद्या प्रमेयाचा उलगडा कोठून येणार ? तीन तासात नाटक आटोपण्याकडे त्याची दृष्टी आणि प्रेक्षकाचे मनोरंजन हा त्याचा हेतु. कलेपेक्षा कारागिरीवरच त्याचा भर. दीर्घ चिंतनाने, निस्सीम तन्मयतेने, अनुभवाच्या दशाने कलेचा जो सहज व सामर्थ्यशाली उद्गार अकस्मात् बाहेर पडतो, तो रागणेकराच्या कोठल्याहि नाटकातून ऐकू येणार नाहीं. तीन मिनिटांत फोनोवर वाजणारी जशी ध्वनिमुद्रिका, तशींच तीन तासात आटोपणारी त्याचीं नाटकें. धावत्या जीवनात त्याची चहा या सोपेपणामुळे सहजच झाली. तीं बहुतेक सारीं एकएका आठवड्यात लिहून काढलेली आहेत आधीं कथानकाचा आराखडा नाहीं किंवा नंतर साफसुफीचा हातहि नाहीं, असें आपलें लेखन-तंत्र रागणेकर सांगतात, बिचारा गटे !–आपले फौस्ट नाटक साठ वर्षे लिहीत बसला होता म्हणे ! तो रागणेकराची चपळाई पाहून चकितच होईल ! त्यांनीं ' कुलवधु ' पाच दिवसात, ' आशीर्वाद ' पंधरा दिवसात, ' माझे घर ' तीन आठवड्यात व ' नंदनवन ' एक महिन्यात लिहिलें. ' नाटक हे वाचण्यासाठीं लिहावयाचे नसून पहावयासाठीं लिहावयाचे असतें ' हे त्याचे सूत्र.

## वृत्त-सृष्टींतून नाट्य-सृष्टींत

मराठी रंगभूमीच्या पडत्या काळात यशाला व वैभवाला चढलेले रांगणेकर याना परिस्थितीची किंवा शिक्षणाची अनुकूलता लाभलेली नव्हती. मोतिराम गजानन रांगणेकर याचा जन्म १९०७ सालीं झाला. १९२४ सालीं ते मॅट्रीक झाले. पुढे ते वृत्तव्यवसायात शिरले. ' अरुण ' 'नावाचे मासिक व ' तुतारी ' नावाचे साप्ताहिक त्यांनीं मुंबई येथे खुसखुशीतपणे चालविले. छपाईच्या सजावटीपासून लेखाच्या मांडणीपर्यंत सर्व अंकात चटकदारपणा आणण्याचा प्रयत्न ते करीत. १९२९ सालीं हीं नियतकालिके बंद पडल्यानंतर त्यांनीं ' वसुंधरा ' नावाचे साप्ताहिक सुरू केले. तें चार वर्षे चालविल्यावर ' चित्रा ' नावाचें साप्ताहिक त्यांनीं

काढलें. त्याच्या समाप्तीनंतर १९३९ सालीं, ते 'आशा' नावाचें साप्ताहिक घेऊन मराठी वाचकापुढें आले. त्यानतर मात्र त्यांनीं वृत्त-सृष्टींतून नाट्यसृष्टींत उडी मारली. त्याच्या आधीं ते ग्रामोफोन कंपनीला छोटी छोटी पदे तयार करून देतच होते. शिवाय 'औट घटकेचा राजा' 'प्रल्हाद' वगैरे चित्रपटाच्या कथाहि लिहून देत होते. 'सीमोल्लंघन' नावाची कादंबरी त्यानीं लिहिली आहे. पण त्याना सोन्याची खाण गवसली ती म्हणजे 'कुलवधु.'

## कलेचा कोमटपणा

सौ. ज्योत्स्ना भोळे यासारख्या कुशल नटवर्गाच्या साहाय्यानें त्यानीं आपली नाटकी कारागिरी यशाच्या कळसास पोचविली. त्यात भाषा, कल्पना, विनोद, किंवा कथानक--हें सर्वच काहीं कोमट आहे. पतिपत्नीचे श्रृंगारिक खटके ऐकण्याची चटक ज्याना लागलेली, असा श्रोतृवृंद त्याच्या या नाटकावर पुनः पुनः उड्या घेतो. बाकीच्या नाटकाना 'कुलवधू'च्या लोकप्रियतेचा चतकोरहि लाभला नाहीं. कारण कथानकाचे कुतूहल किंवा रस-निर्मितीचे आकर्षण असे त्याच्या नाटिकात फारसें नसते. जी कांहीं अल्पस्वल्प कथा रागणेकराच्या डोक्यात असेल, ती बहुतेक सारी पहिल्या अंकातच सपून जाते.--पुढे पुनरुक्तीच ऐकत श्रोत्याना बसावे लागते.

सिनेमात गेलेली स्त्रीसुद्धां कुलीन गृहिणी राहू शकते, असे मत 'कुलवधू'-मध्ये माडलेले आहे. नवनाट्याचा प्रणेता इब्सेन याच्या नोरा'प्रमाण भानुमतीहि आपल्या घराचे दार ढकलून बाहेर जाते. पण, नोराच्या धक्क्याने युरोपातील घरे हादरलीं, तसा काहीं परिणाम भानुमतीच्या कृतीने महाराष्ट्रात घडून आला नाहीं. रागणेकराच्या लेखणींत ती शक्तीच नाहीं, कारण त्याच्या हृदयात तशी आंचच नाहीं-किंवा तसे काहीं समाजकार्य करण्याची इच्छा त्यानीं आपल्या मनाशीं धरली आहे असें दिसत नाहीं. माफक भावनाचे दोनचार खेळ करून प्रेक्षकाचे प्रहरभर चित्तरंजन करणे, हीच त्यांची धाव ! त्यांत मात्र त्याना सोळा आणे यश आले आहे.

'कुलवधू'त सिनेमामध्ये स्त्रीने जाण्याचा प्रश्न घेतलेला आहे, तर 'अलंकार'मध्ये कुलीन स्त्रीने रंगभूमीवर जाण्याचा विषय रंगविलेला आहे. दुष्काळासाठीं होणाऱ्या एका कार्यक्रमात वत्सला भाग घेते. म्हणून तिचा व्यसनी नवरा तिला रगभूमीवरून फरफरा ओढून आणतो असें हे प्रसगप्रधान ( Action play ) नाटक आहे. त्यामुळे स्त्रियाना घटस्फोट मिळण्याची आवश्यकता किती आहे हे समाजाला पटेल, असा विश्वास नाटककाराला वाटत आहे. पण तसा ठसठशीत परिणाम घडविण्याचे सामर्थ्य नाटकाच्या अंगीं मात्र नाहीं.

## कथाविषयांचा सूर

'माझे घर' या नाटकाने 'कुलवधू'खालोखाल यश मिळविलें आहे. एकत्र कुटुबातील माणसाच्या व्यक्तित्वाचा कोडमारा कसा होतो हे या नाटकात हसतखेळत दाखविले आहे. त्यातील बाजीराव म्हणतो, "म्हणजे पहा ना! अखड हिदुस्थान तर व्हायला हव आणि सर्वांना समान हक्क मात्र द्यायला नकोत! त्यातलाच प्रकार हा!" पण राष्ट्राचे रूपक नाट्य-कथानकावर बसविण्याचे श्रम रागणेकरानीं घेतलेले नाहींत. नटश्रेष्ठ पृथ्वीराज यानीं आपल्या 'दीवार' नाटकात एकत्र कुटुबाचाच विषय घेतलेला आहे, पण तो किती प्रभावीपणे माडलेला आहे - आणि त्यातून राष्ट्राच्या अखडत्वाचा सदेश किती कलापूर्णतेने दिला आहे. खाडिलकराचीच स्मृति होते त्यावेळीं! रांगणेकर त्या बाजूस फिरकावयाचेच नाहींत. त्याच्या लेखणीने प्रेक्षकाच्या हृदयावर कोणत्याच विचाराचा ठसा उमटत नाहीं—रजन तेवढे होते.

सुशिक्षित कुमारिकाच्या प्रश्नाला 'आशीर्वाद' या नाटकात रागणेकरानीं वाचा फोडली आहे; पण विभावरी शिरूरकराचा तो जोस कोणीकडे आणि रागणेकराचा दुबळेपणा कोणीकडे! धबधबा व ओहोळ इतका फरक! आर्थिक कुटुंबाच्या स्वास्थ्यासाठीं सुमित्रा आपल्या प्रेमाचा होम करते असें या नाटकात दाखविले आहे; पण तें अगदीं बेताबेतानें. समाजातील जीर्ण मताचे किल्ले जमीनदोस्त होण्याला तोफा डागाव्या

लागतात—दिवाळींतील फटाके पेटवून ते काम होत नाहीं—त्याने क्षणभर मौज तेवढी वाटते—आणि तेवढीच अपेक्षा रागणेकराची दिसते.

## ठरीव मालमसाला

‘रंभा’ हे रागणेकराचे अगदीं अलीकडचे नाटक आहे. इतर नाटकापेक्षा यामध्ये कथानकाचे नावीन्य आहे. व्यसनी नवऱ्याच्या बायकोचा चडफडाट, हा रागणेकराच्या बहुतेक नाटकाचा कथाविषय. आणि त्याला विनोदाची फोडणी देण्यासाठीं संपादक किंवा बातमीदार यांची टवाळी हे ठरीव ठशाचे प्रसंग. वात्सल्य — रसाचे शितोडे उडविण्यासाठी एखादी लहान मुलगी काहीं नाटकात आणली आहे तेवढाच पालट. कलह—त्यातले त्यात पती-पत्नीचे—ऐकण्याला निद्राप्रिय माणसाना केवढी हौस वाटते! हे ओळखून रागणेकरानीं आपल्या बहुतेक नाटकात संसारी जोडप्याचे खमंग खटके दाखविले आहेत. पण ‘रंभा’ या नाटकाचा सारा पिंडच भिन्न द्रव्यानीं घडलेला आहे.

## कलावंताचें कार्य

तेरा वर्षाच्या एका मुलीला आपल्या मागल्या जन्माची आठवण होते आणि ती आपल्या पूर्वजन्मातील घर, त्यातील माणसें, तेथील वस्तु—सारे काही अचूक ओळखते, अशी छोटी बातमी वर्तमानपत्रात एकदा आली—आणि लोकाच्या स्मरणातूनहि गेली. पण कलावताचे कार्य हेच असते कीं, अशा धावत्या घटनाना रम्य व शाश्वत स्वरूप देणे. सायंकाळचा देखावा किती क्षणभगुर. पण चित्रकार तो आपल्या कलमाच्या कसबाने चितारून कायम स्वरूपात ठेवतो. आणि शब्द-चित्रकार तरी दुसरे काय करतो? कन्या-विरहाचे वर्णन ‘शाकुतला’त कालिदास करतो, तर पत्नी-विरहाची व्यथा भवभूति ‘उत्तर-राम-चरितात’ मूर्तिमंत उभी करतो. क्षणिक अनुभवाला चिरकालिक स्वरूप देणे व त्यातून त्रिकालाबाधित तत्त्व शोधून काढणे हेच कलावंताचे कार्य. भाऊसाहेब पेशव्याचा तोतया खोटा आहे हे नाना फडणिसाने सिद्ध करून दाखविले, असे चार ओळींचें वृत्त इतिहासात वाचावयास मिळतें; पण त्याच्या पोटात भावनाचीं किती

आदोलने लपलेलीं होतीं; हे पहावयास मिळते केळकराच्या ‘ तोतयाचे बडात ’. त्याचप्रमाणे पुनर्जन्माची स्मृति असलेल्या बालिकेची वार्ता किती साधी. पण त्यामुळे एका कुटुबातील माणसाच्या मनात भावनाची केवढी वादळे निर्माण झालीं, याचे मनोवेधक चित्र रागणेकरानीं ‘ रभा ’ नाटकात रंगविलेले आहे.

## कथानकाचें नावीन्य

पूर्वजन्माची आठवण असलेली रभा विजापुराहून मुबईस येते, तिचा प्रथम प्रवेश नाटककाराने मोठ्या कुशलतेने घडविला आहे. मुबई हायकोर्टाचे जज्ज बापूसाहेब याची पत्नी तेरा वर्षापूर्वी दिवगत झालेली. तिचा स्मृति-दिन दरवर्षी ते आपल्या घरीं पाळतात. आजहि ते आपल्या तीन मुलासह ‘मातृ–दिन’ साजरा करीत होते. अशावेळीं रभेला घेऊन तिचा गरीब बाप तेथे येतो. त्याची बावचळलेली मनोवृत्ति नाटककाराने फारच बारकाईने रेखाटलेली आहे. ‘मागल्या जन्मीं ही या घरात रहात होती’ एवढे एकच वाक्य सागण्याला त्याला सहा पाने लागलेली आहेत. त्या सवादात सर्वाच्याच मनाचा विभ्रम कसा होतो हें कुशलतेने दाखविले आहे.

## बंडखोर स्त्रीचीं शब्दचित्रें

‘कुलवधू’तील भानुमतीचा स्वभाव जितका चातुर्याचा तितकाच शातपणाचा दाखविला आहे. आणि तसाच तो बडखोरहि आहे. ती आपल्या नवऱ्यालाहि स्वतत्र बाण्याने बजावते,

“ देवदत्त : तस म्हणत नाहीं भानू, मी. पण मी त्याना पत्र पाठवून बोलवू नकोस म्हणून सागितल होत कीं नाहीं ?

भानु० : पण मला ती तुमची चूक वाटली. नवरा झाला म्हणून तो कधीं चुकतच नाहीं कीं काय ? अशा वेळीं बायकोन त्याच मुळींच ऐकायच नसत—तरच ती खरी पतिव्रता ! ”

भानुमतीला आपल्या निर्मल चारित्र्याची खात्री असल्यामुळेच तिनें आपल्या क्रुद्ध सासुसासऱ्याना, आपल्या नवऱ्याचे इच्छेविरुद्ध, आपले घरीं

रहावयास बोलाविले. खरे सोने अग्नीला भीत नाहीं हेच तिने आपल्या कृतीने दाखविले. कारण तिचे सासरे मुंबईस आले ते फणफणतच.

## स्त्री-स्वभावाचे नमुने

त्याना घरीं भानुमतीचे वर्तन शभर टक्के कुलीन दिसून आले, तरी सासुसासऱ्याचे समाधान होईना. तिच्या सरळ वागण्याचाहि ते वाकडाच अर्थ करूं लागले. तो प्रकार असा—

" बनी : ( हळूच आईला ) बघ कशी आर्क्टिंग करते आहे !

भानु० : ( थोडा वेळ वाट पाहून ) हे भेटले नाहींत स्टेशनवर ?

बनी : अगबाई ! "हे" का ? नाव नाहीं वाटतं घेत नवऱ्याच ?

भानु० : ( निष्कपटपणाने ) कोकणात घेतात ?

राधा : कोकणात घेत नाहींत, पण म्हटल मुंबईत फासन असेल ती !

बनी : आणि त्यात सिनेमातल्या बायका !

भानु० सिनेमात गेल म्हणजे बायकानीं मर्यादा सोडायला हवी, असं थोडंच आहे ! ( बाप्पास ) घर शोधायला त्रास पडला असेल !

बाप्पा : छेः, तुझं घर म्हटल्याबरोबर गाडीवाल्याने बरोबर इथं आणून सोडल ! फार नामांकित माणस तुम्ही ! "

पण शेवटी भानुमतीने आपल्या सौजन्याने व सहिष्णुतेने त्याचे मन जिंकले. आणि प्रत्यक्ष सिनेमाच्या स्टुडिओत जाऊन आल्यानतर तर तिच्याबद्दल सासऱ्याला आदरच वाटू लागला. तो म्हणतो, " काय बिशाद आहे हिच्याशीं कुणी चावटपणा करील ! ही आली म्हटल्याबरोबर सगळे कसे चूपचाप ! केवढ्या आदरानं वागवतात हिला ! थेट अगदीं मालकापासून तो साध्या नोकरापर्यंत सगळे मोठा मान देतात हिला ! "

## आर्थिक स्वातंत्र्याचा प्रश्न

भानुमतीचे शुद्ध चारित्र्य पाहून खेडवळ सासुसासऱ्यांचे शुद्ध मन लगेच निवळले. पण त्यानीं केलेल्या जखमाचे वण कांहीं तिच्या नवऱ्याच्या अंतःकरणांतून बुजले गेले नाहींत. ' आपल्या बायकोला पधराशे रुपये

पगार आणि आपल्याला मात्र फक्त साठच रुपये !—तिच्या पैशावर आपली चैन अवलबून !' असा विषमतेचा विचार देवदत्ताच्या मनात येतो आणि त्याच्या मनातील नवरेपणाचा 'मालक' जागा होतो. त्यामुळे त्या दोघांमध्ये खडाष्टक उडते.

"देव०:—मी एकट्यानंच नाहीं म्हणून कसं चालेल? एवढे मोठे बाप्पा तुला डोक्यावर घेऊन नाचूं लागले, भानू.

भानु०—म्हणून तुमच्या डोक्यार मी बसणार नाहीं.

देव०—काय नेम त्याचा ?

भानु०—हो. काय नेम त्याचा ? शकराच्या डोक्यावर नाहीं कां गंगा बसली होती ? आपण तरी काय, शकराचेच अवतार ! तिसरा डोळा नाहीं म्हणून बरं, नाहींतर माझं केव्हाच भस्म करून टाकल असतं !—बरं तें जाऊ दे. उद्या परवा केव्हातरी आमच्या कंपनीचे मालक येणार आहेत तुम्हाला आमत्रण द्यायला.

## मनोविभ्रमाचें चित्रण

'कुलवधू' मध्ये चित्रपटात उत्तम काम केल्याबद्दल भानुमतीचा जाहीर सत्कार होतो. ती पुष्पहार, पुतळा, पदक व पारितोषिक घेऊन घरीं आनंदाने येते. तिच्या आनंदी वृत्तीचें चित्रण रांगणेकरानीं मोठ्या कुशलतेने केले आहे. तिचा आपल्या मोलकरणीशीं झालेला संवाद पुढीलप्रमाणे—

भानु०—" तस नको ग. तूं कुठून तरी चोरून बघ. ( खिडकीकडे जाऊन बाहेर पहात ) पण केव्हा येणार ग ते ?

पार्वती०—मला सांगून गेले आहेत वाटतं ?

भानु०—आता आल्यावर मी त्याच्यावर प्रथम खूप रागावेन—

पार्वती०—(मध्येच) पण तुम्ही पुतळ्यासारख्या गप्प बसणार म्हणाला होता ना त्या खोलींत ?

भानु०—अग हो—विसरलेंच मी ! काय करूं—रागावूं का गप्प बसूं ?— रागावणं नको बाई ? किती आनंदांत आहें मी यावेळीं

आपल्याच माणसावर काय रागवायच ?—पण ते का आले नाहींत ग थिएटरांत ? ”

## घटस्फोटाचा पुरस्कार

‘अलंकार’ या नाटकात व्यसनी नवऱ्याची अरेरावी दाखविली आहे. त्या अरेरावीविरुद्ध बंड करून उठणारी वत्सला म्हणते, “एवढ्याशा ह्या टीचभर दोरीची अरेरावी आतापर्यंत मी फार सोसली, फासाच्या दोरी-पेक्षाहि ह्या वीतभर दोरीन मला जन्मभर मरणाच्या असह्य यातना भोगायला लावल्या. पण आता मला त्या सहन होत नाहींत. रत्नहाराला-देखील तुच्छ मानून आजपर्यंत मी ह्या अलकाराला दिमाखान मिरवीत आले. पण आज ह्या सोन्याची तुम्हीं माती केलीत—ह्या फुलाचा पाचोळा करून टाकलात. ह्या वीतभर दोरीनं तुम्ही आम्हा बायकाना जन्मभर जखडून टाकता आणि आम्ही त्यातच स्वतःला धन्य मानून घेतो.”

द्विभार्या-विवाहाचा प्रश्न ‘नदनवन’ नाटकात रागणेकरानीं हाताळला आहे. पण घरात सवत आलेली दिसताच मनोरमा आपल्या पतीच्या सुखासाठीं ‘घराबाहेर’ पडण्याचें औदार्य दाखविते. एखाद्या पौराणिक सती साध्वीप्रमाणे ती आपल्या भावी सवतीला म्हणते, “अवतिकाबाई, जगाच्या दृष्टीन सवत म्हणून तुम्हीं आला असला, तरी मला तुम्ही बहिणी-सारख्या आहात. माझ्या बहिणीच्या हाती मी माझ्या ससाराचा देव्हारा विश्वासान देऊन जाते आहे—अशा वेळी जाताना तरी माझ्यावर रागावू नका. आता मला गोड शब्दानीं तुम्ही निरोप दिला नाही, तर जन्मभर ही गोष्ट खात राहील.”

## वात्सल्याचा पुतळा

जुन्या पिढींतील करारी म्हाताऱ्याचे शब्दचित्र रागणेकरानीं जसे ‘कुलवधू’त, तसेच ‘माझे घर’मध्येहि रेखाटले आहे. दोन्ही म्हातारे जितके कडवे तितकेच प्रेमळ आहेत आणि म्हणूनच त्याचे हृदयपरिवर्तनहि झटदिशीं होतें. ‘कोणे एके काळीं’ व ‘एक होता म्हातारा’ या नाटकातहि अशीच स्वभावचित्रे आहेत. त्यातहि ‘एक होता म्हातारा’मधील नानाचा

स्वभाव पहिल्यापासूनच प्रेमळ दाखविला आहे—वात्सल्याचा पुतळाच आहे तो ! मुलाच्या कल्याणासाठीं म्हणून तो, आपल्या इच्छेविरुद्ध, स्वतः म्हातारपणीं लग्न करतो आणि ते लग्न मुलाचे कल्याणाचे आड येतें असे कळताच गागरून–गोंधळून जातो. नानाचे आपल्या मुलावर प्रेम किती गाढ होते याचे सुरेख वर्णन उमा करते. ती म्हणते, "ज्यानी तुला तळहाताच्या फोडासारख वागवल, तुला वाईट वाटू नये म्हणून आजपर्यंत विरक्तपणान आयुष्य काढलं—ज्यानी तुला जिवाभावाचा मित्र मानून तुझ्या सुखदुःखात आपल सुखदु ख मिसळून टाकल, त्याच्या आयुष्याचा आता एका फटकाऱ्यान निकाल लाव."

## प्रेमाची पायमल्ली

'आशीर्वाद' नाटकातील तात्या याचा स्वभाव काहीं कडवा किंवा व्यसनी नाहीं. उलट त्यानी आपल्या पोटाला चिमटा घेऊन आपल्या मुलीला—सुमित्रेला डॉक्टरीपर्यंतचे शिक्षण दिले. पण ती एका डॉक्टर बरोबर लग्न करून आपल्या घराबाहेर जाणार ही बातमी कळताच त्याना दु खाचा धक्का बसतो. आपले म्हातारपण झालेले, त्यात नोकरी गेलेली, आणि आता कमावती मुलगीहि जाणार—यामुळे पुढें आपली काय दुर्दशा होईल याचे दारुण चित्र त्याच्या डोळ्यापुढे उभे राहते व त्यामुळे ते वैतागाने सुमित्रेला टाकून बोलतात व तिच्या लग्नाला पर्यायाने अडथळा आणतात. प्रेमावर परिस्थिती कशी मात करते हे सागताना ते म्हणतात, "पण अंतःकरणाच्या खालीं पोटहि आहे हे विसरू नकोस. उपाशी अंतःकरणा-पेक्षा उपाशी पोटाचीच कळ असह्य होते माणसाला ! लग्न काय—केव्हाहि होईल. आजच काहीं तूं म्हातारी झाली नाहींस." परतु तात्याची मोठी मुलगी अक्का ही त्याच्या वात्सल्य–भावनेला गदगदा हालवते.

## कथानकाचा तोकडेपणा

'माझे घर'मधील नारायण व बाजीराव यानीं आपापल्या पत्नीसह घरातून पाय काढला. याचा झटका नानाना चागलाच जाणवला. त्यानीं आपल्या घरात लोकशाही सुरू केली, किंबहुना मुलाच्या संसारात ते जाऊन राहिले

व सर्वांशीं समानतेने राहूं लागले. 'फॅमिली ग्रूप'चा फोटो काढण्याचे वेळीं लक्ष्मी नव्या वेषाने आली म्हणून नाटकाच्या प्रारंभीं खटका उडतो. पण कुटुंबातील प्रत्येकाचे व्यक्तिमत्व मान्य केले गेल्यामुळें नाटकाच्या शेवटीं सर्वांचा 'फॅमिली ग्रूफ'चा फोटो निघतो. असें हें चुटपुटते कथानक आहे. दुसऱ्या अंकात एका बहिऱ्या प्राध्यापकाचे विनोदी पात्र आणल्यामुळे कथानकाची उणीव काहींशी भरून निघते. पण एकंदरींत कथानकाच्या तोकडेपणामुळे हें नाटक प्रेक्षकाच्या जिज्ञासेची तार सतत खेचून धरूं शकत नाहीं.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) बोलपटानीं नाट्यकला मारून टाकली असे तुम्हास वाटते का ? कारणे द्या.

( २ ) रागणेकरानी नवें नाट्यतंत्र अवलंबिले व रंगभूमीला ' नवजीवन ' दिले ! नवे नाट्यतंत्र म्हणजे काय ? रंगभूमीला त्याचा कसा उपयोग झाला ?

( ३ ) रागणेकराच्या सर्व नाटकांत कोणते नाटक अधिक गाजले ? कां ? त्यात नटनटींना किती श्रेय आहे ?

( ४ ) " प्रेक्षकाचे मनोरंजन हा त्यांचा हेतु. कलेपेक्षा कारागिरविरच त्याचा भर " रागणेकराच्या नाटकाच्या आधारे या विधानाची चर्चा करा.

( ५ ) ' कुलवधू ' नंतरच्या नाटकातील कथानकात आकर्षकता राहिली नाहीं हीं नंतरची नाटके कोणतीं ? त्यातील कथानकात महत्त्वाच्या घटना कोणत्या ?

( ६ ) ' रंभा ' नाटकात कथानकाचे कोणते नावीन्य आहे ?

**अधिक अभ्यास**

रागणेकर आणि मराठी रंगभूमि लेखक–प्रा. द. रा. गोमकाळे

## या पुस्तकांतील
## लेखकांचीं कांहीं वाचनीय पुस्तकें

### कृ. प्र. खाडिलकर

१. विद्या–हरण
२. कीचक–वध
३. सत्त्व–परीक्षा
४. भाऊबंदकी
५. मानापमान
६. स्वयंवर

### न. चि. केळकर

१. तोतयाचें बंड
२. कृष्णार्जुन–युद्ध
३. वीर–विडंबन

### वा. वा. खरे

१. शिव–संभव
२. तारा–मंडळ
३. उग्र–मंगल

### भा. वि. वरेरकर

१. हाच मुलाचा बाप
२. करीन ती पूर्व !
३ सत्तेचे गुलाम
४. सोन्याचा कळस
५. तुरुंगाच्या दारांत
६. सारस्वत

### मो. ग. रांगणेकर

१. कुलवधु
२. माझें घर
३. रंभा
४. आशीर्वाद

★

# शिखरे-वाङ्मय

## चरित्रें

| | रु. आ. |
|---|---|
| म. गांधीचे चरित्र | ८— ० |
| गाधी–जीवन–कथा | ३— ० |
| राष्ट्र–पिता गांधीजी | १— ० |
| गाधी–रण–गीता | १— ० |
| राष्ट्र–जनक टिळक | १— ४ |
| लोकमान्य टिळक | ०— ८ |
| सुधारकाचार्य आगरकर | १— ८ |
| डॉ. राधाकृष्णन | ०— ८ |

## प्रबंध

| | |
|---|---|
| गांधीजींचे रामराज्य | १— ० |
| साम्राज्य व स्वराज्य | १— ० |
| सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म | ०—१२ |
| आजकालचे साहित्यिक | १— ० |

## कादंबरी

| | |
|---|---|
| थोरली आई | १— ८ |
| आईची कृपा | १— ० |
| भावनांचा नाच | २— ० |
| जिवलग | १— ८ |

## नाटकें

| | |
|---|---|
| वैष्णवजन | १— ० |
| आठ साल | १— ० |

## लघुकथा

| | |
|---|---|
| क्रांति–किरण | १— ० |
| गंगेचे थेंब | २— ० |

लघुकथाकार

# अनुक्रम

## प्रा. फडके : : : १

गोष्टीची गोडी नाहीं कोणास ? आजीच्या तोंडून गोष्ट ऐकता ऐकतां लहानपणीं कोण झोपीं गेले नाहीं ? वेदकालापासून आतापर्यंतच्या वाङ्मयात गोष्टीच गोष्टी ! राक्षसाच्या, भुताच्या, पऱ्याच्या गोष्टी. कुत्र्यामांजराच्या,



पोपटमैनाच्या, वाघसिंहाच्या गोष्टी. ठकसेनाच्या गोष्टी, बिरबलच्या गोष्टी, अरबी भाषेतील गोष्टी–नाना प्रकारच्या गोष्टी ! त्या ऐकण्याची चटक लहान-थोर सर्वांसच. इतिहासातील सर्व काळात व पृथ्वीवरील सर्व स्थळात ही गोष्टीची आवड जबर आहे, कायम आहे. कथा म्हणून, लघुकथा म्हणून, लघुतमकथा म्हणून,– नाना वेषांनीं गोष्टीचे वाङ्मय सर्वत्र मोहिनी घालीत असतें.

### लघुकथांचे प्रकार

लहान मुलाची कल्पनाशक्ति जशी तरल असते तशीच अमर्याद पण असते; तिला गगनापर्यंत धाव घ्यावीशी वाटते. अटक अशी तिला माहीतच नसते. नसते तें असतें करावे, हीच तर त्या कल्पनाशक्तीला अनिवार ओढ. तिची भूक भागविण्यासाठीं ' अद्‌भुत कथा ' तयार असतात. त्याना स्थलकालाचें बंधन नसतें कीं सत्यासत्याचे निर्बंध नस-तात. तरुणपणीं प्रेमाच्या व पराक्रमाच्या भावना हृदयात उचंबळतात,

त्याचे पडसाद ऐकविणाऱ्या ' प्रणय कथा ' साहजिकच युवकांची मने वेधून घेतात. तिरंगी चित्राखालीं बहुरंगी प्रणय रंगविणाऱ्या कथा-कादंबऱ्यावर युवकांच्या उड्या पडतात याचे कारण हेच. त्यापुढील वर्ग सांसारिकांचा. सत्यसृष्टीचे धक्के-चपेटे व कोपरखळ्या-चिमटे त्यांना बसतात. निराशा व निर्धनता, अपमान व अपयश, मत्सर व द्वेष इत्यादि वास्तव जगातील कटु अनुभवांनीं ते भगभगलेले व कावलेले असतात. दुःख-दैन्याने त्रस्त-तप्त झालेल्या त्यांच्या मनाला विरंगुळा मिळावा, म्हणून कोठें तरी ' पलायन ' करावे असे वाटते. त्यांच्यासाठीं ' कल्पित कथा 'ची टाकसाळ चालू होते. जे आपल्याला सत्य-सृष्टींत लाभत नाहीं, ते हस्तगत केल्याचे समाधान संसारी वाचकाला ' कथा-सृष्टीं ' त गवसते आणि म्हणून त्यांत तो रमतो. याच ' कल्पिता ' ला उदात्त स्वरूप देऊन ध्येयवादाची सृष्टि वाचकाच्या डोळ्यापुढे उभी करणाऱ्या काहीं कथा असतात. दोन्हीहि मृगजळेच. पण एकाने दुःखाचा विसर पडतो, तर दुसऱ्याने आशेचा विसार मिळतो.

## पाश्चात्यांचा स्पर्श

अशा अद्भुत, नीतिपर, वास्तव गोष्टींचा भरणा मराठी साहित्यात पुष्कळच आहे. भारत-रामायण किंवा पंचतंत्र-हितोपदेश इत्यादि संस्कृत वाङ्मयातील कथांना तर ' देशीकार लेणें ' दिलेलें आहेच. पण त्याशिवाय इसापनीति, अरबी भाषेतील गोष्टी, बुद्धांच्या जातक कथा इत्यादि परभाषातील कथांचे पाटहि मराठीच्या मुलखात आणून सोडलेले आहेत. ' आटपाट नगरा 'तील गोष्टी सांगणाऱ्या कहाण्या म्हणजे तर अस्सल देशी नाणें. तशाच लोक-कथाहि. वेताळ-पंचविशी व विक्रम-बत्तीशी यांतील गोष्टी खेड्यापाड्यांच्या कोनाकोपऱ्यापर्यंत जाऊन पोंचलेल्या आहेत. पण इंग्रजांचे राज्य आलें व पाश्चात्य संस्कृतीचा स्पर्श घडला. त्यामुळे स्त्री-पुरुषांच्या पोशाखांत जसा फरक पडत गेला, तसाच साहित्यातहि पडला. लघुकथा, लघुनिबंध, भावगीत इत्यादि नव्यानव्या शाखा ललित वाङ्मयाला फुटूं लागल्या.

## कथा व कादंबरी

पूर्वींच्या कथा आणि आधुनिक लघुकथा यामध्ये चक्री पागोटे व टोपी याच्याइतके अतर आहे. हरिभाऊ आपटे किंवा शिवरामपत पराजपे यानीं दुष्काळासारख्या विषयावर कथा लिहिल्या आहेत आणि त्या कादबरीपेक्षा लहानहि आहेत. पण त्याना अर्वाचीन तत्राप्रमाणें 'लघुकथा' म्हणता येत नाहीं. लघुकथा म्हणजे छोटी कादबरी नव्हे. या दोन वाङय-प्रकाराची भिन्नता प्रा. फडके यानीं मोठ्या बहारीने वर्णिली आहे. 'लघुकथा लेखन–मंत्र आणि तत्र' या आपल्या ताज्या ग्रंथात ते म्हणतात, "कादबरीला घवघवीतपणा असू शकतो. उलट लघुकथा निमुळती असायला हवी. कादबरी म्हणजे एक भव्य प्रासाद असतो. लघुकथा काश्मीरमधल्या सफेता झाडासारखी किंवा सुरूच्या अथवा पोफळीच्या झाडासारखी सरळ उंच जाणारी असते. कादबरीला जाडपणा, डेरेदारपणा असतो, लघुकथेला तो नसतो. कादबरी आडव्या अगान वाढूं शकते. लघुकथा वाढून चालणार नाहीं. कादंबरीचा आघात एखाद्या भल्या-मोठ्या हातोड्याच्या आघातासारखा व्हायला हवा. लघुकथा एखाद्या तीक्ष्ण टोंकाच्या सुईप्रमाणे टोचायला हवी. एखाद्या टोलेजग इमारतीवर विजेचे दिवे लावल्यावर जी रोषणाई दिसते तिची उपमा कादबरीला साजेल. लघुकथेला उपमा द्यायची झाली तर लखकन् उजळून, क्वचित् काडकाड आवाज करून लुप्त होणाऱ्या विद्युल्लतेचीच शोभेल. एखाद्या गवयानं तासभर एखादी रागिणी गाऊन दाखवावी, आणि सहज बोलतां बोलता एखाद्या रागातली सुंदर तान घेऊन दाखवावी, यात जो फरक आहे; तोच कादबरी आणि लघुकथा यात आहे."

## लघुकथेचें स्वरूप

असे असलें तरी लघुकथा ही सामान्यतः लघु असतेच- तीनशे ते तीन हजारपर्यंत शब्दात ती आटपावी असा सकेत आहे. एवढ्या लहानशा क्षेत्रात कमींत कमी पात्रें घेऊन आणि कमींत कमी प्रसंग वापरून, ऐकणा

त्याच्या मनावर एकच एक संस्कार ठसठशीतपणें घडविणें हें आधुनिक लघुकथेचे उद्दिष्ट असतें. संस्काराचे एकत्व हाच लघुकथेचा आत्मा. अशा आधुनिक लघुकथाची परपरा मराठींत १९२० सालानंतर सुरू झाली. त्यापूर्वीं वि. सी. गुर्जर यासारखे लेखक 'मासिक मनोरजना 'मधून चटकदार लघुकथा लिहीत होते. गुर्जरानीं तर सुमारें पन्नास वर्षे असें लेखन करून सहाशेवर लघुकथा लिहिल्या. पण रेखीव रचना करून, पात्रें व प्रसग काटकसरीने वापरून, सूचक भाषाशैलीने, मनाचीं आदोलनें चित्रित करणाऱ्या लघुकया १९२० सालानंतरच मराठींत चमकू लागल्या. संध्यकाळचे वेळी आकाशांत एक एक चादणी येऊन लुकलुकू लागते आणि थोड्याच वेळात सारे आकाश चादण्यानी भरगच्च भरून जातें, तसा तेजस्वी विस्तार मराठी साहित्यात लघुकथाचा झाला. १९२० ते १९४० हीं वीस वर्षे 'लघुकथाचें युग' म्हणून गाजलीं. पूर्वीं मिशा-बरोबर मते व मताबरोबर कविता तरुणाना जशा येत असत, तशा या कालखंडात लघुकथा रचण्याचा छंद युवकामध्ये वाढत गेला. कोणत्याहि नवीन लेखकानें हातात लेखणी घेतली कीं, आपल्या साहित्य–सेवेचा प्रारंभ लघुकथेने करावा, अशी जणु रूढि पडत चालली. अशा लघुकथा-कारामध्ये फडके यांनीं आपले स्थान निर्माण केले आहे. त्याचे आतापर्यंत पंधरा कथा संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

प्रा. नारायण सीताराम फडके याचा जन्म ता. ४ ऑगस्ट १८९४ रोजीं झाला. नगर जिल्ह्यातील कर्जत या खेडेगावीं ते जन्मले. तरी दहाव्या वर्षापासून पुढील सारे शिक्षण पुण्यास झाले. वडील मामलेदार असल्यामुळे त्याना बरेच फिरावे लागे. त्यामुळे फडक्याचे प्राथमिक शिक्षण स्थिरपणे होऊ शकले नाहीं. १९०५ सालीं वडिलांची बदली पुण्यास झाली, आणि पुणे येथील न्यू इग्लिश स्कूलमध्ये मराठी चौथ्या यत्तेंत फडके दाखल झाले. इग्रजी तीन यत्ता वडिलानीं घरींच करून घेतल्या. त्यामुळे नूतन मराठी विद्यालयात ते एकदम इग्रजी चौथींत जाऊन बसले. १९१० सालीं मॅट्रिकचे प्रवेशद्वार त्यानीं ओलाडले. नंतर ते फर्गसन कॉलेजांत गेले.

## लेखनाची विद्या

विद्याभ्यास व क्रीडाविलास या कॉलेजच्या दोन्ही अंगाचा भरपूर लाभ फडक्यानीं घेतला. क्रिकेट व टेनिस खेळण्यांत ते पुढे असत. पत्ते खेळण्यात ते पटाईत होते. नाटकात भाग घेण्यास ते उत्सुक असत. या खेळाबरोबरच बौद्धिक विकासांकडेहि त्याचे लक्ष असे. सभेत सफाईदार भाषणे ते करीत. इंटरमध्ये असतानाच त्यानीं आपली पहिली गोष्ट लिहिली. त्या गुप्त पोलिसी गोष्टीचा मोबदला त्याना सोळा रुपये मिळाला. इतर वाचनहि त्यानीं पुष्कळ केले. १९१४ साली बी. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गात ते उत्तीर्ण झाले. त्यानतर १९१७ सालीं त्यानीं एम्. ए च्या परीक्षेतहि तसेच भरघोस यश मिळविले. तत्त्वज्ञान विषयाचीं विद्यापीठाचीं पारितोषिके त्यानीं पटकाविलीं. ही दुसरी पदवी त्यांच्या हातात पडण्यापूर्वींच 'प्राध्यापकी' त्याच्या गळ्यात पडली. १९१६ सालीं न्यू पूना कॉलेज निघाले. त्याबरोबर फडके तेथे गेले व तर्कशास्त्र शिकवू लागले. १९१८ सालीं मुंबई विद्यापीठाने २०० रुपयाचें बक्षिस लावले होते. दादाभाई नौरोजी यांचे चारित्र लिहिणारास ते मिळावयाचे होतें. फडक्यानीं महत्त्वाकाक्षा धरली आणि चारित्र लिहिले. त्याना तें बक्षिस मिळाले.

## संपादकी व प्राध्यापकी

१९१९ सालीं म. गाधींनीं असहकारितेचे रणशिंग फुंकलें. फडके यानीं प्राध्यापकाचा राजीनामा दिला. त्यानीं 'मराठा' या इग्रजी साप्ताहिकात सहसंपादकाचे काम केले. 'केसरीं'तहि ते हौसेने 'विविध विचार—तरंग' लिहीत. १९२० च्या जूनपर्यंत वृत्तपत्रीय सृष्टीमध्ये फडके वावरत होते. नंतर ते दिल्लीच्या एका खिश्चन कॉलेजमध्ये तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून गेले. तेथे त्याचे वास्तव्यहि होते एका खिश्चन कुटुबात. ही जागा हंगामी होती. एक वर्ष पुरें होताच ते परत पुण्यास आले. १९२२ च्या जूनमध्ये सिंध-हैद्राबादमधील कॉलेजात ते प्राध्यापक म्हणून गेले. तेथे ते सुमारें चार महिनेच राहिले. तेथून ते नागपूरच्या कॉलेजमध्ये १९२४ च्या

जूनमध्ये दाखल झाले. तीनचार महिन्यात तीहि नोकरी त्याना त्याच्या विशिष्ट मतामुळे सोडावी लागली. पुनः ते वृत्तसृष्टीच्या आश्रयास आले. १९२५ पासून सुमारें वर्ष दीडवर्ष ते मुंबई येथील एका इग्रजी पत्राचे संपादक होते. १९२६ च्या जूनपासून मात्र त्याची ही भ्रमती थाबली. त्यावेळीं ते कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजात प्राध्यापकाच्या खुर्चीवर जे जाऊन बसले, ते १९५१ सालीं सेवानिवृत्त होईपर्यंत.

## मान–सन्मान

१९३९ सालीं मिरज येथे भरलेल्या दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद त्याना देण्यात आलें. रत्नागिरी येथें १९४० सालीं भरलेल्या 'महाराष्ट्र साहित्य समेलना'चे अध्यक्षस्थानींहि त्याची निवड झाली. 'प्रतिभासाधन' व 'सुप्रजाजननशास्त्र' या त्याच्या ग्रथास प्रत्येकीं पाचशें रुपयाचे बक्षीस मिळाले.

मानसोपचार, मानस–मदिर, वाङमय–विहार इत्यादि विविध विषयावर मिळून त्यानीं शंभरावर ग्रथ लिहिले. त्यात कादबऱ्या ३३, प्रबध १९, कथासग्रह १५, नाटके ८, गुजगोष्टी ६, चरित्रे ६ व व्याख्याने ५ असून इंग्रजी पुस्तकें १२ आहेत.

## फडक्यांचे कला–गुण

फडके हे 'कादबरीकार' म्हणून जितके यशस्वी झाले, तितके लघुकथाकार म्हणून झाले नाहींत. मात्र 'नाटककार' म्हणून त्याना जितकें अपयश मिळाले, तितके काहीं कथाक्षेत्रात आले नाहीं. कारण नाटकापेक्षा लघुकथेची सरहद्द कादबरीच्या जवळ आहे. कथेच्या निवेदनाला योग्य अशी सफाईदार व लालित्यपूर्ण भाषा तर त्याच्यापुढे हात जोडून उभीच आहे. त्याचप्रमाणे निरनिराळ्या पात्रांना व प्रसगाना शोभेसे व स्वाभाविक संवाद घालण्यात त्याचा हात कोणीच धरूं शकत नाहीं. आणि मनोगाहन –शास्त्रात निष्णात असल्यामुळे, ते पात्राचा स्वभाव–परिपोष उत्कृष्ट करूं शकतात. परतु नाटकाप्रमाणेच लघुकथेतहि जो संयम व सघर्ष असावा लागतो, तो फडक्याच्या लेखणींत फारसा नाहीं. त्यामुळे त्याच्या लघुकथामध्ये लघुत्व येत नाहीं व संस्काराचे एकत्व साधत नाहीं. 'झक

मारतात एम. ए , पी एच. डी.' या नांवाची त्याची लघुकथा चोवीस पानं पसरलेली आहे, या नावाचा आतील विषयाशीं नावापुरतासुद्धा संबंध नाहीं आणि विनोद पिकविण्याचा जो प्रयत्न त्यात केलेला आहे, तोहि फारसा यशस्वी झालेला नाहीं. हास्यरस निर्माण करण्यासाठीं साध्या प्रसंगावर विनोदाचे खोगीर त्यानीं चढविले आहे. त्याचा एक नमुना म्हणजे—" मोरूच्या डोक्यात खाडकन् प्रकाश पडला! तीन पिळ्या हाडवेर संपण्याच्या तयारीन हाती चंची घेऊन सनातनी विठ्ठलराव का शरण आला होता त्याचा एकदम उलगडा झाला! गहू, तांदूळ, साखऱ्या इत्यादि भरपूर साहित्य काबीज करायच होत. युद्धसाहित्य बळकावण्यासाठीं हिटलर ज्याप्रमाण रशियाच्या युक्रेन प्रातात घुसला, त्याप्रमाण समेटाच्या भाषेन त्याच्या पोटात शिरून मिष्टान्नाच्या केवळ एका भोजनाच्या मोबदल्यात अडीचशे पान उठवता येतील इतक साहित्य लाटण्याच्या या लबाड विठू शेवड्याचा धूर्त डाव होता काय? आवळा देऊन कोहळा काढायचा इरादा आहे तर याचा? आल ध्यानात सार तुमच कपट, मिस्टर विठ्ठलराव शेवडे? पण घेवड्याच्या मोरूशीं गाठ आहे तुमची...... !"

## समाजवादाचे शिंतोडे

'चद्रा' या गोष्टींत गुन्हेगार जमातीच्या जीविताचें रुक्ष वर्णन आरंभींच्या दोन पानात आले आहे पुढील कथेबद्दल जिज्ञासा उत्पन्न करण्यास ते मुळींच पोषक नाहीं. त्याचप्रमाणे 'जागृताचे स्वप्न' या कथेत एका शिक्षकाचे व्याख्यान दिले आहे. 'राम आणि रहीम' या कथेत समाजवादी विचार माडला आहे. तो असा—" हिंदूचे खरे शत्रु मुसलमान नाहींत किंवा मुसलमानाचेहि खरे शत्रु हिंदु नाहींत. जगात दोनच जाती आहेत, काम करणारा मजूर आणि मजुराच्या मेहनतीवर गब्बर होणारा पैसेवाला. हिंदु कामगार आणि मुसलमान कामगार दोघानाहि हा पैसेवाला सारखाच रगडतो आहे." असाच अर्थ-प्रधान विचार, 'दादा पुरते डोळे उघडा!' या कथेतील दुर्गी सागते. 'दारूबंदी' या गोष्टीचेहि पालुपद 'वर्गभेद नाहींसा करा' हेंच आहे. पण समाजवादाच्या

तळमळीनें या कथाचे अणु-रेणु भरून गेलेले नाहींत. मुलीला मिठाई देतां येत नाहीं, म्हणून चंद्रा क्रांतीच्या सैन्यात दाखल झाली, असा ओढून-ताणून आणलेला समाजवाद कथेला चिकटविल्यासारखा दिसतो.

## व्याख्यानाची धोंड

कादंबरींत काय किंवा कथेत काय, शुष्क चर्चा किंवा नीरस व्याख्यानें नसावींत. हा नियम काटेकोरपणें कोणी पाळत असतील तर फडकेच. पण आश्चर्य हे कीं, कादबरीच्या राज्यात असताना असे कायदे कसोशीनें पाळणारे फडके कथेच्या क्षेत्रात शिरताच मात्र कायदेभग करू लागतात ! वधूपरीक्षेच्या अपमानकारक रूढींचें चित्रण करणाऱ्या त्याच्या कथेतील नायिका त्रिवेणी, जणु काहीं महिला परिषदेत उभी असल्याप्रमाणे, लाब-लचक व्याख्यान झोडते आणि विचारते, “ बापानीं मुली दाखवाव्या, चागल्या शिकल्यासवरलेल्यानीं त्या पहाव्या आणि पदवीधर मुलींनीं या गलिच्छ प्रकारापुढ मान वाकवावी अस चालल आहे म्हणून तुमचे डोळे उघडत नाहींत होय ? मुलींच्या मनाला अधिक सतोषाची आणि सन्मानाची वाटेल अशी लग्न जुळविण्याची पद्धति रूढ करायला पाहिजे हे तुमच्या कधीं लक्षातच येणार नाही, होय ? ”

## चित्तवेधक प्रारंभ

पाल्हाळिक वर्णन किंवा अरसिक विवेचन हे दोष वगळले, तर फड-क्याची लघुकथा नाकींडोळीं नीटस आहे आणि तिचे इतर अवयवहि सुंदर आहेत यात शका नाहीं. लघुकथेचा प्रारंभ चित्तवेधक असणे जितके आवश्यक, तितकाच तिचा शेवट विस्मयकारक असणे अगत्याचें असतें. पहिले वाक्यच असे चटकदार पाहिजे कीं, वाचकाने पुढे पुढें वाचीतच जावे. आणि शेवटचे वाक्य असे असले पाहिजे कीं, एखाद्या झोपेत चालणाऱ्या माणसाला धक्का लागून त्याने खाड्दिशीं जागे व्हावे, त्याप्रमाणें भावनेच्या तंद्रींत गुंगलेल्या वाचकाला खडबडून जाग यावी आणि त्याला कांहींतरी चुटपुट लागावी. असा आकर्षक आरंभ आणि अखेरीस

कलात्मक कलाटणी ही दोन्ही साधण्यांत फडके पुष्कळ वेळां यशस्वी होतात. " प्लॅटफॉर्मच्या फरशीवर टाप टाप असा बुटाचा आवाज करीत करीत धिम्या लयींत येरझारा घालणाऱ्या त्या उंच मजबूत गृहस्थाकडे दृष्टि जाताच कुणाचीहि जिज्ञासा जागृत होण्यासारखी होती. " असे 'माझा देश' या कथेचे आरंभींचे वाक्य वाचले कीं, कोणाची जिज्ञासा जागृत होणार नाहीं ? तसाच 'दारुबंदी' या गोष्टीचा आरंभहि उत्कंठा उत्पन्न करणारा आहे. तो असा, " कुणी तरी मागून येऊन माझ्या पाठीवर इतक्या जोरानं थाप मारली, कीं हातातली छत्री मीं पुढे टेकली नसती तर मी पडलोच असतो.

मी रागानं वळून पाहिलं अन् पाहतो तो जालंदी स्वारी माझ्यापुढें उभी !

माझा सारा राग एकदम मावळला अन् हस्तांदोलनासाठीं हात पुढें करीत मीं हसून विचारलं, "

## एकजिनसी वातावरण

एकदर लघुकथेमध्ये एकच एक वातावरण निर्माण करणेहि अगत्याचे असते. 'माझा देश' या कथेत युद्धकालीन वातावरण सर्वत्र भरून राहिले आहे सहज भेटलेला माणूसहि बोलून जातो– " आमच्या बायकापोराना पाऊण शेर साखऱ्यासाठीं आणि अर्धी बाटली रॉकेलसाठीं तास तास रांग धरावी लागते. पाहुण्याला मलिदा आणि धन्याला धत्तुरा असा न्याय चालला आहे जगात आजकाल !" तसेच स्टेशनवरच्या उपाहारगृहात कथा–नायक गेला असताना तेथील पोऱ्याच्या तोंडूनहि जे शब्द बाहेर पडतात, ते या युद्धकालीन वातावरणाला पोषक असेच असतात. तो पोऱ्या व नायक याचा संवाद असा–" मान हलवून नोकर म्हणाला, 'आता केकस कुठल्या साहेब ? हा कंट्रोल सुरू झालाय ना ? मुंबईच्या मोठमोठ्या युरोपियन हॉटेलातसुद्धा आता केक कसल्या मिळतात माहीत आहे ? बाजरीच्या !'

'बरं टोस्ट तरी करून देतोस काय पोटभर ?'

'दोन तुकडे देतो साहेब, तेच पोटभर म्हणा. फार खराब दिवस आले साहेब...''

## कल्पनेची ठिणगी

एक प्रसग किवा एक कल्पनाहि लघुकथेचे भाडवल होऊं शकतें. 'धद्यान शिपी पण मनान?' या कथेत फडक्यानीं एकच कल्पना फुलविली आहे. स्वतत्र धदा करणारा एक शिंपी आरभीं कलादृष्टीने काम करीत असतो. पण कर्ज फेडण्यासाठी तो लष्करी कत्राटदाराकडे नोकरीस राहतो. त्यामुळे त्याच्या वृत्तीतील कला मरते आणि त्याचे जीवन यात्रिक होते. ही क्राति फडक्यानीं कुशलतेने रेखाटली आहे. त्या शिंप्याचे प्रारभीचे स्वतत्र जीवन कसे होते? तर--"बाबूराव म्हणजे कापडातून सुईदोरा घालणारा साधा शिपी नव्हता. आपल्या हातून होणार काम पहिल्या दर्जाच असाव अशी त्याला हौस होती. कपड्याच्या नव्या नव्या तऱ्हा शिकण्यासाठी तो नेहमी उत्सुक असे. नुसत कॅटलॉग पाहून आपली कल्पकता लढवून एखादा कपडा मनपसत शिवून झाला कीं त्याला मोठा हर्ष होई. स्वच्छतेची, टापटिपीची आणि सौंदर्याची त्याला जन्मसिद्ध आवड होती. एखाद्या ततुकारान आपल वाद्य ठेवाव त्याप्रमाणे तो आपल शिवण्याच यत्र कमालीच स्वच्छ ठेवीत असे. त्या यत्रावर त्याची केवढी माया! तो शिपी नव्हे, कलावत होता!"

लष्करी कत्राटदाराकडे नोकर बनल्यानतर आपले जीवन कसे यात्रिक बनले याचे वर्णन करताना तो शिपी म्हणतो, "रोज तीन रुपये मिळविणार यत्र झालो होतो मीं. कर्ज फेडण्यासाठीं माझी सारी कलाकुसर गाडून घाण्याच्या बैलाप्रमाणे यत्रावर पाय मारीत होतो मी आठ आठ तास! कुणाच्या गळ्याच, छातीच, हातापायाच कसलच माप घ्यायच नसे. हजारो माणसाची कळसूत्री बाहुलीं लढाईवर जायचीं असत! साऱ्याचे हात, पाय, गर्दन एकाच मापाची! घे कापड, कर कात्रीनं तुकडे, अन् चालू दे पाय मारणं!"

## बाल-मनाची चित्रें

बालकाचे मानसशास्त्र फडके उत्तम जाणतात. त्याचा उपयोग मराठीत तरी त्याच्याइतक्या कौशल्याने दुसरा कोणताच ललित-लेखक करू शकत नाहीं. ' दौलत ' कादंबरींतील छोट्या अकल्पितेचे बोबडे बोल व अल्लड कृति कोण विसरू शकेल? तसेच ' कोडमारा ' या कथेतील नानूचे स्वभावचित्रहि चित्ताला चटका लावणारे आहे. 'लहान मुलें म्हणजे देवाचे लाडके दूत, त्यांचे विचार सुतासारखे सरळ व भावना स्फटिका-प्रमाणे निर्मळ ' असे मानण्याचा भाबडेपणा फडके करीत नाहींत. बाल-काच्या आवडीनिवडी, हर्षखेद, मानअपमान, इत्यादींचे स्वरूप ते यथार्थ-तेने जाणतात आणि त्यांचीं कारणेहि अचूकपणे ओळखतात.

चित्रपटासंबधीं नानूला काय वाटत होते, हे सांगताना फडके लिहितात, " त्याच्या तात्यांनी त्याला पांचसहा चित्रपट दाखविले होते. आणि ते सगळे त्याला आवडले होते. त्यातल्या सर्व गोष्टी त्यानं स्मरणांत ठेवल्या होत्या. अमुक एक चित्रपट वाईट आहे असं मोठीं माणसं कां म्हणतात हेंच त्याला कळत नसे. त्याचा स्वतःचा हिशेब असा होता कीं, चित्रपट म्हटला कीं चांगला असलाच पाहिजे. पैसे वाचवायचे असले आणि लहान मुलांना पाठवायचं नसलं म्हणजे चित्रपटाच्या वाईटपणाची सबब मोठीं माणसं निर्माण करतात. तात्यांच्याइतकं मोठं झाल्यावर ज्या अनेक गोष्टी तो करणार होता त्यातला एक बेत असा होता कीं, प्रत्येक चित्र-पटाला आपण तर जायचंच पण साऱ्या मुलांनासुद्धा धाडायचं. " मुलांची महत्त्वाकांक्षा अशीच असते.

नानू शेजारच्या घरीं खेळावयास जात असे. तेथील बिऱ्हाडकरू जागा सोडून गेले होते. त्यांच्या जागीं बरेच दिवस दुसरें कोणी आलें नव्हते. तेव्हा नानूची खेळण्याची कुचंबणा होऊं लागली. म्हणून त्याने वडिलांना एक फक्कड तोड सुचविली व्यावहारिक अडचणींचा विचार तो कशाला करतो?

' नानू वडिलांना म्हणाला, ' तात्या, परांजपे रहात होते ती शेजारची बंगली तशीच मोकळी पडली आहे आपण घेऊं या ती! अं?'

पण त्यांचे तात्या नुसते हंसले आणि त्याच्या आईनं त्याला विचारलं, ' अरे नानू, वेडा का तू ? अरे ४५ रुपये भाडं कुठून आणायच ? ' तें ऐकून नानू अगदीं खजील झाला. अवघे ४५ रुपये आणणं इतकं कठीण असूं शकत हे त्याला काहीं केल्या खर वाटेना. त्याला वाटल होत, आपण सुचविल्याबरोबर तात्या म्हणतील, ' अस म्हणतोस ? ठीक आहे. जाऊ त्या शेजारच्या बंगलींत रहायला. ' तस उत्तर त्याला मिळाल नाहीं म्हणून त्याचा मोठा हिरमोड झाला. " बालाचे जग किती साधे–सरळ !

अखेर त्या रिकाम्या जागेत एक बिऱ्हाड आले. नुसते बिऱ्हाडच नव्हे, तर त्याच्याशीं खेळण्याजोगीं मीरा नावाची मुलगीहि पण आली. आणि नुसती मुलगीच नव्हे, तर तिचे वडीलहि मोठे गोड बोलणारे, ममताळू स्वभावाचे, मुलाच्या खेळात भाग घेणारे आणि शाळेतील अवघड विषय सोपे करून शिकविणारे. पण ते नट होते-दारुडे होते– दुर्गुणी होते. त्यामुळे नानूला त्याच्या घरीं जाण्यास त्याच्या वडिलानीं बदी केली. तरी तो जाई. तेव्हा वडिलानीं त्याला एकदा चागले चापले. त्यावेळीं नानूची स्थिति काय झाली, हे एखाद्या शिल्पकाराप्रमाणे फड· क्यानीं उभे केले आहे. नानूचे शब्दचित्र त्यानीं मोजक्या शब्दानीं पुढील-प्रमाणे रेखाटले आहे, " त्याच्या बोलण्याच्या तऱ्हेचा नानूला फार राग आला. तोंड गच्च आवळून धरून आणि भुवयाना आठी घालून भिंतीला दाबून पाठ लावून तो अगदीं गप्प उभा राहिला. "

## बालकाची उत्कंठा

तसेच, "तुरुंगातून सुटका" या कथेतहि बाल–मनाचे चित्रण फडके यानीं उत्तम केले आहे. बारा वर्षांचा रघुनाथ आपल्या भावाची किती उत्कठेने स्टेशनवर वाट पाहतो याचे वर्णन त्यानीं चार पाने केले आहे. ते इतकें हुबेहूब आहे की, वाचकाच्या डोळ्यापुढे फलाटावर इकडे तिकडे वेड्या-सारखा हिंडणारा रघुनाथ मूर्तिमत उभा राहतो. तुरुंगातून सुटलेला आपला दादा गाडींतून उतरला नाहीं पण गाडी मात्र पुढे निघून गेली, याचें वर्णन लेखकानें किती सूक्ष्मतेने केले आहे पहा.—"स्टेशनवरचा पोर्टर

रुळाचा एक तुकडा टांगलेला होता त्याच्यावर टोले मारून घंटा देई, गाडीची शिटी वाजे, आगगाडीचा भोंगा होई आणि डब्यांचीं चाकें व जोडसाखळ्या यांचा विचित्र आवाज होऊन, उदीर खाल्ल्याने जडावलेल्या एखाद्या अजस्र सर्पाप्रमाणें, गाडी चालू होई. तिच्यातून निघालेल्या धुराच्या धादोऱ्या कांहीं वेळ तिन्हीसांजाच्या त्या धूसर आकाशांत फड-फडलेल्या अस्पष्ट दिसत, आणि कांहीं वेळाने गाडी वळण घेऊन दिसेनाशी होई. मग छोटा रघुनाथ सुस्कारा टाकून परत फिरे."

'जगांतले पहिले पाऊल' या लघुकथेमध्येहि पांच वर्षांच्या एका बालकाची मनोवृत्ति चित्रित करण्यांत आली आहे. मावशीचा लळा लागलेला आनंद जेव्हां आपल्या श्रीमंत बापाच्या घरीं जातो, तेव्हां तेथील थाटमाट पाहून तो गडबडून जातो. त्या श्रीमंतींत त्याचें मन कांहीं रमत नाहीं. उलट कारखान्यांतील कामगार वडिलांच्याविरुद्ध जे जे बोलतात, ते ऐकून आनंद कष्टी व कुढा होतो. "आपल्या हृदयांतील कसली तरी नाजूक भावना चिरडली जात आहे" असें त्याला वाटूं लागलें. हें सारें मनोविश्लेषण फडक्यांनीं नाजूक हातांनीं केलेलें आहे.

## एक नमुनेदार कथा

फडक्यांची कथा-सृष्टि सदाफुली व चिरतरुण आहे. नाटक, सिनेमा व कॉलेज यांतील प्रणय-लीलांचेच झंकार त्यांच्या बहुतेक कथांतून ऐकूं येतात. त्यांच्या यशाचें शिखर म्हणजे एकाद्या निष्पाप बालाच्या किंवा अभागी स्त्रीच्या मनाचे पदरामागून पदर उलगडून ते व्यवस्थितपणें मांडून दाखविणें हें होय. 'मोहोर' ही त्यांची अलीकडील कथा या दृष्टीनें अभ्यसनीय आहे. वत्सल पित्याच्या रागाची, संभ्रमाची व शेवटीं प्रेमाची अवस्था त्या कथेंत किती नाजूक कलमानें रंगविली आहे!

लघुकथेचा आरंभ कसा करावा, तिचा शेवट कसा साधावा, त्या दोहोंची सांखळी जोडणारें वातावरण कसें निर्माण करावें, आणि संवाद, वर्णन, स्वभाव-परिपोष, भाषाशैली, इत्यादि सर्व अंगोपांगांतून एकच एक भावना कशी खेळवावी, म्हणजे त्या सर्वांचा संकलित असा एकच एक

परिणाम घडून लघुकथेचे सर्वांगसुदर पुष्प कसे फुलते, याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे फडक्याची ' वत्सला ! ' ही कथा. या कथेत फक्त दोनच पात्रे आहेत.—विश्वनाथ व वत्सला. त्यांपैकीं एकट्या वत्सलेचीच मनःस्थिति सर्व कथेत ओतप्रोत भरून राहिली आहे. वत्सला कुरूप पण तिचा कठ मधुर आणि विश्वनाथ देखणा पण डोळ्यानीं आधळा. या दोघाची आकस्मिक भेट आगगाडीच्या डब्यात होते.

' कामाच काय होत, ते कळवीन मी तुम्हाला ' असे वत्सला आपल्या वडिलाना आरभींच म्हणते, त्यामुळे ' हे काम कोणते ? ' अशी जिज्ञासा वाचकाच्या मनात उत्पन्न होते. ' सृष्टीच्या मुखमंडलावरील रम्य वनश्रीचे' शब्दचित्र पाचसात वाक्यात काढल्यानतर ' पण सुखाचा अन् आनंदाचा दसरा सर्वांनाच लाभणार होता काय ? ' असा प्रश्न करून लेखकाने वाचकाच्या जिज्ञासेची तार अधिकच ताणली आहे. आगगाडीत वत्सलेला त्या सुदर तरुणाचे डोळे एकसारखे मिटलेले दिसले. त्यामुळेहि तिची—आणि तिच्याबरोबर वाचकाचीहि—जिज्ञासा सहजच वाढते. आणि मग तिला कळून येते कीं, तो आधळा आहे. पण तो एका ग्रामोफोन कंपनीचा मालक असतो. त्याने वत्सलेचीं गाणीं ध्वनिमुद्रित करविलीं. पुढे त्याच्या आजारीपणात तिने त्याची शुश्रूषा केली. अखेर त्याने तिच्याशीं लग्न करण्याची गोष्ट काढली. वत्सलेनें आपल्या कुरूपतेमुळे नकार दिला. पण ' अतःकरणातील भावनाचे सौदर्य ' त्याला महत्त्वाचे वाटले आणि त्या दोघाचे जीवन एकजीव झाले. हें सारे कथा-सूत्र भावनेचे पदर उलटसुलट गुंफणारे व जिज्ञासा वाढविणारेच आहे.

## भाषेचा सहजपणा

कथेची भाषा किती सोपी व सहज असावी, याचाहि नमुना ' वत्सला ' या कथेत पहावयास सापडतो. पुढील चारच वाक्यें पहा. " बोलता बोलता तिच्या भावना अनावर झाल्या आणि ती रडू लागली. तिला वाटल, झाल, आटपल सारं ! भ्रम संपला ! सुखहि संपल ! आता विश्वनाथाला आपला स्पर्शसुद्धा नकोसा वाटेल."

सहज सवाद पात्राच्या तोंडी घालण्यांत फडक्याचा अगदीं हातखंडा आहे. ' वत्सला ' या गोष्टींत आधळ्या विश्वनाथाशी झालेला तिचा सवाद किती स्वाभाविक व विनोदपूर्ण आहे.

ती म्हणाली, " पुण्याला. आपण ? "

" मी मुंबईला जाणार आहें."

" आपल्याबरोबर तर कुणीं दिसत नाहीं.—"

" नेहमीं कस कोण बरोबर मिळेल ? मिरजेला एका स्नेह्यानीं गाडींत बसवून दिल. आता पुण्याच्या स्टेशनवर एक स्नेही येतील, ते मला मुबईच्या गाडीत बसवून देतील. मग मुबईच्या स्टेशनवर उतरून घ्यायला कुणी तरी येईलच."

" पण वाटेत मदत नाहीं लागत ? "

" लागते. पण बहुधा ती मिळते. आताच पहा कशी मिळाली ! ' अस म्हणून तो हसला.

भाषेच्या कृत्रिमतेपासून फडके अगदीं अलिप्त आहेत. कोल्हटकर—गडकरी—खाडेकर याच्या अगदीं दुसऱ्या टोकाला ते उभे असतात. शब्द-लीला त्याना वावड्या वाटतात. श्लेष, कोटी, अनुप्रास,—त्याच्या लेखनात सहसा आढळत नाहींत. अपवाद म्हणून, ' लक्ष्मीपूजन ' ( लक्ष्मीचे किवा लक्ष्मीने केलेलें, ), ' भाल्याची ( भालचद्राची ) शिकार, ' ' निरोगी ( ज्याकडे रोगी येत नाहींत असा ) डॉक्टर ' असें शब्दाचे खेळ तुरळक आढळतात. ' शिंप्याचा धंदा शिवायचा असून त्याच्या मनाला हा उद्वेग शिवत नाहीं. ' किंवा त्रिवार ( अर्थात् कापड मोजण्याचाच वार ) सत्य होय. ' असें श्लेष तर विरळाच ! प्रारभींच्या कथातच ते थोडेफार सापडतात.

वर्णन—शैलींत फडके याचा हात कोण धरील ? नुसती फुलाची वेणी; पण तिचे स्तवन तें किती मिष्टास शब्दानीं करतात पहा—" वेणींतील एकेक मोगऱ्याची कळी अशी टपोरी होती ! छे ! असा बटमोगरा कधीं कोणी पाहिला नसेल ! एकेक कळी म्हणजे शुभ्र सौंदर्याचा जणु बुंदच होता ! आणि त्या कळ्याची गुफा करणारी रंगीत लोकर आणि

चमचमणारी कलाबतू इतक्या बेतानें मधून मधून डोकावत होती कीं, जणुं त्या कोंवळ्या कलिकाना सावरण्यापुरतेंच आपल्याला पुढे झालें पाहिजे हें तिला कळत होते ! आणि वेण्याची आजची मुरडहि कांहीं निराळीच होती. एकेक वेणी अशी गेंदेबाज आणि लाडकी दिसत होती कीं, तिच्यापुढे मोत्याचे सर फिके पडावे आणि हिऱ्यानींहि गर्वगलित होऊन श्वास टाकावा ! " अशीं सहज-सुंदर व कथा-पोषक वर्णनें फडके लीलेने करतात.

## विनोदासाठीं कृत्रिमता

मात्र कथानकाच्या रचनेत फडके पुष्कळ वेळा कृत्रिमपणा आणतात. ' पुरुषस्य भाग्य ' किंवा ' उपाशी प्रेम ' अशा लघुकथामध्ये असंभाव्य प्रकार दडपून विनोद निर्मिण्याचा प्रयत्न फडक्यानी केला आहे. पण तो विनोद ' ठकसेनाच्या गोष्टी 'सारखा उथळ वाटतो. वर्तमानपत्राच्या कचेरींतील अनंतासारखा धास्तावलेला जीव सिनेमाचा नट होतो हें ' अरबी गोष्टी ' इतकेंच ' सुरस व चमत्कारिक ' आहे. तीच स्थिति शांताच्या बंगल्यापुढे प्रेमासाठीं उपास करणाऱ्या भावड्याची. बंगल्याच्या बगुताईने, प्रतिउपास करून त्याला पलायन करावयास लावले ही कदाचित् अद्भुत कथा ठरेल—लघुकथा नव्हे. मात्र या कथेतील विनोद व उपरोध खुमासदार व धारदार आहे भाषाशैली व अतिशयोक्ति या दोन्ही दृष्टींनीं नमुनेदार ठरणारा विनोद पुढील चार ओळीतहि पहावयास मिळतो.

" अशीसुद्धा गप्प उठली, की प्रेमासाठीं प्राणान्तिक उपोषण करणाऱ्या या असामान्य तरुणाच अभिनंदन करणारी तार ड्यूक ऑफ विंडसरकडून आली असून त्या तारेत लिहिलं होत, ' शाबास पठ्या ! माझ्याहि पुढ तूं गेलास ! मी प्रेमासाठीं सिंहासन सोडल, पण तू प्राणसुद्धा सोडायला तयार आहेस. मी डोक्यावरची टोपी काढून तुला अभिवादन करतो ! "

या कथेचा शेवटहि एकदर कथानकाला साजेसा विनोदपूर्ण आहे. तो असा—" भावड्या पुनः त्या कॉलेजात परत आला नाहीं !

कोणी म्हणे तो कराचीच्या कॉलेजात गेला. कुणी म्हणत, कीं त्यानं कलकत्त्यास उपासाला चालणाऱ्या पदार्थांचं दुकान काढलं आहे. अन् एकदा तर गप्प उठली कीं, आपल्या एकंदर उपाशी प्रेम-प्रकरणाचा चित्रपट करून द्यायच्या कराराने तो थेट हॉलिवुडला जायच्या खटपटींत आहे !"

## नवें दर्शन

दिवाळी म्हणजे लघुकथाची गिहस्थ पर्वणी. नियतकालिकाच्या विशेष-अंकासाठीं दहादहा, वीसवीस लघुकथाच्या लाह्या भाजून देण्याची पाळी लेखकावर येते. अर्थात् त्यात गणगच्च फार असतात. पण फडक्याची लेखणी विशिष्ट पातळीच्या खालीं कधींच उतरत नाहीं. हापूसचा आंबा लहानमोठा केवढाहि असो, त्याचा विशिष्ट स्वाद व चव त्याला असाव-याचीच, तोच थाट फडक्याच्या लघुकथेचा. काहीं काही कथा तर अशा प्रासंगिक असूनहि सुरेख उतरल्या आहेत. 'पहिली भाऊबीज' हें एक उदाहरण सागण्यासारखे आहे. चित्रपट कपनीचा मालक चद्रकात हा तरुण व श्रीमत होता. पण त्याला सख्खी किंवा मानलेली बहीण कोणीच नव्हती. त्याच्या हृदयाला बहिणीच्या प्रेमाची ओढ लावण्यासाठीं लेखकाने कथेच्या आरभीच दिनूला आणले आहे. तो भाऊबीजेसाठी बहिणीकडे जाण्यास आतुर आहे. मालकाने दिवाळींतहि कपनीचे काम चालू ठेवले होते, म्हणून तो चद्रकाताकडे रजा मागावयास आला—आणि 'रजा नाही' म्हणताच त्याने राजिनामा पुढे केला—इतकी त्याला बहिणीच्या भेटीची ओढ ! प्रेमाच्या या नव्या पैलूचे दर्शन चद्रकाताना घडलें. त्यानतर आगगाडींत त्याना एक तरुणी भेटली. तिच्या घरीं दारिद्र्य होतें आणि तिच्या बहिणीचे ऑपरेशन करावयाचे होते. त्या कामीं चद्रकातानीं तिला गुप्तपणाने पण सहानुभूतीने इतकी मदत केली कीं, ती त्याना भाऊबीजेच्या दिवशीं आपल्या घरीं ओवाळावयास घेऊन गेली. हृदयातील भावनेचा एक नवा साक्षात्कार, जगातील अनुभवाचें एक नवें दर्शन, मनातील गुंतागुंतीचा एक नवा उलगडा—हें उत्तम लघुकथेचे जन्म-कार्य फडक्याच्या ह्या लघुकथेनें साधलें आहे.

## प्रचाराचें शीड

एखाद्या तीक्ष्ण अनुभवाचे ओझरते दर्शन लघुकथेंतून झाले तरी पुरें होतें—त्यातून बोध किंवा प्रचार झालाच पाहिजे असे नाही—आणि फडके तर त्या वाटेला सहसा जाणारे नव्हेत. परतु काही काहीं कथात, त्याच्या कलादृष्टीचा पहारा चुकवून, थोडेफार सुविचार घुसले आहेत. ' चोर व साळसूद ' या लघुकथेत ढोंगी सदानदमहाराज आपल्या शिष्याकडून पैसे लुबाडतात, पिऱ्या माग त्याच्या पैशावर दरोडा घालतो आणि खडेराव वकील पिऱ्या मागाचे पैसे गडप करतो—अशी समाजातील गुप्त चोऱ्याची साखळी या कथेत फडक्यानीं दाखविली आहे. शेवटी महाराजाना हजार रुपयाची दक्षणा देऊन बसलेले वकील म्हणतात, " बराय म्हणायचा हा साधूचा धदा. आम्ही रात्रदिवस मेदू शिणवून, अन् कोर्टांत हाडाचीं काड करून पैसा मिळवावा, अन् या बेट्या महाराजानीं सहजा-सहजी हजार रुपयाच उदक आमच्याकडून हातावर घ्याव ! हः ! काय न्याय आहे पहा ! "

तसेच ' उलटे शाकुतल ' या कथेत पति-पत्नींचे कर्तव्य फडके यानीं कुशलतेने सागितले आहे. दुष्यंतरावाना गरिबी आली म्हणून त्याना सोडून निघालेल्या शकुतलाबाईना आगगाडींत गरीब पण प्रेमळ जोडप्याचे दृश्य दिसते, आणि माहेरीं गेल्यावरहि त्याना विविध अनुभवामुळे पटते, " गरिबीची लाज कसली ? गरिबींतच पति-पत्नींनीं एकमेकास आधार द्यावयास हवा. "

लघुकथेत स्वभावदर्शन घडविणे एकपट कौशल्याचे असले, तर स्वभाव-परिवर्तन दाखविणे दसपट चातुर्याचे आहे. असे चातुर्य फडक्यानीं ' सुप्रभात ' या कथेत दाखविले आहे. " ते विलक्षण ओरडणें ऐकून ओबायदुल्ला एकदम दचकून जागे झाले. " असा या कथेचा प्रारभच मुळीं जिज्ञासा उत्पन्न करणारा आहे. ते ओरडणे का होते याची माहिती चार पाने दिल्यानंतर मग मियासाहेबाचा परिचय लेखकाने करून दिला आहे. त्याचा स्वभाव शूर व उदार दाखविला आहे. पण त्यावर धर्म-

द्वेषाची काजळी चढलेली आहे. ती झाडून टाकणारा प्रसंग या कथेत रंगविला आहे. स्वप्नात पैगंबरानें इशारा देणें व नंतर आगगाडींत सोजिराच्या मारामारींत हिंदु साधूने आपल्या रक्षणासाठीं पुढे येणें, या धक्क्यामुळे त्याचा धर्मद्वेष कोलमडून पडतो, आणि बकरीदच्या दिवशीं गाई मारण्यासाठीं त्यानीं जी पाच हजार रुपयाची देणगी दिलेली होतीं, ती ते रद्द करतात. कथेची मांडणी व तिच्याद्वारे केलेला प्रचार या दोन्ही गोष्टी फडक्यांना यात चांगल्या साधल्या आहेत. ही लघुकथा त्यानीं १९२६ सालीं लिहिलेली आहे. पुढे पुढे त्याच्या कलेने लोक-जागृतीचे बंधन पार झुगारून दिले आणि त्यामुळ शीड मोडलेल्या नावेप्रमाणे त्याची कला हवे तसे झोके खाते.

## स्वभावाचीं प्रतिबिंबें

स्वभाव–परिवर्तनाच्या दृष्टीने ‘ शाता ’ ही कथाहि नमुनेदार आहे. तिचा निम्मा भाग तिच्या रोजनिशींतील उताऱ्यानीं व्यापला आहे. त्यामुळे निवेदन–पद्धतींत वैचित्र्य निर्माण झाले आहे. शतनूच्या प्रशंसेमुळे शाताच्या मनाची कळी कशी खुलली ते ऐका, “ त्याचे ते शब्द ऐकून शाताला सुखातिशयाने गुदमल्यासारखे झाले. प्रशंसेचा अनुभव तिच्या मनाला पूर्वीं कधीं मिळालाच नव्हता. आणि या घरात मात्र तिला तिच्या प्रशंसेखेरीज काहीं ऐकूच येत नव्हते. ओसाड रानात राहिलेल्या माणसाने प्राजक्ताच्या झाडाखालीं योगायोगाने येऊन बसावे, आणि जोराच्या वाऱ्याने झाड गदगदा हालल्यामुळे त्याच्या अंगावर सुकुमार, सुगंधी फुलाचा सारखा वर्षाव व्हावा, तशी तिची अवस्था झाली होती ! ”

‘ जसे मन, तसें जन ’ या न्यायानें संतुष्ट शाताला आता सारे जगच निराळे भासू लागले. स्वतःच्या बदलाविषयीं ती लिहिते, “ या पंधरा दिवसात मला वाटत मी सारखी बदलत होतें, आणि ज्या क्षणीं त्यानीं माझा हात धरला त्या क्षणीं मला वाटत, तो बदल अगदीं परिपूर्ण झाला. मी बुद्धीन जड आहे, अंतःकरणाने रुक्ष आहे, स्वभावान कुढी आहें अन् रूपानं अगदीं सामान्य आहें, अस मला पूर्वीं वाटत असे. हें वाटणं

परिस्थितीन माझ्या मनांत अगदीं कायमचं रुजायच्या बेताला आलं होतं. पण मला आता कळल कीं, त्या माझ्या वाटण्यातली एकसुद्धा गोष्ट खरी नाहीं ! माझी मीच ती खरी मानून घेतली होती ! मी हुषार आहे, रसिक आहे, मनमोकळी आहें अन् सुंदरसुद्धा आहे ! ”

## जीविताशीं समरसता

१९२६ सालींच लिहिलेल्या ‘ वैभव ’ या कथेत फडक्यानी श्रीमतीपेक्षा माणुसकीचे महत्त्व अधिक दाखविले आहे. “ प्रफुल्लता, आत्मविश्वास इत्यादि भावनाचे सूक्ष्म तेज गिरिजाबाईच्या चेहऱ्यावर त्याक्षणी दिसत होते. ते कितीही पाहिले तरी त्याना पुरेसे वाटेना. एखाद्या जवाहिऱ्याच्या सग्रहीचा हिरा चारचौघाच्या दृष्टीस पडला, आणि त्याच्या पाण्याची प्रशसा सर्वांनीं केली म्हणजे जसे त्या जवाहिऱ्याला वाटते तसे नानास त्या वेळीं वाटलें. ” अशी एखादीच साधी पण समर्पक उपमा देऊन सारा प्रसग उजळून टाकण्याची हातोटी श्री. फडके याची आहे. ‘ मनोहर स्वप्न ’ या कथेतील चित्रकार नायकाचा राग नाहींसा झाला हे सागतांना फडके लिहितात, “ स्वस्त रगाप्रमाणे त्याच्या मनातला राग एकदम उडून गेला. ” लेखनासाठीं कागदाला पुनः पुनः टाक लावणाऱ्या तरुणाला काय लिहावें हे सुचत नाहीं, आणि त्यामुळे तो पुनः पुनः थाबतो, हे शब्दचित्र काढताना फडके यानीं असा दृष्टात दिला आहे कीं, “ सोसाट्याचा वारा सुटावा आणि माणसाने काडी ओढून पेटवावी, पण ती दिव्याच्या वातीला लावीपर्यंत पुनःपुन विझावी तसेच त्याचे होत होते. ”

हा तरुण लेखक मुंबईतला आहे, पण मुबईत घडणाऱ्या घडामोडीवर काय लिहावे हे त्याला कळत नाहीं, म्हणून तो आपल्या कल्पनेतून एक ऐतिहासिक कथा निर्माण करतो. तिच्यात सहजच अनेक चुका होतात, व तो फजीत पावतो. तशीच स्थिति पन्हाळगडाजवळील शाळा-मास्तराची होते. त्यांना आपल्या डोळ्यासमोरील ऐतिहासिक वैभव ओळखताच येत नाहीं, आणि म्हणून ते मुंबईतील घटनेवर एक कल्पित कथा लिहितात, त्यात त्याचें साहजिकच हसें होतें. “ धोबी तलावाच्या नीलवर्ण पाण्याचें ”

त्याचे कल्पित वर्णन चेष्टेचा विषय बनते. या " दोन गोष्टींची कथा " फडके यानीं सुदर गुंफिली आहे, आणि तिच्या शेवटीं इसापनीतींतल्या–प्रमाणे ' तात्पर्य 'हि सागून टाकले आहे, ते असें —

" आपल्यासमोर जे जीवित घडत आहे त्यातच समरस होऊन व त्याचे चिकित्सक दृष्टीने निरीक्षण करून लिहावयाची योग्य दिशा टाकून लिहिलेल्या सर्व वाङ्मयाची हीच कथा असावयाची ! " असाच सदेश ' दृष्टीआड सृष्टी ' इत्यादि कथातून फडके यानीं दिला आहे. तो भावी कथा-लेखकाना गुरु-मत्रासारखा महत्त्वाचा वाटण्याजोगा नाही काय ?

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) ' कथा–वाङ्मय हे इतिहासाच्या आरंभापासून निर्माण झालें आहे व अद्यापीहि प्रभावी ठरले आहे. ' या विधानाचे स्पष्टीकरण करा.

( २ ) संसारी दु खाचा विसर पाडण्याची शक्ति कथा–वाङ्मयात कशी येते ? त्या दृष्टीने मानवाला कथा–वाङ्मयाचा कसा उपयोग झाला आहे ?

( ३ ) लघुकथा व कादंबरी यातील फरक कोणता ? लघुकथेचीं वैशिष्ट्यें कोणती ?

( ४ ) बालमनाचीं सरस चित्रे रेखाटणाऱ्या फडक्याच्या लघुकथा कोणत्या ? एखाद्या चित्रणाचा साराश लिहा.

( ५ ) ' भाषेच्या कृत्रिमतेपासून फडके अगदीं अलिप्त आहेत ' उदाहरणासह चर्चा करा

( ६ ) आपल्या लघुकथात फडक्यानीं निर्माण केलेल्या व्यक्ति कोणत्या समाजातील आहेत ? उत्तर आधारासह लिहा

## वि. स. खांडेकर : : : २

आधीं फूल उमलते आणि नतर गुच्छ तयार होतो, त्याप्रमाणें खाडेकरानीं प्रथम लघुकथा लिहिली आणि नतर कादबरी रचली. त्याची पहिली लघुकथा 'घर कोणाचे ?' ही १९२३ साली प्रसिद्ध झाली;



तर त्याची पहिली कादंबरी "हृदयाची हाक" १९३० सालीं उजेडात आली. गेलीं तीस वर्षे ते लघुकथा सतत लिहीत आहेत. या अवधीत त्यानी सुमारे तीनशें लघुकथा लिहिल्या असतील. त्या कथा व पुढील कादबऱ्या याचा मूळ पिंड एकच. अतरगात समाजाच्या उद्धाराची तळमळ आणि बहिरग पद-लालित्याने व काव्य-कल्पनेने नटलेले असा त्याच्या कथा-कादबऱ्याचा थाट असतो. त्याचे लेखन हेतुपूर्ण असते व त्याची सजावट कलापूर्ण असते. आरभीच्या कथावर भाषेच्या कृत्रिमतेची दाट छाया पडलेली आहे. अलकाराच्या मुसळधार पावसामध्ये कथेतील सारी भावना धुऊन जाते. पण खाडेकराची प्रतिभा सारखी विकास पावणारी आहे. तिने हीं कृत्रिमतेचीं कवचे लवकरच फोडून टाकलीं आणि रसपूर्णतेकडे अधिक लक्ष पुरविले. या बाबतीत त्याना लघुकथामध्ये कादबऱ्यापेक्षा अधिक यश मिळाले.

## लघुकथेचे पैलू

ललित भाषाशैली, रम्य कल्पना आणि समाजहिताचा प्रचार-या त्रिगुणानी नटलेल्या त्याच्या काहीं काहीं कथा मराठीला भूषण होऊन राहिल्या आहेत. काहीं थोड्या कथा तर सूक्ष्म मनोविश्लेषण करणाऱ्याहि आहेत. वाचकाच्या चित्ताला एखाद्या करुण भावनेचा स्पर्श करून जाणाऱ्या त्याच्या काहीं लघुकथा सस्मरणीय आहेत, तर काहीं कथा उदात्त विचारामुळे व काहीं कथा एखाद्या तेजस्वी कल्पनेमुळे किंवा रमणीय उपमेमुळे रसिकाच्या ध्यानात चिरकाल राहणाऱ्या आहेत. एखाद्या उत्तम गवयाचे गाणे मैफलींत ऐकल्यानतर ते पुढे दीर्घकाळ श्रोत्याच्या कानात घुमत राहावे, तसा परिणाम घडविण्याचे सामर्थ्य खाडेकराच्या काहीं काहीं लघुकथामध्ये आढळते. त्यानीं स्वतःच आपल्या कथालेखनाची प्रगति तीन टप्प्यानीं कशी झाली, ते सागितले आहे. त्यात जसा फाजील गर्व नाहीं, तसाच दाभिक विनयहि पण नाहीं. प्राजल बुद्धीने सत्य निवेदन करताना ते लिहितात, " कोल्हटकर व गडकरी याच्या वाङ्मयाची त्याकाळीं त्याच्या मनावर फार मोठी छाप होती. त्यामुळे त्याच्या पहिल्या बहुतेक कथातून कोट्याचा हव्यास व अलकाराचा सोस दिसून येतो. या लेखनपद्धतीमुळे त्या गोष्टीत जसा एक प्रकारचा कृत्रिमपणा आला आहे तशा त्या थोड्याफार पाल्हाळिकहि झाल्या आहेत. दिवाकर कृष्णाच्या नवीन रेखीव आणि भावपूर्ण कथेच्या पद्धतीची व तोडीची एकहि गोष्ट त्याच्या या काळातल्या लेखनात आढळून येणार नाहीं. खाडेकराची प्रवृत्ति केवळ मनोरजक गोष्टी लिहिण्याकडे जशी नव्हती, तशी केवळ व्यक्तीच्या नाजुक भावभावना व सूक्ष्म सुखदुःखे काव्यात्म रीतीने प्रगट करूनहि त्याचे समाधान होण्यासारखे नव्हते. सामाजिक सुखदुःखे चित्रित करण्याची त्याना पहिल्यापासून इच्छा असलेली दिसते." आपल्या कथा पुरोगामी असतात कीं नाहीं याची चर्चा टीकाकारानीं खुशाल करावी असे म्हणून खांडेकर स्वतःची भूमिका सागतात. ती म्हणजे, " मानवी जीवनातील काहीं उदात्त, उन्नत, उत्कट आणि उद्बोधक क्षणाचे पूजन करण्याचा प्रयत्न मी करतो. "

## ललित वाङ्मयाचा नाद

खाडेकराचा जन्म सागली येथे ता. १९ जानेवारी १८९८ रोजीं झाला. त्याचे मूळचे नाव गणेश व वडिलाचे नाव आत्माराम. वडील सागली संस्थानात मुनसफ होते. ते १९११ सालीं वारले. खाडेकराच्या कुटुबाला खडतर दिवस आले. १९१६ सालीं कोकणातील एका जमिनदार चुलत्याने खाडेकराना दत्तक घेतले. त्यामुळे " गणेश आत्माराम " चा " विष्णु सखाराम " झाला.

इंग्रजी चौथ्या इयत्तेपासून ते शिष्यवृत्ति मिळवीत गेले. १९१३ सालीं ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले—आणि तेहि मुबई विद्यापीठाच्या हजारो विद्यार्थ्यात आठवा क्रमाक कमावून. शाळेच्या ' चिमण्या जगा 'तील क्रमिक पुस्तकाची बाधली शिदोरी घेऊनच खाडेकर थाबले नाहींत, त्यानी इतर वाचन मनसोक्त केले. हरिभाऊची ' उषःकाल ' कादबरी त्यानीं एका रात्रींत वाचून सपविली, देवलाचे ' शारदा ' नाटक तर तोडपाठच केले. तसेंच कोल्हटकराचे विनोदी वाङ्मय. ' सुदाम्याचे पोहे ' ते मोठ्या चवीनें सेवन करीत. कोल्हटकराचे ' वधूपरीक्षा नाटक पहाण्यासाठीं खाडेकर सागलीहून मिरजेस पायी चालत गेले. मराठीतील इतर ग्रथाचेहि वाचन ते आवडीने करीत होते. नाटक-कादबऱ्यात तर ते रगून जात.

## चौफेर संकटें

मॅट्रिक झाल्यावर खाडेकर पुण्यास आले आणि फर्गसन कॉलेजात दाखल झाले. त्याना एक शिष्यवृत्ति मिळाली होती. पण पुण्याची रहाणी, कॉलेजची फी, याचा खर्च कसा भागणार ? दोन शिकवण्या त्यानीं धरल्या. तरी पैशाची ओढाताण चालूच होती. दत्तक—विधानानतर ती थाबेल अशी खाडेकराना आशा होती. सरस्वतीप्रमाणे लक्ष्मीचाहि वरदहस्त आपल्या मस्तकावर फिरू लागेल असे मनोराज्य ते करीत होते. पण ते धुळीस मिळाले. दत्तक घराण्यातुन त्याच्या शिक्षणाला आर्थिक मदत तर कांहीं मिळाली नाहींच, पण उलट त्यांचे मानसिक स्वास्थ्य मात्र हिरावले गेले. दत्तक वडिलाचा स्वभाव खाडेकराच्यापेक्षा अगदींच निराळा होता.

त्यामुळें त्या दोघांत खटके उडूं लागले. सावंतवाडीला दोनतीन वर्षें खाडेकरांना काढावीं लागलीं. हा काळ केवळ काळजी करण्यात गेला. तेथे त्याच्या पाठीस मलेरिया लागला. गरिबी पाचवीला पूजलेलीच होती. त्यात भर दत्तक घराण्याच्या कटकटीची, आणि आता तिला साथ मिळाली रोगाची !

## ज्ञानदानाचें सत्र

चरितार्थ चालविण्यासाठीं खाडेकरानीं शिक्षकाचा पेशा पत्करला. १९२० सालीं कोकणातील शिरोडे येथील इग्रजी शाळा त्यानीं चालवावयास घेतली. शाळेत विद्यार्थी किती होते ? तर ५०–६०. आणि शाळेचे प्रमुख म्हणून खाडेकराना पगार किती ? तर २० रुपये. ' उल्का ' कादंबरीत भाऊसाहेबाच्या थोर मनाचे जे चित्र खाडेकरानीं रेखाटले आहे तें बऱ्याच ठिकाणीं खुद्द त्याचेच आहे असे वाटते. काही गावकऱ्याचाहि त्रास शाळेला सोसावा लागला. तथापि खाडेकरानीं आपल्या चिकाटीने त्या शाळेचा विकास केला. घरात भाड्याच्याऐवजीं गाडगीं व कंदिलाच्या ऐवजी दौत वापरून दारिद्र्याचे विष खाडेकर पचवीत होते, पण शाळेत विद्यार्थ्याना ज्ञानामृत देत होते. पुढे त्या शाळेतील विद्यार्थ्यांची सख्या दोनशेवर गेली.

त्यानीं आतापर्यंत २१ लघुकथा–सग्रह प्रसिद्ध केले, १०० लघु-निबंध लिहिले, १५ कादबऱ्या रचल्या, ६ नाटके रगविलीं, ५० रूपक-कथा चितारल्या आणि टीकालेख तर २००-३०० लिहिले. आणि हें सारे निरामय, निर्मल व प्रसन्न वाङ्मय त्यानीं निर्माण केले, ते मानसिक, शारीरिक किंवा आर्थिक स्वास्थ्य बिलकूल नसताना. उलट गरिबीशीं, रोगाशी, प्रतिवादीशी झगडत असतानाच त्यानी ही साहित्याची सुरंगी व सुगंधी बाग फुलविली.

## मानाचे तुरे

१९३५ सालीं पुणे येथे भरलेल्या ' शारदोपासक संमेलनाचें ' अध्यक्षस्थान त्याना अर्पण करण्यांत आले. मडगाव व मुंबई येथील प्रांतिक

संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या माळा त्याच्या गळयात घालण्यांत आल्या. १९४० साली जमखिंडी येथे भरलेल्या ' दक्षिण महाराष्ट्र साहित्य समेलनाचे ' अध्यक्षत्व त्याना बहाल करण्यात आले आणि मराठी साहित्यातील मोठा मान त्याना त्याच्या पुढील वर्षीच लाभला. १९४१ साली सोलापूर येथे भरलेल्या ' महाराष्ट्र साहित्य समेलना 'च्या सिंहासनावर त्याना अध्यक्षपदाचा अभिषेक करण्यात आला.

## स्वार्थी संसारांचें चित्रण

आपले घर हेच जग मानणारी ससारी माणमे किती तरी असतात. त्यांनीं आपल्या घराबाहेरील सुखदु:खे जाणावीत, अशी प्रेरणा देणारी ' घरट्याबाहेर ' ही लघुकथा आहे. त्यातील राजाराम हा सस्कृतचा प्रोफेसर आहे आणि तो आपल्या बायकोच्या कानात हिऱ्याच्या कुड्या लटकविण्यासाठीं आसुसलेला आहे. सहा वर्षांनीं मावस-बहिणीच्या लग्ना-साठीं त्याची पत्नी परगावी निघाली असता तो आठदहा दिवसाचा विरहहि राजारामाला असह्य झाला होता. कारण "एखाद्या उच्च झाडाच्या फादीवर मऊ मऊ कापसाने आणि लहान लहान गवताच्या काड्यानीं सजविलेल्या घरट्यात एखाद्या पाखराच्या जोडप्याने आनदाने चिव्चिव् करीत काळ काढावा, एकमेकाच्या चोचींत चोच घालून सूर्योदय आणि सूर्यास्त, आटलेली नदी आणि पूर आलेली नदी, लग्नसमारभ आणि प्रेतयात्रा, किंबहुना जगातल्या साऱ्या घडामोडी—जणू काहीं आपण या जगातले कोणी नव्हे अशा समजुतीने पहाव्या, तसा राजाराम व कालिदी याचा ससार गेलीं सहा वर्षे चालला होता."

चार दिवस झाले तरी पत्नीचे पत्र आले नाहीं, तेव्हा राजाराम तळमळू लागला. पाचवे दिवशीं कालिदीचे पत्र आले, पण त्यात तिनें काय लिहिले होते ? स्वार्थी प्रेमाच्या गुलगुल गोष्टी त्यात नव्हत्या, तर तिला तीन दिवसात समाजातील जीं सुखदु:खे दिसलीं त्याचे वर्णन होतें. समाजात कोठे अज्ञान आहे, कोठे दारिद्य आहे, तर कोठे रोगराई आहे. या दैत्याच्या दाढाखालीं सापडलेल्या असख्य जिवाच्या किंकाळ्या

कालिंदीला ऐकू येऊ लागल्या. त्याच तिनें आपल्या पत्रात लिहिल्या आणि शेवटीं असा निष्कर्ष काढला कीं, " आपल्यासारख्या माणसाच्या घरट्यात सुदैवाने गारवा आहे, पण त्या घरट्याबाहेर केवढा वणवा पसरला आहे ! या वणव्यात आपलीं माणसे होरपळून जात असताना आपण गप्प बसायचे ? छे !

दोनच वाटा मला पुढे दिसताहेत. तो विझवण्याचा प्रयत्न करावा, नाहीं तर इतराच्याबरोबर जळून तरी जावें ! "

## सामाजिक जाणीव

वाचकाच्या मनात सामाजिक जाणीव निर्माण करणाऱ्या अशा कथा खाडेकरानीं पुष्कळ लिहिल्या आहेत, ' मनुष्य, पशु आणि दगड ' या कथेत रघुनाथ शातारामला लिहिलेल्या पत्रात म्हणतो, " मन मात्र अधिकच अस्वस्थ झाले ..तुझ्या घराबाहेर गावात जे दैन्य आणि दारिद्य पसरलें आहे ते पाहून, विषमता जो नगा नाच घालीत आहे तो पाहून, अन्यायाला न्याय मानणाऱ्या खालच्या समाजाचा दुबळेपणा पाहून, वरच्या वर्गातलीं तुझ्यासारखीं हळवीं पण आधळी माणसे पाहून !" शातारामच्या घरीं आरामात असलेला रघुनाथ कलकत्य'तील मजुराच्या सपाची बातमी वाचून तिकडे गेला. कारण त्याच्या मते, " दगड म्हणून अमर होण्यापेक्षा, पशू म्हणून सुखाने जगण्यापेक्षा, मनुष्य म्हणून मरण्यात अधिक आनद आहे ! " सामाजिक व वैयक्तिक अशी दोन मने असतात हा खाडेकराचा लाडका सिद्धात आहे. ' समाधी-वरलीं फुले ' या कथेत ते लिहितात, " मनुष्याला दोन मने असतात हेच खरे ! त्याचें सामाजिक मन लोकाना सहज दिसतें, पण त्या सामाजिक मनाच्या आड, अगदीं अग चोरून का होईना, वैयक्तिक मन लपून बसलेले असतेच कीं ! "

## विषमतेचें कलात्मक चित्र

समाजातील विषमतेचे दारुण स्वरूप खाडेकरानीं दोन चार फटकाऱ्यानीं सहजासहजीं पण भेदक रीतीने रगविलें आहे. फुले आणि चुरमुरे–

हे नित्याचे जिन्नस. पण ‘ दोन भास ’ या लघुतम कथेंत त्यातूनच समाजातील विषमतेच्या दरीची कल्पना त्यानीं आणून दिलेली आहे. ‘ ड्रायव्हर–’ मोटारींतील तरुणी ओरडली ..‘ मोगरीच्या कळ्या घे ! ’ पण डायव्हरनें हिरमुसल्या चेहऱ्यानें परत येऊन सांगितले, ‘ बाईसाहेब, त्या मोगरीच्या कळ्या नाहीत ! चुरमुरे आहेत ! ’ भरल्यापोटीं सहल करावयास निघालेल्या श्रीमंत तरुणीची निराशा झाली.

—आणि तशीच निराशा झाली एका भिकारणीचीहि. “ वस्त्रापेक्षा अधारच तिच्या लज्जेचे अधिक चांगल्या रीतीने रक्षण करी.” भूक भागविण्यासाठीं रस्त्यावरील केळाची सालहि तिने आपल्या झोळीत टाकली. आणि तिला दूर दिसला एक चुरमुरेवाला. विडी पेटविण्यासाठीं तो दुकानापासून दूर गेलेला पहाताच ‘ तिने एकाद्या गिधाडाप्रमाणे त्या राशिवर झडप घातली. भरलेली मूठ तिने तशीच तोंडात कोंबली. लगेच थूः–थूः–थूः करून तिने तोंडातला लगदा थुकला. ते चुरमुरे नव्हते, मोगरीच्या कळ्या होत्या ! ” समाजातील तीव्र विषमता सौम्य शब्दानीं प्रगट करणाऱ्या या एकपानी लघुकथेतील प्रत्येक शब्द वेचक व भरीव आहे.

‘ गवसणी ’ या छोट्या रूपक-कथेतून परस्पर-सहकार्याचा सूर कलासुंदर रीतीनें खांडेकरानीं काढला आहे. त्या कथेचा शेवट असा—“ कोपऱ्यातून सतार स्फुदत म्हणत होती—‘ मला गवसणींतच घालून ठेवा. मघाशी गवसणी असती तर माझी अशी दुर्दशा !—’

दुसऱ्या कोपऱ्यातून उद्गार आले—‘ मघाशी एक गडी आला नि मला म्हणाला—उद्या सकाळीं पोतेरे घालायलाच तुला नेतो ! ’ असे पोतेरे होऊन पडण्यापेक्षा मी सतारीला सभाळीन, हवी तेव्हा तिच्यापासून दूर राहीन—” सतार व गवसणी परस्पराला उपकारच असतात.

## निर्वासिताचें मनश्चित्र

विद्यमान परिस्थितीच्या नाडीवर हात ठेवून समाजाच्या प्रकृतीची योग्य चिकित्सा करणे हे श्रेष्ठ ललित लेखकाचें कार्य असते. तें खांडे-

करानीं काहीं काहीं कथामध्ये उत्तम रीतीने साधले आहे. अशा कथाचा एक नमुना म्हणजे 'नवा माणूस' ही गोष्ट. १९४८ साली गांधी-हत्येनतर लिहिलेल्या या गोष्टींत एका निर्वासित डॉक्टराचे करुणरम्य चित्र नाजूक हाताने रेखाटलेले आहे. कराची येथे डॉक्टरी व्यवसाय करणारा मेघश्याम आगबोटींतून मुंबईस चाललेला होता. त्याची "दीड तपाची सेवा धर्म-वेडाच्या वणव्यात अर्ध्या दिवसात जळून खाक झाली!" देशाच्या फाळणीपूर्वी हिंदु-मुसलमानाचे दगे उसळले होते, तरी "मरणाच्या दारी पडलेल्या एका लाब्रच्या मुसलमान रोग्याला पहायला" डॉक्टर गेले, आणि त्याच्या पाठीमागे त्याची बायको, त्याची मुलगी, त्याचा मुलगा—सर्वांची सररहा कत्तल झाली. त्यामुळे त्याचे मन किती उदास व भकास झाले असेल, याची कल्पना खाडेकरानी नाना रीतींनीं आणून दिलेली आहे. प्रशात सागरावर शुभ्र चादणे पसरलेले दिसले, तर डॉक्टराना "प्रेतावर घातलेल्या पाढऱ्या चादरीसारखें वाटलें तें!" मुंबईस आल्यावर मुले–मुली आनदात हिंडताना पाहिलीं, तरी "त्याच्या मनाच्या जखमाना धक्का बसे." त्याच्या मनाचा चडफडाट इतका झालेला कीं, एका हॉटेलात गप्पा चालू असता तो मध्येच म्हणतो, "धरणीकपाने सारी मुंबई कोसळून तिच्या खालीं तीस लाख लोक एका क्षणात पुरले गेले तर काय मौज होईल!"

आपली प्रीति स्थाने नाहींशीं झाल्यामुळें तो माणसाचा द्वेष कसा करू लागला हें स्वभाव–दर्शन खाडेकरानीं कुशलतेने केले आहे. आणि तितक्याच कौशल्याने त्याचे स्वभाव–परिवर्तनहि दाखविले आहे. गांधीजींच्या फोटोसमोर उभे राहून 'हसताय काय असे?' असें विचारणारा मेघश्याम त्यांच्या हत्येची वार्ता ऐकताच शुद्धीवर येतो व मनाने उदार होतो. ती वार्ता ऐकताच आगगाडींतील निरनिराळ्या थरातील उतारूंची अवस्था काय झाली याचे वर्णन खाडेकरानीं खुबीने केले आहे, तें असें,

"सारा डबा आपल्याभोंवतीं गरगर फिरत आहे असा मेघश्यामाला भास झाला. डब्यातल्या साऱ्या माणसाच्या मुद्रावर स्मशानाची कळा आली. त्या

संन्याशाचे अश्रु हातातल्या गीतेवर ठिबकूं लागले. ती खिडकीजवळची बाई गळा काढून देवाला शिव्या देऊं लागली.

मेघश्यामला रडे येईना ! पण आत कुणीतरी आपल्या काळजाचे लचके तोडीत आहे असे त्याला वाटले. साऱ्या गाडींत ही अमंगल वार्ता आता पसरली होती. अश्रु, हुंदके, तावातावाचीं बोलणीं, यानीं सारें वातावरण भरून गेले. गांधीजींच्या जीवनाचे रहस्य मेघश्यामच्या ध्यानीं आले. हिंदु–मुसलमान या भेदाच्या वर जाऊन तो मानवधर्माचा पूजक बनला.

त्याचे मन उजळलें होते. इतके दिवस मनाने निर्माण केलेल्या तुरुंगात तो खितपत पडला होता. आज आता त्याच्या पायातल्या सूड आणि द्वेष याच्या शृंखला गळून पडूं लागल्या होत्या." तो गाडींतील मुसलमान उतारूच्या घरीं औषधी उपचार करण्यासाठीं गेला, असा या कथेचा शेवट दाखविलेला आहे. सत्य–सृष्टींत इतक्या झटपट स्वभाव बदलत नसला, तरी ध्येयवाद म्हणून कथा–सृष्टीत तसे परिवर्तन दाखविणे इष्टच ठरते.

## दारूबंदीचा प्रचार

दारूबंदीची आवश्यकता पटविणारी लघुकथा खाडेकरानीं लिहिली आहे. तिचे नाव 'विजय कोणाचा ?' शिशु-सप्ताहासारखीं समाजोपयोगी कार्ये करणारा एक राजा दारूबंदी मात्र करीत नाहीं. तेव्हा त्याला एक संपादक उपदेश करतो, " सरकारी खजिन्यात दारूवरील कराच्या रूपानें जमा होणारा प्रत्येक पैसा कुठून येतो ? दारूबाजाच्या निढळाच्या घामात, त्याच्या बायकोच्या अश्रूत व त्याच्या पोराच्या रक्तात भिजून तो आलेला असतो ! लाखो बायकापोराचीं पोटे जेव्हा रिकामीं रहातात तेव्हा सरकारची तिजोरी भरते ! हजारो पतिव्रताचीं अंगें बेफाम नवऱ्याच्या मारानें एकीकडे सुजत असतात व दुसरीकडे सरकारी जमाबंदीची रक्कम फुगत असते ! पोटातल्या आगीने जळणारीं व बाहेरच्या थंडीनें कुडकुडणारीं दारूबाजाचीं लक्षावधि मुले देशात तडफडत असतात, म्हणूनच शिशु-

सप्ताह साजरे करण्याला पाहिजे असलेला पैसा सरकारला मिळत असतो. दारूचे व्यसन सर्वांस चालू ठेवून प्रजा सुखी करूं पाहणें म्हणजे वेलीच्या मुळाशीं निखारे घालून तिच्या फुलाची अपेक्षा करीत बसण्यासारखे आहे.''

दारूमुळे उडणारे अनर्थ विरोधाभासाच्या अलंकारानीं खांडेकर पुढीलप्रमाणें वर्णितात. "या दारूच्या पायीं दररोज किती पोरे भाकरीच्या तुकड्यासाठीं तळमळताहेत, या दारूच्या आगीने किती आईबापाच्या आशाचीं राखरांगोळी केली आहे, या तांबड्या पाण्यामुळे स्वभावतः गंगाजलाप्रमाणें निर्मळ असणाऱ्या किती लोकाना काळे पाणी पहावे लागले आहे."

'दादू', 'दुसरें सरकार' वगैरे कथांमध्येहि खांडेकरानीं दारूची भीषणता मांडली आहे. कला व प्रचार यांचा मेळ 'हिरा जो भंगला' अशा कथांमध्येहि चांगला साधला आहे.

## विनोदाची खुलावट

खांडेकर जसे कवि आहेत, तसेच विनोदी लेखक पण आहेत. त्यामुळे त्यांच्या लघुकथांमध्ये जशी काव्याची कल्पकता चमकते, आणि ती कल्पकता रूपक-कथा रचण्यापर्यंत धाव घेते, त्याप्रमाणे त्यांच्या कांहीं कांहीं कथांमध्ये विनोदाची लकेर घुमत राहते, किंबहुना, शब्द-योजना, वर्णन-शैली व एकंदर कथानक हे सर्वच कांही हास्यरसाने ओथंबलेले असतें. याचे ठळक उदाहरण म्हणजे "जांभळीची शाळा-तपासणी". खेड्यातील प्राथमिक शाळेत हरहमेश घडणारा एक प्रसंग या कथेमध्ये खांडेकरानीं बहारीने रंगविला आहे.

जांभळी, निंबगाव, आंबेगाव हीं गावाचीं नावेच किती मजेशीर आहेत. तशींच मास्तराचीं नावे गुळमुळे व भडभडे. एका विद्यार्थ्यांचे नावहि आडमुठे. कथेचा प्रारंभहि किती विनोदी आहे पहा—"आज जांभळ गावातील सूर्य पूर्वेला न उगवता पश्चिमेलाच उगवला होता असें म्हटले पाहिजे, कारण तेथील मराठी चार यत्तांच्या महाविद्यापीठाचे आचार्य व अधिकाराने त्यांच्या हाताखालचें पण व्यवहारात त्यांच्या डोकीवर चढून बसलेले त्यांचे असिस्टंट, शाळेतल्या म्हाताऱ्या घड्याळाने

कण्हत सात अंक मोजले न मोजले तोच शाळेत येऊन दाखल झाले होते. हा प्रसंग इतका अभूतपूर्व होता कीं, तो शाळेच्या इतिहासात सुवर्णाक्षरानीं नसला तरी शिऱ्याच्या शाईने अवश्य लिहिला गेला असता; पण पण त्याला एक अट होती—व ती शाळेत शाई सापडणे ही होय ! ”

## प्रसंगनिष्ठ विनोद

भडभडेमास्तराना कोर्टाचा नाद, तर गुळमुळ्याना चटक भिक्षुकी करण्याची. त्यासाठीं ते दोघेहि शाळेबाहेर पडले असताना, एक नवे निःस्पृह व तरतरीत इन्स्पेक्टर शाळा तपासावयास आले. वाटेत त्याना चुकविण्या-साठीं भडभडे मास्तर छत्रीची ढाल कशी करतात हे पाहताना कोणालाहि हसूच लोटेल. इन्स्पेक्टरानी जाभळीचा रस्ता विचारला असताना भड-भड्यानीं निंबगावचे रस्त्याकडे बोट दाखविले. या आपल्या गनिमी काव्यावर भडभडे स्वतःच किती खूष झाले हे लेखकाने पुढील गमतीदार शब्दानीं सागितले आहे.—

“ इन्स्पेक्टरसाहेबाना निंबगावची वाट दाखविताच पन्हाळयावर शिद्दीजोहाराच्या हातावर तुरी देणाऱ्या शिवाजीइतकेच प्रसगावधान आपण दाखविले अशी अभिमानाची ऊर्मि धावणाऱ्या मास्तराच्या मनात उसळली. पण तो सिद्धीजोहार पाठलाग करूं लागला तेव्हा बाजीप्रभूने त्याला मध्येच अडविले. आपला बाजी-प्रभु यावेळी कुठे आहे? तो स्मशानात यावेळीं पिंडाच्या गोळ्याना तोंड देत बसला असेल, हाहि विचार त्याच्यापाठोपाठ त्यांच्या मनात आला. ”

इन्पेक्टर येणार म्हणून शाळेत किती उलथापालथी झाल्या, याचे मजेशीर वर्णन खाडेकरानीं केलेले आहे, तें असे—“ तत्काळ शाळेच्या कोपऱ्यात कित्येक दिवस हक्काची रजा घेत पडलेल्या केरसुणीला आपल्या कामावर रुजूं व्हावे लागले. दुष्काळात सापडलेल्या मनुष्याप्रमाणें टेबलावरील दौतीची स्थिति होती; तिला पोटभर अन्न वाढण्यात आले. मास्तरांच्या कपाटातील जरीचा रुमाल सणावारीं अगर लगीनघरीं प्रगट होणाऱ्या आजीबाईच्या नव्या मुकस्याप्रमाणें प्रगट झाला. शाळेतील विद्येचें विश्व

चालविणारे परब्रह्म दैवत–शिक्षारूपी पुरुषाची प्रकृति–सकलसौभाग्यवती वज्रचुडेमंडित मातोश्री छडीबाई आपलें सगुणरूप टाकून निजधामाला गेल्याहि. ” या धरणीकंपाचा आणखी एक परिणाम म्हणजे आडमुठे या आडदाड मुलाला मास्तर म्हणून खुर्चीवर बसावें लागले.

## घोटाळयांत घोटाळा !

अशा प्रसंगातून हास्याच्या एकाहून एक मोठ्या लाटा निर्माण होतात शेवटची डोंगरलाट म्हणजे आडमुठ्याची ‘ शिराळशेटी मास्तरकी ’ चालू असताना स्मशानात भटकीसाठीं गेलेले गुळमुळे मास्तर परत येतात आणि आपल्या खुर्चीवर बसलेल्या विद्यार्थ्याला बडवतात ! ‘ मी ’ या कादंबरींत हरिभाऊ आपट्यानी असाच एक शाळेतील प्रसंग रंगविला आहे. खाडेकरानीं शेवटीं अशी गंमत केली आहे की, गुळमुळे मास्तर इन्स्पेक्टरना ओळखीत नाहींत व इन्स्पेक्टर त्या मास्तराना ओळखीत नाहींत, त्यामुळें घोटाळ्यात घोटाळा होतो, कसा तो पहा—“ दंग्याची चाहूल लागताच इन्स्पेक्टर खोलींत येऊन म्हणतात, अहो हे काय ? मास्तराना मारता काय असें ? ”

गुळमुळे चिडून उत्तरतात, “ तुम्हाला कुणी सागितले आहे मधे तोंड घालायला ? हा मास्तर काय ? घे लेका हा मास्तरकीचा पगार.” ‘ पगार ’ शब्दाबरोबर आडमुठ्याच्या पाठीवर धम्मक लाडू पडू लागले.

“ अहो, हे मास्तर आहेत, सोडा त्याना. ”

इन्स्पेक्टरसाहेब गयावया करून म्हणाले, पण गुळमुळे दाद देईनात. ”

## कृत्रिम विद्वत्तेची चेष्टा

शिक्षकापेक्षां वरच्या पायरीवर बसणारा प्रोफेसर. त्यालाहि खाडेकरानीं आपल्या विनोदाचा विषय केलेला आहे. ‘ परीक्षकाची परीक्षा ’ या कथेंत एका विद्वत्ताजड प्राध्यापकाची अनुप्रासप्रियता दाखविली आहे.

विनोदाची बैठक उभारण्यासाठीं आरंभींच त्या प्राध्यापकाचे वर्णन पुढील-प्रमाणे केले आहे, " म. गांधींचा दररोज चरक्यावर सूत काढण्याचा नियम एखादे वेळी चुकेल, श्री. शिवरामपंत परांजप्यांच्या लेखात उपरोधिक वाक्य यावयाचे चुकून राहून जाईल, श्री. चिंतामणराव वैद्यांच्या व्याख्यानात महाभारताचा उल्लेख कदाचित् येणार नाहीं, पण प्रो. पणशीकर यांच्या वर्गांतील अगर बाहेरील व्याख्यानात नवा शब्द आला नाहीं असें कधींही होणार नाहीं, अशी त्यांची ख्याति होती. "

क्लिष्ट व विस्तृत प्रस्तावना लिहिणारे काहीं प्राध्यापक महाराष्ट्रात गाजलेले होते. त्यांचे विडंबन करताना खांडेकरांनीं किती अतिशयोक्ति केली आहे, पहा—" त्यांच्याकडे जोडाक्षरविरहित इतापनीति एका मासिकाच्या संपादकाने अभिप्रायाकरिता पाठविली होती म्हणे ! स्वारींने ज्ञानकोशाचे पांचदहा भाग भरतील एवढा अभिप्राय लिहिला. तो अभिप्राय छापायचा म्हटला तर निदान पांच वर्षें त्या मासिकाला इतर सर्व विषय बंद ठेवावे लागले असते. शेवटीं प्रोफेसरसाहेबांनीं त्या अभिप्रायाची अतिसंक्षिप्त आवृत्ति काढली ती मूळ पुस्तकाच्या सातपट झाली. "

प्रा. पणशीकर यांना अनुप्रासाचा छंद किती विलक्षण होता, हे पटविण्यास त्यांचें एक वाक्यहि पुरे आहे. ते वाक्य असे,—" या ग्रंथकर्त्यांत कोल्हटकरांची कोमल कला नाहीं, गडकऱ्यांचे गोड गुंजन नाहीं, देवलांची दयाशील दृष्टि नाहीं अथवा खाडिलकरांची खुमासदार खुलावट नाहीं. "

## शिक्षकीचा गौरव

' जांभळी 'च्या कथेवरून खांडेकरांना शिक्षकवर्गाचे दोष दाखविण्यात हौस वाटते असे कोणी म्हणेल, तर तें साफ चुकीचें ठरेल. ते स्वतः शिक्षक होते—आणि ध्येयवादी शिक्षक होते. शिक्षकाच्या पेशाची थोरवी त्यांनीं अनेक कथांमध्ये गाइलेली आहे. शिक्षकावरील विद्यार्थ्यांची भक्ति त्यांनीं सहृदयतेनें चित्रित केलेली आहे. " फत्तर व्हावें पण मास्तर होऊं नये " असे उद्‌गार त्यांच्या कथेंत जे ऐकूं येतात, ते त्यांचे स्वतःचे नव्हेत.

पूर्वपक्ष म्हणून, समाजांतील विकृत समजूत ते व्यक्त करीत असतात. पण शिक्षकाचे श्रेष्ठत्व त्यांनीं अनेक कथामध्ये घवघवीतपणाने माडले आहे. "वकील कीं शिक्षक ?" या कथेमध्ये तर एलूएल्. बी. झालेला तरुण शिक्षकच होतो, किंबहुना श्रीमंतीला भाळणाऱ्या आपल्या पत्नीलाहि तें पटविताना तो विचारतो, "भव्य वाड्यापेक्षा उत्तम शरीरसपत्ति कमावणारा मुलगा, दागदागिन्यानीं भरलेल्या पेटीपेक्षा उदात्त विचारानीं भरलेले त्याचें मन, पायावर लोळण घेणाऱ्या लक्ष्मीपेक्षा त्याच्या हातून होणारी जनसेवा या गोष्टी पित्याला अधिक आनददायिक होतात ना ?"

श्रीमंत वकील व तरुण शिक्षक याच्यामध्ये झालेल्या संवादातहि खाडेकरानीं हाच सिद्धात अलंकारिक भाषेनें माडलेला आहे. तो सवाद असा—

"वकिलीच्या धंद्यात कुबेर व्हायची सधि मिळते हे खरे—'

'मग आणखी काय पाहिजे ?'

'कुबेर हाच काहीं सर्वश्रेष्ठ देव नाहीं.'

'कुबेर नसेल, विष्णु असेल, पण तो तरी कुठे लक्ष्मीला सोडून रहायला तयार आहे ?'

'तुम्ही काहीं म्हणा. देवाच्या न्यायकचेरींत विष्णु वकीलीच करीत असला पाहिजे. उगीच काहीं लक्ष्मी त्याची दासी झाली नाहीं.'

'पण विष्णुपेक्षाही श्रेष्ठ असा देव आहेच. शकर–'

'शकर ! दिगंबर शंकर ! गावात रहायला घर नाहीं म्हणून स्मशानात जाऊन तळ देणाऱ्या या देवासारखें व्हावें असं तुम्हाला वाटतं कीं काय ? मग खास तुम्हाला शिक्षक होण्याची अवदसाच आठवली असली पाहिजे.'

'पण हालाहल विष घेण्याची पाळी आली तेव्हा शंकरानेंच तें घेतलें; विष्णूने नाहीं.'

' पूजास्थान ' ' केवड्याचे काटे ' इत्यादि कथांमध्येहि शिक्षकाचें सहृदय व उदात्त जिवनच खाडेकरानीं रंगविलेले आहे.

## शब्द-लीलांची मौज

विनोदी कथानकाच्या वेलीवर श्लेषादि शब्दालंकाराची फुले खाडेकरानीं लीलेनें लटकविलीं आहेत. ' अक्षराच्या बाबतीत अवाक्षर न काढणारे ', अशा शब्द–लीला खाडेकराना सहजच साधतात. दुसऱ्या कथामध्येहि " शिव्याचे काम, सरस्वती–पूजन " इत्यादि शब्दांवर त्यानी कोट्या केलेल्या आहेत. " पक्तिपठाणाशीं कुटुबातल्या भानगडीविषयीं बोलणे हें पठाणाकडून कर्ज काढण्यापेक्षाहि भयकर " अशा कोट्या सर्वत्र उधळलेल्या आढळतात. " हात जोडून बसणाराच्या हातावरल्या रेषा त्याला कसा हात देणार ? " असे शब्दाचे खेळ म्हणजे तर खाडेकराच्या हातचा मळ होय. तरी खाडेकर स्वतःच्या लेखनाची चिकित्सा करून म्हणतात, " माझ्या कथामध्ये अश्रूच्या मानाने हास्य फार कमी आहे.........
लेखनात स्वच्छद विनोदाचे व माझे फारसे सूत जमत नाहीं एवढे खरें. आम्ही दोघे मित्र आहोत; पण काहीं केल्या आम्ही जानी दोस्त होऊं शकत नाहीं. "

## अलंकारांचा खजिना

' साक्षी, सवशी आणि साधु यात खऱ्यापेक्षा खोट्याचाच भरणा अधिक आढळतो, ' ' विद्यार्थ्याला सुट्टी आणि वयकाना माहेर कधीं नकोसे झाले आहे काय ? ' इत्यादि सिद्धान्त अलकाराच्या कोंदणात बसवून खाडेकर वाचकाना सादर करतात. हरघडीच्या व्यवहारातील रुक्ष अनुभव खाडेकर अलंकारांच्या कोदणातून माढून दाखवितात, तेव्हां ते किती आकर्षक वाटतात, याचीं काहीं उदाहरणे त्याच्या लघुकथामधून पुढे दिलीं आहेत.

" कालासारखा प्रवासी जगात दुसरा कोणींच नाहीं. कोट्यवधि वर्षांपासून तो एकसारखा चालत आहे. पण तो क्षणभरदेखील विश्रांति-

करता कुठे थाबत नाहीं. त्याच्या मार्गावरील वृक्ष सुखाच्या वसंतानें पल्लवयुक्त झालेले असोत वा दुःखाच्या हेमताने निष्पर्ण झालेले असोत, लष्करी शिस्तींत रुळलेल्या शिपायाप्रमाणे काळ प्रमाणबद्ध पावलें टाकीत पुढेच जातो. ”

“ विनायक, जगात आधळ्यापेक्षा पागळ्याचेच दुःख आधिक असतें. आधळ्याला चादणे दिसत नाहीं, टेकडी दिसत नाहीं. पागळ्याला हे सारे सुंदर देखावे दिसतात, तिथे जावेसे वाटते, पण— ”

‘ शंकरावर वाहिलेल्या कमळापेक्षा चपलेचे डोळे, देव्हाऱ्यांतील जाई-जुईपेक्षा चपलेने मदस्मित केले कीं तिचे अर्धस्फुट दिसणारे दात, बेलाच्या तिरूयापेक्षा तिच्या डोक्यावरील पिंपळपान, दूर्वांकुरापेक्षा तिचे काळे-कुरळे केस आणि घटानादापेक्षा तिचा मधुर स्वर मेघनाथाला अधिकाधिक आकर्षू लागला. ”

उन्हाळ्याच्या प्रखरतेचे शब्द-चित्र किती थोड्या शब्दानीं खाडेकर रेखाटतात पहा, “ एरव्हीं तो भयकर उन्हाळाच होता. आभाळातून एकसारखी निखाऱ्याची वृष्टि होऊं लागली. त्या निखाऱ्यानीं जमिनीवरील हिरवळ जळून तिची राखरागोळी झाली ! वृक्षवेलींचे निष्प्राण सागाडे पाहून पूर्वी त्याच्याशी कुजबुज करणारा वारा उष्ण निःश्वास टाकू लागला. आपण पृथ्वीवर नसून एका उलट्या कढईत कोडले गेलो आहोत— आणि त्या कढईच्या खाली वणवा पेटला आहे, असे प्रत्येकाला वाटू लागलें.”

## कौटुंबिक चित्रांचे नमुने

अपापाचा पैसा आपल्याला नको म्हणून हाती आलेले महत्त्वाचे कागदपत्र फाडून टाकणारी सुधा पतीच्या व पित्याच्या—दोघाच्याहि क्रोधास कशी पात्र झाली, हे ‘आक्का’ या प्रपच–कथेत रंगविले आहे. शेवटीं “बाहेर येऊन सुधा पायऱ्या उतरूं लागली. समोर भयाण अधार पसरला होता; पण नवऱ्याच्या हृदयातील काळोखाच्या मानाने तो कमी भीतिप्रद होता. बाहेर रातकिड्याची किरकिर ऐकूं येत होती; पण तात्याच्या मनातील

पापी विचारापेक्षा ती कमी कर्णकटु होती. सुधेनें वर पाहिले, मेघाच्या पदराआड एका ताऱ्याला पोटाशीं घेऊन रजनी त्याचे कौतुक करीत होती. तात्या रागाने बेफाम होऊन ओरडले, " मूर्ख मुलगी "! रंगराव पिसाळून गर्जले, ' बेफाम बायको' ! "

चंद्रकाताने कण्हत हाक मारली, " आक्का, आक्का ! "

' संसाराच्या उन्हाळ्यातहि सात्विक प्रीतीच्या वायुलहरी नाचत असतातच ! ' हे आशादायक तत्त्व खाडेकरानीं ' गार वारा 'मध्यें गोंवले आहे. संसारांतील साधेसुधे पण लपलेले आनद उलगडून दाखविण्याची ' य. गो. 'ची कला खाडेकराना या कथेत सुदर साधली आहे. रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत कचेरींतील काम घरीं करीत बसणारा कारकून प्रथम असे मानतो कीं, आपण मरमरेतो राबतो पण आपली बायको मात्र खुशाल ताणून देते. पण पुढे त्याला कळते कीं, आपली बायको आपल्या तापकरी मुलाची शुश्रूषा करीत, अलोचन जागरण करीत बसली होती-स्वतःच्या जेवणाखाणाकडे लक्ष न देता ससाराचा भार उचलीत होती. तेव्हा वसतरावाना रखरखीत उन्हाळ्यातहि गार वारा सुटल्याचा भास झाला आणि पटले कीं, "पुरुषाचे दुःख हे वरून तापणाऱ्या धरणीच्या पृष्ठभागावरील एखाद्या खडकासारखे आहे. पण स्त्रीचे दुःख हे धरणीच्या अतरगात वाढणाऱ्या लाव्हासारखे आहे. ते चटकन् दिसत नाहीं म्हणून काय त्याचे चटके कमी तीव्र बसतात ? " गाधीजींच्या उपवासाचाहि खाडेकरानीं कथानकाला पार्श्वभूमीप्रमाणे खुबीने उपयोग करून घेतला आहे. अंतर्बाह्य उकाड्याचे वातावरण कथेच्या अणुरेणूत भरून राहिले आहे. आणि पत्नीची शात, प्रेमळ, संयमी व सात्विक मूर्ति किती कुशलतेने खाडेकरानीं उभी केली आहे. प्रत्यक्ष शब्दानीं वर्णन न करता बारीक बारीक कृतींतूनच तिचे थोर व्यक्तिमत्त्व त्यानीं प्रगट केले आहे. ही लघुकथा वाचून काहीं तापट नवऱ्यांचा मेंदू काहीं काळ तरी शांत होणार नाहीं काय ? विशेष हें कीं, हें बोधप्रद व कलापूर्ण कौटुबिक चित्र खाडेकरानीं रंगविले आहे ते अगदीं साध्या—सरळ भाषेनें—जवळजवळ य. गो. जोशी याच्या पद्धतीनें. त्यात कोट्या—उपमांचे रबरी फुगे नाहींत की कल्पनाचीं फुलपांखरें नाहींत.

कादंबरीच्या क्षेत्रात फडके व माडखोलकर याच्या मधला दुवा म्हणून खांडेकर जसे शोभतात आणि लघुनिबंधाच्या विभागात फडके व काणेकर याचा साधा ते जसा जोडतात, त्याचप्रमाणे लघुकथाच्या प्रातात ते फडके व य. गो. जोशी याच्यामधला पूल ठरतात.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) आपल्या कथालेखनाची प्रगति तीन टप्प्यानी झाली असे खांडेकर लिहितात, हे तीन टप्पे कोणते ?

( २ ) वाचकाच्या मनात सामाजिक जाणीव उत्पन्न करणाऱ्या पुष्कळच कथा खांडेकरानीं लिहिल्या; ही 'सामाजिक जाणीव' म्हणजे काय ? हें त्याच्या काही कथाच्या आधारे लिहा.

( ३ ) "खांडेकराच्या लघुकथातील विनोद" या विषयावर एक लहानसा निबंध लिहा

( ४ ) 'खांडेकराचे लेखन म्हणजे अलंकाराचा खजिना' तुम्हांला आवडलेल्या काही अलंकाराचे उदाहरणासह विवेचन करा

( ५ ) "खांडेकराचे लेखन हेतुपूर्ण असते व त्याची सजावट कलापूर्ण असते." विवेचन करा

( ६ ) 'मला आवडलेली खांडेकराची लघुकथा' या विषयावर रसग्रहणात्मक निबंध लिहा

( ७ ) 'खांडेकर म्हणजे फडके व जोशी याच्यामधील पूल होत'—कोण-कोणत्या गुणाच्या बाबतीत हे खरें आहे ?

# य. गो. जोशी : : : ३

" प्रसाद " हीं ठसठशीत अक्षरे दारावर असलेला एक बंगला पुण्यातील नातूबागेत उभा आहे. तो साधासुधा दिसत असला, तरी विशाल व मजबूत आहे. तसाच साधा, विशाल व मजबूत देह धारण करणारे



जोशीबुवा मनानेहि ह्याच गुणाचे आहेत. त्याच्या जीवनात प्रसाद हा गुण भरगच्च भरलेला आहे आणि तोच त्याच्या वाङ्मयातहि ओतप्रोत उतरलेला आहे. त्याच्या मासिकाचे नावहि आहे 'प्रसाद.' 'तुझा प्रसाद—चंद्रमा। करूं मज पूर्णिमा' हें त्या मासिकाचे ब्रीद आहे. त्याचे एक संपादक ह. भ. प. सोनोपत दाडेकर याचे वर्णन करताना जोशीबुवानीं त्याना म्हटले होते, " सोनियाचा पिपळ ! " त्याच रीतीने खुद्द जोशीबुवाचे वर्णन करावयाचें झाले, तर त्याना म्हणता येईल, " पारिजातकाचे झाड ! "

## जसें लेखन, तसें जीवन

" व्यायाम केल्यानंतर मनुष्याच्या अंगातून जसा घाम निघतो, तसें वाङ्मय हें लेखकाच्या जीवनातून सहज निघाले पाहिजे. " हे जोशीबुवाचे लेखन—सूत्र. आणि त्याचा कित्ता म्हणजे त्याचे चारित्र्य व साहित्य. साधा पंचा नेसून उघड्या अगाने वावरत असणारी त्याची धिप्पाड मूर्ति,

आल्यागेल्याचे सस्मित स्वागत करण्यास सदैव सिद्ध असते. स्वाक्षरी मागावयास आलेला एखादा बाल-लेखक असो किंवा साहित्य-समेलनाचे अध्यक्षपद भूषविलेला एखादा वृद्ध वाग्भट असो-सर्वांशी हसतहसत ते बोलतात आणि बोलता बोलता तासन्‌तास निघून जातात छापखान्यातील एखादा जुळाऱ्या येवो किंवा दूरचा एखादा फडवाला येवो-जोशीबुवाच्या कपाळाला कधी आठी पडलेली असावयाची नाहीं किंवा भुवई कधीं वर चढलेली दिसावयाची नाही. कवि व लेखक, वकील व व्यापारी, डॉक्टर व वैद्य, शिक्षक व प्राध्यापक, नट व दिग्दर्शक-नाना वर्गातील लहान-थोर, गरीब-श्रीमत, अडाणी-विद्वान अशा लोकाची ये-जा जोशीबुवाच्या घरीं सतत चालू असते. आणि तेथे येऊन गेलेला प्रत्येक माणूस, पारिजातकाची सावली व सुगध लाभल्याप्रमाणे, आनंदित होऊन परत जातो. दुःख व दारिद्र्य यानी जोशीबुवाना एके काळीं खूप छळलेले आहे. तरी त्याच्या मनाचे समाधान कधींहि भग पावले नाहीं. दहिवराने भिजलेल्या पारिजातकाचीं फुले जमिनीवर टप्‌टप् पडावींत, त्याप्रमाणे हास्यामध्यें घोळलेले गोड सवाद त्याच्या मुखातून अष्टौप्रहर निघत असतात. गोड गप्पाचे गुऱ्हाळ त्याच्या घरीं निरतर चालू असते. तेच त्याचे चिंतन आणि तोच त्याचा अनुभव !-त्यातूनच निर्माण होते त्याचे वाङ्मय ! प्रेम, जिव्हाळा, सहानुभूति या गुणानीं त्याचे अतःकरण तुडुंब भरलेले आहे. साधेपणा व मोकळेपणा हे त्याच्या स्वभावाचे जणु उजवे-डावे हातच. अहकार, मत्सर, द्वेष इत्यादि क्षुद्र विकाराना त्याच्या स्वभावात थाराच नाहीं. त्याचे लेखन जितके प्रेमळ व निर्मळ आहे, त्याहिपेक्षा अधिक त्याचे जीवन सरळ व जि हाळ्याचे आहे.

## जिव्हाळ्याची जादू

आपल्या स्वतःच्या जीवनात अखंड आनंद भरून ठेवण्याची जी गुरुकिल्ली जोशीबुवाना गवसलेली आहे, तीच ते इतराच्या जीवनालाहि लावीत असतात-आणि त्यात दडलेली दौलत बाहेर काढून दाखवीत

असतात. सर्वसामान्यच माणसे, त्याचे साधेसुधेच आयुष्य, आणि त्यातील मामुलीच घडामोडी—पण त्यातून प्रेमाचे व आनंदाचे लपलेले झरे जोशीबुवा शोधून काढतात व वाचकाना दाखवितात. तेव्हा वाचक आपल्या मनाशीं चकित होऊन म्हणतो, " अरे, हे कसे बुवा आतापर्यंत आपल्या लक्षात आले नाही. हा आनदाचा ठेवा तर आपल्यापाशीच होता कीं ! " मुलाबाळाचे, भाऊबहिणीचे, मायलेकाचे, भावाभावाचे प्रेम किती मधुर असू शकते, आणि ते प्रत्येकाच्या ससारांत कसे लपलेले असते, हे जोशीबुवा साध्या-सोप्या शब्दानीं वाचकाना सागतात आणि म्हणतात, " हे पहा तुझे सौख्याचे गाठोडे—तुझे तुझ्यापाशींच होते. त्याकडे कानाडोळा करून तू बाहेर सुखाचा पाठलाग उगाच करीत होतास. आता हें गाठोडे नीट सभाळून ठेव म्हणजे झाले ! " साध्या प्रपच—कथातून अद्भुत रस निर्माण करण्याची जादू जोशीबुवाजवळ आहे. ही जादू कोणती ? तर जिव्हाळा ! जोशीबुवाच्या या जिव्हाळ्याच्या जादूने सामान्याना असामान्याचे व नीरसाना रसपूर्णतेचे स्वरूप प्राप्त होते. आणि त्यामुळे " आपल्याहि आयुष्यात इतकी गोडी आहे तर ! " असें वाचकाना वाटू लागते. रानावनातून व उन्हातान्हातून पायपिटी करून शिणलेल्या मुशाफिराच्या दृष्टीस झाडावर मधाचे मोहोळ व झाडाखालीं झुळझुळ वाहणारा स्वच्छ पाण्याचा झरा अवचित दृष्टीस पडावा, तसा अकल्पित आनद जीवनाच्या भगभगीस कटाळलेल्या जीवाना देण्याची शक्ती जोशीबुवाच्या लघुकथामध्ये आहे.

## अनुभवाचें शिक्षण

श्री. यशवंत गोपाळ जोशी याचा जन्म पुणे जिल्ह्यातील डिकसळ या खेड्यात ता. १७ डिसेबर १९०१ रोजीं झाला. वडील कोर्टांत रजिस्ट्रारचे काम करीत. त्याचा स्वाभिमानी व निःस्पृह स्वभाव यशवतरावाच्या अंगीं उतरलेला आहे. घरची गरिबी. त्यात नाना अडचणी. त्यामुळें यशवंतरावाच्या शिक्षणाची मजल इग्रजी चौथीपाशींच खुटली. पुढें त्यानीं इंग्रजीचा अभ्यास ' टाईम्स ' वाचण्याइतका केला, तरी इंग्रजी

ग्रथाचे वाचन बेताबाताचेच आहे. त्यामुळें त्याच्या काहीं कथावर वाङ्मय-चौर्याचा आळ आला असतांना, भिंतीवर आपटून परत गेलेल्या चेंडूप्रमाणें, तो सहजच खाली पडला !

शिक्षण बेताचे व घरची गरिबी, त्यामुळे जोशीबुवाचे पूर्व-आयुष्य पोटाच्या पाठीमागे लागण्यातच गेले. सरकारचे लष्करी खाते असो किंवा येरवड्याचा तुरुंग असो-कोठलीहि व केवढीहि नोकरी त्यानीं खुशीनें पत्करली. छापखान्यातील कटाळवाणे कामहि ते आनदाने पार पाडीत. दारिद्र्याबरोबरच मृत्युहि त्याच्या घराच्या राशीस लागलेला होता. एका पधरवड्यात घरातील सात-आठ मृत्यु त्याना पहावे लागले. या नानाविध दुःखाच्या भट्टींत त्याच्या मनाची वीट पक्की भाजली गेली. त्यांच्या भाषेला विलक्षण धार आली. त्याना मनुष्य-स्वभावाचे बरेवाईट अनुभवहि पुष्कळ आले. तशाहि अवस्थेत त्याच्या चित्तात एकच ऊर्मि उसळत होती-आणि ती म्हणजे लेखक होण्याची !

## प्रापंचिक कथा

त्यानीं स्वतःचेच अनुभव व स्वतःच्याच भावना, आपल्याला सुचतील त्या शब्यानीं व जमतील त्या पद्धतीने लिहून काढल्या-आणि त्या लघुकथा म्हणून निरनिराळ्या मासिकाकडे पाठविल्या. त्याना बक्षिस काय मिळाले ? तर " साभार परत ! " एक नव्हे, दोन नव्हे, पधरा कथा नापसत होऊन परत आल्या. पण आपल्या रत्नाची किमत जोशीबुवा बरोबर जाणत होते. ' यशवत ' मासिकानें लघुकथाच्या स्पर्धेत शंभर रुपयाचे पारितोषिक लावले. त्यासाठीं जोशीबुवानीं आपल्या "परती"च्या कथातील एक गोष्ट उचलली व ती त्या मासिकाकडे पाठविली. तिला पहिला क्रमाक मिळाला ! जोशीबुवाचें यशवंत नाव जिकडेतिकडे गाजले. त्या गोष्टीचे नाव ' शेवग्याच्या शेंगा! ' त्याची प्रथम प्रसिद्ध झालेली गोष्ट म्हणजे 'एक रुपया दोन आणे.' आता रुपेरी पडद्यावर सोन्यासारख्या चमकणाऱ्या 'वहिनीच्या बागड्या' पूर्वी एका सपादकाने कवडीमोल मानून परत केलेल्या होत्या. या साऱ्या कथा 'परत' आलेल्याच होत्या. साधेपणाचें सौंदर्य कळण्यास वेळ लागतो हेंच खरें.

य. गो. च्या लेखन–शैलीवर प्रारभीं गडकऱ्याच्या कृत्रिम भाषेची विलक्षण मोहिनी पडलेली होती. पण त्या मोहिनेद्रतून ते लवकर जागे झाले आणि देवल-आपटे याच्या घरगुती भाषेची माधुरी व मातब्बरीच त्याना अधिक वाटू लागली. आणि तेहि तसेच लिहू लागले. त्यानीं आतापर्यंत सुमारे दीडशे लघुकथा लिहिल्या आहेत. तत्राची फिकीर ते करीत नसल्यामुळे, त्यातील काहीं स्वभवा–चित्राप्रमाणे आहेत, काहीं उपहास-प्रचुर टीका–लेखाप्रमाणे आहेत, तर काहीं भाव-निबधाप्रमाणे आहेत, पण काहीं मात्र शुद्ध, प्रमाणबद्ध व सर्वांगपूर्ण लघुकथाहि आहेत. ‘ होमकुड ’ व पडसाद ’ या दोन कादबऱ्या त्यानीं लिहिल्या आहेत. पैकीं ‘ पडसाद ’ या कादबरीवरून ‘ माझा मुलगा ’ हा बोलपट ‘ प्रभात ’ ने तयार केला. भोळा शकर, श्रीमुखात व बोलका सिनेमा हीं नाटकेहि त्यानीं रचलीं आहेत. शिवाय “ अनौपचारिक मुलाखती ” सारखा अभिनव लेखन प्रकारहि त्यानी सुरू केला. साध्या पण धारदार शब्दानीं प्रखर टीका करणारे ‘विद्वान भाड्याने देणे आहेत.’ यासारखे लेखहि त्यानीं अनेक लिहिले आहेत.

## ध्येयवादी प्रकाशक

‘ लेखका ’ इतकाच ‘ प्रकाशक ’ म्हणूनहि जोशीबुवानी लौकिक कमावलेला आहे. दोन्ही क्षेत्रात त्यानीं आपले चोखटेपण राखले आहे. स्वतःप्रमाणेच इतराच्या जीवनातीलहि आनद ते जसा शोधून-उलगडून दाखवितात, त्याचप्रमाणे ते स्वतःप्रमाणे इतराचेहि वाड्मय प्रकाशात आणतात. शे–दीडशे कथा–कादबऱ्या प्रकाशित केल्यानंतर त्यानीं ध्येय-वादी व कोशस्वरूपी वाडमय प्रसिद्ध करण्याचा वाग्यज्ञ सुरू केला. पाठीशीं विद्वत्ता नसताहि त्यानीं जसे यशस्वी लेखन केले, तसेच गाठीशीं द्रव्य–राशि नसताहि त्यानीं प्रचड स्वरूपाचे समाजोपयोगी ग्रथ प्रकाशित केले. नवीन तत्त्वज्ञानाचा परिचय मराठी वाचकाना करून देण्यासाठीं त्यानीं ‘ वाद–विवेचन–माला ’ चालविली व तिच्यामार्फत तेरा पुस्तके काढलीं. त्यातच मार्क्सच्या ‘ कॅपिटल ’ ग्रथाचा समावेश होतो. विद्या-

पीठासारख्या संस्थेने करावयाचीं प्रकाशने या एका व्यक्तीनें लीलेने पार पाडलीं आहेत. 'काळातील निवडक निबंध' हे प्रा. शिवरामपंत परांजपे यांचे तेजस्वी वाङ्मय जप्तींतून मोकळे झाले. तेव्हा काळाच्या उदरातून पुनः बाहेर आलेले हे वाङ्मय प्रसिद्ध करण्याचे धाडस केले जोशीबुवानींच. ज्ञानकोशाची सुधारलेली व संक्षिप्त आवृत्ति शोभेल असा 'सुलभ विश्वकोश'हि त्यानीं प्रकाशित केला. ज्ञानेश्वरी, महाराष्ट्र परिचय, संस्कृत कोश इत्यादि महत्कार्यांचे कंकण त्यानीं बांधले आहेच. महाराष्ट्र शारदेची सेवा लेखक व प्रकाशक या दोन्ही नात्यानीं इतक्या विपुल प्रमाणात व विमल स्वरूपात करणारे महाभाग थोडेच सापडतील! १९४७ सालीं "मुंबई मराठी साहित्य संमेलना"चे अध्यक्षस्थान त्याना देण्यात आले होते.

## लेखनाची प्रेरणा

प्रत्यक्ष डोळ्यासमोर घडणाऱ्या जीवनाकडे कानाडोळा करून काल्पित कथा-कादंबऱ्यात रमण्याची प्रवृत्ति वाचकामध्ये वाढत आहे. तिची टर उडविण्यासाठीं जोशीबुवा मिष्किलपणे लिहितात, "काही कांहीं लोकाचा वाङ्मयावर आता इतका विश्वास आहे कीं, चांगला किंवा वाईट असा एखादा असामान्य अनुभव प्रत्यक्ष आयुष्यात आला तर तो लोकाना काल्पनिक वाटतो आणि वाङ्मयातले अनुभव खरे वाटतात!" पण आपले वाङ्मय सत्यसृष्टीचे प्रतिबिंब दाखविते काय? सध्याच्या मराठी ललित साहित्याविषयीं जोशीबुवानीं आपले प्रांजल मत स्पष्टपणें दिलें आहे. 'मी का लिहितो?' या लेखात ते सांगतात, "आपले मराठी सामाजिक वाङ्मय वाचून आपल्या समाजाकडे पाहावे, तो वाङ्मयातलीं चित्रें आणि आपलीं प्रत्यक्ष समाजचित्रे यात किती तरी तफावत वाटूं लागली. आपलीं म्हणून लिहिलेलीं समाजचित्रे साहेब आणि मडम याच्या चित्राना गंध आणि कुंकूं लावून देशीं चित्रें म्हणून विकण्याचा अट्टाहासच मराठी वाङ्मयात चाललेला मला वाटला!"

'यशवंत गोपाळ जोशी' या स्वतःच्या नांवाचीच गोष्ट लिहिण्याची गंमत त्यानीं केली आहे. त्यातील एका वृद्ध गृहस्थाच्या मुखानें जोशीबुवा

इतर साहित्यिकाना कानमत्र देतात, " थापा नकोत, खरं लिहा ! ती तुमची कला–टेक्निक थोड कमी झालें तरी चालेल; पण खरं बोला ! अरे बेस्यानो, ज्या गोष्टी तुम्ही सामाजिक गोष्टी म्हणून लिहिता, तो तुमच्या सामाजिक गोष्टींत सामावलेला समाज आहे कुठ ? " कलेचा आत्मा म्हणजे भावना. त्या व्यक्त करण्याचे अनुभवसिद्ध शास्त्र आहे. ते निरुपयोगी आहे असे कोण म्हणेल ? पण पावशेर उपमा, अच्छेर वर्णने व शेरभर सवाद असे भावनाविष्काराचे कोणी कोष्टक माडू लागला, तर त्या अतिरेकाचे मात्र हसें होते. तसे हसे ' ग्यानबा तुकाराम आणि टेक्निक ' या आपल्या गाजलेल्या कथेत जोशी यानीं केले आहे. तींत शेवटीं ते निष्कर्ष सागतात, " एका भक्तीच्या जिव्हाळ्याखेरीज याला कसल आल आहे टेक्निक् ? जिव्हाळा असेल तर टेकनिक्ची जरूरी नाहीं आणि जिव्हाळा नसेल तर टेक्निक पाहिजेच !! "

## कला व तंत्र

हे झालें अन्य साहित्यिकाच्या वाङ्मयासबधींचे मत. ' पण तुम्ही स्वतः का लिहिता ? कसे लिहिता ? कोणता हेतु मनात धरून लिहिता ? ' असे सवाल त्याना कोणी केले, तर जोशीबुवा त्याना उत्तरतात, " मी फक्त पाहतो आणि त्यात स्वतःचे अतःकरण मिसळून लिहितो ! त्यात माणुसकी सापडेल–प्रामाणिकपणा सापडेल-' मी ' सापडेन. " त्याच्या लघुकथापैकीं निम्म्याहून अधिकाची कथानके त्याच्या प्रत्यक्ष अनुभवातून निघालेलीं आहेत. आणि बाकीचीं बहुतेक आपल्या मित्राच्या सत्यकथातून जन्मलेलीं आहेत. त्याची कला म्हणजे त्यात ' अतःकरण मिसळण्याची.' ते स्पष्टच सागतात, " मी, माझे कुटुंब आणि माझे स्नेहीसोबती याबाहेर माझी दृष्टीच पोचत नाहीं ! बाकी एकदर जिव्हाळ्याचे आणि जागतिक महत्त्वाचे प्रश्न म्हणजे ' हवापाण्या ' च्या चौकशीसारखे वाटतात मला. " मात्र खऱ्याखुऱ्या अनुभवाचे जीवत चित्रण करणाऱ्या लेखकाची भूमिका किती उच्च पाहिजे हें सागताना ' यशवत गोपाळ जोशी ' या कथेत ते म्हणतात, " लिहिल्याशिवाय राहवत नाहीं तें लेखन ! लिहायला बसताना

देवाच्या पूजेला बसल्यासारखा मनाचा उल्हसितपणा पाहिजे ! लेखनाच्या जागेतसुद्धा पवित्रपणा पाहिजे !...लेखक म्हणजे चांगल्या विचारांचा मार्गदर्शक दिवा असला पाहिजे ! ''

## साहित्याचें जीवित-कार्य

सत्य घटना कलात्मक रीतीने मांडण्याची ऊर्मि जोशी यांना लहानपणापासूनच आहे. तिचे वर्णन साध्या सुंदर भाषेने करताना ते म्हणतात, " लहानपणी मुलांना जसे कांहीं कांहीं नाद लागतात, तसा मला लेखन-वाचनाचा नाद लागला. तो नाद कांहीं वर्षांनीं इतका वाढला की, एखाद्या दिवशीं जेवण मिळाले नाहीं तर आपण ज्याप्रमाणे बेचैन होतो, त्याप्रमाणे लेखनवाचन ही माझ्या जीवनाची भूक ठरली ! '' केवळ कल्पित, निव्वळ अद्‌भुत असे कांहीं तरी लिहून वाचकाची पोकळ करमणूक करणे हे वाङ्मयाचे जीवित-कार्य आहे असे ते मानीत नाहींत. साहित्याने परिस्थिति पालटण्याचा प्रयत्न केला पाहिजे, हे उच्च तत्त्व जोशी किती साध्या दाखल्याने पटवितात पहा. " रस्त्यावर पाणी साचले म्हणून मुलांनीं त्यात कागदाची होडी टाकणे असाच आपल्या लेखनाचाही खेळ आहे- त्यापेक्षा आपल्याला पाऊस व्हायला पाहिजे-वारा व्हायला पाहिजे-म्हणजे आहे त्या परिस्थितीशीं खेळण्यापेक्षा परिस्थिती बदलण्याचे सामर्थ्य आपल्याला यायला पाहिजे. ''

## वास्तव जीवनाचा आरसा

काडीची माडी करण्याचे कसब जोशीबुवांना चांगलेच साधले आहे. एखादा गारुडी जसा चिमूटभर माती हातामध्ये घेतो आणि हा हा म्हणता तिचा रुपया बनवून दाखवितो, तसा चमत्कार जोशीबुवा आपल्या लघुकथेमध्यें करतात. त्यांची अगदीं प्रथम ( म्हणजे १९२९ सालीं.) प्रसिद्ध झालेली गोष्ट घ्या. तिचे नावच मुळी 'एक रुपया दोन आणे !' इतर कल्पना-विलासी कादंबरीकाराप्रमाणे, त्यांचे नायक बड्या हॉटेलात उतरत नाहींत, त्यांचें बिल पांच-सहाशे रुपये होत नाहीं, आणि ते बिल, दांत कोरून टाकलेल्या काडीप्रमाणे, सहजासहजीं फेकून देणारे मित्र किंवा

मैत्रिणी भेटत नाहींत. सारा कारभार साधा नि रोकडा, सत्यकथाच त्या. कला काय असेल ती केवळ मांडणींत. ‘ एक रुपया दोन आणे ! ’ या पहिल्या लघुकथेतील नायक काय करतो ? तर हॉटेलात ‘ एक मिसळ व पाव मागवितो ’ तोंच त्याची ‘ ती ’ माहेराहून येऊन टांग्यातून घरीं चाललेली त्याला दिसते. दोघांचे लग्न लागून एकच वर्ष झालेले. विरहानतरची ती भेट ! पण तींत ‘ रोमान्स ’ काय आहे ? कांहींच नाहीं. पुढे कथेतील ‘ पेचप्रसंग ’ निर्माण होतो, तो कोणता ? तर एकतीस तारखेचा! त्याच्या खिशात एकहि पैसा नसतो आणि तिचा लकडा ‘लाकडें आणा.’ तेवढ्यावरून बोलाचाली झाली, चिडाचिडी झाली, रुसवारुसवी झाली, उणींदुणीं उत्तरेंहि झालीं. पण अखेर वडिलाची मनीआर्डर आली—तीहि फार मोठी नव्हे, फक्त पंचवीस रुपयाची, पण तेवढ्याने त्याची अडचण निभावली गेली. झाली—कथा सपली. शेकडा नव्वद वाचक ज्या गरिबीचा आणि त्या गरिबींतील ज्या अडचणींचा हरघडी अनुभव घेत असतात; त्यांचेंच हे वास्तव चित्र पाहताना त्याना एखादा मित्र भेटल्याप्रमाणे आनद का वाटणार नाहीं ? शिवाय जुन्या काळातील वडिलाचें प्रेमळ स्वभावचित्रहि आकर्षक आहे. सोप्या भाषेने, सहज सवादाने, स्पष्ट स्वभाव-चित्रे रेखाटण्यात जोशीबुवाची लेखणी तरबेज आहे. ‘ ससार-प्रवेश ’ या कथेतहि १ रुपया १३ आणे मध्ये सुखासमाधानाने दिवाळी साजरी करणारे मानी कुटुंब दाखविले आहे.

## कलेची किमया

ही कथा सजविण्यासाठीं एक रुपया दोन आणे तरी जोशीबुवानीं खर्च केले, पण ‘ शेवग्याच्या शेगा ’ ही त्याची सुप्रसिद्ध कथा रचण्यास त्याना काय खर्च आला ? अवघ्या पंधरावीस शेगा—त्याहि घरातल्या झाडाच्या, पण त्या शेगानीं तीन भाडखोर भावाचे मेतकूट जमविलें आणि ‘ दिवाळींचे रहस्य’ या कथेत तर रुपया नाहीं, शेगा नाहींत, काहीं नाहीं. फक्त वडील आपल्या एक—एक मुलाला बोलावून त्याच्या कानात हळूच सागतात, ‘ हट्ट करायचा नाहीं हं. ’ बस्स ! तेवढी मधाची धार कानात

पडताच सारीं मुलें खूष. सारे कुटुंब आनदाने नाचूं लागले. त्या प्रेमाच्या दिवाळींत गरिबीचा अधार राहतो कशाला? नुसत्या 'सुपारींत' सुख कसें असते हेहि त्यानीं सुदर रीतीने सागितले आहे. कलेची किमया म्हणतात ती हीच. साध्या विषयात मोठा आशय पहाणारी व सामान्यांतून असामान्य तत्त्व शोधणारी कला-दृष्टि जोशीबुवाच्या ठायीं आहे.

## कौटुंबिक प्रेमाचें चित्र

शभर रुपयाचें पहिले बक्षिस मिळविण्यासारखी कोणती जडीबुट्टी 'शेवग्याच्या शेगा'त जोशीबुवानीं भरली आहे? तर करुण रसात घोळलेले भावाबहिणींचे प्रेम! "वडिलाच्या अस्थि आळदीला पोंचवून श्रीनिवास आताच आला होता." ही पहिलीच ओळ कारुण्याचा सूर लावणारी आहे. त्या कारुण्याची कमान चढविणारीं वर्णनें मधून मधून पेरलेलीं आहेत. जिला नायिका म्हणता येईल ती कशी आहे? तर "तारका साधी, सुदर, एकमार्गी मुलगी होती, वय सुमारें चवदा, वयाच्या आठव्या वर्षींच मातृवियोग! तेव्हांपासून तिचें निम्में बोलणे कमी झालें. जे आईजवळच बोलायचे तें ती आतां कोणाजवळ बोलणार? आईजवळ बोलायचे विचार मनात तसेच पडून रहात. तशा विचाराची तिच्या मनात बरीच अडगळ झाली आणि त्यामुळें तिच्या स्वभावात थोडासा कुढेपणा आला!"

आईबापावेगळी तारका. तिचें जीवन किती दुःखी झालें याचें करुण चित्रण पुढील दोनचार ओळींत कसे केलेंले आहे पहा. "हालतेचालते वडील दिसेनासे झाले होते, आणि तिच्या वडिलाच्या-दामोदरपताच्या दिवाणखान्यात त्याचा 'लाइफ साइज' फोटो लावलेला होता. तारकेला परिस्थिती असह्य झाली म्हणजे ती वेड्यासारखी आपल्या वडिलाची तसबीर कुशींत घेऊन उभी राहिल्यासारखी तसबिरीला बिलगे, अश्रू ढाळी आणि परत फिरे!"

श्रीनिवासनें तारकेला आपल्या घरीं ठेवलें; पण या अटीवर कीं, दुसंऱ्या दोघा भावाच्या घराचा उबरठा चढायचा नाहीं. हा कोंडमारा

तारकेला असह्य झाला आणि ती घरातील शेवग्याच्या शेंगा तोडून घेऊन दुसऱ्या भावाकडे गेली. तेथे तिला दोघेहि भाऊ भेटले आणि "प्रसगानें दगडालाहि पाझर फुटतो, असें आपण म्हणतो, मग नारायण काहीं अगदींच दगड नव्हता. त्याच्या डोळ्यात–काय–पाणीच म्हणायचे ना?" त्याचवेळीं श्रीनिवासहि तेथें आला. "मला माझे तीनहि भाऊ पाहिजे आहेत" असे तारका हृदय पिळवटून म्हणाली. तेव्हा 'कपाळावर बुक्की मारून घेत श्रीनिवास म्हणाला "तारे—तारके! ......तू कुणाकडेहि जात जा आणि कुणाकडेहि राहा.'" छोट्या वहिणींच्या प्रेमरसाने भावा-भावाचीं फुटलेलीं हृदये साधलीं गेलीं.

## करुण व हास्य

जोशीबुवाच्या बहुतेक कथा करुणरसाने ओथंबलेल्या आहेत. काहीं थोड्या कथामध्ये मात्र विनोद असतो, पण तो तीक्ष्ण उपरोधातून निर्माण झालेला असतो. साध्या, गरीब, मध्यमवर्गीय कुटुबातील अगदीं सामान्य घडामोडी घेऊन त्यावर त्यानी आपल्या कथाचे मदिर उभारलेलें आहे. कोणाचे तरी दारिद्र्य, कोणाचे तरी आजारीपण, कोणाचे तरी निधन—हे त्याच्या बहुतेक लघुकथामध्यें आढळते. आणि त्यातून ते करुणरस निर्माण करतात. पण त्याची खरी बहार आहे, ती त्या करुणरसावर उदात्त रसाचे किरण पाडण्याचे कामीं. दुःखाच्या प्रसगीं दुसऱ्याच्या अतःकरणातील माणुसकी कशी जागी होते आणि ती त्याग, सेवा, प्रेम इत्यादि रूपानीं कशी प्रगट होते, हे जोशी-बुवाच्या कथेत वाचले म्हणजे वाचकाचे मन सहजच उच पातळीवर चढते. जोशीबुवाचा विशेष गुण आहे तो हाच. उपरोधाच्या नाजूक शस्त्रानें समाजातील दभावर जोशीबुवा तीक्ष्ण आघात करीत असतात. 'साहित्यिकाची सफर' हे सारे पुस्तकच अशा उपहासपर विनोदाने खदखदणारे आहे. साहित्यातील कृत्रिमपणा, आधुनिक सुधारणेचा नकली-पणा, शहरी जीवनाचा यात्रिकपणा इत्यादींवर त्यानीं कैक उपहासप्रचुर लघुकथा लिहिल्या आहेत.

## उपरोधाचें शस्त्र

उपरोधिक लिहिण्यात जोशी याचा हातखंडा आहे. ' ग्यानबा तुकाराम आणि टेक्निक ' या कथेत त्यानीं साहित्यात तत्राचा भलता बडिवार माजविणाराचा खरपूस समाचार घेतला आहे. ' दुधावरची साय ' या करुण-रम्य कथेतहि ते उपरोधाने लिहितात, " मी मनात म्हणे, काय तर्कशास्त्राची अजब जादू आहे ! खऱ्या गोष्टीहि त्यामुळे चक्क खोट्या ठरतात ! मला मानसशास्त्र वगैरे अजिबात कळत नव्हते, म्हणूनच मी तें इतराना कळते असे गृहीत धरीत असें ! "

' कलेकरिता कला ' कीं ' जीवनाकारिता कला ? ' या प्रश्नावर एकदा महाराष्ट्रात जोराचे वादळ माजले होते. वादळातील होडीप्रमाणे, काहीं साहित्यिकाचीं मते, आज एक उद्या दुसरे, अशी उलटसुलट होत होतीं. त्याची चेष्टा करताना जोशीबुवाचे ' घरचीं फुलझाडे ' या कथेतील एक पात्र उपदेश करते,

" साहित्यविषयक बोलण्यात दर पाच मिनिटाला ' जीवन ' आणि सहाव्या मिनिटाला ' कला ' असा टेका धराल, तर तुमच्या लेखनाचा जलसा चिकार गर्दीचा व्हायला बिलकूल अडचण पडणार नाहीं ! "

तसेंच, ' पायाचे दगड ' या कथेत जोशी यानीं शहरातील तकलुपी मैत्रीचे विडंबन पुढीलप्रमाणे केलें आहे, " मैत्रीची व्याख्या–सिगारेट ओढायला एकत्र जमणें,–फिरायला जाणे,–सौंदर्यचर्चा !–बंधनाच्या पलीकडील सामाजिक मताच्या उष्ट्या पत्रावळी चोखणे !–आत्मप्रौढी करण्याचा गुत्ता ! '

' राधेकृष्ण गोपालकृष्ण ' ही कथा म्हणजे चित्रपट–सृष्टीवर चालविलेली विडंबनाची कुऱ्हाडच ! जो चित्रपट पहावयास एकहि प्रेक्षक येत नाहीं, त्याचा " ५४७५ वा अभेद्य आठवडा " चालू ! म्हणून पट-गृहाचे देवालय बनलें–पण देवाविरहित !

## नवथरांचें विडंबन

शहरी तरुण-तरुणींच्या तकलुपी प्रणय-चेष्टाची कुचेष्टा जोशी यानीं

'सर्कस' या कथेत भरपूर केलेली आहे. प्रेम-भंगामुळे आत्महत्या करूं पहाणाऱ्या हळव्या युवकावर उपरोधाचें हत्यार जोशी यानीं चौफेर चालविलें आहे. सर्कस पहाता पहाता 'तो' व 'ती' याचे प्रेम जमतें, त्या प्रेमाचे पर्यवसान लग्नात करण्याचे ते दोघे ठरवितात, पण—पण काहींच नाहीं! त्या दोघाचे वडील त्या लग्नाला समति देतात. पण 'बिनविरोधी प्रेमा'त काय राम? म्हणून 'तो' बेशुद्ध पडतो, ते पाहून 'ती' हृदय बंद पडून मरते आणि शुद्धीवर आलेला 'तो तिचा मृत्यु पाहून तिच्यासकट जल-समाधि घेतो, असे उथळ प्रेम-कथाचे विडबन जोशी यानीं केलेले आहे. 'लोखड,' 'पाजरपोळातली गाय' इत्यादि कथात आधुनिक सुधारणेचे विडबन त्यानीं अतिशयोक्तीने केले आहे. बहुतेक सारें विडबन-पटु लेखक सनातन चालीरीतींवरच स्थानींअस्थानीं शस्त्र चालविताना आढळतात, पण जुन्या पक्षाच्या बाजूने लढणारा झुझार वाग्वीर ललित साहित्यात जोशी हे एकटेच होत! 'गजरा मोतियाचा' या अलीकडील कथेत त्यानीं सध्या मध्यम वर्गाची दैना कशी उडते याचें चित्रण तिखट उपरोधाने केले आहे.

## कथेची नांदी

कथेच्या प्रारभीं इकडच्या-तिकडच्या गप्पा किंवा निसर्गातील एखाद्या देखाव्याचें वर्णन अथवा एकादें व्यावहारिक तत्त्वाचे विवेचन करून त्याला कथानकाचा धागा जोडण्याची जोशी याना सवय आहे. 'भिकोबा आणि धनाजी' या सत्तरी उलटलेल्या दोन वृद्धाच्या कथेत 'नादी'च्या या सर्व प्रकाराचा सगम झालेला आहे. त्यातील काहीं वेचे पुढें देतों. "उन्ह एकसारखे रखरखत होते आणि त्या रखरखणाऱ्या उन्हात एखाद्या योग्यानें विस्तवावर चालावें त्याप्रमाणे तीं हिरवींपिवळीं कोंवळीं पिंपळपानें भर उन्हात नाचत बागडत होतीं! का उन्हाला, सूर्याला हिणवींत होतीं—वाकुल्या दाखवित होतीं—देव जाणे!

तें नयनरम्य आणि मनोहारी दृश्य पाहून मला वाटले, जगांत नवीन नवीन तत्त्वज्ञाने उजळत राहतात त्याप्रमाणे तीं नवी पिंपळपानें त्या पिंपळाचीं नवीन तत्त्वज्ञानें असावींत!

नवीन तत्त्वज्ञाने चकाकतात-चमकतात-आणि काहीं कालावधीनें वाळून जातात-गळून जातात."

## अनुकंपेचे विषय

मधुकरी, शिक्षक, कारकून अशा दीनदलित वर्गाविषयीं जोशी याना गाढ सहानुभूति वाटते. इतर कथाकार वेश्या, विधवा, मजूर वगैरेंच्या दुःखाना वाचा फोडीत असतात; तर जोशीबुवांच्या कथांतून दारिद्र्यामध्ये भरडल्या जाणाऱ्या मध्यम वर्गाचे उसासे ऐकू येतात. पिलू मराठे, दादा साठे यांच्या दरिद्र कथा हि चटकदारपणे सांगाव्यात जोशी यानींच. शिक्षक हा समाजाचा किती उपयुक्त घटक ! त्याचा व्यवसाय साधुसताइतका पवित्र. पण समाजात त्याला ना धन, ना मान. सत्तेच्या व श्रीमतीच्या अडणीवर बसलेले पालक गरीब शिक्षकाची कशी हेटाळणी करतात याचें सुंदर चित्रण जोशी यानीं "बक्षीस रुपये १०१" या कथेत केलेले आहे. त्यातील विद्यार्थी शशिकात हा एका मामलेदाराचा मुलगा. त्याची आई सावत्र. त्याला आवड चित्रकलेची. पण वडिलाचा आग्रह त्यानें एल्एल्. बी. व्हावे असा. सुमारे चार वर्षे तो फरारी झालेला. म्हणून वर्तमानपत्रात बक्षिसाची जाहिरात दिलेली. त्या जाहिरातीनें होणारा कथेचा प्रारभ उत्कठा वाढविणारा आहे. त्यानतर नगरकर मास्तराचे स्वभावचित्र दोन पानें विस्तारानें रगविलेले आहे—'अगदीं दुसरे दत्तो वामन पोतदार म्हणानात !" या वाक्याने त्या वर्णनाची अखेर केली आहे. ते जितके प्रेमळ व परोपकारी, तितकेच स्वाभिमानी व स्पष्टवक्ते. ते आपण होऊन शशिकाताच्या वडिलास भेटावयास गेले. तेव्हा ते वडील मामलेदारीच्या तोऱ्यात म्हणाले, 'शशिकाताला शिकवणी ठेवायची आहे !' पण मास्तरानीं सागितले, 'त्याला शाळेतून काढा.' तेव्हा ते वडील मामलेदारी थाटात म्हणतात " काय गाढव आहात हो ! " त्यावर " आज आपण दिवसाच 'घेतली' आहेत वाटत ?' असें सडेतोड उत्तर देऊन मास्तर तेथून निघून गेले. मास्तराच्या अपमानाने जखमी झालेला शशिकातहि त्याच क्षणीं घरातून बाहेर पडला. तीन वर्षानीं वडील अत्यवस्थ आहेत,

ही जाहिरात वाचून तो त्याना भेटावयास गेला, पण " अगोदर माझ्या मास्तराची माफी मागा" असे म्हणाला. शिक्षकीचा केवढा गौरव! 'बिलोरी काचाचा चक्काचूर ' या कथेतहि जोशी यानीं ' शिक्षकाचा मानभंग व मनोभग ' याचेच चित्र रगविले आहे. ' दिनकर दिवेकर ' या कथेचाहि सूर तोच. ' शिक्षकाच्या जगात ' नावाची स्वतत्र कथा–मालाच त्यानीं सुरू केली होती. तींत शिक्षकाच्या जीवनातील सत्य असे कटु अनुभव कलेच्या साखर-पाकात घोळून माडले आहेत. आपल्याच मुलाचा ज्ञानदाता-शीलकर्ता जो शिक्षक, त्याला दिवाणखान्यात चहा नेण्यास सागणे किंवा मंडईतून भाजी आणावयास लावणे, हे अतीं आपल्या मुलाच्याहि आयुष्याचे-मातेरें करणारें कसे आहे, हे जोशी यानीं परिणामकारकपणे दाखविले आहे.

## कलेतील सहजपणा

सहजता हा त्याच्या कलेचा आत्मा. त्याची भाषाहि नेहमींच्या बोलण्यातीलच असते. डोगर–पहाडातून खळखळत धावणाऱ्या झऱ्याचें पाणी किती जीवत असते? तो जीवतपणा जोशीबुवाच्या भाषेमध्ये भरून राहिलेला आहे. निसर्गातील ते पाणी जसे स्पर्शाला थंड व चवीला गोड असते, तशीच जोशीबुवाची भाषाशैली निसर्गसुदर असूनहि अर्थवाहक व परिणामकारक असते. मृदुमजुल शब्द, विस्तारानें सजविलेले अलकार व अतराळात उड्डाण करणारी कवि–कल्पना–या साऱ्या कृत्रिमतेवर जोशी यानीं बहिष्कारच घातलेला आहे. या कृत्रिमतेचा उपहास करताना मात्र ते आपली कल्पकता अशी दाखवितात, "खालीं डोळ्याचीं सुदर तळीं–त्यात बुबळाचे हंस नाजूक फडफड करीत असतील ते तुम्हाला तिथून हालू देणार नाहींत!"

आणखी एक कल्पकतेचे उदाहरण—" दिवस डोळे मिटीत होता, आणि रात्र डोळे उघडीत होती. आकाशात रंगीबेरंगी शिडकाव्याचा रंग-पंचमीचा खेळ चालला होता." पण हीं वर्णने अपवादच समजलीं पाहिजेत.

जोशी याची नेहमींची भाषा पराकाष्ठेची साधी, सोपी, सरळ. दाखले दिले तरी ते नित्याच्या व्यवहारातील, घरोघर आढळणाऱ्या घटनाचे.

'पारिजातकाचीं फुले' या सुंदर व बोधपर कथेंत ते शहरी जीवनाचे वर्णन पुढील शब्दानीं करतात, "आमच्या सुखाची गाय आमच्या अतःकरणाच्या गोठ्यात सुखानें सावलीला बसलेली क्वचितच आढळे ! नेहमीं हिसकाफिसक चाललेली आणि दावे तोडण्याच्या तयारींत असलेली." अशाच घरगुती दाखल्याने त्यानी 'दुधावरची साय' या गोष्टींत पावसाचे वर्णन केलें आहे, ते असे, "पावसाच्या धारा झपाट्याने खालीं येत होत्या गाईच्या आचळातून दूध काढावें तसें मला वाटत होतें ते ! आकाशगाईच्या आचळातून दूधपाणी पृथ्वीच्या चरवींत साडत होतें ! सर्वत्र फेसाळलेल्या पाण्याची सतत धार सुटली होती ! दूध काढताना गाईनें लाथ झाडावी किंवा कान फडफडावे त्याप्रमाणे सोसाट्याचा वारा मधून-मधून या अचाट गोदोहनाला अडथळा आणीत होता. गोदोहनाच्या वेळेला वासराने मधे मधें आचळाला तोंड लावण्याचा प्रयत्न करीत जिभल्या चाटाव्यात, त्याप्रमाणे उंच झाडे वरच्यावरच पावसाची धार चाटीत होतीं !"

नुसती वीज कडाडत गेली, त्याचे वर्णन किती कौशल्याने त्यानीं केले आहे पहा "इतक्यात एकदम पाचपन्नास आग्गूड एकदम वाजवावेत, अशा आवाजानें सुरवात होऊन वीज कडाडली आणि-अशी-ही अशी-सरपटणाऱ्या सर्पाप्रमाणे तेजाने चकाकत, सर्रकन् माझ्या डोळ्यासमोरून ती नाहींशी झाली."

## सविस्तर वर्णनशैली

'वस्ताद' या कथेंत एका तालीमबाज तरुणाचे वर्णन मोजक्या शब्दांनीं पुढीलप्रमाणे केले आहे, "सहा फूट उंचीच्या आरशात पहात एक तरुण उभा होता. त्याच्या अंगात फक्त एक गंजीफ्रॉक-तो घामानें भिजलेला. एक पंचा वेढून घेतलेला-तो तालमींतील मातीनें लाल झालेला. रोजच्या व्यायामानें शरीर पोलादी बनलेले. गळ्यात एक काळा गंडा. नुकतीच त्यानें तालीम केलेली असल्यामुळें अंग घामानें निथळत होतें. आणि एका टॉवेलानें घाम पुशीत और मिजाशीने तो समोरच्या आरशात पहात होता !"

'विकास' या लघुकथेत एक उंच माणूस व त्याच्या भोवतालचीं ठेंगणीं माणसें याचें वर्णन किती विनोदप्रचुर उपमानीं जोशी यांनीं केलें आहे, पहा. " हा उंच मलखांब मधे आरती करीत उभा आणि हातानीं फिरवायच्या तालमींतील जोड्याप्रमाणें ती सर्व खुजीं माणसें—मोठें चमत्कारिक दिसे तें ! एखाद्या दिवशीं तीं सर्व माणसें एकदम बाहेर पडलीं आणि हाही त्याच्यांत असला कीं, रस्त्यानें मेंढरें वळीत चाललेल्या धनगराची मला आठवण होते ! "

सध्या मोडकळीस आलेल्या खेड्यांतील भकासपणाचें चित्र जोशी यांनीं 'संसार-प्रवेश' या कथेंत जाता जाता कसें काढलें आहे, पहा. " त्या खेडयातील कित्येक घरें ओस पडलेलीं होतीं ! कित्येकांवरचीं छपरें नाहींशीं झालीं होतीं. कित्येक घराच्या दगडी विटा आल्यागेल्यांनीं वाहून नेल्या होत्या. काही घरांचे चौथरे आणि दगडी पायेच फक्त शिल्लक राहिले होते. ठिकठिकाणीं फडया निवडुंग माजलेला होता. कित्येक ठिकाणीं कोरांटी—कोरफड उगवली होतीं. काहीं पडीक घरांतून औदुंबराचे वृक्ष उभे होते. तर काहीं घरांतून बाभळी वाढल्या होत्या. कावळ्यांची कावकाव कर्कशपणानें ऐकू येत होती ! "

## रेखीव शब्द-चित्रें

एकाद्या पात्राचें वर्णन करायला जोशी बसलेच, तर तें किती सुंदर व यथार्थ असतें, याचा पुरावा 'कोथिंबिरीच्या काडया' या कथेंत पहावयास मिळतो. त्यांनीं रेखाटलेलें द्वारकाबाईचें शब्द-चित्र असें, " वय पन्नाशीचा सुमार ! सुंदर बागेवर सूर्याचे मावळते किरण जो एक मलूल पण बोलका तजेला आणतात, तसेंच द्वारकाबाईकडे पाहून वाटे ! ती सात्त्विक मूर्ति, तो प्रेमळ चेहरा, तो चेहऱ्यावरचा सात्त्विक तजेला, वीतभर काठाचें तें रेशमी लुगडें, तें अगाखाद्यावरचें दागिन्यांचें वैभव—द्वारकाबाईना शोभत होतें. उलट द्वारकाबाईहि त्या वैभवाला वैभव आणीत होत्या !...चित्रांतली श्रीलक्ष्मी चित्ररूप टाकून वावरते आहे असें वाटे. "

तसेच एक शब्द-चित्र ' घरचीं फुलझाडे ' या कथेंत दृष्टीस पडतें. तें असे—" आज काहीं तरी सणाचा दिवस होता. गौरी न्हालेली होती. ओले केस पाठीवरच ऐटीनें रुळत होते. पाऊस पडल्यानतर सृष्टिसुदरीवर जे सौदर्याचे सिचन होते, त्याचप्रमाणे गौरीचे नाहणे झाल्यामुळे गौरीच्या देहावर एक प्रकारची सतेजता फाकलेली होती, आता ती एखाद्या देवतेसारखी दिसत होती ! "

## अंतःसृष्टीचे चितारी

खऱ्या ललित लेखकाचे लक्ष बाह्य चित्रणापेक्षा आतर वर्णनाकडेच अधिक असते. तसे ते जोशी याचे आहे. एकाद्या इमारतीचे, तिच्या दिवाणखान्याचे, त्यातील सामानसुमानाचे, पात्राच्या पोशाकाचे, हावभावाचे, शरीराचे—अशा बाह्य वर्णनाची कोरीव कलाकुसर ते फारशी करीत बसत नाहींत. पण साध्या प्रसंगातून व सहज सवादातून व्यक्तींच्या स्वभावातील छटा व मनातील खळबळी याचे चित्रण ते सफाईने करून जातात. काहीं काहीं कथामध्यें मात्र त्यानीं बाह्य परिस्थितिहि चितारली आहे—पण तीहि अगदीं अकृत्रिमतेनें. पाऊस पडू लागल्यावेळच्या बालाच्या लीला त्यानीं ' आयुष्यातील एक अनुभव ' या निखालस सत्य-कथेंत पुढीलप्रमाणे वर्णिल्या आहेत. " आमच्या दारासमोर साचलेले पाऊसपाणी त्यानें पायातील वहाणेने वर उडवले. माझ्या मुलानें तयार केलेली एक कागदी होडी त्याने त्या साचलेल्या पाण्यात नेऊन टाकली—आणि एखादे अगदीं लहान मूल वडिलाच्या हातीं सापडूं नये म्हणून जशी एखादे बाळ-झुकाडी देऊन पळते त्याप्रमाणें—तितक्याच बालसुलभ अभिनयाने तो निघून गेला. '

दोन म्हाताऱ्याची केविलवाणी अवस्था वाचकाच्या डोळ्यापुढें उभी करण्यासाठीं जोशी हे ' भिकोबा आणि धनाजी ' याचें वर्णन करताना अशी उपमा देतात कीं, " एकाच पिंजऱ्यात दोन उदीर सापडावेत त्याप्रमाणे ते दोन म्हातारे संध्याकाळच्या त्या मलूल वेळीं एकमेकाकडे केविलवाण्या आणि कावऱ्याबावऱ्या डोळ्यांनीं पाहताना दिसत होते. ".

याहिपेक्षा करुण वर्णन ' पैसे कसे संपणार ? ' या कथेत साध्यासाध्या शब्दांनीं व हरघडीच्या दाखल्यानी जोशी यानीं केलें आहे. आपल्या अपत्याच्या मृत्यूचे दुःख उकलून दाखविताना वृद्ध बाप म्हणतो,–" पण बर का भाऊसाहेब, गमत ही कीं, एकाही आमच्या मुलानें आपल्या भावडाचा चेहरा पाहिला नाहीं ! एखाद्या विसरभोळ्या माणसाची या पावसाळ्याची छत्री जशी दुसऱ्या पावसाळ्याला टिकू नये--हरवायचीच त्याची कुठं तरी--तसं आमच झाल बघा ! "

## स्वभावाचें प्रतिबिंब

' वहिनींच्या बागड्या ' या हृदय--द्रावक लघुकथेंतहि वहिनीचें शब्द-चित्र जाता जाता जोशी यानीं काढले आहे, ते असें—" भर बाराचें उन्ह, पायात काहीं नाहीं ! सबंध चेहरा घामाने डबडबलेला. केससुध्दा घामाने चिंब झालेले. कपाळावरील घामाच्या ओघळाने कुंकवाचा रक्तवर्ण रंगाचा सडा गालावर झाला होता. त्या धापा टाकीत माझ्या-जवळ आल्या. " हे झाले वहिनींच्या बहिरंगाचे चित्रण, पण त्याच्या स्वभावाचेहि वर्णन जोशी यानीं किती कुशलतेने केले आहे पहा. " आमच्या वहिनींचा स्वभाव मधमाशीसारखा होता ! सापडेल तिथून निर्मल–निष्पाप आनद गोळा करावयाचा आणि त्याचा सुगंध कुटुबांत पसरायचा ! पण काहींच्या नशिबीं असा आयता आनद घेण्याचेहि नसतें, किंवा ते घेत नाहींत ! ते नुसते सुखाचे पहारेकरी ! "

वहिनीचा बाळ देवाघरीं गेला. त्याचे वर्णन किती हलक्या हातानें, सहृदय भावनेने जोशी यानीं केले आहे. ते करताना सहज स्फुरणारे तत्त्व-ज्ञानहि सहज आठवणाऱ्या दाखल्याने त्यानीं सागितले आहे. ते असें— " इकडचा मुलगा तिकडे झाला ! एका खळगींतून बाहेर आला आणि दुसऱ्या खळगींत पुरला गेला ! त्याचे नाव काय ? त्याचे काम काय ? आमच्या दादा-वहिनींना त्याचा उपयोग नुसता तुरटीच्या खड्यासारखा झाला ? तुरटीचा खडा डोळ्यांतून फिरवला म्हणजे डोळे साफ होतात— डोळ्यातून पाणी येते. "

## प्रभावी संवाद

काळजाला घरें पाडतील असे सवाद लिहिण्याची शक्ति जोशी याच्या लेखणींत आहे. वहिनीवर आईसारखी माया करणारा नायक. पण त्याचें लग्न झालें. त्याची बायको स्वभावाने कोती व कुढी. तिच्या बाळाला वहिनीचा लळा लागला, तर वहिनीची दृष्ट लागेल म्हणून ती बायको आपल्या मुलाला वहिनीपासून दूर ठेवू लागली. उदार स्वभावाच्या वहिनींनीहि आपली ममता आवरली व त्या बाळाला दूर ठेवण्यास सुरुवात केली. त्या दोघा प्रेमळ जीवाची ताटातूट नायकाला पहावेना. तेव्हा तो वहिनीला चारच वाक्यात आपल्या हृदयाचे उमाळे उकलून दाखवितो.

' मी गहिंवरून म्हणालो, " वहिनी-ए आई, माझ्यावरची आणि माझ्या बाळावरची माया अशी काढून घेऊं नकोस—वहिनी, मी भाबडा आहे—सगळ मोकळ्या मनान बोलतों मी तुझ्या जवळ ! म्हणून का तूं अशी निष्ठुर झालीस ? ते कांहीं नाहीं. घे—घे या बाळाला आणि मला वचन दे, कीं मघापासून जस तू त्याच्याशीं निष्ठुर वर्तन केलस, तस यापुढं कधींहि करणार नाहींस ! "

## कलात्मक बोध

पारिजातकाच्या झाडाचे वर्णन त्यानीं किती सहज—रम्य केले आहे. " शेजारींच कोपऱ्यावर केराची पेटी होती आणि त्या पेटींत व तिच्या सभोवताली पारिजातकाच्या फुलाचा तुरळक सडा पडला होता. सहज नजर वर गेली. फुलाचा शेला पांघरून पारिजातकाचे झाड डौलाने उभें होते ! आणि जेव्हा डौलाने ते पारिजातकाचे झाड डुले त्या वेळीं त्याच्या त्या शेल्यातील कित्येक फुलें खालीं पडत. " उकिरड्यावर उगवलेल्याहि पारिजातकाचीं फुलें प्रसन्नच असत, तसेंच तीस रुपये पगारावर पोट भरणारे कुटुब सदा आनदी असे, असे तत्त्व ' पारिजातकाचीं फुलें ' या मनोज्ञ कथेत माडलेले आहे. वाचकाच्या मनातील क्षुद्र विकाराचीं जळमटे झाडून टाकून तेथे उदात्त विचाराचा सुगध पसरविण्याचें सामर्थ्य जोशी याच्या कथा—लेखनात आहे. ' दोन श्रीमत ' या कथेंतील कार-

कून बापू इतका बाणेदार व स्वाभिमानी दाखविला आहे कीं त्यापुढे श्रीमतानीहि मान लववावी. कल्पित दृश्यामुळे वाचकाच्या चित्तात हुरहूर उत्पन्न करणाऱ्या कथापेक्षा अशा सद्गुण पेरणाऱ्या कथा समाजाला अधिक उपयुक्त नाहींत काय ? कलेचा आस्वाद मिळून शिवाय मनाची उन्नति झाली आणि त्यायोगे आपल्या जीविताला रुचि व अर्थ प्राप्त झाला, तर ते कोणाला नको आहे ?

## जीवनाचा मंत्र

कथेच्या ओघात सुविचार गुंफण्यात जोशी यशस्वी आहेत. ' पाजरपोळातली गाय ' या उपरोधिक कथेची नायिका आपल्या हळुवार पतीला धडा देते, " भारी किंमतीच्या कापडाच्या दुकानात कपड्याच्या जाहिरातीकरिता देहाचे लाकडी ठोकळे करून ठेवलेले असतात ना ? तशी तुम्ही बायकाना वागणूक देत आहात हल्लीं. यत्रासारखे त्याचं आयुष्य करून ठेवल आहात आपण ! त्याच्या मनाची रग नाहींशी करून आपण आपल्याहि मनाची रग नाहींशी करून घेतली आहात ! . . . .

"आपल्या सुशिक्षित समाजात जर निरखून पाहू लागलो तर कुणाच्याच ' लाईफमध्यें ' स्प्रिंग ' राहिलेली नाहीं, तर नुसती मान हलविणारीं चित्र बाजारात मिळतात तशी आपली निर्जीव हालचाल करणारी स्थिति झाली आहे ! "

' वहिनींच्या बागड्या 'मध्ये तर जीवनातील सुखाचा मत्र लेखकानें सांगितला आहे. तो असा—" मनमिळाऊपणा ह्याच गुणाला मी शंभर मार्क देतों; इतर किरकोळ हजार दुर्गुण अगात असले, तरी एक मनमिळाऊपणा जर अंगात असेल तर—

—पण तो नाहीं, म्हणून हल्लीं कुटुंबपद्धति–छिन्नविच्छिन्न झालेली दिसते आहे ! "

## माणुसकीचें दर्शन

मानवी जीवन हें केवळ धनाने, स्वार्थानें, भोगानें सुखी होणार नाहीं; त्यासाठीं श्रद्धा, प्रेम, सहिष्णुता इत्यादि गुण अवश्य असतात, हा सिद्धात

जोशी यानीं वाचकांना न कळत, आपल्या कलेच्या द्वारा, कैक कथातून दिला आहे. ' धर्म ही अफू आहे ' या कथेत मानवी जीवनाला विसावा व ओलावा मिळण्यासाठीं श्रद्धेय स्थानाची आवश्यकता किती आहे हें कलासुदर पद्धतीने सागितले आहे. ' माणसानाच माणूस नकोसा झाला ' अशा एकाकी अवस्थेंत ' दुःखीकष्टी जीवाना धर्माची अफू हवीच आहे ' हें सनातनी भासणारे तत्त्व जोशी यानीं अशा कलाचातुर्याने माडले आहे कीं, नवनीतिवाद्यानींहि क्षणभर ते मान्यच करावे. वकील झालेला व पचेचाळीस वर्षे वयाचा एक सधन रसिक माणूस आपल्या ' जीविताची आतषबाजी ' करतो—नीतिनियम लाथाडून शेजाऱ्याच्या सुखाची राख-रागोळी करतो. त्याचे शाप बाधल्यामुळेच कीं काय, त्याला दुर्दशा येते, त्याचे मित्र सोडून जातात आणि " एकाद्या झाडावरचीं एकाद्यान सर्व फुलं टिपून न्यावींत त्याप्रमाणे, त्या एकाच प्लेगन माझ्या घरातल्या सर्व चादण्या आणि नक्षत्रं हिरावून नेलीं ' अशी कहाणी तो लेखकाजवळ सागतो. अशा असहाय्य स्थितींत, ' तोच देवाधर्माविरुद्ध मतप्रचार करणारा माणूस आज जीवन—विश्रातीकरिता देवळाच्या चौथऱ्यावर येऊन बसला आहे—चौथऱ्याचाच भाग झाला आहे. ' एकटेपणाची आग विझविण्या-साठीं त्याने नसलेल्या बायकामुलासाठीं जेवणाचीं ताटे वाढलीं, हा साधा प्रसंग अत्यत भावनापूर्ण आहे ! तसेंच तो लेखकाच्या घरीं जातो आणि पोटउकाला झाल्यामुळें व तेथे माणुसकी सापडल्यामुळे ' उदयाचळीं मित्र आला ' अशी भूपाळी गातो, हें अतिशय सूचक आहे ! साऱ्या बदलत्या आयुष्याचा आढावा कलात्मक रीतीनें घेणाऱ्या या कथेत विविध घटनाचीं बीजें रुजलेली आहेत.

## तंत्राच्या उपेक्षेचें फल

सामान्यतः जोशी याच्या कथेचा प्रारभ रेंगाळणारा असतो. कधीं बाह्यसृष्टींतील एकादें लाबलचक वर्णन करून, कधीं एकादा अप्रस्तुत संवाद रंगवून, तर कधीं अगदीं मामुली विचार पाल्हाळपणें माडून ते आपल्या कथांची सुरवात करतात. त्यातील सैलपणा सहजता उत्पन्न करूं

शकत असला तरी चित्तवेधकपणाला तो बाधक ठरतो. ‘ लोखंड ’ ही कथा २१ पाने व्यापते, तर ‘ वहिनीच्या बागड्या’साठीं ४२ पाने खर्चीं पडलीं आहेत. हा पाल्हाळ लघुकथेला बाधक ठरतो. काहीं काहीं कथाचे प्रारभ तत्राच्या कसोटीस उतरणारे आहेत. ‘ नवराबायकोंनी सागितलेली गोष्ट ’ या कथेचा प्रारभ जिज्ञासा उत्पन्न करणारा आहे. तो असा —

“त्यावेळचे ते दृश्य पाहून माझ्या मनाला आनदाचा आणि उत्साहाचा इतका कमालीचा आवेग आला कीं, मीं एकदम बेफामपणे हाक मारली—

“ विश्वनाथपत—”

“ ओ, या ना ! ”

साधारण लावून घेतलेला दरवाजा मीं खाडकन् उघडला आणि त्या घरात शिरले. ”

सहज चूळ भरावी आणि तींतून आकृति उमटावी, तशी ही तत्रशुद्ध व परिणामकारक रचना जोशी याच्या कथा-सृष्टींत कोठे कोठे आढळते. पण एरवीं तत्राची उपेक्षाच त्यानीं केलेली असल्याने त्याच्या सर्वच लघुकथा रसिकाना पूर्ण समाधान देऊ शकत नाहींत. दीर्घकाळ ‘ आ-ऊ ’ करणाऱ्या गवयाने मध्येच एकादी मधुर व दाणेदार तान मारावी, त्याप्रमाणे त्याच्या कथेत एकादाच गुण उत्कटत्वाने प्रगट होतो. कोणत्याहि इमारतीचा पाया, भिंती, छप्पर हे तिन्ही भाग खबीर असावयास हवेत, तसेच लघुकथेच्या कथानकाचा आदि, मध्य व अत व्यवस्थितपणे सकल्पिलेला व प्रमाणशुद्धतेनें माडलेला असला पाहिजे. चंदनी लाकडाचा एकच खाब कितीहि बारकाईने व कसबाने कोरला, तरी तो खाब म्हणजे काहीं राजवाडा नव्हे. आपल्या शरिराचाहि एकच अवयव पुष्ट केला, तर त्याची काय शोभा? ‘वहिनीच्या बागड्या’चा उल्लेख अगदीं अखेरीस एकदा येतो, पण तो आधींपासून सूचकपणे यावयास हवा होता. इतर कथाचीहि वस्तु मोलाची आहे, पण तिची सर्वांगीण घडण करण्याचे चातुर्य लेखकाने दाखविले नाहीं. तें दाखविलें असतें, तर ‘ य. गो. ’चे नाव हरिभाऊ व शरद्बाबू याच्या प्रथम पंक्तींत झळकले असते—झळकेलहि पुढे कदाचित् ! आज-देखील त्यांच्या कथा जुन्या-नव्या अभिरुचीच्या वाचकाना आवडतातच.

कारण त्यात माणुसकीचा जिव्हाळा ओतप्रोत भरलेला असतो. त्याचा विद्युत्स्पर्श होताच वाचकाचा कंठ गहिंवरतो, डोळे अश्रूंनीं भरून येतात आणि हृदयावर कायमचा ठसा उमटतो—आणि तो शुभ, मंगल व पवित्र असतो, हें विशेष.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) 'वाङ्मय हे लेखकाच्या जीवनातून सहज निघाले पाहिजे' हे विधान श्री जोशी याच्या लेखनाच्या बाबतीत कसे खरें आहे ते लिहा

( २ ) श्री य. गो जोशी यानी लेखनाला कशी सुरवात केली? त्या वेळीं त्याना कोणते अनुभव आले?

( ३ ) श्री जोशी याच्या प्रकाशन-कार्याची थोडक्यात माहिती द्या?

( ४ ) "मी का लिहितों व कसें लिहितो?" या प्रश्नाचीं उत्तरे श्री जोशी काय देतात? उत्तर त्याच्या कथाच्या आधारें लिहा.

( ५ ) 'श्री जोशी याच्या कथातील कौटुंबिक वातावरण' यासंबंधीं लहानसा निबंध लिहा

( ६ ) अंत सृष्टीचे चित्रकार या दृष्टीने श्री जोशी यानी रंगविलेलीं काहीं व्यक्ति-चित्रे सागा.

( ७ ) श्री. जोशी याच्या कथात करुणरस आहे, तसाच काहीं कथात तीव्र उपहास आहे, अशा उपहासप्रधान कथा कोणत्या?

( ८ ) 'जिव्हाळा असेल तर टेक्निक्ची (तंत्राची) जरूरी नाही, आणि जिव्हाळा नसेल तर टेक्निक् पाहिजे.' कथालेखनासंबंधीच्या श्री. जोशी याच्या या विधानाबद्दल तुमचें मत काय?

## ग. ल. ठोकळ : : : ४

मराठींतील लघुकथेच्या प्रवाहात ग्रामीण जीवनाचा ओघ मिसळण्याचे श्रेय ज्या चार-पाच लेखकाना आहे, त्यात श्री. ग. ल. ठोकळ याचे स्थान वरचे आहे. अस्सल ग्रामीण वातावरणाने जिचा अणुरेणु भरलेला आहे,



अशा कथा व एक कादंबरीहि त्यानीं लिहिलेली आहे. इतर लेखकाच्या कथा-कादंबऱ्याचीं बहुतेक कथानकें शहरी असतात. आता जगातील बहुतेक शहरे एकछापीच असल्यामुळें इंग्लड-अमेरिकेतील लघुकथाचे टिप-कागदच वाऱ्याने उडून महाराष्ट्रात आले आहेत कीं काय, असा भास होण्यासारख्या ठरींव प्रेम-लीलाच्या व शहरी वातावरणाच्या कथा मराठींत पुष्कळ आहेत. पण येथलींच पात्रे, येथलेच प्रसंग व येथलेच प्रश्न घेऊन मराठी मनाने त्याचे चित्रण करणारे कथा-लेखक विरळा. त्यातहि खेड्याची सय फारच थोडयाना होते. शब्दाशब्दांतून व प्रसगाप्रसगातून जानपद जीवन प्रगट करणाऱ्या कथा रचणारे लेखक मराठीमध्ये हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच आहेत. त्यापैकीं श्री. ठोकळ याची कथालेखनाची कला उच्च दर्जाची आहे. बॅडच्या घोषात शिंगाची सूक्ष्म–तरल ललकारी ऐकूं यावी, तसा अनुभव त्याच्या कथा वाचताना येतो.

## विद्येचें वातावरण

श्री. गजानन लक्ष्मण ठोकळ याचा जन्म अहमदनगर येथे ता. २६ मे १९०९ रोजीं झाला. त्याना विद्येचा वारसा वडील व आई या उभयताकडून भरपूर मिळाला. वडील हे शिक्षण-खात्यात इन्स्पेक्टर होते आणि मातुःश्री या शाळेच्या मुख्याध्यापिका होत्या. त्यामुळे त्याच्या घरात शैक्षणिक वातावरण सतत खेळत असे. गजाननरावाना वाचनाचा छद सहजच लागला. १९२६ सालीं ते मॅट्रिक झाले. पण वाचनाच्या अतिरिक्त छदामुळे त्याना बी. ए. ची पदवी पदरात पाडण्यास नऊ वर्षे लागलीं. या काळात त्यानीं इग्रजी कादबऱ्याचे वाचन मनसोक्त केले. हार्डी, वुडहौस, मो पा सा, ओ. हेन्री, टॉलस्टॉय इत्यादीच्या कथा-कादबऱ्याचा त्यानीं फडशा पाडला. लावण्या-पोवाडे-बखरी या मराठींतील जुन्या वाङ्मयाचाहि त्यानीं अभ्यास केला.

## ग्राम-गीतांचे संग्रह

बी. ए. ची परीक्षा १९३५ मध्ये उत्तीर्ण झाल्यावर दोन वर्षांनीं ठोकळ बी. टी. झाले. शिक्षकीचा हा शिक्का घेऊन ते पुणे येथील ' शिवाजी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूल 'मध्ये अध्यापनाचे कार्य करूं लागले. तेरा वर्षे शिक्षकीचा व्यवसाय ठोकळानीं केला. पण त्याबरोबरच त्याचा लेखन-वाचनाचा छद वाढत होता. त्याचे जीवन खेड्यात गेलेले असल्यानें जानपद गीताचा सग्रह काढण्याची कल्पना त्याचे मनात बराच काळ खेळत होती. तिला मूर्त स्वरूप आले, ते कॉलेजमध्ये असतानाच—१९३३ सालीं. ' सुगी ' या नावाचा विविध कवींच्या ग्रामीण कविताचा हा संग्रह रसिकाच्या प्रशंसेस पात्र ठरला. त्यानंतर केवळ आपल्याच ग्राम-गीताचा सग्रह ठोकळानीं प्रसिद्ध केला. त्याचे नांव ' मीठ-भाकर '. त्याची तिसरी आवृत्ति निघाली व त्यातील बऱ्याच कविता शाळेच्या पाठ्य पुस्तकात घेतलेल्या आहेत, यावरून ठोकळाच्या काव्याची लोकप्रियता कळून येते.

## काव्य व कथा यांची मिठी

बालपण खेड्यात गेलेले, वाचन इंग्रजी कथा-कादंबऱ्याचें आणि

व्यवसाय पुण्यासारख्या शहरांत. या सर्वांचा ठसा ठोकळांच्या संस्कारक्षम मनावर खोल उमटला. ते प्रकृतीनें जसें कवि, तसेंच विनोदीहि आहेत १९२६ ते १९३८ या बारा वर्षांत काव्य-रचना करून त्यांनीं एक तप पूर्ण केलें. त्यानंतर त्यांनीं आपला मोहरा लघुकथाकडे वळविला. ' हिंमत मर्दा ' ही त्यांची पहिली लघुकथा ' किर्लोस्कर 'मध्यें प्रसिद्ध झाली. नंतर किर्लोस्कर, वसंत वगैरे मासिकांत त्यांच्या कथा प्रसिद्ध होऊं लागल्या. त्यांच्या तीस-चाळीस कथांपैकीं कांहीं अस्सल ग्रामीण आहेत, तर कांहीं रहस्य–कथांप्रमाणें अद्‌भुतरम्य वा विनोद-सुंदर आहेत. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें तर, ' काव्य व कथा यांची गच्च हातमिठी ' बहुतेक कथां-मध्यें वाचकांच्या दृष्टीस पडते. एकाद्या काव्य–कल्पनेच्या नशेंत दिवसानु-दिवस गुंगत पडलेले असतांना ते लघुकथा लिहितात. त्यामुळें पाल्हाळ हा दोष त्यांच्या कांहीं कांहीं कथांत डोकावतो. साधारणपणें दहाबारा पानांच्या आंत त्यांची गोष्ट अशी नाहींच. ' गोफणगुंडा ' सत्तावीस पानांची आणि ' मोत्यांचा चारा ' तर अठ्ठावीस पानांची आहे.

## सविस्तर वर्णनशैली

' गोफणगुंडा ' वगैरे गोष्टींची भाषा गोफण-फेकीच्या लयीची आहे. शब्दांची निवड व प्रसंगांचें चित्रण यथायोग्य करण्यांत त्यांची लेखणी कुशल आहे. चमत्कृतिपूर्ण घटनांचें बाह्य वर्णन तेवढें ते सुरेख करतात. मनोविश्लेषण करून स्वभाव-परिपोष साधण्याची आणि त्यामुळें वाचकाच्या भावना हलवून रसोत्कर्ष करण्याची सूक्ष्म व अंतर्मुख कला अद्याप त्यांना वश व्हावयाची आहे. कलेच्या गाभाऱ्यांत त्यांचा अद्याप प्रवेश व्हाव-याचा आहे. त्यांनीं लिहिलेल्या ' गांवगुंड ' या कादंबरींत अंगावर शहारे आणणारे प्रसंग एकामागून एक रंगविले आहेत. ती कादंबरी बोलपटाच्या रुपेरी पडद्यावर चित्रित झाली आहे. तसाच ' सोन्याची लंका ' हा त्यांचा बोलपटहि ग्रामीण जीवन रंगविणाराच आहे. शाळेंतील विद्यार्थ्यांसाठीं त्यांनीं श्री. वि स. खांडेकर यांच्या सहकार्यानें ' मंगल-वाचनमाला ' काढली. पुस्तकांचें प्रकाशन करण्याच्या धंद्यांत ते १९४७

साली शिरले आणि आपल्या जीवनांतील छंदाला अनुरूप असें नांव त्यानीं आपल्या पुस्तकाच्या दुकानास दिले. ते म्हणजे 'श्री–लेखन–वाचन–भाडार.' अद्याप त्याना आपल्या शालेय व काव्यात्मक लेखनातूनच प्रकाशनापेक्षाहि अधिक ' श्री 'चा लाभ होतो. त्याची मनोवृत्ति उमदी व उसळणारी असल्याने त्याच्या हातून वैशिष्ट्यपूर्ण कथा-कादबऱ्या यापुढेहि पुष्कळच लिहून होतील अशी आशा वाटते.

## ग्रामीण गुण–दोषांचे चित्रण

' गोफणगुंडा ' ही एकच कथा ठोकळानीं लिहिली असती, तरी ग्रामीण कथा–लेखकात त्याना सहज स्थान मिळालें असते. आताहि त्यानीं सातच ग्रामीण कथा लिहिल्या आहेत. त्या सर्वात ' गोफणगुडा ' ही नमुनेदार आहे. खेड्यातील दुफळी, अटीतटीचे वातावरण, पिढ्यानुपिढ्याचे हाडवैर तरी स्वाभिमानी व उदार स्वभाव, तेथील खेळ व कष्ट, प्रेम व द्वेष, भोळेपणा व क्रूरपणा या सर्वाचा चित्रपट या एका कथेत ठोकळानीं ठसठशीतपणे दाखविला आहे.

बाणगंगा नावाची नदी. तिच्या दोन काठावरील चरोली व मनोली या खेड्यातून विस्तव जात नसे. हिंमतराव व भवानराव एकमेकाना पाण्यात पहात–एकमेकाचे तोड पाहण्याचे टाळीत. पण योग असा कीं, हिमतरावाचा मुलगा खासेराव व भवानरावाची मुलगी चादणी याचे प्रेम जमले. त्या प्रेमाचा प्रारंभहि खेळताना ओघेसा वीररसात्मकच आहे. खासेराव पानमळ्यात बसला असताना त्याच्या डोक्यावर गोफणीतील धोडा येऊन आदळतो. तो चादणीच्या हातुन न कळत सुटलेला असतो. नायकाला जखम होऊन व रक्त वाहून सुरू झालेल्या या प्रेम–कथेत गोफणगुड्याची व लाठ्याकाठ्याची लढाई होऊनच नायक–नायिकाची लग्न–गाठ बसते. वधू–पित्याने पाच हजार रुपयाचा हुडा कबूल करून शब्द मोडला आणि वरपक्षाला निःशस्त्र करून शस्त्राच्या धारेखालीं लग्न पार पाडले. यामुळे या कथेत आणखीच क्षोभक ( Stunt ) प्रसग निर्माण झाला. तो म्हणजे चादणीचें आपल्या विश्वासघातकी

पित्याशीं गोफणीनें युद्ध. शेवटीं भवानराव पस्तावा पावतो, हुंडा देतो व सख्य जोडतो असे दाखविले आहे. नदीच्या पुरात चादणी पडली असताना खासेराव तिला वाचविण्यासाठीं उडी घेतो, त्याच वेळीं त्या पुरातच त्या दोघाना जल–समाधि मिळाल्याचे दाखविले असते, तर ते आधुनिक तंत्राला जमणारे, वास्तव स्वरूपाचे व परिणामकारक झाले असते.

## गांवरान भाषाशैली

उन्हाळ्यामध्यें खेडयात कशी स्थिति असते याचे वर्णन ग्रामीण शब्दानीं ठोकळ पुढीलप्रमाणे करतात, "उन्हाळा कडक लागला गव्हाचा हंगाम सपला. घरोघर पोत्याच्या टिऱ्या लागल्या. कणग्यात टाकोटाक गहू भरून शेतकऱ्यानीं त्याचीं तोंडे लिपून टाकलीं. शेताशेतातून निचीतीने नागरणी सुरू झाली. जमीन दात वासून ऊन खाऊ लागली. चरोली व मनोली या दोन गावामधून वाहणाऱ्या बाणगगेचे पाणी ढोपराना लागू लागले.' ढोपराइतकेच पाणी असलेल्या बाणगगा नदीच्या काठचा देखावा ठोकळानीं वाचकाच्या डोळ्यापुढे कसा उभा केला आहे पहा. " बाणगगेचे पाणी खडकाळींतून झुळझुळ वाहत होते. पाणकणसाच्या अडोशाला तीनचार बगळे माशावर डोळा ठेवून स्तब्ध होते. इतक्यात ' डुब ' असा आवाज झाला आणि ते बगळे एकदम उडाले. पाण्यावर वर्तुळाकार लाटा उठल्या. खासेराव बाणाप्रमाणे उडणाऱ्या त्या बगळ्याकडे पाहू लागला. "

शेतकीजीवनातील निरनिराळ्या अवस्था अस्मल ग्रामीण शब्दानीं व समर्पक दाखल्यानीं रगविण्यात ठोकळ तरबेज आहेत. पावसाळ्याचे परिणाम त्यानीं पुढीलप्रमाणे वर्णिले आहेत, " मृगाचे शिपकारे सुरू झाले. शेतकऱ्यानीं पेरणीला सुरवात केली. दोनचार पाऊस खाल्ल्यावर जमिनीने कात टाकली. चोहीकडे हिरवेगार दिसू लागले. बाणगंगेनें बाळसें धरले. तिचा फिकटपणा जाऊन ती लालसर दिसू लागली. पावसामुळें खासेरावाच्या फिरण्यात खंड पडू लागला. बऱ्याच दिवसानीं उघाड पडली. आकाश ठिगळे लावलेल्या निळ्या गोधडीप्रमाणें दिसत होतें. "

एकाद्या खेड्यात सकाळीं तुम्ही गेला, तर घरोघर कोणते दृश्य दिसते, याचें चित्र 'गिरणबाबू' मध्ये ठोकळ ग्रामीण रंगानीं रंगवितात, तें असे—" भिमाजीची बायको रखमाई भल्या पहाटे उठून कुरुंदाच्या जगी जात्यावर बसे व दोन पायल्या दाण्याचे धाणे दळून त्याचे भुसकट करी. तिची थोरली सून सईबाई चुलखंडाच्या जाभाटात डोंगरावरून तोडून आणलेले खैराचे खाडके खुपसून जाळ करी व पुढ्यातल्या काठवटींत भाकरी ठोकायला बसे. दिवस हातभर चढण्याच्या अवमरी हातभर उंचीच्या भाकरीच्या दोन चवडी तयार होत! धाकटी सून गहूबाई गोठ्यातला शेणामुताचा खातेरा आवरून बैलाना व गाईम्हशींना चारापाणी देई व धार काढायला बसे. बैलावरच्या भल्याथोरल्या पातेल्यात चार चरव्या रिचवल्यावर ती दुदश करी. असा होता भिमाजीच्या घरचा बारदाना!"

नागपंचमीचा सण खेड्यात मोठ्या उत्साहाचा. त्याचे वर्णन दोनचार वाक्यात लेखकाने कसे केले आहे, पहा—" नागपचमी आली. लोकानीं फांद्याफांद्यावेर झोके बाधले. गारुड्याच्या पुंग्या वाजू लागल्या. झोक्याबरोबर नागाच्या फडा झुलू लागल्या बायकानीं धरलेले फेर पहाण्यासाठीं ढगाच्या खिडकीतून सूर्याचे किरण बाहेर डोकावू लागले."

" दौलतजादा " या गोष्टीतहि खेड्यातील विविध ऋतूंची दोलत एकएका वाक्यात लेखकाने वर्णिली आहे. ते वर्णन अस्सल ग्रामीण शब्दात केले आहे. ते असे. " त्या वेळीं कोपरगावच्या पचक्रोशींत धुव्वाधार पाऊस पडे. सारीं शेत ज्वारीबाजरीच्या धाटानीं फुलून जात. सरत्या पाणकळ्यात गहू—हरभऱ्याचा पेरा होई. थंडीची हुडहुडी सुरू झाली कीं, दहिखदाण्याची पखरण पडे आणि ओंब्याओंब्यातून व धाट्याधाट्यातून दाणे मस्त पोसत. शेतकरी भारी आनंदात असत."

## रेखीव शब्द-चित्रें

वार्षिक जत्रेच्या वेळीं गोफण-फेकीचे खेळ त्या खेड्यामध्यें होत. त्यावेळचें दृश्य लेखकानें कौशल्याने चितारलें आहे. तें असें,—" दोन्ही

गावातले शंभर शंभर जवान पुढे सरकले व दगडाच्या ढिगाराच्या अवधानाने जागा व दबा धरून उभे राहिले. वाळूत पाय भाजू नयेत म्हणून त्यानीं पायतणे घातलीं होतीं, डोक्याना चारी बाजूनीं मुडाशीं गच्च आवळून बांधली होती. धोतराचे काचे गुडघ्यापावेतो कसलेले होते; आणि पैरणी धोतराच्या आत खोचलेल्या होत्या. सुभाच्या दणकट गोफणी त्याच्या हातात सापाप्रमाणे लोंबत होत्या. सुखाने कर्ण्याला तोंड लावले. कर्ण्याचा आवाज होताच लढाईला तोंड लागले. गोफणी हवेत भिरभिरू लागल्या. दगड सू सू करीत सुटू लागले.''

गोफणींचे ते सामने पाहण्यासाठीं हिंमतराव आले होते. त्याचे शब्दचित्र ठोकळानी सुस्पष्ट काढले आहे. ते असे. "हिंमतरावानीं चुण्याचुण्याचा मांडचोळणा चढवला होता—व पायात पंजाबी चढाव घातले होते. अंगातल्या पांढऱ्याशुभ्र लांब अंगरख्याच्या आतून त्यानीं हिरव्या रंगाचे किनखापाचे जाकीट घातले होते. त्याच्या डोक्यावर पिळाची पगडी शोभत होती त्याच्या भरदार चेहेऱ्यावर गालमिशा व कल्ले एकमेकात मिसळले होते. ते घोड्यावरून उतरले व काखेत शाल व तरवार धरून आपल्या जागेवर जाऊन बसले '

सामने सुरू झाले. खासेरावाने गोफण फिरविण्यास आरंभ केला. त्याचे चित्रण ठोकळानीं बोलक्या शब्दानी तपशीलवार केले आहे. ते असे, "त्याची गोफण इतक्या जोराने फिरू लागली कीं, जणू काय दोरखंडाची छत्रीच त्याने आपल्या डोक्यावर धरली होती. नेम धरून त्याने गोफणीचा पदर सोडला. दगड वाऱ्याला कापीत बाणगंगेच्या पात्रावरून उडाला आणि नेमका भवानरावाच्या पुढ्यातल्या हुक्क्यावर जाऊन आदळला. हुक्क्यातले निखारे भवानरावाच्या अंगावर सांडले. म्हातारा ताडदिशीं उभा राहिला आणि खासेरावाकडे पाहून हातवारे करू लागला. हिंमतराव आनंदाने बेहोष होऊन ओरडले, "शाबास रे मेरे पठे !" खासेरावाने दुसरा दगड गोफणींत भरला. दगड गुईंगुईं करीत जो निघाला तो भवानरावाच्या पगडीला लागला.''

## अलंकारहि शेतकीचेच

'गाभुळी चिंच' या कथेतहि गोफण–फेकीचें वर्णन आले आहे. तें असे, "एका शेतात आमच्या गड्याची मुलगी भीमा गोफण फिरवून पाखराना हाकारा घालीत होती. मी तिच्याजवळ जाऊन तिच्या हातातली गोफण घेतली व दोनचार गोफणीच्या फेकी केल्या. सू सू करीत माझ्या गोफणींतून पळणारे धोंडे आणि 'हर्र हर्र हृ हू' असा मी उच्च आवाजात केलेला पुकारा याने शेतावर आलेलीं सर्व पाखरे हा हा म्हणता उडून गेली."

सूर्योदयाचे वर्णन कैक ललित लेखकानीं केले आहे, पण 'तुफानी ताडेल'मध्ये टोकळ तेच वर्णन कसे करतात, पहा. "समुद्राच्या कुशींतून सूर्याचे तांबडे वर्तुळ वर सरकू लागले. पाणविस्तवाच्या नवकोट ठिणग्या एकदम फुलून, उफाळून वर उठाव्यात त्याप्रमाणे समुद्राचे पाणी लालीलाल झाले. क्षितिजाशीं भिडलेल्या मचव्याचीं शिडें लागून जाळाच्या शेड्या-प्रमाणे दिसूं लागली"

कथेच्या प्रवाहात जाता जाता ज्या उपमा व दृष्टांत टोकळ देतात, तेहि ग्रामीण भूमींतीलच असतात. त्याचे काही नमुने— 'धारोष्ण दुधाचा प्याला फेस फुकून फुकून सावकाश प्यावा, त्याप्रमाणे लखूजी तिला हळुवार-पणे वागवीत होता." "सुगीच्या दिवसात भरलेल्या कणसावर चिवचिव करीत झेपावणारीं पाखरे खळ्याचे काम सपवून जमीन उघडी पडल्यावर तिकडे फिरकतील कशाला?" "उमद्या मनाच्या गाभाऱ्यातून बाहेर पड-लेल्या त्या मोकळ्यामाकळ्या हास्याची खुदखुद हवेंत उंच चढून आका-शाच्या साळीला जाऊन भिडली."

'गाभुळी चिंच' मधील नानाने चार वर्षे आपले प्रेम आटोक्यात ठेवले. पण खेड्याचे मोकळें वारे लागताच ते अनावर झाले. त्याची मन:स्थिति खेडूत उपमेनेच निवेदिली आहे. "बाजरीचे शेत पिकून त्याला गच्च फुलवरा यावा, तसे माझें मन तिच्या विचारानीं भरून गेलें होतें. पण तिचे मन? खोल पाणी असलेल्या चिंचोळ्या विहिरीचा तळ जसा कधींच दिसत नाहीं, तसें होते तिचे मन. एखादा सूर्यकिरणाचा

कवडसा येऊन तो तळ दिसावा, यासाठीं माझी केवढी धडपड ! ” मात्र शेवटीं नायक-नायिकाच्या प्रेमाचा जो आविष्कार दाखविला आहे, त्यात कला अशी फारशी नाहीं. शहरी नखरा किंवा लज्जा न दाखविली, तें योग्यच आहे; पण अगदीं रानटी माणसाचे जे चाळे दाखविले आहेत, ते रंगेल प्रेमाचेहि सुदर नमुने म्हणता येणार नाहींत. रहस्यमय चित्रपटातल्याप्रमाणें धावपळ व चावाचावी यात कला काय आहे ! व त्याच्या स्वभावाची उकल तरी काय आहे ! केवळ बाह्य कृति दाखवूनच ललित लेखकाचें कार्य संपत नाहीं.

## शेतकरी-जीवनांच्या दोन बाजू

खेड्यातील प्रेमाचे प्रवाहहि शहरातल्या इतकेच वाकडेतिकडे असतात—आडमुठेपणामुळें ते गढूळहि दिसतात. हरबा हा वारकरी. तो पंढरीच्या वारीला गेला. ही संधि साधून त्याची बायको एकाने पळवून नेली. त्याला बडवून हरबाने आपली बायको परत आपल्या घरीं आणली. एवढेंच कथानक ‘ म्होतूर ’ या कथेचे आहे. खेड्यात अशीं लफडीं नेहमींचीं असतात. या कथानकाचा विस्तार व रंगभरणी ठोकळानीं सूक्ष्मतेनें केली आहे. प्रारंभींचें लग्नाचें वर्णन घेतले तरी तें आटोपशीर असून डोळ्यापुढें दृश्य उभें करणारें आहे. ग्रामीण भाषा व सर्वांगीण वर्णन हे त्याचे दोन्ही ठळक गुण या वर्णनात उठून दिसतात. तें वर्णन असें—“ गावोगावचे लोक लग्नाला लोटले. बैलगाड्याची रीघ लागली. धूमधडाक्यानें लगीन लागले. खंडीखंडी गव्हाचा भरडा शिजून निघाला. लापशीचे डोंगराएवढे ढीग पडले. पंगतीवर पंगती उठल्या. वाढून वाढून गांवकऱ्यांच्या कमरा खिळखिळया झाल्या. पडगावला हें लगीन चागलेच गाजलें. झालझेंडा झाल्यावर आडगावचें लग्नाचे वऱ्हाड परत फिरलें. नवरीच्या पाठराखणीला तीन करवल्या निघाल्या. घुंगुरमाळाच्या तालावर बैल मोठ्या हिरीरीनें धावत सुटले. ”

लग्नानंतर हरबा पंढरीच्या वारीस निघाला. वारकऱ्याचें शब्दचित्र ठोकळांनीं किती थोडक्यांत पण किती ठसठशीत काढलें आहे पहा.

" डाव्या खांद्यावर पडशी, गळ्यात टाळ अडकविलेले, उजव्या खांद्यावर भगवें निशाण व डाव्या हातांत चिपळ्या अशा थाटांत हरबा दाराबाहेर पडला. त्यानें हरणीकडे ढुकूनहि पाहिलें नाहीं. "

पालखी हलली. वारकऱ्याचा ताडा भजन करीत तिच्यामागून निघाला. कांहीं बायका डोक्यावर तुळशीची रोपें घेऊन निघाल्या होत्या. गांवकरी पालखीला पोंचवायला वेशीपर्यंत गेले.

## मानवी कर्तृत्वाला प्रेरणा

वारीहून परतल्यावर हरबाला आपल्या ससारावरची सक्रात कळली. तो वारकरी असला तरी स्वाभिमानी होता, कणखर होता. नुसता " टाळकुट्या " नव्हता. तो तालीमबाज बनला. त्यापूर्वी " ताठरलेल्या डोळ्यानीं हरबा सकाळी उठला, तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर निश्चयाची झाक होती. तुकारामाचा गाथा आणि ज्ञानेश्वरी या ग्रंथाना रुमाल गुंडाळून त्यानें ते माळ्यावर ठेवून दिले, टाळ आणि चिपळ्या त्यानें अडगळीच्या खोलींत फेकून दिल्या; जोत्याच्या दगडावर त्यानें आपली एकतारी दात खाऊन आपटली—तिचे तुकडे तुकडे झाले ! गळ्यातल्या तुळशीच्या माळेला त्याने जोराचा हिसाडा दिला. माळेतले दाणें घरगळत घरगळत चौकात जाऊन पडले." ईश्वरावरील श्रद्धा बाजूस पडली व मानवी कर्तृत्व जागें झालें. अन्यायाच्या प्रतिकारासाठीं झगडण्यास हरबा तयार झाला. म्हणून त्याने व्यायाम करून शरीर सुदृढ बनविण्यास आरंभ केला असें कथा-लेखकानें सागितलें आहे, पण सूड इतका संयमी असतो का ? शरीर-सामर्थ्याशिवायहि सूड उगविल्याचीं उदाहरणें थोडीं नाहींत. पण ठोकळाचा हरबा सनदशीरपणें व उघडपणें सूड घेतो. त्यानें प्रथम काय केलें ? तर " हरबाच्या वाड्यातले भजनाचे सूर विरून गेले. त्याजागीं मेहनतीच्या डरकाळ्या घुमू लागल्या. निवृत्तीनें माघार घेतली. प्रवृत्ति पुढें सरकली. देवभक्तीचीं राख उडून गेली. जातिवंत मराठशाहीचा निखारा धगधग करूं लागला. अवघ्या तीन महिन्यांत हरबाची कळा पालटली. त्याच्या तोंडावरल पिवळेपणा जाऊन तो लालबुंद दिसूं लागला. त्याची

छाती पेलदार झाली, दंडावरल्या बेटकुळ्या फुगल्या आणि त्याच्या माडयाचे पट फिरले. बोलताना त्याचा आवाज एडक्याच्या हुकाराप्रमाणें येऊं लागला." तालीम बाजाचे हे शब्दचित्र किती हुबेहूब आहे !

## कुस्त्यांचें शब्द-चित्र

हरबानें आपल्या सामर्थ्याची कसोटी कुस्त्याच्या फडात लावली आणि साऱ्या गावकऱ्याना चकित केले. खेड्यातील कुस्त्याचा देखावा कसा असतो ? तर " पहिलवानाच्या कुस्त्या सुरू झाल्या. सलामी झाली रे झाली कीं, त्याचीं तुळतुळीत शरिरें एकमेकाना भिडत व डावपेचाना सुरवात होई. दडावर दड, माडीला माडी किवा छातीला छाती घासताना शेराचे फोक एकमेकावर घासल्यासारखा आवाज होई. चीतपट करणाऱ्या पहिलवानाला त्याच्या कुवतीप्रमाणे मुडासे अगर चादीचे कडे मिळे. ढोलकी जोरजोराने वाजत होती. लोकाचा जमाव अधाशीपणाने कुस्त्या पहात होता. एखाद्या पहिलवानाची पाठ जमिनीला लागली कीं, ते कसून टाळ्या पिटीत व एकच गलका होई. "

अशा कुस्त्याच्या हगामात झिंग्या हा अजिंक्य ठरला होता. त्याच्याशींच दोन हात करण्याची हिंमत हरबाने दाखविली. त्या दोघाच्या लढतीचे वर्णन ठोकळानीं वीरश्रीच्या भावेंने केले आहे. " एक काळाझार व दुसरा पिवळाधमक असे दोन नागच जणू काय फुसफुस करीत एकमेकाशीं भिडले होते..... झिंग्याची पोलादी छाती लोहाराच्या भात्याप्रमाणे खालींवर होऊ लागली. हरबालाहि चागलाच दम लागला होता. दोघाचीं शरीरें घामाने न्हावून निघालीं. ओल्या अगाला ठिकाठिकाणीं माती चिकटल्यामुळे हरबा बिबऱ्या वाघासारखा दिसत होता. "

## कोल्हाट्यांचें शील

खेडयांतील अडाणी, भोळ्या, भित्र्या व कंगाल जनतेवर ' खानदानी ' श्रीमंत व सत्ताधारी लोक किती प्रकारांनीं अन्याय व जुलूम करतात याची कल्पना शहरांत वाढलेल्या सुशिक्षिताना कदापि येणार नाहीं. ती कल्पना आणून देण्याचें श्रेय ठोकळासारख्या कलावंतांना आहे. खेडूत

जनतेचे अज्ञान—दारिद्र्यादि दोष जितके मोठे, तितकेच इमान—अब्रू इत्यादि गुणहि उंच. गावोगाव खेळ करीत भटकणारे उघडेवाघडे कोल्हाटी, पण तेहि आपल्या शीलाला किती जपतात हें ‘ कडू साखर ’ या कथेत ठोकळानीं दाखविले आहे. साखरी ही कोल्हाट्याची मुलगी. ती रस्त्यावर कसरतीचे खेळ करून दाखवी. तिच्या सौंदर्यावर बाळासाहेब इनामदार भाळले. त्यानीं साखरीबरोबरच्या लिंबाजी वगैरे साथीदाराना आपल्या वाड्यात रात्रीं जेवावयास बोलावले आणि खूप दारू पाजली ते स्वतः कोल्हाट्याच्या वस्तींत गेले व साखरीवर हात टाकूं लागले. याचा सूड म्हणून दुसरे दिवशींच्या खेळात, बाळासाहेबाना गोड बोलण्यानें झुलवून, साखरीने पेटाऱ्यात बसविले आणि आडवेतिडवे सुरे मारून त्याना ठार केले. असें हें रोमांचकारक कथानक आहे. कोल्हाट्याच्या वस्तीचें वर्णन ठोकळ पुढीलप्रमाणें करतात, “ गावाबाहेरच्या मैदानात कोल्हाटी लोक मेखा ठोकून, त्याना दोर बांधून, पाले उभीं करीत होते. त्याच मेखाना शेळ्या, बोकड आणि एडके बांधले होते. पलीकडच्या बाजूला बैलगाड्या सोडल्या होत्या. आजूबाजूच्या झाडाना घोडे बांधले होते. बैलाच्या आणि घोड्याच्या पुढ्यात वैरण टाकली होती. कुत्रीं इकडे तिकडे भटकत आणि भुंकत होतीं. कोंबड्या फडफड करीत दाणे टिपीत होत्या. ”

## ठसठशीत स्वभाव-चित्रें

कोल्हाट्याचे खेळ पहाण्यास खेडूत किती उत्सुक असतात, हें सांगताना ठोकळ म्हणतात, “ इतक्यात ‘ साखरी, साखरी ’ असा कल्लोळ सुरू झाला. चार हजार माना करदिशीं वळल्या. लिंबाजीच्या खांद्यावर उभी राहून साखरी येत होती. तें दृश्य मोठें पाहण्यासारखे होतें. तंग कसलेल्या लंगोटात लिंबाजीचा उंचापुरा पिवळाधम्मक देह त्याच्या नांवाप्रमाणेंच चमकत होता. त्याच्या उमद्या चेहऱ्यावर हसूं खेळत होतें. आपली आवडती मैना उडून खांद्यावर येऊन बसावी ना, तितकीच त्याला साखरीच्या ओझ्याची दखल होती. लांबलांब ढांगा टाकीत तो खेळाच्या जागेकडे येत होता. ” लिंबाजीची सामर्थ्यवान मूर्ति लेखकानें

वाचकापुढें कशी सहज उभी केली आहे. तिच्याप्रमाणेच साखरीची मूर्तिहि त्यानें कौशल्यानें रंगविली आहे. तिचें सौंदर्य कसे तीक्ष्ण होतें, हें तिच्या नुसत्या डोळ्याच्या वर्णनावरून ठोकळानीं सागितले आहे. ते लिहितात.

" ते तिचे काळेटपोरे डोळे—पिवळी जर्द तल्लख नागीणसुद्धां नजर टाकताच थबकेल असें पाणी होतें त्या डोळ्यात. बहिरी ससाण्यानें झेप टाकावी तशीं तिच्या डोळ्यातलीं बुबुळे इकडे तिकडे फिरून जमलेल्या लोकाच्या अतराचा ठाव घेत होतीं. त्यात मार्दव होतें का ? छे, मुळींच नाहीं ! सौदर्य ? नव्हतें असे कसे म्हणता येईल ? पण तिच्या नावाची गोडी तिच्या डोळ्यात खास नव्हती. चार क्षण तिच्या डोळ्याकडे टक लावली, तर आपल्या डोळ्यात मिरची गेली असें वाटत असें लोकाना. "

कोल्हाटी वाड्यात जेवावयास बसले असतांना ' मागल्या बाजूनें एक व्यक्ति अंधारातुन बाहेर पडली ' असा मोघम उल्लेख करून ठोकळानीं कथेत रहस्यपूर्णता आणली आहे. मात्र साखरी सूड घेण्यासाठीं एक दिवस थाबते व दुसरे दिवशीं प्रेमाचे नाटक करते आणि त्याला बळी पडून बाळासाहेबामारखा मातबर माणूस 'मत्राने भारल्याप्रमाणे' पेटाऱ्यात बसून स्वत:ला खेळणे करतो, हे सारे प्रकार अस्वाभाविकच वाटतात. सूड किंवा प्रेम याना काहींहि शक्य असते, अशीच लेखकाची कैफियत असल्यास कोण जाणे !

## विनोदाचा स्थूलपणा

ग्रामीण भाषा व सर्वांगीण वर्णन या दोन ठसठशीत गुणांमुळें ठोकळांच्या जानपदकथा विशिष्ट महत्त्व पावल्या आहेत. पण त्याशिवाय त्यानीं शहरी प्रेमाच्या व विनोदी वृत्तीच्या म्हणून ज्या कथा लिहिल्या, त्यांत त्याचें तें विशिष्ट महत्त्व तर दिसत नाहींच, पण दुसरेंहि काहीं वैशिष्ट्य आढळत नाहीं. ' जो तो आपल्या आखाड्यात भारी ' हा पैलवानांचा ठोकताळा ठोकळांनीं ध्यानीं ठेवला पाहिजे. प्रणयी अंतःकर-

णाच्या नाजूक तारा छेडण्याचें कसब त्यांच्या कलमात नाहीं, किंबहुना कोणत्याच अंतःकरणाला त्याचें कलम स्पर्श करूं शकत नाहीं. तें वरवरच फिरतें. विनोदी कथात तर सायकलीचे धक्के लागणें, धावपळ करणें वगैरे शारीरिक कसरतींचेच प्रयोग फार आहेत. बुद्धीचा विनोद करण्याची सूक्ष्मता त्याच्या लेखणींत आलेली नाहीं. बाह्य क्रियाचा स्थूल विनोद निर्माण करताना शक्याशक्यतेच्या व सभ्यतेच्या मर्यादाहि ते नेहमींच सभाळूं शकत नाहींत. ' ससारातील मीठ ' या कथेंत त्यानीं स्त्रीला पतीकडून मिळणारा मार सुखाचा वाटतो असें दाखविले आहे, आणि त्यात कलाहि फारशी नाहींच. य. गो. जोशी याची ' पाजरपोळातली गाय ' किंवा सौ. मुक्ताबाई दीक्षित याची 'शिकारी' या कथात त्याच्यासारखाच विचार किती सूक्ष्मतेने व सूचकतेने माडला आहे हें पहावे.

## शब्द-लीलांचा मोह

विनोद निर्माण करण्यासाठीं शारीरिक कवायतीबरोबरच शाब्दिक कसरतीहि करण्याचा मोह ठोकळाच्या पात्राना होतो, ही त्याच्या लेखनाची प्राथमिक अवस्था होय. 'बा'ची ( म्हणजे बायकोची व B. A. बी. ए. ची ), धक्याला आगबोट लागली, जोडा जमणे—जोडा मारणे, इत्यादि श्लेष ओढूनताणून आणलेले दिसतात. विनोदासाठीं त्यानीं 'ठेच' या कथेतील नायकाचे वर्णन बीजगणिताच्या भाषेंत केलें आहे. तें पुढीलप्रमाणे,

" शिदू या नावाचे समीकरण :—

श्रीधर = श्री + धर

श्री = श + री

श्रीधर = (र + र) = शीध

शीध = इ + ऊ = शिधू

बोलतांना धूचा दू करतात.

∴ ( एतदर्थ ) शिदू

शिदू या व्यक्तीचें समीकरण :—

सर्व साधारण चेहरा + दाढी व मिशा ( बोडल्यामुळे ) + डोक्यावर केस ( ठेवल्यामुळें ) + चार पाच फुटकुळ्या + थोडासा गभीरपणा ( बावळटपणाच्या सदरात मोडणारा ) = शिदूचा चेहरा.

पपलिनचा सदरा (मळका) + रिपकॉर्डाचा कोट (बिनइस्तरीचा) + फिनले मिलचे पातळ धोतर ( ताबूस रग चढलेले ) + वनातीची टोपी + चपला ( कोल्हापुरी ) = शिदूचा पोषाख, शिदूचा चेहरा + शिदूचा पोषाख = शिदू ही व्यक्ती."

हा विनोद कोणत्या प्रतीचा आहे, हें सागावयास हवें आहे काय !

## अस्वाभाविकतेचा दोष

स्वाभाविकपणाला तर ठोकळानीं आपल्या विनोदी कथात हद्दपारच केलेले दिसते. ' पहिले चुबन ' या गोष्टींतील नानासाहेब व भाऊसाहेब या वृद्धाच्या कॉफींत नायक भाग घालतो व त्यामुळे त्या तिघाचे पेटी-वादन, काव्य--गायन व नृत्य सुरू होते असें दाखविले आहे ! भागेच्या तारेंतीलच साऱ्याचे बोलणे ! मग त्याचे गुणावगुण कोण पहाणार ? 'फिट-फाट ', ' हिंमत मर्दा ', ' पाऊस व प्रेम ' इत्यादि कथात प्रत्यक्ष भाग नसली, तरी पात्राचे वर्तन भाग प्याल्यासारखेंच वाटते. प्रेमपत्रे व प्रेमभेटी गुपचूप पळविणारा गोपाळ जितका काल्पित सृष्टींतील, तितकेच तालमीवर खूष होणारे दादासाहेबहि ! बिचाऱ्या बहिरू गवळ्याच्या भावनेकडे लक्ष देण्यास कथा-लेखकाला सवड कोठे आहे ? रेशन ऑफिसात कारकुनी करणारे सुधीर व सुधा याचे प्रेम व लग्न ' चिमणाचिमणीं 'त दाखविलें आहे. त्यातहि लेखक त्या त्या पात्राशीं समरस होताना दिसत नाहीं. दूर उभें राहून, दुर्बिणींतून दुसऱ्याच्या प्रेमलीला पाहणे व त्या मिस्किलपणें खुलवून सागणें हीच भूमिका त्याने घेतलेली दिसते.

## रचना-सौंदर्याचा नमुना

ग्रामीण कथा लिहिण्यांत ठोकळ यांचें दिघे यांच्याशीं जसें साम्य आहे, तसेंच अद्भुतरसात्मक कथा लिहिण्यातहि आहे. 'मोत्याचा चारा' या संग्रहातील बहुतेक कथा अशा गूढ-रम्यच आहेत. पण त्यात प्रमाणबद्ध रचनेच्या दृष्टीनें प्रशसनीय अशी लघुकथा म्हणजे 'मोत्याचा चारा' हीच. शिंदुर्णी या खेडयाजवळील एका ओढ्याच्या गुल्बशीच्या डोहात सहा पुरुष पाणी होतें. त्यात दर बारा वर्षांनीं मोती तयार होत. ते मोती कसे ? तर "संध्याराणीने आपल्या शलाकानीं या मोत्याना कुरवाळले असेल कां ? कीं डोहाच्या सभोवार दाटलेल्या कण्हेरी व गुल्बशी या रानझुडुपाच्या फुलाचा गर्द तांबडा रंग पाण्याच्या जाड थरातून ओघळून खालीं जातांना फिकट होऊन गुलाबी झाला ? गवताच्या हिरव्यागार, नाजूक पात्यावर तरळणारे दवाचे थेंब, अरुणाची प्रभा पोटात घेताना, अकल्पितपणें गोठून खालीं पाण्यात तर नाहीं ना सांडले ?" एकजात गोल, गुलाबी व गोळीबंद मोती !

अशा मोत्याच्या खाणीपाशीं नायक एकदा बसला असताना त्याला तेथे विलक्षण सौंदर्य अकस्मात् पहावयास मिळाले. "भुरभुरती श्रावण-सर नुकतीच येऊन गेली होती. ढगाच्या चाळणींतून गळणारे सूर्याचे ओलावलेले कवडसे डोहाच्या पाण्यावर पडून उलटत होते. गवताचीं हिरवीगार बेटे, झाडझडोऱ्याच्या हिरव्याजर्द फांद्या, कण्हेरीचे तांबडेलाल गेंद आणि गुल्बशीचे नाजुक, लाल झुबके हे एकात एक मिसळून अशी रंगीबेरंगी, सुंदर शोभा निर्माण झाली होती कीं, कुणाला वाटावें, भरीस भर म्हणून, पाचूच्या खाणींत माणकाची खाण फुटली आहे ! मी मात्र माझ्या मोत्याच्या खाणींत पूर्णपणे रममाण झालो होतों. अशा वेळीं एक तरुण मुलगी भुकाऱ्याने माझ्या शेजारी येऊन उभी राहिली. मी तिच्या-कडे पाहिलें आणि माझ्या हिशेबीं या तिन्ही खाणींचा भाव खाडदिशीं उतरला." या लहानशा उताऱ्यातहि ठोकळानीं पर्जन्यवृष्टीचें, वनस्पति-सृष्टीचें आणि मानवी सौंदर्याचें वर्णन किती बहारीनें केलें आहे ! केशव

व बाबी यांच्या प्रेमाची ही शोककथा माडली आहे, तीहि वाचकाची जिज्ञासा सतत वाढत राहील अशा रचना–कौशल्यानें.

## कारुण्याचा स्पर्श

' सुगंध ' या कथेत कारुण्याचे थोडेसे स्वाभाविक सूर ऐकूं येतात. या एका कथेत चौघाचे मृत्यु कोंबले आहेत. प्रेमभग झालेल्या हृदयाची कथा हृदयस्पर्शी आहे. कथेचा विनोदी प्रारभ, पार्श्वभूमीसारखा उपयोगीं पडतो. लेखकानें चादण्या रात्रींचे छोटेसे पण सुरम्य वर्णन केले आहे. ते असे, " आकाशाच्या निळ्याभुऱ्या अंगणात जाई–जुई–मोगऱ्याचीं इवलीं इवलीं पाढरीं पाढरीं फुले विखुरलीं होतीं. पश्चिमेनें आपल्या कपाळीं चंदनाचा ढळढळीत टिळा लावला होता. "

चादण्या रात्रीं गप्पा मारणाऱ्या मित्रमंडळींत फौजदाराचा भावशून्य व अधाशी स्वभाव पुढीलप्रमाणे दाखविला आहे. " मुरकुटे फौजदारानीं अत्तरदाणींत बच्चदिशी बोट घातले व तिच्यातला अर्धा फाया काढून तो आपल्या कानाच्या बेचक्यात खुपसला. बोटाचा वास घेत ते म्हणाले, " अहो वखारवाले, या हीन्याला ' नाहीं ' म्हणू नका अं ! " आपण फार विनोद केला या कल्पनेने मुरकुटे जोरात हसले."

## शहरी जीवनावर टीका

खेडें व मुंबई–दोन टोकें ! तीं जोडणारी कथा म्हणजे ' वाघाचा डोळा !' खेड्यांतील दुकानदार लालचंद काटकसरीनें, कंजूषपणानें रहातो; पण त्याचा मुंबईतील भाऊ मोटारी उडवितो. त्या मोटारीच्या धुळींतील सुवर्णकणानें लालचंदच्या नोकराचे डोळे दिपतात व ते मुंबईस जातात. पण तेथे माणुसकीला वाव कोठला ? व्यसनाचा नाच मात्र चालू ! ही शहरी जीवनाची काळी बाजू लेखकानें चागली रंगविली आहे. आपला मुंबईकर श्रीमंत भाऊ आज आपल्या खेड्यांतील दुकानांत पायधूळ झाडणार, या आनंदानें लालचंदचा दिनक्रम सुरू झाला, तो असा, " लवकर आंघोळ आटोपून लालचंद आंतल्या घरांतून बाहेरच्या

दुकानांत आले. फुलछाप साबू लावून धुतलेला मलमलचा खमीस त्यांच्या अंगात होता. धोतरावरून चढवलेली चांदीची जाड साखळी खमिसाच्या आतून चमकत होती. भुसार मालाच्या व्यापाराची काळजी करून त्यांचें शरीर कृश झालें होतें. सोन्याच्या जाडजूड बाळ्यांनीं त्याच्या कानाचीं पाळीं लोंबू लागलीं होतीं. केशरी पागोट्याखालीं आठ्यांनीं दुमडलेल्या अरुंद कपाळपट्टीवर त्यांनीं केशराचें गंध लावलें होतें. डोळे किलकिले करून त्यांनीं दुकानाची साफसूफ पाहिली व ते खूष झाले."

त्या दुकानाचें वर्णन बारीकसारीक तपशिलांनीं लेखकानें अगदीं कोरले आहे. तें पुढीलप्रमाणें—"एका कोनाड्यात बालाजीची तसबीर ठेवलेली होती. कोनाड्याच्या एका बाजूला 'शुभ' व दुसऱ्या बाजूला 'लाभ' अशीं अक्षरे कुंकवाच्या बोटानें काढलेलीं होतीं. लालचंदनें बालाजीची पूजा केली व मुद्दाम बनवून आणलेला दोन पैशाचा हार तसबिरीवर चढवला. पूजा संपल्यावर रोजच्याप्रमाणें उदबत्ती विझवून न ठेवतां त्यांनीं ती तशीच पेटत राहूं दिली. गादीवर परीटघडीची चादर टाकून त्यांनीं तक्क्यावर शुभ्र अभ्रा चढवला."

मुंबईत गेलेल्या खेडूत रंगनाथला काय दिसलें ? लक्ष्मी ही ज्यांची बटीक झाली आहे, ते सट्टेबाजारांतील शेटये म्हणजे संपत्तीच्या 'अत्तराच्या कुप्याच.' पण त्या सट्टेबाजारांतील देखावा, रंगनाथाला, दारुड्यांच्या किंवा वेड्यांच्या जमावासारखाच वाटला. त्याचें शब्द-चित्र पहा,

"रंगनाथला वाटले, मुंबई म्हणजे एक झाड, भुलेश्वर ही एक फांदी, समोरची इमारत हें मधाचे पोळें आणि हे सटोडिये म्हणजे मधमाशांचा थवा. टेलिफोनच्या शेंकडो घंटा एकसुरी, एकमेळी किणकिणत, ठणठणत होत्या. रंगनाथनें बंबखान्यांतल्या आगीच्या बंबाकडे पाहिलें. त्याला वाटलें, त्या बंबाची घटा झक मारते आहे ! भावाच्या विचारणा चालल्या होत्या. भाव येत होते. भाव जात होते. तेजीमंदी तालातालानें पुढेंमागें सरकत होतीं. पिसाटल्याप्रमाणें तें शेंकडो सटोडिया हो हो करून ओरडत होते. रंगनाथला वाटलें, बेलापूरच्या मराठी शाळेंतले झाडून सारे वर्ग एकत्र जमून परवचा म्हणत आहेत."

शहरी जीवनाची हीन बाजू व खेडूत जीवनाची उजळ बाजू दाखविणाऱ्या लघु-कथा ठोकळ उत्तम प्रकारें लिहूं शकतील. कारण त्याना दोन्ही जीवनांचा अनुभव आहे आणि तो अनुभव कलेच्या द्वारा प्रगट करण्याचें कौशल्य त्याच्या अंगीं भरपूर आहे.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) कथा-वाङ्मयात ' ग्रामीणकथा ' असा निराळा प्रकार मानतात. त्या प्रकाराचीं वैशिष्ट्यें कोणतीं ? मराठींत अशा कथा लिहिणारे कोण कोण लेखक आहेत ?

( २ ) श्री. ठोकळ याच्या लेखन-कार्याची माहिती लिहा.

( ३ ) ' गोफणगुंडा ' ही कथा वाचा आणि त्यांतील ग्रामीण वातावरण लेखकाने कसें निर्माण केलें आहे तें सविस्तर लिहा.

( ४ ) " खेडयातील जीवनांत संथपणापेक्षां संघर्षच अधिक असतात. " श्री. ठोकळाच्या कथाच्या आधारें या विधानाचें स्पष्टीकरण करा

( ५ ) कोल्हाटी, पेहेलवान, फौजदार, दुकानदार—खेडयांतील या व्यक्तींचीं शब्दचित्रें रेखाटा.

( ६ ) ' मोत्यांचा चारा ' ही लघुकथा वाचून त्या कथेचें थोडक्यांत परीक्षण लिहा.

# सौ. मुक्ताबाई दीक्षित : : ५

भारतीय भाषातील वाङ्मयाची तोंडओळख करून देणारें 'पेन'चें एक इंग्रजी पुस्तक नुकतेंच इंग्लंडात प्रसिद्ध झाले. त्यात मराठींतील ठळक लेखिका म्हणून जीं दोन नांवें घेण्यांत आलीं आहेत; तीं म्हणजे विभावरी



शिरूरकर व मुक्ताबाई दीक्षित. यापैकीं कादबरींच्या क्षेत्रात विभावरीबाईंनीं किती क्रातिकारी कामगिरी केली, याचें दिग्दर्शन 'सौ. मालतीबाई बेडेकर' या प्रकरणात पूर्वीं केलेले आहे. आता सौ. मुक्ताबाई दीक्षित यानीं लघुकथेच्या प्रातात कोणती करामत करून ठेवली आहे, हे येथें पहावयाचें आहे.

(श्री. हरिभाऊ आपटे किंवा प्रा. फडके या प्रतिभाशाली कथाकारानीं परकायाप्रवेश करून स्त्रियाचीं मनें कुशलतेनें रेखाटलीं यात शंकाच नाहीं. पण किती झालें, तरी तो पर–काया–प्रवेशच! प्रत्यक्ष अनुभवापेक्षा कल्पनेवरच अधिक भिस्त. बालगंधर्वानीं स्त्री-वेष करण्यातलाच प्रकार. त्याचें रुक्मिणीचें किंवा भामिनीचें सोंग कैक नवशिक्या नटींपेक्षा अधिक सरस, अधिक स्वाभाविक सजत असे, हें खरें; पण नाट्यकलेचा प्रसाद लाभलेली प्रत्यक्ष स्त्रीच जर तो तो अभिनय करूं लागली, तर त्यांत किती सहजता, किती जीवंतपणा येईल! रगभूमीवर बालगधर्वाला हार

खावयास लावणारी रूपसंपन्न, अभिनयसंपन्न व गानसंपन्न नटी अद्याप निर्माण झाली नाहीं; तथापि कथेच्या प्रातात मात्र, काहीं कांहीं गुणांचे बाबतींत, आपटे किंवा फडके याच्यावर ताण करणाऱ्या लेखिका पुढें आल्या आहेत. त्यापैकीं सौ. मुक्ताबाई दीक्षित याच्या लघुकथा, त्यांतील प्रांजलपणामुळें व मनोविश्लेषणामुळें, रसिकाच्या निरंतर स्मरणात राहण्यासारख्या आहेत. )

## शारदेची उपासना

मुक्ताबाईचा जन्म मुक्ताबाईच्या गावींच झाला. 'निवृत्ति-ज्ञानदेव-सोपान-मुक्ताबाई' या चार भावडापैकीं मुक्ताबाई विजेच्या कडकडाटात गुप्त झाल्या, त्या खानदेशातील एदलाबादला. त्या गावीं त्याची समाधि असून त्याचें नाव भक्तीनें तेथें घेतलें जातें. म्हणूनच मूळचें पाळण्यांतले नांव कृष्णाबाई असताहि, करंदीकरानीं आपल्या कन्येचें नांव मुक्ताबाई असेंच रूढ केलें. माहेरीं व सासरीं-दोन्हीकडे 'मुक्ताबाई' हेंच नाव चालू झालें, तरी त्या नावाच्या व्यक्तीला मात्र पाळण्यातील नाव लाडकें असावे. कारण लघुकथा लिहिताना मुक्ताबाईनीं 'कृष्णाबाई' या टोपण नावानेंच त्या लिहिल्या.

मुक्ताबाईचा जन्म १९०१ सालच्या डिसेबर महिन्यात झाला. त्यांच्या मनावर लेखनाचे संस्कार आनुवाशिकच होते, असें म्हटलें तरी चालेल. सुप्रसिद्ध कवि विनायक हे त्याचे चुलते. त्याचे बंधु श्री. ना. बि. करंदीकर धुळ्यास वकिली करीत असले, तरी ग्रथ–लेखनाचा त्याना छंद आहे. पं. नेहरू यांच्या 'भारताचा साक्षात्कार' या ग्रंथाच्या अनुवादात साने-गुरुजींइतकाच त्यांचाहि हात आहे. इतरहि कोणी कवि, कोणी लेखक– असें विद्येचें वातावरण करंदीकराच्या कुटुंबात होतें.

## प्राध्यापकाच्या खुर्चीवर

हुजूर डेप्युटी कलेक्टर या मानाच्या जागेवर वडील होते. ही जागा त्यांनीं आपल्या मनगटाच्या जोरावर कमावली होती. त्यांनीं नोकरीला आरंभ केला, तो पंधरा रुपये पगाराचा नाक्यावरील कारकून म्हणून. पण

आपल्या अंगच्या गुणांनीं ते वरवर चढले. जत संस्थानांत 'अॅडमिनिस्ट्रेटर' म्हणूनहि त्यानीं काम केलें. त्यानंतर ब्रिटिश राजवटींत त्यांच्या कर्तृत्वाचें प्यादें पुढें सरकता सरकता डेप्युटी कलेक्टरच्या कटीवर जाऊन बसलें. पण वडिलांच्या ऐश्वर्याचा लाभ मुक्ताबाईंना फारसा झाला नाहीं. (कारण त्या सात–आठ वर्षांच्या असतानाच त्यांच्या शिरावरील पितृप्रेमाचें छत्र हिरावलें गेलें. आई तर त्याआधींच देवाघरीं गेलेली होती. पण चुलत्यांनीं मुक्ताबाईंचा प्रतिपाळ चागल्या रीतीने केला. नुसता प्रतिपाळच नव्हे, तर शिक्षणहि त्यानीं त्यांना चागलें दिले.

पुणे येथील हुजूरपागेत मुक्ताबाईंचे दुय्यम शिक्षण झाले. १९२२ सालीं त्यानीं मॅट्रिकचें प्रवेशद्वार ओलाडले व स. प. कॉलेजांत पाऊल टाकलें. कॉलेजच्या खुल्या वातावरणांत त्यांच्या जिज्ञासेचे दरवाजेहि खुले झाले. बी. ए. ला त्यानीं 'तत्त्वज्ञान' हा विषय घेतला व मानस-शास्त्राचा अभ्यास विशेष आवडीनें केला. १९२६ सालीं बी. ए. ची परीक्षा त्या उत्तीर्ण झाल्या. बी. टी. झाल्यानंतर बडोदें येथील 'महाराणी हायस्कूल'–मध्ये त्यानीं शिक्षिकेची नोकरी धरली. मराठी विषय घेऊन त्या नागपूर विद्यापीठाच्या एम. ए. १९३५ सालीं झाल्या. बडोद्यांतील शिक्षकी त्यांनीं सात वर्षें केली. त्यानंतर पुणें येथील ठाकरसी कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक म्हणून त्यांनीं काम केलें. त्यांचें आयुष्य ' वाऱ्यावादळाशीं झगडा ' करण्यात गेलें. ' पाढरपेशा वर्गातल्या सुशिक्षित एकाकिनीचें भावजीवन ' कंठतांना त्यांना जे अनुभव आले व त्याचें जें मानस-मंथन झालें, तेंच त्यांच्या लेखनाचें खरें भांडवल.)

## तर्खड पारितोषिक

कथा-लेखनाकडे मुक्ताबाई योगायोगानेच वळल्या असें म्हटलें पाहिजे. पदवीधर होऊन त्या अध्यापनाचें कार्य करीत होत्या, तेव्हा १९२७ सालीं त्यांच्या वाचनांत श्री. वरेरकरांची एक गोष्ट आली. तिचें नाव ' आमचे मालक ' त्यांतील विचार मुक्ताबाईंना नापसंत वाटले–बेचैन करूं लागलें. म्हणून, त्याची दुसरी बाजू दाखविण्यासाठीं त्यांनीं एक लघुकथा लिहिली

आणि तिला नांव दिलें ' आमचे दास ' म्हणून. त्या म्हणतात, ' अगदीं अनपेक्षितपणें मी लेखिका झालें ! ' या दोन्ही गोष्टी 'गृहलक्ष्मी' मासिकांत प्रसिद्ध झाल्या होत्या. मुक्ताबाईंच्या भाषेची तडफ व विचारांचा प्राजलपणा पाहून ' रत्नाकर ' मासिकाचे श्री. गोखले यानीं त्याचेकडे लघुकथेची मागणी केली—किंबहुना, लकडाच लावला. त्यामुळेंच मुक्ताबाईंच्या हातून कथा-लेखन झालें. त्याच्या बहुतेक कथा ' रत्नाकर ' व ' प्रतिभा ' या उच्च दर्जाच्या नियतकालिकातून प्रसिद्ध झाल्या व त्यानीं चिकित्सक कथा-वाचकाचें चित्त वेधून घेतलें. ' मानस-लहरी ' या त्याच्या पहिल्या कथा-संग्रहानें त्याना कीर्ति मिळवून दिली आणि ' अनिरुद्ध प्रवाह ' या दुसऱ्या कथा-संग्रहानें तर त्यानीं १९३९ मध्यें 'तर्खड पारितोषिक'हि हस्तगत केलें. हें बक्षीस टीकात्मक ग्रंथांनाच बहाल करण्याची प्रथा आहे. त्या बक्षिसास पात्र होण्याचा पहिला मान मुक्ताबाईंच्याच ललित लेखनाचा. त्याच्या लघुकथाहि सामाजिक टीका करणाऱ्याच आहेत, अशी परीक्षकाना खात्री पटली; म्हणूनच त्यानीं हें पारितोषिक त्याना दिलें. यानतरहि त्यांच्या सुमारें दहा लघुकथा प्रसिद्ध झाल्या आहेत. चार-पाच कथा तर इंग्रजी, हिंदी, गुजराती व ऊर्दू या भाषात अनुवादित झाल्या आहेत. थोड्याच कथा लिहून मोठी कीर्ति मिळविणाऱ्या लेखकामध्यें मुक्ताबाईंची गणना होण्यासारखी आहे.

## यशवंत नाट्य-लेखन

लघु-कथानंतर नाट्य-लेखनाकडे मुक्ताबाईंची लेखणी वळली. 'जुगार' हें त्याचें पहिलें नाटक १९५० सालीं रंगभूमीवर आलें आणि त्याचे नाद-निनाद महाराष्ट्रभर उमटले. सपत्नीक स्त्रीचें मनोविश्लेषण या नाटकांत मार्मिकतेनें, सूचकतेनें व हलक्या हातानें केलें आहे. त्या गुणाला कोंदणहि मोलाचें लाभलें. रंगभूमीवर तें नाटक उभें रहाण्यासाठीं नटश्रेष्ठ श्री. केशवराव दाते यांनीं जिवापाड परिश्रम घेतले. त्याच्या अनुभवसिद्ध मार्ग-दर्शनाचा लाभ झाल्यानें ' जुगार 'च्या यशांत भरच पडली. इंदूरच्या " महाराष्ट्र साहित्य परिषदेचें " ' यशवंत नाट्य पारितोषिक ' या नाट-

काला मिळालें त्या नाटकाचें हिंदी व कानडी या भाषांत अनुवाद झाले आहेत. याशिवाय त्याचीं आणखी दोन नाटकें प्रकाशनाच्या वाटेवर आहेत. त्यांचे पति श्री. विठ्ठलराव हें 'इंटर नॅशनल बुक सर्व्हिस' या संस्थेचे मालक असल्यामुळें ग्रंथाच्या समुद्रातच जणु मुक्ताबाई बसल्या आहेत व त्यामुळें त्यांच्या चिकित्सक वृत्तीला वाचनाचें आकंठ पान करणें सुकर झालें आहे.

## खऱ्या टीकाकारच

'टीकाकार' म्हणूनहि त्यांचें स्थान वरचें आहे. 'चादरात,' 'जागत्या छाया' वगैरे ग्रथावरील त्यांची टीका तात्त्विक मीमांसा करणारी असून गुणग्राहक अभिप्राय देणारी आहे. 'घराबाहेर' नाटकाचें परीक्षण तर अत्यंत सडेतोड आहे. तसेंच 'माधव ज्यूलियन' च्या काव्याचें मूल्य-मापन. त्यांचा स्वभावच चिकित्सक असल्यानें त्या स्वतः-च्याहि टीकाकार सदैव असतात. (साहित्यावर व समाजावरहि अचूक व तीक्ष्ण टीका करण्यात मुक्ताबाईंची लेखणी यशस्वी आहे. थोड्या व साध्या शब्दात पुष्कळ व गहन अर्थ सागण्याचा गुण त्यांच्या लेखणींत किती आहे, हें एका वाक्यावरूनहि कळून येण्यासारखें आहे. काणेकराच्या 'चादरातो' विषयीं लिहिताना त्या म्हणतात,

"चादरातींतील कित्येक भावगीतें, भावगीताचें उदाहरण म्हणून देण्यासच नव्हेत, तर भाव-गीताची व्याख्या ठरविण्यास उपयोगीं पडण्याइतकीं सरस आहेत. त्यातील भावना त्यांच्या आहेत, उत्कट आहेत; त्या जणु काय त्याना बेचैन करीत आहेत. शब्द साधे आहेत, नाद-माधुरी आहे, विकारावर भर आहे, भावनेंत एकपिंडता आहे. तिच्या प्रकटनात मनोज्ञपणा आहे व सर्वांच्या शेवटीं आटपशीरपणा आहे. भावनेचा भर ओसरला कीं, लेखणी हातातून खालीं ठेवल्यासारखी वाटते." इतका अर्थ-गौरव किती मराठी टीकाकाराच्या लेखनांत सापडेल ? मुक्ताबाईंच्या लेखनातील मुख्य दोष एकच—आणि तो म्हणजे तें अल्प आहे हा ! त्याचें वर्णन त्या स्वतःच, 'कासव-गति' या एका शब्दानें करतात !

## स्वभाव-वैशिष्ट्याचा उठाव

लघुकथेची शास्त्रीय भूमिका टीकाकार मुक्ताबाई किती यथार्थपणें जाणतात, हें ' जागत्या छाया ' वरील त्याच्या परीक्षणावरून कळून येतें. " एकाद्या व्यक्तीच्या स्वभाव-वैशिष्ट्याचें वर्णन समर्पक शब्दांत केलेलें असलें, तरी तें शब्द-चित्र होईल, लघुकथा नव्हे. त्याच्या त्या स्वभाव-वैशिष्ट्यामुळें जेव्हा एकाद्या घटनेला उठाव मिळेल, त्या वेळेसच लेखकाला लघुकथेची वस्तु सापडली असें म्हणता येईल. " ही त्याची मीमांसा मूलग्राही आहे. या कसोटीला त्याच्या बहुतेक कथा उत्तम प्रकारें उतरतात. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, ' आमचे दास ' ह्या पहिल्याच कथेंत लेखिकेचें कथा-लेखनाचें सारें कौशल्य प्रतिबिंबित झालें आहे. तींत सुशिक्षित तरुणांच्या प्रेमभावनेचीं आंदोलनें हळुवारपणें चित्रित केलीं आहेत, त्यासाठीं योजिलेल्या घटना स्वाभाविक आहेत, (वायफळ शब्द शोधूनहि सापडावयाचा नाहीं, त्याचे सारे सवाद सूक्ष्म बुद्धिमत्तेनें लख-लखणारे असतात.) या सर्व गुणाचें प्रतिबिंब या पहिल्या कथेंत पडलेलें असून ती कथा पात्रमुखी आहे. नव्या काळातील तरुणी स्वतःच आपल्या मनाचें हेलकावे या कथेंत सांगत असल्याकारणाने ती विलक्षण परिणाम-कारक झाली आहे.

मॅट्रिक झालेली मुलगी 'लग्न करून परतंत्रता पत्करायची नाहीं' असा निर्धार करते आणि " आदर्शभूत स्वतंत्र स्त्री " होण्याचें मनोरथ रचते. पण तिचें लग्न एका प्राध्यापकाशीं होतें. त्या प्राध्यापकाचा स्वभाव शांत, समजूतदार व निश्चयी असा शेवटपर्यंत दाखविला आहे. आस्थेनें, आपले-पणानें तो तिला कांहीं गोष्टी करावयास सागतो, तेव्हां तिला तो " धैर्य-धराचा हुकमीपणा " वाटतो. "बरोबरीचे हक्क याचाहि अर्थ एकाच प्रकारचे हक्क असा नाहीं. " हा त्याचा सयुक्तिक विचार तिच्या बंडखोर मनाला रुचत नाहीं. त्यामुळें ती माहेरीं रागावून जाते. तेथें ती चार वर्षें राहते आणि बी. ए. होते. पण तिला लवकरच कळून येतें कीं, " मी पतीच्या दास्याला न जुमानतां ज्ञानार्जन केलेली बाणेदार स्त्री होतें, पण

घराच्या मर्यादा सोडून जगाच्या आखाड्यात पाऊल घातल्यापासूनच माझा दुबळेपणा मला जास्त जाणवत चालला होता. आपल्याला संरक्षणाची जरुर आहे ही गोष्ट नकळत मला पटत चालली होती. "

## स्वभावाचें परिवर्तन

आपल्या मनाचें एकाकीपणाचें असमाधान लपविण्यासाठीं तिनें एका खाजगी शिक्षणसंस्थेंत काम करण्यास सुरवात केली. पण ही "समाजसेवा म्हणजे निव्वळ आत्मवंचना आहे." हेहि तिला पटले. तिच्या आईचें स्वभावचित्र पार्श्वभूमीसारखे रंगविलेले आहे. पतीच्या सुखासाठीं ती आत्मसमर्पण करते. तिच्या प्रत्यक्ष उदाहरणानें मुलीच्या मनातील अहंकाराच्या गाठी हळूहळू सुटू लागतात. त्यांतच कौपर, टेनिसन् वगैरे कवींचे आत्मसमर्पणाचे विचार तिच्या वाचनात येतात. एका कवयित्रीचाहि सूर तोच ! हे पाहून ती थक्क होते व तिच्या मनाची तटबंदी ढासळून जाते. ती मनात म्हणू लागते, " मला त्यानीं 'गृहाची गृहिणी' केली होती, पण मला त्याना 'मदतनीस' शोभायला हव होत. 'मनाचा ताबा' नको होता, तर मेंदूची बरोबरी हवी होती. व म्हणूनच त्या अंतःकरणाच्या राज्यातून माझी हकालपट्टी झाली होती." •

## तरुणींचीं मनश्चित्रें

त्यानंतर तिने आपल्या पतीच्या स्वभावाचे जे विश्लेषण केलें आहे, तें अत्यंत मार्मिक आहे. " बुद्धिवैभवाच्या जोरावर मन ताब्यात ठेवू पाहणाऱ्या त्या शास्त्रज्ञाला प्रीतिवैभवान जग विसरायला लावीन " अशी प्रतिज्ञा करून ती पतीच्या घरीं परत जाते. तिचा स्वीकार प्राध्यापक शांतपणें करतात. फरक इतकाच कीं, " पूर्वीच्या प्रत्येक 'कर'ची जागा आता परकेपणाच्या 'कराल का ?' नीं पटकावली होती." या परकेपणामुळें, तुटकपणामुळें, दूरपणामुळे तिचा कोंडमारा झाला—आणि तो तिला असह्य झाला. शेवटीं ती त्याना शरण गेली, पण ही शरणागती जुन्या काळच्या आईप्रमाणें आंधळी नसून 'ज्ञानोत्तर' आहे असें

समाधान तिनें मानून घेतलें. हे मनाचे झोके कोणत्या सुशिक्षित तरुणीला वाचनीय व मार्गदर्शक वाटणार नाहींत ?

असेंच आणखी एका तरुणीचे मनश्चित्र " वर्षाव " या कथेत लेखिकेनें रेखाटलें आहे. गणिताची प्राध्यापिका असणारी एक तरुणी अगदीं एकटी असते. तिच्यावर तीन प्राध्यापकाचे प्रेम असतें. पण अखेर मानसशास्त्राचा प्राध्यापक तिचें मन जिंकतो. , हें या कथेत चित्र-पटाच्या वेगाने दाखविले आहे. गणिताचें पुस्तक लिहिण्यासारखा तिचा रुक्ष उद्योग चालू असताना बाहेर सृष्टींतील उकाडा वाढत असतो, आणि जेव्हा तिचें प्रेम जमतें तेव्हा पुस्तक संपतें–आणि सृष्टीहि पावसानें भिजून निघते–असे–' निसर्गाचे सवादित्व ' दाखविले आहे. शृंगारिक संवादाची बारीकशी लकेरहि या कथेत उमटली आहे.

## विनोदाचा परिमल

" अज्ञात मार्ग," " शात वादळ," " दोन म्हातारे," इत्यादि कथांतूनहि शृगाररसाचे बारीक बारीक थेंब उडत असतात. ' अज्ञात मार्गांत ' तर शृंगाराच्या तरंगाला विनोदाचा वास लावलेला आहे. लोणावळा येथे हिरकणीचे हृदय जिंकू पाहणारा व तिच्याबरोबर टेनिस खेळूं पाहणारा दिनकर साठे, आपला मित्र माधव याला तिच्यापासून दूर ठेवण्यासाठीं किती युक्त्या-प्रयुक्त्या करतो हें पाहताना वाचकाला हंसू हेतें. " तो खेळ बद पाडण्याकारिता कैवल्यधामच काय, पण चारी धामाची यात्रा मी दोन्ही पाय मुरगळले असते तरीसुद्धा केलं असती " अशी त्याची हिंमत, पण त्याचा गनिमी कावा फुकट जातो आणि माधव हिरकणीशीं लग्न करतो.

" निदक ", " पुराण पुरुष " व " पत्ता हरवला " या तीन कथा केवळ विनोदी आहेत. पसतीस वर्षें वयाचा जमादार आपल्या प्रवासाच्या थापा इतक्या मारतो कीं, तो प्रवास करण्यास साठ वर्षें लागावीं ! एरवीं शब्दांची काटकसर करणाऱ्या लेखिकेनें येथें विनोदासाठीं शब्दाची यथेच्छ उधळपट्टी केली आहे व ती योग्यहि आहे. प्रो. नारिंगे याची धादल व

विसराळूपणा यांचें विनोदी चित्र 'पत्ता हरवला' या गोष्टीमध्यें पहाव-यास मिळतें. त्यांना पार्श्वभूमि शोभण्यासारखे शब्दचित्र श्यामकांताचें रंगविलें आहे. 'पत्त्याचा कागद हरवला तर स्मरणानें तो पत्ता आठवा,' एवढाच काय तो सल्ला श्यामकांतानें प्रोफेसराना दिला. पण तो त्यांना मोलाचा वाटला.

"शात वादळ" या कथेंतील श्रीरंग व चंदन या प्रेमी युवकांना आपल्या लग्नाला आईवडिलांचा विरोध होत नाहीं म्हणूनच धक्का बसतो. त्यामुळे बंडखोरी करण्याची संधि गमावल्याचे त्याना दुःख होतें. याच कल्पनेवर य. गो. जोशी यानीं 'सर्कस' ही कथा किती विडबनपर व हास्यकारक रचली आहे तें पहाण्यासारखें आहे.

## जुन्या-नव्याचा संघर्ष

'कळ्याचे निःश्वास कीं सुवास ? या कथेतील श्रीनिवासचा बुजरा स्वभाव आरंभापासून अखेरपर्यंत सुसंगतपणें लेखिकेनें रेखाटलेला आहे. सुशिक्षित तरुणीची त्याला धास्तीच वाटे. घरीं त्याला ज्या मुली दिसल्या होत्या, त्या जुन्या वळणाच्या होत्या. त्यांचें वर्णन लेखिकेनें मोजक्या शब्दानीं रेखीवपणें केलें आहे. तें असें:—"वडील बहिणी होत्या, पण त्या अगदींच अशिक्षित त्या जोडवीं घालीत, तुळशीची पूजा करीत, चातुर्मासात नेमधर्म करीत व सौंदर्यशास्त्रापासून शक्य तो अलिप्त रहात! शेजारीं पाजारीं काहीं तरुण अर्धवट शिकलेल्या पोरीसोरी असत, परंतु त्या घट्ट अम्बाडा बाधीत, लोकरींचें विणकाम करीत, नवऱ्याच्या नावाला लाजत व आपल्या खुळचट रोमान्सचें मैत्रिणींजवळ वर्णन करीत!"

## संवादांतील चातुर्य

श्रीनिवासची ही स्त्री—विन्मुख वृत्ति व्यक्त करणारी घटना लेखिकेनें कथेंत गुंफली आहे. त्याच्या लग्नाच्या वाटाघाटी चालू असतांना एके दिवशीं संध्याकाळीं तो फिरावयास गेला. त्यावेळीं कॉलेज—कन्यकांचा संवाद सहजगत्या त्याच्या कानीं पडला. संवाद चालला होता विभावरी शिरूरकर याच्या "कळ्यांचे निःश्वास" या कथा—संग्रहावर. हा संवाद

वाचतांना वामनरावाच्या " रागिणी "ची आठवण कोणासहि व्हावी इतका तो बुद्धीच्या तेजानें लखलखणारा आहे. त्याचा एक नमुना असा—

" तुला तुझ्या आईबापानीं अविवाहित ठेवली—अगदीं स्वार्थाकरिता ठेवली तरी, वाङ्मयाच्या स्वरूपांत का होईना, जनतेच्या न्यायासनासमोर आपल्या आईबापाना आरोपी म्हणून तूं उभ करशील का ? "

" पण अस म्हटलं तर सहेतुक वाङ्मयाची वाढच कठीण होईल—उलट आत्मप्रत्ययाच्या अनुभूतीचा आधार हाच वाङ्मयात महत्वाचा आहे."

" कळ्याचे निःश्वास " या लघुकथानीं श्रीनिवासची मनोवृत्ति पालटली आणि त्याने ललितेशीं लग्नगाठ बाधिली, असे लेखिकेनें दाखविलें आहे. वाङमयाचा जीवनावर इतका सत्वर प्रभाव खरोखर पडूं लागला, तर वाङ्मयसेवकाना उच्चीचे ग्रह येण्यास कितीसा उशीर लागेल ? पण विचाराची वावटळ वळायला कोणतें निमित्त पुरेल हें सागता येत नाहीं.

## कथेच्या द्वारें टीका

" कळ्यांचे निःश्वास " हा विभावरींचा कथा-संग्रह, " जादूगार " ही फडक्याची कादबरी आणि "आई" ही यशवंताची कविता—या तीन वाङ्मय—प्रकारावर, आपल्या कथेच्या ओघात मुक्ताबाईनीं मार्मिक टीका केली आहे. चित्रकाराच्या कुचल्यानें शस्त्र-क्रिया करण्यासारखेंच हे कसब आहे. " अभिनव स्त्रीराज्य " या कथेंतील राजा काव्यात्म वृत्तीचा असतो. ऐदीपणाने श्रीमतीवर लोळत लोळत तो फडक्याच्या गंधर्वनगरींत गुंगत असतो. त्याची ती तद्री उतरविण्यासाठीं जोगळेकर त्याला आपली नवी कादबरी वाचावयास देतात. तींत शब्दमाधुर्य कल्पनासौंदर्य, भावनाविलास, वगैरे सर्व काहीं असते, पण " वृद्ध आजीबायाचा—पजीबायाचा घोळका " व त्याचें कीर्तन याचेंच कथानक त्या कादबरींत असतें. तें वाचून उल्लू राजाचा तल्लख मेंदू इतका भडकला कीं, " कीर्तनानें सुरवात करून प्रेतयात्रेनें कादबरीचा शेवट करणाऱ्या त्या नवकल्पनावादी कादंबरीकाराच्या डोक्यात, कोपऱ्यांतल्या दाडग्या ".अभिनव " काठीचा

अगदीं " नावीन्यपूर्ण " तडाखा देऊन, त्याला कधीं पाहिली होती का नव्हती अशा " नवनवोन्मेषशाली " तिरमिरीचा " क्रातिकारक " अनुभव आणून द्यावा, असा अगदीं " प्रतिभापूर्ण " मोह राजाला वाटला—"

## कारुण्याचा स्पर्श

या विनोदापेक्षा साहित्याचा भावनेवर कसा करुण परिणाम होतो हें " आई " या कवितेत नाजूक कलमानें त्यानीं चितारलें आहे. कवि यशवंताची भावपूर्ण गानमोहिनी सर्वत्र पसरत होती. पण दोन महिन्यां-पूर्वींच आईविरहित पद्मावतीला तें काव्य ऐकवेना. म्हणून ती दिवाण-खान्याबाहेर आली आणि ' फुलून फुलून हुदके ' देऊ लागली. हा अनु-भव शेकडो महाराष्ट्रीय रसिकाना आलेला आहे. पण लेखिकेचें कौशल्य हें कीं, तेरा वर्षानतर त्याच कवीची तीच कविता ऐकत असताना पद्मा-वतीची वृत्ती स्थिर होती, असें तिने दाखविले आहे. काव्यसृष्टींतून ती सत्यसृष्टींत उतरली होती. अश्रु ढाळून भावनेला वाट करून देण्याइतकीहि स्वस्थता तिच्या अत.करणाला नव्हती. ती भावनिक चैन तिला परवडत नव्हती. आता पद्मावती म्हणजे " तरुण अतःकरणाच्या चेपल्या गेलेल्या महत्वाकाक्षा आणि कोडल्या गेलेल्या भावना याचें मूर्तिमत प्रतीक होती. " तिच्यावर कुटुबाची जबाबदारी पडलेली होती. ती पार पाडण्या-साठीं पद्मावती अविवाहित राहिली होती. तिची मनोवृत्ति बधिर झाली होती–तिची भावना करपून गेली होती. हा फरक मुक्ताबाईनीं मोठ्या कलात्मकतेनें माडला आहे.

" मातृऋणाची फेड " ही कथाहि हृदयस्पर्शी आहे. नायकाची आई पुनर्विवाहित असते, म्हणून तिला लोक ' पतित ' समजतात—बहिष्कृता-प्रमाणें वागवितात. तिनें मृत्युशय्येवर असताना आपल्या मुलाला हा नसता ' कलंक ' पुसायचें काम सागितलें. तिचें तें प्रदीर्घ व व्याकरणशुद्ध भाषण अस्वाभाविक वाटतें आणि आतां पुनर्विवाह इतका वर्ज्यहि मानला जात नाहीं. पण पधरा वर्षांच्या मुलाची त्यावेळची मनः-

स्थिति वाचकाच्या चित्ताला चटका लावणारी दाखविली आहे. पुढें मुलगा इंग्लंडला जातो, बॅरिस्टर होतो, इंग्रज मुलीच्या प्रेमात सापडतो आणि तिच्याशीं लग्न करण्याचे ठरवितो. ' विवाहात धर्मांचा प्रश्न गौण आहे ' असाहि सिद्धांत तो ठोकून देतो. पण आपल्या असल्या विवाहामुळें आजूबाजूच्या बायका आपल्या आईची बदनामी करतात, हें ऐकल्यावर मात्र त्याचें मन एकदम पलटी खाते व म्हणतें, " मी धर्मघातकी व्हायला तयार होतों, समाजघातकी व्हायला तयार होतों, फार काय आत्मघातकी व्हायला तयार होतों–पण मातृघातकी ! "

' मनु पालटला ' या गोष्टींत लग्न-विधींच्या इतर अंगामध्ये पिढ्या-पिढ्यांना फरक पडत गेला, तरी लग्नमंडपापुढें 'माई अन्न वाढा व पोराला' हा भिकाऱ्याचा कोलाहल काहीं पालटला नाहीं, ही समाजातील विषमता लेखिकेनें सूक्ष्मतेनें मांडली आहे.

## विचारांची शास्त्रीयता

जगातल्या कटु सत्याची ओळख पटल्यामुळें येणारा तिरस्कारमिश्रित कडवटपणा " ' पावित्र्य-विडंबना 'तील निर्मलेच्या स्वरात आहे. तो मुक्ताबाईच्या लेखणींतून सदैव वाहत असतो. समाजाची काळी बाजू त्यांनीं उघड्या डोळ्यानीं पाहिलेली दिसते. ' रूढ नीति–कल्पनांचे पाटबंधारे जीवनाचा अनिरुद्ध प्रवाह थोपवून धरायला असमर्थ ठरतात " असा सिद्धांत त्यांनी एखाद्या समाजशास्त्रज्ञाप्रमाणें " शिकारी " या गोष्टींत मांडला आहे. पण विवाहसंस्थेचा पाटबंधारा नसलेला समाज कसा काय टिकूं शकेल याचा विचार त्यांनीं केलेला आहे काय ? समाजाच्या पायाखालील विवाहसंस्थेचें अधिष्ठान काढून घेतल्यानंतर त्याला दुसरें कोणतें अधिष्ठान मिळवून द्यावें, हाहि विचार विद्वान कथा-लेखकांनीं करावयास हवा. साऱ्याच जुन्याचा विध्वंस करण्याची बंडखोर वृत्ति डोळे दिपविणारी असते; पण समाज-नेत्यांना शांतपणें, दूरवर, सारासार–विचार करावा लागतो.

## द्वि-पत्नी विवाहाचा प्रश्न

विचारांचा असाच एकांगीपणा ‘ पुण्यात्मे ’ या कथेंतहि आढळतो. आनंदरावानीं मंजूला टाकले आणि परजातींतील पदवीधर सुधेशीं लग्न केलें. त्याची भेट मंजूच्या वडील बहिणीनें घेतली. तेव्हा ती त्यांचेवर आपला राग कसा काढते, हें लेखिकेने पुढील शब्दांनीं दाखविले आहे— “ तापलेली सळई कानात घालावी असा मला भास झाला ! आपल्या सुखाच्या वेळीं तिच्याकडे लक्ष दिलं नाहीं आणि आता तिच्या सुखाच्या आड येताहेत ! सतापामुळे डोळ्यात येऊ म्हणणारा अश्रूंचा कढ आंवरून मी म्हणाले, “ बरोबर आहे, तुमचा फायदा नाहींच. उलट तोटाच आहे. कारण आजच्या समाजात तो तुमच्या अब्रूला कमीपणा आहे ! आनंदराव, एका जिवाचा जिवत बळी घेतलात, आता त्याला अन्य तऱ्हेने सुख मिळेल तर तेंही मिळू देऊ नका ! किती पापी आहात ! ” बोलता बोलता माझ्या डोळ्यात अश्रू आलेच ! ”

पण हा रागाचा व शोकाचा भर ओसरल्यावर ती वडील बहिण आनंदरावांच्या द्वि-पत्नी-विवाहाचा निषेध न करता विनायकरावाच्या विषम विवाहाचा तेवढा निषेध करते,—त्याला ‘ सैतान ’ म्हणते, याचें आश्चर्य वाटतें विनायकरावाचा अपराध हा काहीं आनदरावाचा बचाव होऊं शकत नाहीं. रोगाचें निदान बरोबर न झाल्याकारणानें लेखिकेवर आपल्या भगिनींना निराशेचाच सल्ला देण्याची पाळी येते. तो सल्ला असा- “ भूतदयेच अधिष्ठान सोडलेल्या धर्मकल्पना, आणि निषेधात विराम पावणाऱ्या सुधारणेच्या निर्जीव, निष्क्रिय वल्गना, अशा दुहेरी पेचांत आतून—बाहेरून कुजलेल्या समाजात, स्त्रीजातींत जन्म घेतलास ! आता सुखाच्या आशेवर पाणी सोडशील तर त्यातच तुला जास्त सुख लाभेल.”

## जीवनाचा अर्थ

“ शास्त्रज्ञाचा शोध ” ही लघुकथा लघुनिबंधाच्या वळणावर गेली आहे. Love या शब्दाचा अर्थ छोटूनें विचारताच जयतानें जेम्स, रसेल, मॅक्डूगल, फ्राईड, गार्डीनर, वूल्फ इत्यादि आंग्ल पंडिताची पलटण उभी

करून त्याच्या वचनाचे बार काढण्यास सुरवात केली. या पहिल्या फेरी-नंतर कॉलेजांत वादविवाद झाला तोहि प्रेम याच विषयावर. त्या सभेंत विवाहोत्तर प्रेमाचा पुरस्कार जयंतानें केला. पण प्रत्यक्ष कृतीची वेळ आली असताना त्याचेवर विवाहपूर्व प्रेम करणाऱ्या अजितेकडेच त्याचे मन कलतें. हा उच्चाराआचारातील विरोध या कथेंत दाखविलेला आहे. पण त्यांवर विचारार्ची व चिकित्सेची इतकी दाट छाया पडली आहे कीं, त्यामुळे भावनेचा मूळचा रग दिसेनासा होतो. मात्र जयताचा अखेरचा सिद्धात वाचकाच्या मनात गुणगुणत राहतो, तो सिद्धात म्हणजे " त्या शब्दाचा अर्थ पुस्तकात सापडत नाहीं—जीवनात सापडतो, आणि तो अर्थ शिकून कळत नाहीं—अनुभवावा लागतो. " तसेंच, ' मूलभूत स्त्रीसुलभ भावना त्याच आहेत ' असाहि सिद्धात लेखिकेने बऱ्याच कथा-मध्ये मांडलेला आहे. नव्या स्त्री-पुरुषामध्ये समानता असावी असा लेखि-केचा आग्रह आहे, पण समानता म्हणजे एकरूपता नव्हे आणि समान-तेला सहिष्णुता व प्रेम याचे वावडें नाही असा समतोल विचार सर्वत्र सागितलेला आहे.

## स्त्रीचा दर्जा

आधुनिक सुशिक्षित तरुणीची मनोवृत्ती ' शिकारी ' या कथेत मुक्ताबाईनीं मूर्तिमत उभी केली आहे. त्या कथेतील एक विद्यार्थिनी अर्वाचीन स्त्रीचे वर्णन करताना म्हणते, " लता म्हणा, देवता म्हणा, पण निर्जीव वस्तु म्हणून दुसऱ्याच्या—केवळ तो पैसा मिळवतो आणि त्याव-रून स्वतःची लायकी टरवतो म्हणून – दुसऱ्याच्या हातच खेळण होण्या-पेक्षा माणूस म्हणून ओळखल जाण हेंच अधिक चागल ! "

हाच सिद्धात " सरक्षक " या कथेंत लेखिकेने सोदाहरण माडून दाखविला आहे. त्याचा वस्तुपाठ म्हणून त्या कथेत त्रिवेणीची हकिकत सागितली आहे. " लहानपणच्या त्रिवेणीत एकट्या गगेची विशुद्धता होती. आताच्या त्रिवेणींत यमुनेची गंभीरता आणि सरस्वतीचा छुपीपणा येऊन ती अगदीं सार्थनाम झाली आहे ! " पण प्रौढ वयात " तिच्या

वृत्तीनें सागराची गंभीरता आणि प्रक्षुब्धता या दोहोंनाहि सामावून घेतलें होतें. " हिंदु-मुसलमानाच्या दंग्यात ती सांपडली, असे कळताच तिच्या सरक्षणासाठीं विनायकानें मुबईहून किस्मदाबादेकडे धाव घेतली. त्यानें तिला मुंबईस चलण्याचा आग्रह केला, पण तिनें नकार दिला. तिला भीति वाटत होती विनायकाची—त्याच्या प्रेमाची—त्याच्या प्रेमांत आपण सापडूं याची. " भोवतालच्या परिस्थितीचे सर्वस्वीं आकलन केलेल्या एखाद्या तत्वज्ञान्याप्रमाणें त्रिवेणी किंचित् हसली. तू तूं माझं संरक्षण करणार ? "

" कां ? असं कां विचारतेस त्रिवेणी ? "

" विनायक, अगदीं खरं सांगू ? मला परदेशांत भीति नाहीं, दंग्यांत भीति नाहीं, उभ्या जगात मला एकाच व्यक्तीपासून धोका आहे, त्या व्यक्तीपासून माझं संरक्षण करशील ? "

" कुणापासून ? कुणापासून साग ? "

विनायकाने अधीर प्रश्न केला. तिच्या उत्तराकडे त्याचे कान अगदीं लागून राहिले होते.

" कुणापासून ? " त्रिवेणी एकदम म्हणाली " तुझ्यापासून ! " आरामखुर्चीवर बसल्या जागीं एकदम विनायकानें मागें मान टाकली ! "

## स्त्री-मनाचें चित्रण

अशी स्वाभिमानी व स्वावलंबी, निग्रही व बंडखोर स्त्री आधुनिक काळातील आहे, असें दाखवीत असतानाच तिच्या हृदयाची तृष्णा आणि तिच्या वृत्तीची पराधीनता ही दाखविण्यासहि मुक्ताबाई विसरल्या नाहींत हें विशेष. " स्त्री-स्वातंत्र्यवादी " या कथेंतील जगदीश वृंदेच्या व्याख्यानाची मुक्तकंठानें स्तुति करीत असतो, पण त्यावेळीं वृंदेच्या मनांत कोणते विचार खेळत होते याचें विश्लेषण त्यांनीं जसें केलें आहे; तसें मराठींतील फारच थोड्या कथा-लेखकांना साधतें. तें वर्णन असें—

" त्यावेळीं, त्या क्षणाला, तिला त्याच्याकडून तिच्या बौद्धिक जीवनाचा गौरवपूर्वक उल्लेख अप्रिय वाटत होता ! त्याच्याकडून आपल्या वैयक्तिक जीवनाची कातर पृच्छा व्हावी अशी आकाक्षा कुठेंतरी खोल मनांत अस्तित्वात होती. आणि तीं जों जों तृप्त होत नव्हती, तों तों तिच्या मनोवृत्ति अस्थिर होत होत्या. तिला त्याच्या ध्येयनिष्ठेचें कौतुक वाटलें; पण मुळात ध्येयवादी असलेल्या तरुणाला आपल्या सहवासात कांहीं क्षण आपल्या ध्येयाचा विसर पडावा व त्याला आपण पुन्हा ध्येयप्रवृत्त करावें, अशी तरुणींची आकाक्षा असते–तिची ती आकाक्षा अतृप्त राहिली."

बाह्यसृष्टीचे वर्णन करण्याकडे किंवा उपमादृष्टातादि अलंकार घडविण्याकडे मुक्ताबाईंचे फारसें लक्ष नाहीं. असें अंतःसृष्टीचे चित्रण करण्यात त्या चतुर आहेत.

## बाह्यांगाची उपेक्षा

जगदीश व वृंदा ही सुशिक्षित तरुण–तरुणी रात्रीं चादण्यातून चाललीं असताना त्याचें वर्णन कोणता ललित लेखक सोडील ? पण मुक्ताबाईनीं तें वर्णन अगदीं त्रोटकपणें केले आहे, तें असें—" त्यानीं चालायला सुरवात केली तोपर्यंत आकाशात पूर्णचंद्राचा उदय झाला. टिपूर चादण्यातून गावाबाहेरच्या निवांत रस्त्यातून तीं दोघें चालत असता, रस्त्याच्या दोन्ही बाजूनीं असलेल्या बंगल्याच्या बागातून येणारा निशिगंधाच्या, रातराणीच्या परिमलाचा झोत त्याच्या अगावरून जात होता. हळूहळू तिच्या वृत्तींत कसली तरी पर्याकुलता येत होती." दुसऱ्या एखाद्या रससिद्ध लेखकानें हा प्रसग किती घोळून घोळून लिहिला असता. मुक्ताबाईच्या साऱ्या लघुकथामध्यें दहा–पाच उपमा तरी सापडतील कीं नाहीं याची शंका आहे. मात्र ज्या थोड्या आहेत त्या सविस्तर व समर्पक आहेत. " शास्त्रज्ञाचा शोध " या कथेंतील जयंताच्या मनात अजितेबद्दलचें प्रेम नकळत कसे उत्पन्न झाले हें सागताना लेखिका दृष्टात देते, " हें केव्हा झाले त्याचे त्यालाच कळेना ! क्षितिजाच्या वर सूर्य केव्हा येतो तें नक्की कळतें, पण पहांटेच्या अधुक अधारावें बाराच्या तेजाळ

प्रकाशांत कसकसें रूपातर होतें तें कळत नाहीं. पहांटे आपण वांचपडतों, थोड्या वेळानें म्हणतों, 'उजाडलेंच आता,' आणि बारा वाजतां म्हणतों, 'किती लख्ख प्रकाश पडला आहे.' पण तो कुठून येतो, कसा येतो, अणुरेणूला कसा व्यापतो तें कळतें कां ?"

केवळ ललित कथा-लेखक ही मुक्ताबाईंची भूमिका नाहीं. त्या मुख्यतः टीकाकार आहेत. वाङ्मयावर, समाज-स्थितीवर सूक्ष्म बुद्धीची व खोल व्यासगाची टीका करण्यात त्या यशस्वी आहेत. कोणत्याहि प्रश्नाची बारीक चिकित्सा करून त्याचा धागा न् धागा पिंजून काढण्याचा त्याचा गुण असामान्य आहे.(त्याच्या कथा भावनापेक्षां विचारांचेच कल्लोळ उठवितात.)

## ध्येयाची तळमळ

मुक्ताबाईंच्या कथा-सृष्टीचें बाह्य रूप प्रा. फडक्यासारखें दिसत असलें, तरी तिचें अंतरंग मात्र भिन्न आहे. पुण्या-मुंबईतील वातावरण, कॉले-जांतील तरुण-तरुणींचीं पात्रें, वकील-डॉक्टर-प्रोफेसर अशा सपन्न वर्गाची उची रहाणी, मोटारी, बंगले, टेनिस इत्यादी विलास—साधनाची गर्दी, प्रेम, लग्न, स्त्री-स्वातंत्र्य, इत्यादि आधुनिक विषयाचें जाळें-हाच कच्चा माल मुक्ताबाई व फडके या दोघा कथा-लेखकानीं गोळा केला आहे. पण मुक्ताबाईंच्या लेखनात नवध्येयाची तळमळ आहे, स्वभावाचा कणखरपणा आहे, सामाजिक विचारांत समतोलपणा आहे-आणि त्या सर्वांवर मनो-विश्लेषणाचा झगझगीत प्रकाश पडला आहे. त्यामुळें वाचकाच्या भावनेला तृप्ति व बुद्धिला चालना मिळते. अजंठ्याचीं लेणीं पहावयास जाणाऱ्या माणसाला प्रथम डोंगरावर चढावें लागतें व अधारात वावरावें लागतें, पण तो विजेच्या दिव्याचा प्रकाश चोहोंकडे फिरवूं लागला, म्हणजे एकएक भव्य व भावदर्शक मूर्ति दृष्टीस पडते आणि मन आश्चर्यचकित होऊन जातें, तसा काहींसा अनुभव मुक्ताबाईंच्या सरळ भाषेतील चिकित्सात्मक कथा वाचतांना रसिकाना येतो. भाषेचे अलंकार किंवा कल्पनेचें वैभव यांनीं त्याची कथा-सृष्टि नटलेली नाहीं, उलट विद्वत्ता व चिकित्सा यांनीं

तिचें बाह्यांग डोंगरासारखें खडबडीतच आहे. पण मनो-मीमांसेच्या शोध-ज्योतींत तिचें अंतरंग जों जों आपण निरखून पाहू, तों तों आपण विस्मयानें व आनदानें स्तब्ध होतों. किंबहुना आपल्या मनावर भावनेचा खोल ठसा उमटतो व विचारांचें दाट दडपण पडतें. थोर कला-कृतीचें लक्षण हें नव्हे काय ?

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) ' स्त्रियाचीं मनें स्त्रियानींच रंगवावीं ' हे विधान तुम्हास पटते का ? आपल्या गुरुजींशीं विचारविनिमय करून या प्रश्नाचे उत्तर लिहा.

( २ ) मराठींत लेखिका कोण होऊन गेल्या त्याचीं नावें लिहा. त्यांनी कोणती पुस्तकें लिहिलीं ?

( ३ ) श्री. मुक्ताबाईच्या लेखनाला आरंभ कोणत्या घटनेनें झाला ? लेखनाला त्याचे घरचें वातावरण अनुकूल होतें व आहे. कसे तें लिहा

( ४ ) श्री. मुक्ताबाईच्या लघुकथांतून आलेलीं तरुणींचीं मनश्चित्रें यथार्थ आहेत, कांहीं उदाहरणें द्या.

( ५ ) श्री. मुक्ताबाई नुसत्या मनोरंजनासाठीं कथा लिहितात असे नसून कथेच्या द्वारें त्या टीकाहि करतात, या विधानाचें स्पष्टीकरण करा.

( ६ ) श्री. मुक्ताबाईचें लेखन पुष्कळसें ध्येयवादी आहे, हें ध्येय कोणतें ? त्यांच्या कथांतून हें ध्येयदर्शन कितपत झालें आहे ?

## या पुस्तकातील
## लेखकांचीं कांहीं वाचनीय पुस्तकें

**प्रा. ना. सी. फडके**

१. वत्सला आणि इतर गोष्टी
२. माझा देश
३. प्रो. फडके यांच्या गोष्टी

**वि. स. खांडेकर**

१. नवमल्लिका
२. वायुलहरी
३. हस्ताचा पाऊस
४. घरट्याबाहेर

**य. गो. जोशी**

१. पुनर्भेट भाग १
२. पुनर्भेट भाग २
३. रेघोट्याचें दैवत
४. जाईजुई

**ग. ल. ठोकळ**

१. कडूसाखर
२. सुगंध
३. मोत्यांचा चारा

**सौ. मुक्ताबाई दीक्षित**

१. मानस–लहरी
२. अनिरूद्ध प्रवाह

★

# शिखरे-वाङ्मय

## चरित्रें

| | रु. आ. |
|---|---|
| म. गांधींचें चरित्र | ८– ० |
| गांधी–जीवन–कथा | ३– ० |
| राष्ट्र–पिता गांधीजी | १– ० |
| गाधी–रण–गीता | १– ० |
| राष्ट्र–जनक टिळक | १– ४ |
| लोकमान्य टिळक | ०– ८ |
| सुधारकाचार्य आगरकर | १– ८ |
| डॉ. राधाकृष्णन | ०– ८ |

## प्रबंध

| | |
|---|---|
| गांधीजींचें रामराज्य | १– ० |
| साम्राज्य व स्वराज्य | १– ० |
| सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म | ०–१२ |
| आजकालचे साहित्यिक | १– ० |

## कादंबरी

| | |
|---|---|
| थोरली आई | १– ८ |
| आईची कृपा | १– ० |
| भावनांचा नाच | २– ० |
| जिवलग | १– ८ |

## नाटकें

| | |
|---|---|
| वैष्णवजन | १– ० |
| आठ साल | १– ० |

## लघुकथा

| | |
|---|---|
| क्रांति–किरण | १– ० |
| गंगेचे थेंब | २– ० |

लघुनिबंधकार

# अ नु क्र म

# प्रा. फडके : : : : १

बहीण-भावाच्या पाठशिवणीचा खेळ चालतो ना ? तशी मौज लघुकथा व लघुनिबंध यांनीं मराठींत उडवून दिली. साधारणपणें १९२० ते १९३० या दशकांत लघुकथा लोकप्रियतेच्या लाटेवर चढत होती, तर



१९३० ते १९४० या काल-खंडात लघुनिबधाची कमान चढती होती. दिवसेंदिवस जनतेचे जीवन अधिकाधिक धावपळीचें, धादलीचें होत आहे. क्षणभर थाबून, श्वास टाकायला किंवा चिंतन करायला उसंत आहे कोठें ? मुंबईतील लोकांचें विश्रातिस्थळ म्हणजे बस्-स्टॉप हेंच. एकाद्या गहन तत्त्वाचें किंवा सूक्ष्म विचाराचें शातपणें चिंतन करण्यास फुरसद आहे कोणास ? वाचन केलें तरी तें धांवतें-उडतें; आणि तेंहि बहुधा उथळ लेखनाचेंच. ही परिस्थितीची भूक भागविण्याचे कार्य आरभीं लघुकथेनें व तिच्या पाठोपाठ लघुनिबंधानें मराठी साहित्यात केलें. कादंबरीपेक्षां लघुकथा ही लिहिण्यास व वाचण्यास लहान व सोपी; पण त्याहूनहि लहानसर व सुकर असें लेखन लघुनिबंधाचें. म्हणून लघुनिबंधाकडेच नवीन लेखकाचा ओढा होता व त्याची वाचकवर्गामध्यें चांगली चलती होती. आजहि कोणत्याहि मासिकांत लघुकथा व लघुनिबंध याना हक्काचें स्थान व मानाचें पान मिळाल्याशिवाय रहात नाहीं.

या दोन्ही अभिनव वाङ्मय-प्रवाहांचे प्रारंभींचे पूर आता ओसरले असून त्यांचे नित्याचे संथ प्रवाह चालू आहेत.

## लघुनिबंधाचा आत्मा

छोटी कादंबरी म्हणजे लघुकथा नव्हे. तसाच छोटा निबंध म्हणजे लघुनिबंध नव्हे. लघुनिबधाच्या विषयात चमत्कृति असते, भाषेत खेळकरपणा असतो आणि माडणींत सैलपणा दिसतो. पूर्वी स्वास्थ्याच्या काळात, संध्याकाळच्या वेळेस, अगणात घोंगडी टाकून, कामधाम आटोपून आलेले लोक गार वाऱ्यात शिळोप्याच्या गप्पा मजेमजेने, हसतखेळत मनमानेल तशा मारीत असत; त्याची जागा आता छापील लघुनिबधानीं घेतली आहे, असें म्हटलें तरी चालेल. आताहि पुण्या-मुंबईसारख्या शहरात, रात्रींचे जेवण झाल्यावर, प्रशात व धवल अशा चादण्यात, टेकडीवर किंवा समुद्रकाठावर, तरुण मित्रमडळी, धोतराचा सोगा हातावर टाकून किंवा किल्ल्याची साखळी गरगरा तर्जनीभोंवती फिरवीत, रमतगमत गप्पासप्पा छाटीत जातात ना? ती त्याची त्यावेळची मनोवृत्ति, हाच लघुनिबंधाचा पाया आहे, गाभा आहे, आत्मा आहे. लघुनिबंधात काव्य असतें, विनोद असतो व तत्वज्ञानहि असते-पण सारें कळत-न-कळत आलेलें. या सर्वांचें प्रमाण लघुनिबंधात किती असावें हें श्री. वि. स. खाडेकर यानीं आपल्या सुरम्य भाषेंत निवेदन केलें आहे. ते म्हणतात, "लघुकथा, निबंध, गद्यकाव्य आणि विनोदी लेख या लघुनिबंधाच्या चतुःसीमा आहेत असें म्हटले तरी तें फारसें चुकीचें होणार नाहीं. मात्र एक गोष्ट लक्षात ठेवणें जरूर आहे. लघुनिबधातला काव्यविलास म्हणजे बागेंतली सहल नव्हे. शेतातल्या पायवाटेनें जाताना मधून-मधून जशीं रानफुलें दिसतात, तसें लघुनिबंधातलें काव्य असायला हवें. या लेखनप्रकारांतला विनोद वळवाच्या पावसासारखा असून चालणार नाहीं. पहाटे पडणाऱ्या दंवाप्रमाणें त्याचें स्वरूप असलें म्हणजे तो फार खुलून दिसतो. कांहीं काहीं लघुनिबंध गोष्टीवजा वाटले तरी त्यांत कथेला आवश्यक असणारी एकाग्रता नसावी हेंच बरें. निबंधांप्रमाणें लघुनिबंधालाहि तात्विक

बैठकीनें उठावदारपणा येतो. पण त्यातलें तत्वप्रतिपादन हें तळ्यात फुलणाऱ्या कमळासारखें मोहक वाटलें पाहिजे; रानात उगवणाऱ्या झाडाप्रमाणें तें भासता कामा नये."

## लघुकथा व लघुनिबंध

लघुकथेला सामान्यतः कथानक असते, पात्राचे स्वभाव–विशेष असतात आणि आदि-मध्य-अंत याची मर्यादा पण असते. परंतु लघुनिबंधाचें सारे जीवन स्वैर. अनियम हाच त्याचा नियम. कोणत्याहि एकाच चौकटींत बसणारे ते चित्र नव्हे. जिवलग मित्राची सलगी ही त्याची जीवनज्योत आहे. त्यामुळे त्याला बंधने नाहींत. पण त्यामुळेंच त्यांचे लेखन अवघड ठरतें. पायाला चाके लावून रस्त्यावरून धावणाऱ्याला गाडींत बसून जाणाऱ्यापेक्षा अधिक तोल संभाळावा लागतो.

लघुकथा व लघुनिबंध यामधील हा फरक सागताना खांडेकर म्हणतात, " लघुकथेला कथासूत्राची आवश्यकता असल्यामुळें, कठड्याचा आधार घेऊन जिना उतरणाऱ्या मुलाप्रमाणें नवखा लेखक तिची रचना थोडीफार व्यवस्थित करू शकतो. पण जिन्याला कठडा नसला म्हणजे लहान मूल ठेचाळलें कीं तें गडगडत खालीं जातें. सध्याच्या लघुनिबंधातहि असेच अपघात होत असावेत. संपन्न व आकर्षक व्यक्तित्वाशिवाय आणि तें स्वाभाविकपणें प्रगट करणारी वैशिष्ट्यपूर्ण लेखनशैली साध्य झाल्याशिवाय या लेखन-प्रकारात लेखकाला यश मिळणें कठीण आहे. "

सायकल सावकाश चालविणें कठीण असतें, व सोपें लिहिणें अवघड असतें, तसेंच लघुनिबंध लिहिणें हें एका दृष्टीनें निबंध किंवा लघुकथा याच्यापेक्षां बिकट असतें. सर्कशींतील विदूषकाच्या आडव्यातिडव्या उड्या सहज साधलेल्या दिसल्या तरी त्याना कौशल्य कमालीचें लागतें.

## आत्मनिष्ठ लेखन

निबंध हा पोक्त पंतोजीप्रमाणें उपदेश करतो, तर लघुनिबंध हा जानीदोस्ताप्रमाणें कानगोष्टी करतो. निबंधामध्यें भर दुपारचें ऊन रखरखत असतें, तर लघुनिबंधावर अरुणोदयाची शीतलता, प्रसन्नता व गुलाबी रंग

पसरलेला असतो. निबंध हा जर दोन तटामधून संथपणें वहाणारा, पाथस्थाची तहान भागविणारा व पिकाना पोसणारा नदीचा प्रवाह मानला, तर लघुनिबध म्हणजे दृष्टि सुखविणारे व मन रिझविणारें असे थुइथुइ उडणारें कारजे होय. निबधात तर्कशुद्ध विचारसरणी, मुद्देसूद माडणी, प्रौढ भाषा, गभीर विषय आणि त्या विषयाचें सागोपाग व वस्तुनिष्ठ ( Objective ) विवेचन आवश्यक असतें, तर लघुनिबधामध्ये चमत्कृतिपूर्ण प्रतिपादन, सैल रचना, खेळकर भाषा, क्षुल्लक विषय व त्या विषयाच्या एका कोपऱ्यावर आत्मनिष्ठ ( Subjective ) वृत्तीने प्रकाश टाकावयाचा असतो—स्वत:च्या आवडीनिवडी, लकबी—लहरी, विचार—विकार अगदीं सलगीनें सागावयाचे असतात. निबधकार उपदेश करून शिष्यवर्ग निर्माण करतो, तर लघुनिबधकार गप्पा मारून मित्र जोडतो. निबधाचा सबंध लेखकाच्या मेंदूशीं असतो, तर लघुनिबधाचा सबध हृदयाशीं असतो—किंबहुना लेखकाचा सारा आत्माच त्यात प्रतिबिंबित झालेला असतो.

## समाज–क्रांतीचीं साधनें

निबंध व लघुनिबध या दोहोचीं स्वरूपे व कार्ये भिन्न असलीं, तरी त्या दोहोंचाहि साहित्याला मोठा उपयोग आहे. इंग्रजींत बेकन व मेकॉले यानीं आपल्या विचाराची छाप निबंधाचे द्वाराच पाडली. फ्रेंचमध्ये निबंध लिहून रुसो व व्हॉल्टेअर यानीं सबंध राष्ट्राला राजकीय क्रातीचे सुरुंग लावले, तर जर्मनीत ल्यूथर व नीत्शे यानीं सर्व युरोपभर धार्मिक क्रांतीचा वणवा पेटविला, तो विचारप्रधान निबंध लिहूनच. मराठींतहि 'मालाकार' चिपळूणकर व लो. टिळक या जोडीप्रमाणेच प्रा. पराजपे व बॅ. सावरकर या युतीनेंहि स्वराज्याचा संग्राम निबधाच्या शस्त्रानींच चालविला आणि प्रिं. आगरकर याच्या तीक्ष्ण लेखणींतून जळत्या निखाऱ्याप्रमाणे बाहेर पडलेल्या निबंधानींच महाराष्ट्रात सामाजिक सुधारणेचा अग्नि पेटविला. राजकीय असो, सामाजिक असो, धार्मिक असो—सर्व प्रकारच्या क्रातीची प्रेरणा जन—मनात उत्पन्न करण्याचें कार्य निबंधांनीं केलें आहे.

## लघुनिबंधाचे जनक

इंग्रजी भाषेंत लॅंब, लिंड, ल्यूकस वगैरे लेखकांनीं सुंदर लघुनिबंध लिहिलेले आहेत पण पहिल्या महायुद्धाच्या प्रारंभीं गार्डिनर यानी जे गमतीदार व आशावादी लघुनिबंध लिहिले, त्यावर उल्हासाची व सलगीची कांहीं वेगळीच झाक आहे. डास, आगगाडी वगैरे साध्यासाध्या विषयावर या कुशल ललित लेखकानें आपलें कसबी कलम हलक्या हातानें चालविलें. 'हवेंत तरंगणारीं पानें,' 'समुद्र–किनाऱ्यावरील शिंपले' इत्यादि त्याचे लघुनिबंधसंग्रह विशिष्ट संप्रदाय निर्माण करणारे आहेत. मराठी भाषेमध्ये लघुनिबंधाचा प्रारंभ करण्याचा मान प्रा. फडके यांचा आहे. १९२६ सालीं 'रत्नाकर' मासिकात 'सुहास्य' ही आपली पहिली 'गुजगोष्ट' लिहून त्यांनीं वाचकांना साहित्यातील एक नवेंच मिष्टान्न चाखावयास दिलें. कादंबरीच्या स्वरूपावर अभिनव व मनोरम अशी क्रांति चढविण्याचें श्रेय त्यांनीं पूर्वींच मिळविलें होतें, त्यांत या नव्या वाङ्मय प्रकाराच्या उद्घाटनानें त्यांनीं रुचिर भर घातली. "मार्मिक आणि नवे विचार, आणि ते पुढें मांडण्याचें लालित्य ही गुजगोष्टी लिहिण्याची मुख्य सामुग्री होय.' असें लघुनिबंधाचें वर्णन फडके यांनीं केलें आहे. लघुनिबंधाचा विषय 'सामान्य दृष्टीला क्षुद्र अगर उपेक्षणीय' असतो, पण त्यांतूनच लपलेलें सौंदर्य शोधून–उकलून दाखविणें हेंच लघुनिबंधकाराचें कसब. "अज्ञानाची महती, पांचामुखी सैतान, व्यवस्थितपणाचें वेड, वाट चुकल्याचा आनंद," इत्यादि नुसत्या नावावरूनहि लघुनिबंधाचा खेळकरपणा व विचित्रपणा सहज लक्षात येण्यासारखा आहे. छत्री, छबी, पत्रें, लिफाफे, सिगारेट, खिडकी, फाटका शर्ट, पांढरा केस—असलेहि विषय लघुनिबंधाला चालतात—किंबहुना असलेच !

## सौंदर्याचे पूजक

लघुनिबंधकाराला जे गुण अवश्य, ते फडके यांच्या अंगीं विपुल आहेत. त्यामुळें ते जसें क्रमानें तसेंच पात्रतेनेंहि 'आद्य लघुनिबंधकार'च ठरतात. ते तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक असल्यानें सूक्ष्म विचार व मनोमोहन

हे दोन गुण त्याच्या लेखनांत उतरले आहेत. त्यानीं नाना शहरांत वास्तव्य केल्यानें व दूर दूर प्रवास केल्यानें त्याच्या ज्ञानाला अनुभवाचा सुगध लाभलेला आहे. नृत्य, सगीत, क्रिकेट,—इत्यादि कलांची आसक्ति त्यांचे ठायीं असल्यानें त्याच्या लेखनात प्रसन्नता खेळते. ' जीवन म्हणजे धूर ( Life is a smoke )' हें त्याचें जीवन-विषयक तत्त्वज्ञान असल्याने जीवनातील सौंदर्याचे दाणे टिपून सदैव आनंदी रहाण्याची त्याची वृत्ति आहे. म्हणून त्याचे लघुनिबंध हसरे आहेत. आणि सहजसुदर भाषाशैली व यथातथ्य वर्णनशैली याची किमया तर त्यानीं कादबरींच्या सृष्टींत पूर्वींच करून दाखविलेली. त्यामुळे, नाटक व लघुकथा या क्षेत्रात फारशा धावा न काढणारे फडके कादबरीप्रमाणेच लघुनिबधाच्या क्रीडागणावरहि सीमापार टोले मारू लागले व प्रेक्षकाच्या टाळ्या मिळवू शकले.

## जीवनाची रूपरेषा

ता. ४ ऑगस्ट १८९४ रोजीं प्रा. नारायण सीताराम फडके याचा जन्म झाला. नगर जिल्ह्यातील कर्जत या खेडेगावीं ते जन्मले. तरी दहाव्या वर्षापासून पुढील सारें शिक्षण पुण्यास झाले. १९१० सालीं त्यानीं मॅट्रिकचे प्रवेशद्वार ओलाडले. नतर ते फर्गसन कॉलेजात गेले. क्रिकेट व टेनिस खेळण्यात ते पुढे असत. पत्ते खेळण्यात ते पटाईत होते. नाटकात भाग घेण्यास ते उत्सुक असत. या खेळाबरोबरच बौद्धिक विकासाकडेहि त्याचे लक्ष असे. सभेत सफाईदार भाषणे ते करीत. १९१४ सालीं बी. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गात ते उत्तीर्ण झाले. त्यानतर १९१७ सालीं त्यानीं एम. ए. च्या परीक्षेतहि तसेच भरघोस यश मिळविले तत्त्वज्ञान विषयाचीं विद्यापीठाचीं पारितोषिकें त्यानीं पटकाविलीं. ही दुसरी पदवी त्याच्या हातात पडण्यापूर्वींच ' प्राध्यापकी ' त्याच्या गळ्यात पडली. १९१६ सालीं न्यू पूना कॉलेज निघाले. त्याबरोबर फडके तेथे गेले व तर्कशास्त्र शिकवू लागले.

## विविध व्यवसाय

१९१९ सालीं म. गांधींनीं असहकारितेचें रणशिंग फुंकलें. तें

ऐकताच फडके यानीं प्राध्यापकाचा झगा झुगारून दिला व 'मराठा' या इंग्रजी साप्ताहिकात सहसंपादकाचें काम केले. 'केसरीं'तहि ते हौसेनें 'विविध-विचार-तरंग' लिहीत. १९२० च्या जूनपर्यंत वृत्तपत्रीय सृष्टीमध्ये फडके वावरत होते. पण त्याना गांधीजींच्या चळवळीची गोडी वाटेना आणि त्यांचें मन वृत्तपत्रीय लेखनात रमेना. ते थेट दिल्लीच्या एका खिश्चन कॉलेजमध्ये तत्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून गेले. तेथें त्याचें वास्तव्यहि होतें एका खिश्चन कुटुंबांत. ही जागा हंगामी होती. एक वर्ष पुरें होताच ते परत पुण्यास आले. १९२२ च्या जूनमध्ये सिंध-हैद्राबाद-मधील कॉलेजात ते प्राध्यापक म्हणून गेले. तेथे ते सुमारें चार महिनेच राहिले. तेथून ते नागपूरच्या कॉलेजमध्यें १९२४ च्या जूनमध्यें दाखल झाले. तीनचार महिन्यात तीहि नोकरी त्याना, त्याच्या विशिष्ट मतामुळें, सोडावी लागली. पुनः ते वृत्तसृष्टीच्या आश्रयास आले. १९२५ पासून सुमारे वर्ष दीडवर्ष ते मुंबई येथील एका इंग्रजी पत्राचे संपादक होते. १९२६ च्या जूनपासून ते कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजात प्राध्या-पकाच्या खुर्चीवर जे जाऊन बसले, ते १९५१ सालीं सेवानिवृत्त होईपर्यंत.

त्याच्या कथा, त्याच्या कादंबऱ्या, त्याच्या गुजगोष्टी, त्याचीं चरित्रे, त्याचीं नाटके या सर्वांचा सत्कार महाराष्ट्राने मोठ्या प्रेमाने केला आहे. द. म. साहित्य समेलनानें त्याच्या "प्रतिभा-साधन" ग्रंथास पांचशें रुपयाचें पारितोषिक देऊन त्याचा गौरव केला. १९३९ सालीं मिरज येथें भरलेल्या 'दक्षिण महाराष्ट्र साहित्य समेलनाचे' अध्यक्षपद त्याना देण्यात आलें. एवढेंच नव्हे, तर रत्नागिरी येथे १९४० सालीं भरलेल्या 'महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे' अध्यक्षस्थानींहि त्याची निवड झाली.

## सहलींतील खेळकरपणा

लघुनिबंध म्हणजे बौद्धिक सहलच म्हणाना. आणि सहल कशी असते? फडके यानीं आपल्या एका उत्कृष्ट गुजगोष्टींत सहलींतील सलगी, मनाचा मोकळेपणा व वृत्तीचा खेळकरपणा या सर्वांचें वर्णन फार बारकाईनें व बहारीनें केलें आहे. " चांदण्या-रात्रीं तर फिरण्याची मिजास कांहीं

औरच असते. दिवस सपला असल्याळें शिष्टाचाराचीं बंधनें शिथिल झालींशी वाटतात. " हें जें स्वातंत्र्य सहलवाल्याला, तेंच लघुनिबंध-काराला. तो सहज म्हणून बोलतो पण त्यातून विनोद फुलतो, काव्य उमलतें, तत्त्वज्ञानहि विकास पावतें; पण कसे ? तर दिवाळींत मुले पाण्यात बारीक बारीक चकल्या टाकतात, आणि त्यातून रंगीबेरंगी फुलें निघतात तसें. लघुनिबंधाचा जसा प्रारंभ, तसाच शेवटहि चित्ताकर्षक करण्याची कला 'जादूगार' फडक्याना वश आहे यात नवल काय ? ' पोरखेळ ' या लघुनिबंधाची सुरुवात करतांना ते म्हणतात, " मला लाज वाटली. मी अगदीं शरमून गेलों. माझा सारासार विचार मला म्हणाला, ' तुला हें शोभत का ?' अन् त्या प्रश्नाला मला उत्तर देता येईना. " अशी इतकी लाजिरवाणी गोष्ट ती कोणती ? अशा संशयात वाचक बुडाला म्हणजे मग फडके हळूच, हसतहसत, विस्ताराने वर्णन करून सागतात कीं, कचेरींतून घरीं जातांना मी क्रिकेट पहात उभा राहिलो.

## चित्तवेधक प्रारंभ

अशा शरमिंधेपणाऐवजीं कधींकधीं शूरपणाचें अवसान निबंधकाराला येतें व त्यामुळें वाचकाचे चित्त त्याकडे वेधते. ' कारागीर ' या लेखाचा प्रारंभ असा शौर्यपूर्ण व हास्यपूर्ण आहे. " कधीं कधीं वाटतं, खुशाल दाढी वाढवावी आणि या दैनिक श्मश्रूच्या गुलामगिरींतून कायमचं मोकळं व्हावं ! गुलामगिरी नाहीं तर काय हो ? कोण हा खटाटोप, अन् कसली ही हनुवटीवर धरलेली दैनिक कर्तव्याची धार ! "

विचार, माडणी, भाषा सारें कांहीं विनोदी. ' शाई ' या निबंधाला तोंड लागतें तें अशा गंमतीदार लेखनामुळेंच. त्यामुळें वाचकाला पुढें वाचण्याची सारखी ओढ लागते. ' शाई ' ची सुरुवातच अशी आहे— " अतिपरिचयात् अवज्ञा ! नाहीं तर ' शाई ' या विषयावर ग्रंथ लिहिण्यांतच किती तरी शाई खर्च करतां येण्यासारखीं आहे ! निदान मला त्या वेळीं असें वाटलें खरें ! मी सकाळीं कायसें लिहावयासाठीं टेबला-जवळ बसलों आणि दौतींत लेखणी—भलतेंच ! टांक बुडवितों तों शाई

नाहीं. मुंबईतल्या चाळींतल्या एखाद्या स्त्रीनें मोठ्या आशेनें नळावर जावें आणि पाणी गेल्यावर कोणीतरी खोलून ठेवलेल्या नळाचें कोरडें ठणठणीत तोंड तिच्या दृष्टीस पडावें म्हणजे तिला जसें होतें तसेच थोडें फार मला झाले ! उठलों, शेल्फवर शाईची मोठी शिशवी होती ती काढली, व दौतींत शाई ओतून ध्यावयासाठीं तिचे तोड उघडू लागलों. शिशवीच्या आत डौलाने चमकणाऱ्या त्या मनोहर जाभळ्या द्रवाकडे पहातच रहावेसे मला वाटले. " किती सुंदर शब्द-चित्र काढले आहे फडके यानीं ! कादंबरीकारच आहेत ते ! यापुढें शाईचे जें माहात्म्य त्यांनीं गाइले आहे, तें वस्तुतः साहित्याचेंच आहे. साहित्याचे एक साधन म्हणजे शाई. याच रीतीनें दौत, टाक, कागद वगैरेंचेहि हेच गुणवर्णन करता आलें असतें. आणि तें तितकेंच प्रस्तुत—किंवा अप्रस्तुत—ठरले असते. तीक्ष्ण तर्काची कठोर कसोटी लघुनिबंधाला लावून चालत नाहीं. आपल्या गप्पाना, खेळाना, छंदाना आपण ती कोठें लावतो ? ती लावली तर तर्कशुद्ध प्रतिपादनाचे, गंभीर भाषाशैलीचे व महान विषयावरचे ते तात्त्विक निबंधच ठरतील. पण त्या 'दादाचे' गुण या 'छोट्या भाई' च्या अंगीं कसे येणार ? तशीच चटकदार सुरुवात 'पत्रें' या निबंधाचीहि आहे ती अशी—" मानवी संस्कृतीला आलेल्या विविध फळाचीं तुलना केली तर पत्राना चिमुकल्या, रसदार, मधुर काबुली द्राक्षाचीच उपमा द्यावी लागेल. काबुली द्राक्षाचें असें आहे कीं ती पाहिल्याबरोबर मनाला मोह होतो; आणि शिवाय तीं सबंधच्या सबध चटदिशीं खाता येतात. आपल्याला पत्रे आलीं कीं, तींदेखील विलक्षण मोह घालतात. तीं घाईनें वाचल्याखेरीज आपल्याला दुसरें काहीं सुचत नाहीं. आणि तीं चटकन् साद्यंत संपविता येण्यासारखीं असून त्यातील कोणताही भाग त्याज्य नसतो."

लघुनिबंधाच्या प्रारंभाचा आणखी एक नमुना पहाण्यासारखा आहे. 'ऐन पचविशी' याची सुरुवात फडक्यांनीं कादंबरीला साजेशा वर्णनानें केली आहे. ती अशी, " समुद्र अतिशय खवळलेला होता. वारा असा सोसाट्याचा सुटला होता,' कीं किनाऱ्यावर उभ्या असलेल्या स्त्रियांना आपले पदर व केंस सांवरतां सांवरतां पुरेवाट झाली होती; आणि त्यांच्या

त्या संभ्रमाकडे पुरुषमंडळींच्या चोरट्या नजरा पुनः पुन्हा धावत होत्या. समुद्राच्या उसळत्या लाटा धांवत येत त्या किनाऱ्याच्या फरशीवर हापटत, तेव्हा मोठी गर्जना होई, आणि सफेत फेंसाच्या मोत्याचे सरच्या सर हवेंत उंच उडत !"

## अखेर साधली !

मेजवानी-पानसुपारी आटोपल्यावर पाहुण्याच्या हातावर अत्तर लावावें व त्याना निरोप द्यावा, त्याप्रमाणे फडके आपल्या निबंधाच्या अखेरीस एकादा मधुर विचार ठेवून देतात. 'नव्या इमारती'ची अखेर ते अशी करतात, "मीं त्या चित्रपटगृहात प्रथम पाऊल टाकले तेव्हा अशाच काहींशा विचाराची माझ्या मनात गर्दी झाली होती. आणि नतर थिएटरांतले दिवे विझले, पडदा दूर सरकला, आणि आतल्या रजत-पटावर वेणीचा शेपटा जिच्या खाद्यावर खालीं रुळत आहे अशी स्त्री प्रगट होऊन तिनं तुतारीचे उच्च स्वर काढलेले मीं ऐकले, तेव्हा अतः-करणातल सगळं विषादशल्य नाहींसे होऊन मीं मनाशीं म्हटल, बरोबर आहे, नव्या कालाच असच स्वागत केले पाहिजे !"

प्रारभाप्रमाणेच शेवटहि सहजसुदर भाषेने व गमतीदार विचाराने करण्याकडे फडके याचे लक्ष असते. 'पोरखेळ' या निबधाचा समारोप करताना ते प्रतिज्ञापूर्वक म्हणतात, "पण मी आता स्वतःची वचना करून घेणार नाहीं. लोकल गाडीची मी वाट पाहणार; इतकच नाहीं तर ती आली, कीं आरोळीसुद्धा ठोकणार, आणि वाजविता आली तर शिटीसुद्धा वाजविणार ! पाहीना मला कोणीं पाहिल तर आणि ठेवीना नाव ! स्वतःची शरम वाटण्याऐवजीं मला त्याचीच कींव येईल !"

## विनोदाचें वातावरण

जसा आरभ, तसाच शेवट–आणि तसाच सारा निबंधहि–गंमतीचा, सलगीचा करण्याचा कटाक्ष फडके ठेवतात. त्यांच्या निबधाचा देह आपादमस्तक रमणीय व कातिमान् आहे. वास्तविक त्याची वृत्ति श्लेष-अनुप्रासादि शब्दालंकार करण्याची नाहीं, किंबहुना उपमा-उत्प्रेक्षांचा

पाऊस पाडण्याचीहि हौस त्याना नाहीं. पण लघुनिबंधाचें सारें वातावरण विनोदी रहावे म्हणून ते त्या सवग साधनांचाहि मधून मधून उपयोग करतात. ' गंध,' ' शाल,' वगैरे शब्दावर ते जाता जाता श्लेष करतात. ' बाजार ' या निबधात ते म्हणतात, " शाल अंगावर असूनहि मी थडच झालो ! शालीऐवजीं शालजोडींतले मिळाल्यासारखा चेहरा खचित झाला असेल माझा पैसे देताना ! ' तशीच शब्द-लीला " न वाचलेल्या ग्रथाची गोडी " या निबधात त्यानीं पुढीलप्रमाणें केली आहे, " पुस्तकानीं कपाटें भरलीं की अत करणाच्या कपाटातला त्याजविषयींचा आपुलकीचा ग्रथ आटोपलाच म्हणून समजावे."

' नको असलेलीं पुस्तके ' हा लघुनिबन्ध तर अथपासून इतिपर्यंत विनोदानें दरवळलेला आहे. इद्रधनुष्यातील रगाप्रमाणे अशा लघुनिबंधाची सीमा कोठें सपते व लघुकथेची हद्द कोठें सुरू होते हें सागणेच कठीण ! 'राशीला ग्रह आला,' 'साडेसाती' इत्यादि शब्दावरील श्लेष तर हास्यकारक आहेतच, पण पुस्तक देणाऱ्याला त्याचेच पुस्तक ' दुसरें ' म्हणून परत करणे ही घटनाहि विनोदी कथेला शोभण्यासारखी आहे. त्यावेळीं नायकाची जी धादल उडते ती कोणाच्याहि मुरकुडया वळविणारी आहे. तसाच ' छत्री ' हा निबध हास्यरसाने थबथबलेला आहे लो. टिळकाना Steady, Smile सागण्यातील विरोध किती सूक्ष्म आहे.

## बहुमोल अलंकार

सुदर व समर्पक उपमा देण्यात तर त्याचा हातखंडाच आहे. 'सुहास्य' या आपल्या पहिल्याच निबधात ते लिहितात, " खरे पाहता हंसतमुख हें उमलत्या कळीप्रमाणे किंवा चतुर्थीच्या चद्रकलेप्रमाणें आहे. तें कोठेंही दिसले तरी पाहणाराची वृत्ति प्रसन्न झालीच पाहिजे. "

समर्पक उपमाच काय, अन्वर्थक शब्दहि शोधण्याची दक्षता फडके घेतात. ते काम किती कठीण आहे हें त्यानीं किती मौजेने सांगितले आहे. " डोंगरमाथ्याच्या अगदीं कडयावर, धोक्याच्या जागीं फुललेल्या नगुलाबाचें गेंद दिसावेत व मग ते हस्तगत करण्यासाठीं साहस करावं,

किंवा दुसऱ्याच्या परड्यात पारिजात फुलांचा सडा पडलेला असावा व तिथें पोंचण्यासाठीं काटेरी कुंपण तुडवीत जाव, किंवा तळ्यातल्या नील-कमलांनीं मोहनी घालावी, अन् त्याच्यापर्यंत पोंचायसाठीं कमरेइतक्या पाण्यात उतरणं भाग असाव, तद्वत हवे ते शब्द हुडकावे लागतात. ”

‘ पोरखेळ’मध्यें पुढील उपमा किती चपखल आहे, “ उन्हाळ्यात साचलेला पाचोळा पावसाच्या पहिल्या सरीन वाहून जावा तशी फाट-काच्या दोन्ही बाजूस थोपलेली रहदारी दोन्ही दिशानीं वाहून गेली. ” तशीच ‘ ताज कलम’मधील उपमा– “ थिएटरातल्या सगळ्या जागा भरल्यावर गयावया करणाऱ्या फुकट्याना मॅनेजर जागा दिसेल तिथें उभा करतो. त्याप्रमाणे त्याच्या पत्राच्या भोंवतालीं मजकूर गर्दी करून उभा राहिलेला असायचाच ! ” पण पुढेंपुढे ही अलकारिक भाषाशैली फडके यानीं टाकून दिली आणि दोन मित्राच्या सुखसवादातील सहजसुंदर भाषाच तेवढी वापरली.

## भाषेची ऐट

‘ ऐन पंचविशी ’ या निबधात तारुण्यातील उमेद व उत्साह यांचें वर्णन फडके यानीं सहजतेनें पण ऐटदारपणें कसे केले आहे, पहा—
“ ऐन पचविशी ती ऐन पचविशी ! तिची सर दुसऱ्या कोणत्याच वयाला यावयाची नाहीं ! पंचविशी हे एक असें वय आहे कीं, त्या वयात क्षितिज लाब वाटत नाहीं, आकाश आटोक्याच्या पलिकडचे वाटत नाहीं, सागर अथाग वाटत नाहीं–सृष्टींतील कोणतीही वस्तु किंवा व्यक्ति आप-ल्याला मिळविता येणार नाहीं अशा स्वरूपाची भासत नाहीं ! तें वयच असें आहे कीं, त्या वयांत जगाच्या दृष्टीला कदाचित् वेडेपणाच्या वाटतील असल्या गोष्टी आपल्याला कराव्याशा वाटतात, आणि त्या करण्याची धमक आपल्या शरिरांत असते. त्या वयातच नदीच्या पुरात उड्या टाकून पोहण्याचें सौख्य त्यांना उपभोगतां येतें; कोठें आग लागलेली ऐकली तर ती विझविण्यासाठीं दोन दोन मैल आपण धांवत जातों; उत्तम क्रिकेट सामना पहावयास मिळावा म्हणून झाडांच्या फांद्यावर चढून बसण्यांत

शरम वाटत नाहीं लोकांना दिसणाऱ्या अडचणी दिसत नाहींत, पर्वता-एवढालीं सकटे ठेंगणीं वाटतात व शत्रूच्या छळाचा समुद्र गुडघ्याइतकाच खोल वाटतो ! ''

## मनोहर वर्णनशैली

साधाच विचार पण तो मनोहर भाषेने खुलवून माडला कीं, तो चित्तात कसा दरवळत रहातो, याचे नमुने फडके याच्या लघुनिबधात अनेक आहेत. ' एक रात्र आणि पहाट ' याचा श्रीगणेशा करताना ते लिहितात " पुस्तकाच्या तीन जाती आहेत. कांहीं अशीं असतात कीं, ती भर्रकन् वाचून टाकावीं. आपण गाडी थाबल्या वेळात स्टेशनवरचे आइस्क्रीम नाहीं का संपवीत ? तशीं काही पुस्तके अशीं असतात कीं, उगाच चाळावीं आणि ठेवून द्यावीं. भरल्या पोटावर आपल्यापुढे कोणीं बशीभर चिवडा ठेवला म्हणजे त्यातल्या दोन काजूबिया खाऊन जशी ती बशी आपण बाजूला सारतों ना ? त्याप्रमाणे. पण काहीं पुस्तकें मात्र आपल्या मनाला अत्यत आवश्यक अन्न देणारी असतात व तीं त्या अन्ना-प्रमाणे सावकाश चघळून पचविलीं पाहिजेत. ''

' बाजार ' या निबधातहि वर्णन व विचार याचा सुंदर मेळ बसला आहे. मंडईचे वर्णन करताना फडके लिहितात,

" पुण्याच्या मडईत घटका अर्धी घटका रेंगाळण्यात विलक्षण मौज वाटते. हरतऱ्हेच्या ताज्या ताज्या भाज्याचे ते प्रचंड ढीगच्या ढीग अन् कपड्यानं वरचेवर पुसून ज्याची काति वाढविली आहे व झिरझिरीत रंगीबेरगी कागदाच्या बैठकींत ज्याची स्थापना केली आहे, अशा सतरा प्रकाराच्या फळांनीं शिगोशिग भरलेले ते करंडे पाहिले कीं, डोळ्याचं पारणं फिटल्या-सारखं वाटत. धरित्रीच्या उदरातून बाहेर आलेल्या त्या फलसृष्टीचा सुगंध मिळाला कीं, चित्तवृत्ती ताज्यातवान्या होतात. ''

नाट्यपूर्ण रीतीनें फडके मंडईतील दृश्ये उभीं करतात, तीं अशीं–" ती पहा ती माळीण आपल्या माजीची टवटवी कायम राहावी म्हणून तिच्यावर पाणी शिंपतां शिंपता किती उल्हासानं " पैशाला दोन

लावल्या " म्हणून ओरडते आहे! कोंवळ्या लुसलुशीत खिऱ्यांच्या ढिगामागं बसलेला तो माणूस बघा कसा हसतो आहे व ऐटीनें तागडी झुकवितो आहे! लालसर, पिवळसर टपोरीं बोरं विकणारी ती बाई पाहिलीत कशी उच्च रवान सागते आहे "साखरलाडू! सस्ते लावले!" अशीं नुसतीं सुरेख शब्द-चित्रें काढून फडके थाबत नाहींत, तर त्याच्या कृतींतून ते सिद्धांत मंथन करून काढतात, तो असा—" गर्दी, गलबला, धावपळ या गोष्टी माणसाच्या जीवनाला आवश्यक आहेत. त्याच्या योगानंच अंतःकरणाचा कोठा साफ रहातो. एकान्तात मनुष्य चिंतन करूं शकतो, अन् बाजाराच्या उल्हासी गर्दींत त्याच्या चिता निवळतात."

आपलें मत वाचकाला आता पटले असेल, अशा आत्मविश्वासानें फडके शेवटीं वाचकाना असा सवाल टाकतात, " जिथें आपण एकमेकाचे धक्के मनावर घेत नाहीं, ओळख नसताहि एकमेकाकडे पाहून हसतों, नसत्या चौकशी करू शकतों, गर्दींत व गलग्यात सामील होतों, त्या स्थलाचा मोह कुणाच्याहि मनाला पडावा, नव्हे काय?"

## पुनःप्रत्ययाचा आनंद

'हरवली म्हणून सापडली' या विरोधाभासात्मक शीर्षकाच्या निबंधात फडके लिहितात, " माझी टेबलाच्या खणाची किल्ली हरवली खरी, पण या केवढ्या सौख्यागाराची किल्ली मला सापडली! किंबहुना, ती हरवली म्हणूनच ही सापडली!" किल्ली शोधता शोधता फडताळांतील अडगळीच्या ज्या जुन्या वस्तु लेखकाच्या दृष्टीपुढें आल्या, त्यानीं त्याची स्मृति जागृत केली, त्याला पुनःप्रत्ययाचा आनंद दिला आणि तीं अलगुजें, तीं सुवर्णपदकें, तो जाई कुत्रीचा पट्टा-या सर्वांशीं चिकटलेल्या भावना उसळून आल्या. त्यामुळें लेखकाच्या हृदय-कपाटाचेंच दार वाचकांना खुलें झालें—आणि हेंच लघुनिबंधाचें यश!

## विचारांची चमत्कृति

एकच विचार, पण तो उलटा करून मांडला कीं, चमत्कृति उत्पन्न करतो, नाहीं? 'खालीं डोकें वर पाय' केलेल्या माणसाप्रमाणें त्याकडे

जो तो पहातो व हसतो. ' पहाटे उठा, वक्तशीर वागा, व्यवस्थित रहा ' इत्यादि आदेश पोक्त स्वभावाचे निबंध देत असतातच, पण त्याच्या उलट अपवाद म्हणून, ' उशीरा निजा, घड्याळाची गुलामगिरी टाका, मनमानेल तसे हिंडा ' असें कोणी सांगितले तर किती गमतीचे वाटेल! ' रविवार ' या निबंधात फडके असा उफराटा सिद्धात सागतात, " काम न करण्याचा रविवार आहे म्हणून सारीं कामं सुरळीत चालली आहेत! विश्रातीचं आश्वासन देणारा रविवार यायचा असतो म्हणून तुम्ही-आम्ही सहा दिवस कष्ट करतो."

' न वाचलेल्या ग्रंथाची गोडी ' हा विचारहि असाच उफराटा आहे. फडके म्हणतात, " हाच आनद न वाचता ठेवलेल्या माझ्या सग्रहांतल्या त्या पुस्तकात आहे. तीं पुस्तके म्हणजे माझ्या ललाटीं मीच आपल्या हातानीं आगाऊ लिहून ठेवलेल्या हर्षभराच्या घटकाच मला वाटतात. आपल्या नशिबात भरपूर सपात्ति असल्याचे ज्योतिष्यानें सागितले म्हणजे जो आनंद होतो, तसलाच आनंद त्या पुस्तकापासून मला पुनः मिळतो. वाचन-सौख्याचा विशुद्ध आनंद माझ्या नशिबात भरपूर असल्याची ग्वाही तीं पुस्तकें मला हसतमुखाने देतात. पुढे केव्हा उपयोगी पडावी म्हणून कृपण ज्याप्रमाणें सपात्ति साचवून ती न खार्चिता तिच्याकडे नुसता वारंवार पाहतो, तद्वत् माझे भावी सुखाचे क्षण ज्यात भरलेले आहेत तीं ही पुस्तकें पुनः पुनः पाहण्यात व पुसून साफ करून जागच्या जागीं ठेवण्यांत मला अनिवार आनंद होतो. "

अमावास्येला पूर्ण चंद्र कोणी पाहिला आहे ? पण लेखकानें तो 'अंधारी रात्र' या आपल्या निबंधात उत्पन्न केला आहे. देवतेनें प्रसन्न होऊन दोन चंद्र निर्माण केले व त्याना आळीपाळीनें काम दिलें, ही लेखकाची कल्पना जितकी चमत्कृतीची, तितकीच सदैव चांदणें असणेंहि उद्वेगाचें ठरेल, हा तर्कहि विचित्रपणाचाच नव्हे काय ? अंधाऱ्या रात्रींच असंख्य चांदण्याशीं 'बोलल्यावांचून बडबडतां येते'. हें काव्य चद्रप्रकाशात कोठून येणार ? असा सवाल लेखक करतो.

## सुविचारांची गुंफण

लघुनिबंध म्हणजे केवळ साबणाच्या पाण्यांतून रंगीबेरंगी फुगे उडविण्याचा खेळ नव्हे. खेळकरपणा त्यांत अवश्य हवा, पण त्याच्या पोटीं सुविचारहि हवा. तो विचार जो तो लेखक आपापल्या 'प्रकृती'प्रमाणें मांडतो. फडके याचा पिंड श्रीमती, विलासी, ऐषआरामी; त्यामुळे त्याच्या लघुनिबंधात तसलेच विचार विखुरलेले आहेत. काचेच्या फुलदाणींत गुलाबाचीं फुले ठेवावींत त्याप्रमाणे ते आपले आनंदी विचार लघुनिबंधात मांडतात. सोन्याच्या तबकातून मेवामिठाई ठेवावी तसे आयुष्याकडे सुखाच्या, महत्त्वाकाक्षेच्या, प्रवृत्तीच्या, दृष्टीने पहावयास शिकणाऱ्या सिद्धाताची पखरण ते आपल्या लघुनिबंधात करतात.

घड्याळ या लघुनिबंधात ते सागतात, "कोणत्या एका तरी गोष्टीची अशी वेडी आवड असायला पाहिजे, कीं जिच्या नादानं त्याला घड्याळाचा पूर्ण विसर पडेल."

ग्रंथाला 'सुगंध' लावण्याच्या अमेरिकन कृतीचा फोलपणा दाखवून, फडके उपदेश करतात, "ग्रंथाच्या पानागणिक लेखकाच्या लालित्याचा, विद्वत्तेचा अन् श्रद्धेचा परिमल येत असला म्हणजे त्या ग्रंथाला कृत्रिम सुगंध न लावतांही वाचकवृंद भ्रमरासारखे त्यावर लुब्ध होतात. सतत अभ्यासानं व दीर्घ परिश्रमानीं हा टिकाऊ सुगंध आपल्या लेखणींत येईल असा कटाक्ष लेखकानं ठेवला पाहिजे. हा परिमल इतका दिव्य आहे की, हजारो वर्षे झालीं तरी तो उडून जात नाहीं किंवा कमीही होत नाहीं."

'नव्या इमारती' पाहून प्रथम आश्चर्याचा व खेदाचा धक्का बसला, तरी लेखक असें तत्त्वज्ञान निवेदन करतो, "चौफेर पसरत चाललेल्या पुणें शहरातल्या नव्या शोभिवंत इमारतींकडे पाहून उत्पन्न झालेला विषाद नाहींसा करणारा असाहि एक विचार माझ्या मनांत येतो. ठिकठिकाणीं माझा मृत्यु घडत आहे. घडे ना ! मरतांमरताच नव्या परिस्थितीचे नवे ताजे कोष धारण करून मी जगत आहें. याचा प्रत्यय मला पुनःपुन्हा येत असतांना त्या विनाशाचं दुःख मी काय म्हणून करावं ? होय, मी

मनाशीं अशीच समजूत धरली पाहिजे, कीं अंशतः मेल्यावांचून जीवनाची क्रिया सतत चालू राहत नाहीं. छायेवाचून प्रकाश नाहीं तद्वत् मेल्यावांचून जगता येत नाहीं. ''

## जीवनाचें तत्त्वज्ञान

' घरकुलांतलीं दुःखं ' या निबंधाच्या शेवटीं तर एकाद्या तत्त्ववेत्त्याप्रमाणेंच फडके उपदेश करीत आहेत—मात्र तो किती मनोहर रीतीनें पहाः— '' आपली दृष्टि आकुंचित असली कीं, आपल्या लहानशा घरकुलातलीं दुःखं आपल्याला मोठीं वाटूं लागतात, भेडसावूं लागतात. पण तेंच आपल्या घराचं छोटं अंगण सोडून हजारो माणसांच्या सुखदुःखांच्या विस्तीर्ण क्रीडांगणावर आपण पाऊल टाकलं, कीं सूर्य डोक्यावर येतांच पायाखालची सावली बिंदुमात्र व्हावी, त्याप्रमाणे भेसूर वाटणाऱ्या आपल्या क्षुद्र दुःखांची सावली आपल्याला जवळजवळ दिसेनाशी होते !''

तसाच सुविचार ' आरसेमहाल ' या निबंधात आहे. तो किती समतोल व लयबद्ध भाषाशैलीनें निवेदिला आहे पहाः—'' ज्याच्या अंतःकरणांत सौंदर्य असेल त्याच्या दृष्टीस सुंदर वस्तू पडतात, ज्याच्या अंतःकरणांत संगीत असेल त्याला मधुर स्वर ऐकू येतात, ज्याच्या अंतःकरणात स्नेह असेल त्याला मित्र मिळतात, ज्याच्या अंतःकरणात प्रेम असेल त्याला प्रेमिकांची जोड होते. माणसाच्या अंतरंगाचीं प्रतिबिंबेंच त्याच्या भोंवतालच्या वस्तूंत अन् व्यक्तींत पडत असतात. जग म्हणजे एक विलक्षण आरसेमहाल आहे ! ''

' पोरखेळ ' पहाण्यात गेलेला वेळ वाया जात नाहीं, त्याचाहि आपल्या आयुष्याला उपयोग असतो, याची मीमांसा फडके यांनीं सूक्ष्मपणें केली आहे, ती अशीः—

'' अशा पोरखेळांच्या मसाल्यावांचून जीवितात गोडी उरायची नाहीं. तें रुचिहीन होईल. त्याचा लवकरच वीट येईल. माणूस आंबून जाईल. त्याचं तारुण्य आणखी त्याचा उत्साह फार दिवस टिकणार नाहीं.

म्हाताऱ्याला तारुण्याची पुनः प्राप्ति करून देणारीं रसायनं शोधून काढण्यात शास्त्रज्ञ गुंतले आहेत. पण, माणसाची जवानी अखंड टिकवणारं ' पोरखेळ ' हें एकच रसायन आहे ! त्याचं महत्त्व जो ओळखील त्याला कधीं वृद्धत्व येणार नाहीं. "

तोच विचार शहरातील नेहमींच्या एका दृश्याचे वर्णन करून, फडके पुढीलप्रमाणें माडतात. "खेड्यातून भाजीन भरगच्च भरलेले हारे डोक्यावर घेऊन शहराकडे लगबग जाणाऱ्या माळिणी तोंडानं गाणीं म्हणतात, अन् वाटेत मधून मधून डोक्यावरचं ओझं खालीं ठेवून घाम पुसतात. त्याप्रमाणेच ओझं दूर करून घटकाभर मनाला विरगुळा घेण्याची संधि साधलीच पाहिजे. "

## विश्रांतीची हिरवळ

फडके हे सौंदर्यशोधक व आनंदसेवक आहेत.त्यामुळें विश्रांतीचा हा विचार ते पुनः पुनः माडतात. 'सुहास्या 'त ते लिहितात," त्या त्या वस्तूविषयी त्या त्या वेळेपुरते तादात्म्य ठेवून आनंदाचा उपभोग घेण्याच्या या बालवृत्तीमुळेच ससार सुखमय होत असतो. ही बालवृत्ति ज्याच्याजवळ नसते त्याला ससारात आनंद असूनही सापडत नाहीं. संध्याकाळच्या तिरप्या उन्हांत पदार्थांच्या छाया दसपट मोठ्या दिसाव्या; त्याप्रमाणे त्या मनुष्याला संसारांतील लहानसहान दुःखेही प्रचंड व असह्य भासूं लागतात. पत्र्याच्या छपरावर पडलेली लहानशी सरही मुसळधार पावसासारखी वाटावी, त्याप्रमणे लहानशी निराशाही त्याला भेवडावूं लागते. भयाण देवळाच्या सभामंडपात घोटाळणारा वाऱ्याचा लहानसा झोत सूं सूं आवाज होऊन झंझावातासारखा वाटावा, त्याप्रमाणें दुर्दैवाचा विरुद्ध वारा जरासा वाहूं लागतांच त्याला भयंकर वादळात सांपडल्यासारखे वाटून तो गागरून जातो व हतबल आणि हतबुद्ध होतो. अशीं माणसेंच म्हणतात, संसार निःसार आहे."

तोच आशय रूपक अलंकारानें सजवून ' सुहास्य 'मध्यें पुढीलप्रमाणें

माडलेला आहे. " लहान मुलाच्या भोळ्या वृत्तीची कींव करणाऱ्या प्रौढ माणसांची स्थिति त्या मुलाहून निराळी नाहीं. या संसारात लहान-मोठा प्रत्येक मनुष्य कोणत्या तरी एखाद्या खेळण्याच्या नादीं लागलेला असतो. कोणी काव्याचा खुळखुळा करून त्याच्या नादांत असतो; कोणी शास्त्रीय शोधाची बाहुली घेऊन ती जन्मभर उलटीसुलटी फिरवीत असतो, कोणी वेदान्ताचा आरसा घेऊन त्यात आपलें स्वरूप सारखें पहात असतो; कोणी राजकारणाचीं घरकुलें बांधण्यात, मोडण्यात आणि पुन्हा उभीं करण्यात दंग असतात, आणि कोणी जिवंत बाहुलीच्या नादीं लागून तिला वस्त्राभरणानीं सजविण्यात, तिच्याशीं प्रेमकलह करण्यात आणि तिचे परोपरीने कौडकौतुक करण्यात रमून जातात."

## सौंदर्यप्रेमी दृष्टि

रमतगमत जाण्याचा सल्ला देताना फडके ' सहल ' या निबंधांत म्हणतात, " बहुतेक माणसाच्या दुःखाचे कारण तीं एकमार्गी असतात हेंच असते. त्याना आपल्या धंद्याखेरीज काहीं दिसत नाहीं. मुक्काम गाठायसाठीं ती धावत असतात, घामाच्या धारा पुशीत असतात, आणि अजून मजल किती उरली तें पुनःपुन्हा टाचा उचलून व मान उंच करून पहात असतात. अशा सर्वांना त्यांच्या हिताची एकच गुजगोष्ट सांगतों, कीं त्यानीं जीविताच्या रस्त्यावरून धावतपळत जाण्याऐवजीं रमतगमत स्वच्छंदाने सर्व सुंदर वस्तूंचा उपभोग घेत सहल करावी. मग सुखाचा शोध निराळा करावयास नको."

महाबळेश्वराला असताना आपली वाट चुकली, तरी त्यापासून आपला फायदाच कसा झाला हें सांगून फडके प्रतिपादतात, " वाट चुकली कशी हें जसं मला कळलं नाहीं त्याप्रमाणं ती अचानक सांपडली कशी तेंही मला कळलं नाहीं. अन् वाट पुन्हा सांपडल्याच्या आनंदापेक्षा वाट चुकल्यामुळं सृष्टींतल्या अत्यंत उग्र अन् अत्यंत नाजूक अशा दृश्याचं दर्शन घडून ज्या आनंदानं माझं अंतःकरण डवरलं होतं तो किती तरी मोठा होता ! " गार्डिनरच्या ' आगगाडी चुकल्यावर ' या लघुनिबंधापेक्षांहि

फडक्यांच्या या निबंधातील काव्य व तत्त्वज्ञान यांचे पराग अधिक सुगंधी आहेत.

## वाङ्मयाचा महिमा

'शाई'चे नाव घेऊन वाङ्मयाचा महिमा गाताना फडके लिहितात, "राष्ट्राराष्ट्रामधील तहनामे हिच्याच पोटीं जन्माला येणार आणि गुलामाच्या मुदतबंदीचे करारही हीच प्रसवणार! लाखों अनाथाच्या योगक्षेमासाठीं दिल्या जाणाऱ्या धर्मादायाचीं दानपत्रें हिनेच मुद्रांकित होणार आणि अज्ञ सनाथाना अनाथ करून दारोदार फिरावयास लावणारीं खोटीं गहाणपत्रेंही हीच कायम करणार! सुधा आणि हलाहल एकाच कोट्यात सांठविणारा किती अजब द्रव पदार्थ हा!" साहित्यिकाची लेखणी आग लावू शकते, तशीच ती विझवूहि शकते. याच कल्पनेवर त्यांनीं एक कथाहि लिहिलेली आहे. शेवटीं ते सूचना करतात, "वास्तविक दारूगोळा किंवा समशेर हातीं घेणाऱ्या इसमाइतकीच दौतींत शाई ओतून घेणाऱ्या इसमावरही सरकारने करडी नजर ठेवावयास हवी. शाई ही-देखील समशेरीसारखीच शक्ति आहे."

'मित्रा'ची महती फडके पुढील उपमेने सांगतात व शेवटीं 'मित्र' शब्दावर श्लेषहि साधतात. "मित्र म्हणजे केवळ आपल्या जीविताचे अलंकार नव्हेत. आपल्या जीवितप्रवाहाला योग्य वळण देणारे ते तट आहेत. काजव्याचे थवेच्या थवे जर आपल्याला दिसले तर त्याची शोभा मोठी रमणीय वाटल्यावाचून राहात नाहीं. पण त्या शोभेचा उपभोग घेण्यासाठीं आपल्याला अधःकारात राहावें लागते. आपल्याला वाम-मार्गाच्या अंधःकारात टाकून केवळ आपल्याला क्षणभर सौख्य देणाऱ्या या काजव्यांप्रमाणें खरे मित्र नसतात. खरा मित्र सूर्यासारखा असतो."

## ऋतूंचें शब्द-चित्र

"पाऊस" हा निबंध म्हणजे फडके याच्या भाषा-वैभवाचें, काव्य-शक्तीचें व वर्णन-शैलीचें एक सुंदर कोरीव लेणेंच. 'वर्षाकाल हाच सौंदर्याचा

पर्वकाल ' अशी वकिली करण्यासाठीं त्यांनीं आपलें सारें लालित्य, जणु कांहीं पणास लावलें आहे. वसंत ऋतूचींच स्तुतिस्तोत्रें रचणाऱ्या कवीवर लटका राग काढून फडके त्याच्या भावडाला–'ग्रीष्माला'–आपल्या टीकेनें जाळून-पोळून टाकतात. ग्रीष्माचा ताप वर्णन करताना त्याची ललितरम्य लेखणी लिहिते, " नीच प्रकृतीच्या मंत्रिमडळाची चिथावणी मिळाली, कीं ज्याप्रमाणें एखाद्या जुलमी राजाच्या छळाला भर यावा; त्याप्रमाणे ग्रीष्मातल्या चडांशूचा ताप साऱ्या सृष्टीला असह्य झालेला असतो, व सृष्टीचा जीवनरसाचा साठा संपत आलेला असतो. सत्रस्त प्रजेनें एखाद्या उद्धारक महात्म्याची वाट पहावी तद्वत् सारी सृष्टि जलधारांसाठीं आ· वासून बसलेली असते. आईच्या सहवासाला फार दिवस अतरल्यावर बालकाचें तोंड सुकावे तद्वत् वृक्षशाखावरचीं चिमुकलीं पाने म्लान आणि दीन दिसत असतात सौभाग्यचिन्हानीं भरलेला असला तरच सुंदर दिसणारा सुवासिनीचा हात त्यावाचून रिकामा आणि अशुभ वाटावा तशी नदीच्या पात्राची अवस्था झालेली असते. राजमार्गातून आणि मातीच्या ढेकळानीं विखुरलेल्या शेताभातातून वाफा निघत असतात, त्या जणूं काय जलवृष्टीसाठीं धरणीने केलेल्या आर्तस्वरातल्या प्रार्थनाच वाटत असतात ! "

उन्हाळ्याच्या अशा कडक दाहानंतर पावसाची जी पहिली सर येते, तिचें सौंदर्य काय वर्णावें ? त्या सरीनें सृष्टीमध्यें किती मनोहर क्रांति होते याचे वर्णन करून, त्यावेळीं पृथ्वींतून उडणाऱ्या गंधाची कल्पना देण्यासाठीं फडके लिहितात, "जलधाराच्या पहिल्या घुटक्याबरोबर हवेंत दरवळणाऱ्या त्या मृत्तिकागधाला स्तनपान करताच मस्त आनदानें चळवळणाऱ्या बालकाच्या निःश्वासाचीच उपमा साजेल ! त्या निःश्वासाइतकाच तो गंध पवित्र व आल्हादकारक वाटतो. मृग नक्षत्रातील ती पहिली सर कोसळते व तो अनुपमेय गध भूपृष्ठातून उठतो, त्या वेळीं लहान मोठ्या पक्षांची फडफड व चिवचिव होते ती तरी किती गोड असते ! व जीर्ण तृणाकुर कुरतडून शिणलेलीं गाईवासरें अंगें भिजताच हंबरतात तीं तरी किती गोड ! "

पावसाचे भिन्न भिन्न प्रकारहि फडक्यांनीं मिटक्या मारीत वर्णन केले आहेत. मोकळ्या मैदानावर पडणाऱ्या वळिवाची सर फडके यांनीं वाचकांच्या डोळ्यांपुढे मूर्तिमत उभीच केली आहे. सुंदर उपमा देऊन ते म्हणतात, " भूगोल व खगोल सांधणारा तो अजस्र कृष्णवर्ण जलस्तभ वेगाने आपल्याकडे सरकत येताना व आपल्याला भिजवून पलीकडे दुसऱ्या क्षितिजापर्यंत धावून अदृश्य होतांना दिसला कीं बाह्यांगाप्रमाणेच अतरंगही आनदाने न्हाऊन निघते. एखाद्या बागवानाने हातात झारी घेऊन ती सहज झरदिशी हिरवळीवर फिरवावी, तद्वत् वरुणाने गमतीनें पाण्याचा फवारा फिरविल्यासारखे अशा वेळीं वाटते. "

## सृष्टीचीं रम्य रूपें

पावसाची भुरभुर किती गमतीची असते, हे फडके खुबीदार शब्दांनीं सागतात, तें असे, " माजराचीं अलगद पावले कधीं चाहूल देत नाहींत म्हणतात. तितकीच निःशब्द याची चाहूल असते. हा लबाड, चोरट्या चालीचा पाऊस विनोदनिर्मितीचे उत्कृष्ट उदाहरण म्हणून समजावयास हरकत नाहीं. कारण याच्या तयारीचे अवडंबर पहावें तो थेट प्रलय-पर्जन्याला शोभेल असें; पण प्रत्यक्ष अवतार पहावा तो जसा काहीं सुदामदेवाने आपल्या पुरचुडींतले पोहे फुकरून श्रीकृष्णाच्या हातावर ठेवले त्या वेळीं उडालेला कोंडाच ! "

' सारी सृष्टि फलपुष्पांच्या वैभवानें भरघोस नटलेलीं ' असतांना पुण्याहून मुंबईस आगगाडीने जाणाऱ्या मुशाफराला निसर्गाचे ऐश्वर्य ओसंडतांना दिसते. त्याचे शब्दचित्र फडके किती कुशलतेनें काढतात, पहा, " घाटमाथ्यावर पोचताच पर्जन्य व वायु याची सृष्टीदेवीचें प्रियाराधन करण्यासाठीं चाललेली चढाओढ पाहण्यातच गुंतलेले तटस्थ गिरिराज किंचित् भुंवया वक्र करून आपल्या कन्येच्या लग्नाचा सोहळा हंसतमुखानें पाहणाऱ्या पित्यासारखे वाटतात. घाटांत तर वर्षाऋतूची ऐन जवानी गर्जना करीत कड्याकड्यांवरून कोसळतांना दिसते; आणि कर्जतपासून

कल्याणपर्यंतच्या सपाट भूमिभागावर गुडघाभर पाण्यांत बुडून वर डोकें करून वांकुल्या दाखविणारे भाताचे लोंबर, वय झाले तरी रसिक वृत्तीनें उत्सवप्रसंगीं माना डोलविणाऱ्या वृद्धाप्रमाणें वाटणारे उंच उंच तालवृक्ष आणि प्रेमवेड्या आईनें हृदयाशीं क्षणमात्र धरून पुन्हा खेळायला सोडलेल्या खेळकर मुलाप्रमाणे खळखळणारे लहानमोठे जलौघ—असल्या हृदयंगम दृश्याची जिकडे तिकडे गर्दी उसळलेली दिसते ! " हुबेहुब वर्णन आणि तें समर्पक शब्दानीं व समुचित अलकारानीं करण्याचा फडक्याचा गुण या लहानशा उताऱ्यातहि उठून दिसतो.

## लालित्यांतील क्रीडा

निसर्गातील या गमतीजमतीबरोबरच निबंधकाराने आपल्या तारुण्यांतील गोड अनुभवहि या लघुनिबधात सागितला आहे. कॉलेजात असतांना लेखकाला क्रिकेटची मॅच पहाण्याचे वेळीं 'वरुणाने भलेमोठे जलकुंभ आकाशात हारीने माडून ठेवलेले दिसावयाचे.' तेव्हा लेखक पाऊस न पाडण्याबद्दल वरुण देवाची प्रार्थना करी. " आणि काय आश्चर्य ? एखादे वेळीं ही आमची प्रार्थना मान्य व्हावयाची ! खरोखरच आकाशातल्या त्या अजस्र मेघांच्या सिंहासनावर बसून वरुणदेव मोठ्या कौतुकानें जणुं काय आमची मॅच पहात बसायचा, आणि वृष्टि करायचें भानच त्याला उरायचें नाहीं ! " याहून निराळा पुरावा पावसाच्या रसिकतेचा लेखकानें काय द्यावा ? पण अखेरीस हुकमी पत्ता म्हणून फडके 'मृच्छकटिक' नाटकाचा आधार देतात. त्या अखेरीच्या सवालात फडके याची साहित्याची ऐट व आवेश इतका मनोज्ञ आहे कीं, तो वाचताना 'मानापमाना'-तील भामिनीच्या नाजूक शौर्याची व समशेरीच्या पट्ट्याचीच स्मृति व्हावी. शेवटचा निकराचा हल्ला करण्याच्या पवित्र्यात उभे राहून फडके रसिकांना लडिवाळ त्वेषानें जाब विचारतात, " कवींचा लाडका वसंत रसिक खराच; पण वर्षाऋतु काहीं कमी रंगेल नाहीं. आणि इतकें सांगूनही कवींना हट्ट सोडावासा वाटत नसेल तर मीं विचारतों, अहो, वसंतसेनेच्या आलिंगनाचें परमसौख्य चारुदत्तास अकल्पित मिळवून देणारा,

आणि " तेचि पुरुष दैवाचे " असे धन्योद्गार त्या महाभागाच्या तोंडून वदविणारा आमचा वर्षाऋतुच ना ? " लालित्याच्या लाटावर अशा प्रकारें स्वच्छंदानें प्रा. फडके पोहत असतात— आणि म्हणूनच ते रसिकोत्तम ! आणि त्याचे निबंध ललितोत्तम !

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) लघुनिबंधाचे स्वरूप कसें असतें ? निबंध व लघुनिबंध यामध्ये फरक कोणता असतो ?

( २ ) लघुनिबंधाचा प्रारंभ मराठी वाङ्मयात कोणी केला ? पहिला लघु-निबंध कोणता ? लघुनिबंधाच्या स्वरूपाबद्दल लेखकाने काय मत दिलें आहे ?

( ३ ) लघुनिबंधाची सुरवात व अखेर चटकदार पाहिजेत, प्रा फडके याच्या लघुनिबंधाच्या आधारें हें विधान स्पष्ट करा.

( ४ ) ' लघुनिबंधात खेळकरपणा अवश्य हवा पण त्याच्या पोटीं सुविचारहि हवा.' या विधानानुसार प्रा. फडके याच्या लघुनिबंधातील काहीं सुविचार लिहा.

( ५ ) 'फडक्याची भाषाशैली' या विषयावर प्रा. फडक्याच्या लघुनिबंधाच्या आधारें लहानसा निबंध लिहा

## वि. स. खांडेकर : : : २

फडके व खांडेकर—हे दोन देदीप्यमान तारे मराठी साहित्यामध्यें एकाच वेळीं तळपत आहेत हें विशेष. दोघांनींहि कादंबरी, लघुकथा व लघुनिबंध या तिन्ही प्रांतावर आपापला प्रकाश पाडला आहे. नाट्य-



सृष्टि उजळण्याइतके त्यांचे किरण पसरू शकले नाहींत, हें त्या दोघां-तील साम्य जाणवण्यासारखें आहे. पण कथा–कादंबरी–निबंध या 'त्रि-भुवनात' त्यांनीं झगझगीत प्रकाश टाकलेला आहे. दोघांची भाषा लालित्यपूर्ण आहे, कल्पकता काव्यमय आहे आणि सारी लेखन-संपदा तरुण वर्गाला आकर्षित करणारी आहे. विपुल व कलासंपन्न साहित्य सतत निर्माण करण्यात दोघांचाहि हातखंडा आहे. मराठी वाचकवर्गाला या जोडीनें मोठा चटका लावलेला आहे.

### दोन दृष्टिकोन

आविष्काराप्रमाणे आशयांत मात्र या दोघांमध्यें फारसे साम्य नाहीं—'दोन ध्रुवच' आहेत ते, म्हटले तरी चालेल. फडके 'काश्मिरी गुलाब' असले, तर खांडेकर 'हिरवा चाफा' ठरतील. 'धूम्रवलय' या लघु-

निबधांत फडके सिगारेटची जितकी तरफदारी करतात व ‘ सुपारीच्या खांडालाहि न शिवणाऱ्या ’माणसाचा तिटकारा करतात, तितकाच ‘सारेच गुलाम ! ’ या लघुनिबंधात खाडेकर सिगारेटचा तिटकारा व सुपारी–खाडाला न शिवणाऱ्याचा गौरव करतात. पत्रें, पर्जन्य, ऐन पचविशी, पहिला पाढरा केस, इत्यादि किती तरी विषय दोघानीं समानच निवडलेले आढळतात. पण ते दोघानींहि हाताळले आहेत आपापल्या प्रकृतीनुसार व संस्कृतीनुसार. दोघाच्याहि मनोबुद्धीचे व भावनाचे स्पष्ट प्रतिबिंब त्याच्या त्याच्या लघुनिबधामध्ये पडलेले दिसते-आणि म्हणूनच दोघेहि यशस्वी लघुनिबंधकार ठरतात—पण दोघाची तीं प्रतिबिंबें किती वेगवेगळीं आहेत !

फडके आपल्या सौंदर्यशोधक दुर्बिणींतुन केवळ ऐश्वर्याचे व यौवनाचेच निरीक्षण करतात, पण त्या सकुचित क्षेत्रातील अनुभवाशीं का होईना, ते संपूर्ण समरस होतात, आपल्या सवेदनात ते अनुभव मिसळतात, आपल्या भावना ते घोळवितात आणि मग ते आपल्या अकृत्रिम, प्रवाह-शील व मृदुमधुर शब्दानीं व्यक्त करतात व यथावत् वर्णनानीं ते सजीव करून वाचकापुढे मूर्तिमत उभे करतात, किंबहुना वाचकांनाच जणु ते अनुभव घ्यावयास लावतात. सहृदयता व सहजता हे त्यांच्या कलेचे प्राण होत. त्याच्या जोरावर ते रसिकाचीं हृदये जिंकतात.

## खांडेकरांची संवेदनक्षमता

खाडेकरानाहि भावनेची, बुद्धीची व कल्पकतेची देणगी मोठ्या प्रमाणावर मिळालेली आहे. एका व्यक्तीचींच सुखदुःखे, मान-अपमान, हर्षामर्ष याचें कातणीचे घर विणीत ते बसत नाहींत, तर सर्व समाजातील आशा-आकाक्षा, यश-अपयश, आनंद-व्यथा याचा दश त्याच्या हृदयाला होतो व तो ते आपल्या अलौकिक कला-चातुर्यानें प्रगट करतात. त्याच्या अंतःकरणाचा हा विशालपणा व संवेदनक्षमता किती आहे हे सांगतांना प्रा. वि. बा. आबेकर लिहितात, ‘‘आक्रोश ऐकला कीं कावरेबावरें होऊन जावें, दैन्य पाहिले कीं पाझरून जावें, अनाठायीं आक्रमण पाहिलें कीं, अशरण चीड येऊन तापून जावें, अन्यायाचा संचार भोंवतीं पाहिला

कीं तळमळून उठावें, अनीतीचे थैमान दिसले कीं विमनस्क होऊन जावें, अशी त्यांच्या मनाची घडण आहे."

दुसऱ्याचे दुःख व अन्याय पाहताच संताप व चीड यावी हें साहजिक आहे. पण ते सर्व भाव पुरेपूर व परिणामकारकपणें व्यक्त करण्याचें चातुर्य असते केवळ कलावतापाशींच. तें खाडेकराजवळ भरपूर आहे. त्याचे भाषा-वैभव अलौकिक आहे, कल्पना-सौंदर्य रमणीय आहे व वर्णन-चातुर्य आल्हादकारक आहे. उपमांमागून उपमा देण्याचा तर त्याना छंदच आहे. कल्पनामागून कल्पना त्याना सुचतात आणि फुलपाखरें धरूं पहाणाऱ्या बालकाप्रमाणे ते त्याच्यामागे धावतात. विशेष म्हणजे त्यांचें लेखन कलात्मक असूनहि विचार–जागृति करणारे असते; आणि ते विचार सात्त्विकतेचे व समाजहिताचे असतात. प्रिय व पथ्यकर लेखन करावें खाडेकरानींच.

## पुस्तकांत कोंडलेला आत्मा

'प्रकृतीच्या कायमच्या अस्वास्थ्याला' कटाळलेलें असूनहि ते रम्य–मधुर असेंच लिहितात. आपल्या बहुश्रुतपणाची छाया ते आपल्या लघुनिबंधावरहि पाडतात. वास्तविक लघुनिबंध म्हणजे दोन दोस्तांचें सलगीचें सभाषण–सध्याकाळच्या शिळोप्याच्या गप्पा-चादण्यातील सुख-संवाद. त्यावेळीं कोणी कितीहि विद्वान असला, तरी तो आपल्या पाडित्याचे प्रदर्शन काहीं करीत नाहीं. पण खाडेकराचा कोणताहि लघु-निबंध उघडा, त्यात त्याचे स्वतःचे व्यक्तिमत्व दिसण्याऐवजीं कालिदास व भवभूति, तांबे व गडकरी, स्कॉट व शेक्सपीयर, ब्राउनिंग व इब्सेन, ल्युकस व लुई, टॉलस्टॉय व गॉर्की, फार काय व्यास व शकराचार्यहि— यापैकीं कोणी ना कोणी हजर असलेले सापडावयाचेच! यावर खाडेकर असेंहि म्हणूं शकतील कीं, माझ्या लघुनिबंधातील व्यक्ति इतक्या उच्च आहेत कीं, त्याचे सहज संवादहि विद्वत्तापूर्णच असावयाचे–त्याचे "'स्वैरालाप"हि 'शास्त्रे' बनण्याच्या योग्यतेचे ठरावयाचे. असतीलहि असे जाडे व बडे विद्वान. पण सर्वसामान्य वाचक त्या उताऱ्यांचा

शस्त्रसंभार पाहून बिचकून जातो एवढें मात्र खरें, एकादा खेडवळ माणूस मुंबईतील सातमजली ' समशीतोष्ण ' इमारतींत पाऊल टाकताना बिचकतो ना ? तशी अवस्था साधारण वाचकाची खाडेकराचा लघुनिबंध वाचतांना होते–आणि म्हणून ते वाचकांना आपल्या विश्वासात घेऊं शकत नाहींत, आपल्याशीं समरस करू शकत नाहींत–जीवश्चकठश्च मित्र बनवून सोडूं शकत नाहींत. त्याच्या उपमा व उतारे या वीज-पावसाच्या तडाख्यात सापडलेला वाचक दिपतो, दचकतो व गागरून जाऊन आडोसा शोधू पहातो. त्याच्या लघुनिबंधाला विनोदाचे अस्तर लावलेले असते, पण तो विनोदहि पुस्तकी असतो–सहज, खेळकर, मोकळा नसतो.

## अनुभवाचें मर्यादित क्षेत्र

खाडेकरांजवळ भावनेचें भाडार मोठे आहे, पण त्याला कोटिबाजपणाचें कुलुप लावलेलें आहे. कवीप्रमाणे त्याचे मन सवेदनक्षम आहे, पण त्याची कल्पकता त्या सवेदनावर मात करते. ' विरह ' म्हणताच त्याच्या अंतःकरणांतील भावना उसळतात, पण लगेच त्याच्या डोक्यात कालिदास–भवभूति नाचूं लागतात आणि मेघदूत, शाकुतल, उत्तररामचरित यांतील कथा व वचनें यांचा पाऊस पडूं लागतो. त्यातील कोट्याच्या गार गारा वेचण्यात वाचकाला बालकाइतकाच आनंद वाटतो हें खरें, पण त्यामुळें त्याची वृत्ति अतर्मुख होत नाही, अतःकरण हलत नाहीं आणि विरहाची वेदना त्याला जाणवत नाहीं. खाडेकराचे लघुनिबंध उणे पडतात ते यामुळे.

त्याच्या अनुभवाचें क्षेत्र व विचारांचे विषय मर्यादित आहेत. त्यामुळें दाढी व सिनेमा, पत्रे व पुस्तके हेच ठराविक विषय पुनः पुनः येतात आणि त्यातून संवयीची व सकेताची गुलामगिरी, संशय व अहंकार याचे दुष्परिणाम–याच विचाराचे सूर बहुधा निघतात. रम्य कल्पकतेचे, बहुमोल अलंकारांचें व सात्त्विक विचारांचें-असें लेखन एकसारखें विपुल प्रमाणात करण्यांत खाडेकराची बरोबरी दुसरे कोणी मराठीत सध्या तरी करूं शकत नाहीं. त्यानीं दोनशेवर लघुकथा जशा लिहिल्या, तसेच शंभरावर लघुनिबंधहि रचले. ' हजारो सामान्य लोकाच्या बुटक्या आयुष्यांतील तोटके आनंद

हलक्या हातानें व्यक्त व्हावेत ' ही आपली मनीषा त्यांनीं लघुनिबंधांत पूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. ' जीवनांतल्या चिमण्या पण अविनाशी आनंदाशीं ओळख ' करून देण्याचें कार्य त्यांचे बरेच लघुनिबंध पार पाडतात. ' साऱ्याच माणसाना परिचित आयुष्यक्रमापलीकडे थोडा वेळ नेण्याची समाजात व्यवस्था होईल तर काय बहार होईल ! ' याचें वर्णन ' एक तास ' या आपल्या लघुनिबंधात त्यानीं केलें आहे. लपलेला आनद शोधण्याची, दुसऱ्याच्या दुःखाशीं सहानुभूति बाळगण्याची, घराबाहेर पसरलेल्या अफाट समाजाकडे आत्मीयतेने पहाण्याची नवी दृष्टि खाडेकराचे लघुनिबंध देतात.

## वाचनाचा छंद

खाडेकराचा जन्म सागली येथे ता. १९ जानेवारी १८९८ रोजीं झाला. त्याचे मूळचे नाव गणेश व वडिलाचे नाव आत्माराम. वडील सागली सस्थानात मुनसफ होते. ते १९११ सालीं वारले. खाडेकराच्या कुटुंबाला खडतर दिवस आले. १९१६ सालीं कोंकणातील एका जमिनदार चुलत्याने खाडेकराना दत्तक घेतले. त्यामुळे " गणेश आत्माराम "चा " विष्णु सखाराम " झाला.

त्याचें मराठी व इंग्रजी शिक्षण सागलीस झालें. इंग्रजी चौथ्या इयत्तेपासून ते शिष्यवृत्ति मिळवीत गेले. १९१३ सालीं ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि तेहि मुंबई विद्यापीठाच्या हजारों विद्यार्थ्यांत आठवा क्रमांक कमावून. त्यानीं इतर वाचनहि मनसोक्त केले. हरिभाऊंची ' उषःकाल ' कादंबरी त्यानीं एका रात्रींत वाचून संपविली; देवलांचें ' शारदा ' नाटक तोडपाठच केलें. तसेंच कोल्हटकरांचें विनोदी वाङ्मय. ' सुदाम्याचे पोहे ' ते मोठ्या चवीनें सेवन करीत. कोल्हटकरांचें ' वधूपरीक्षा ' नाटक पहाण्यासाठीं खाडेकर सांगलीहून मिरजेस पायीं चालत गेले. मराठींतील इतर ग्रंथांचेंहि वाचन ते आवडीनें करीत होते. नाटककादंबऱ्यांत तर ते रंगून जात.

मॅट्रिक झाल्यावर खाडेकर पुण्यास आले आणि फर्गसन कॉलेजात दाखल झाले. पुस्तकाखालोखाल क्रिकेटचे त्याना व्यसन. गडकऱ्याचा सहवास त्याच्या स्फूर्तीला पोषक झाला. त्याना एक शिष्यवृत्ति मिळाली होती. पण पुण्याची रहाणी, कॉलेजची फी, याचा खर्च कसा भागणार ? दोन शिकवण्या त्यानीं धरल्या. तरी पैशाची ओढाताण चालूच होती. दत्तक–विधानानतर ती थाबेल अशी खाडेकराना आशा होती. पण दत्तक-घराण्यातून त्याच्या शिक्षणाला आर्थिक मदत काहीं मिळाली नाहींच, उलट त्याचे मानसिक स्वास्थ्य मात्र हिरावले गेलें. दत्तक वडिलाचा स्वभाव खाडेकराच्यापेक्षा अगदींच निराळा होता. त्यामुळें त्या दोघात खटके उडू लागले. सावतवाडीला दोनतीन वर्षे खाडेकराना काढावीं लागलीं. हा काळ केवळ काळजी करण्यात गेला. तेथे त्यांच्या पाठीस मलेरिया लागला. गरिबी पाचवीला पूजलेलीच होती. त्यात भर दत्तक-घराण्याच्या कटकटीची, आणि आता तिला साथ मिळाली रोगाची !

## ध्येयवादी शिक्षक

चरितार्थ चालविण्यासाठीं खाडेकरानीं शिक्षकाचा पेशा पत्करला. १९२० सालीं कोकणातील शिरोडे येथील इग्रजी शाळा त्यानीं चालवावयास घेतली. शाळेत विद्यार्थी ५०–६० आणि शाळेचे प्रमुख म्हणून खाडेकराना पगार २० रुपये. घरात भाड्याच्याऐवजीं गाडगी व कंदिलाच्या-ऐवजीं दौत वापरून दारिद्र्याचें विष खाडेकर पचवीत होते, पण शाळेंत विद्यार्थ्यांना ज्ञानामृत देत होते. पुढे त्या शाळेतील विद्यार्थ्यांची संख्या दोनशेंवर गेली.

खांडेकराच्या लेखनाचा प्रारभ वयाच्या सोळाव्या वर्षीं झाला. १९१४ सालीं ‘ रमणी-रत्न ’ नावाचे नाटक लिहून त्यानीं तें वासुदेवशास्त्री खरे यांना दाखविले. १९१९ सालीं त्याचा पहिला टीकालेख ‘ नवयुग ’ मासिकांत प्रसिद्ध झाला. तो कवि केशवसुतासंबंधीं होता. १९२३ सालीं ‘ घर कोणाचे ? ’ ही त्याची पहिली गोष्ट प्रसिद्ध झाली. १९२७ सालीं ‘ निकाल द्या ’ हा त्याचा पहिला लघुनिबंध वाचकापुढें आला.

## विपुल व विमल साहित्य

त्यांनीं आतापर्यंत सुमारे २१ लघुकथा-संग्रह प्रसिद्ध केले, १०० लघुनिबंध लिहिले, १६ कादंबऱ्या रचल्या, ६ नाटके रंगविलीं, ५० रूपककथा चितारल्या आणि टीका–लेख तर २००।३०० लिहिले आणि हें सारें निरामय, निर्मल व प्रसन्न वाङ्मय त्यानीं निर्माण केलें, ते मानसिक, शारीरिक किंवा आर्थिक स्वास्थ्य बिलकूल नसताना; उलट गरिबीशीं, रोगाशीं, प्रतिवादीशीं झगडत असतानाच त्यानीं ही साहित्याची सुरगी व सुगंधी बाग फुलविली.

१९३४ सालीं बडोदे येथील साहित्य–समेलनाच्या कथा-विभागाचें अध्यक्षपद त्याना देण्यात आले. पुढील वर्षी पुणे येथें भरलेल्या ‘ शारदोपासक संमेलनाचे ’ अध्यक्षस्थानहि त्याना अर्पण करण्यात आले. मडगाव व मुबई येथील प्रांतिक समेलनाच्या अध्यक्षपदाच्या माळा त्याच्या गळयात घालण्यात आल्या. १९४० सालीं जमखिंडी येथे भरलेल्या ‘ दक्षिण महाराष्ट्र साहित्य समेलनाचे ’ अध्यक्षत्व त्याना बहाल करण्यात आलें. आणि मराठी साहित्यातील मोठा मान त्याना त्याच्या पुढील वर्षी लाभला. १९४१ सालीं सोलापूर येथे भरलेल्या ‘ महाराष्ट्र साहित्य संमेलना’च्या सिंहासनावर त्यांना अध्यक्षपदाचा अभिषेक करण्यात आला.

## कथेचें मिश्रण

‘ लघुनिबंध ’ हा एक मध्यमपदलोपी समास आहे असे खाडेकरांच्या लेखनावरून वाटते. ‘ कथा ’ हें मध्यमपद त्या नावात आलें नाहीं इतकेंच. बाकी ‘ लघुकथा सामावणारा निबंध ’ असेच त्याच्या लघुनिबंधाचें स्वरूप असतें. ‘ हरवलेले कागद,’ ‘ साडेनऊ रुपये ’ हे त्याचे लेख त्याच्या कथा-सग्रहाच्या पुस्तकात आले असते, तर वाचकांनीं लघुकथा म्हणूनच त्यांचा आस्वाद घेतला असता. गोष्टीचे कागद हरवले, तेव्हा ते पुन: लिहिले पण नंतर पहिले कागद सापडले–या घडामोडीमुळें मनाची किती धादल उडाली याचें सुरेख वर्णन पहिल्या लेखात केलेलें आहे आणि माणसानीं हरवलेल्या गोष्टीसाठीं रडत न बसता आशेनें व श्रद्धेनें

भविष्यकाळ घडवीत असावे असा विचार माडला आहे. प्रश्न इतकाच कीं, या विचाराला ती कथा जोडलेली आहे कीं त्या कथेला विचाराची ही किनार लावलेली आहे ?

असाच संमोह ' साडेनऊ रुपये ' या लेखातहि उत्पन्न होतो. सिनेमाचें आठ आण्यांचें तिकीट काढणाऱ्या 'मी'ने दहा रुपयाची नोट तिकीटवाल्याला दिली; पण ' मध्यतरा 'पर्यंत मनाला सारखी चुटपूट लागली कीं, तिकिट-वाला ते उरलेले पैसे देईल कीं नाहीं ? मग मनुष्याच्या सचोटीविषयीं संशय येतो आणि ' जगातलीं निम्मी दुःखे मनुष्य आपल्या कल्पनेनें निर्माण करतो ' असें तत्त्व स्फुरते. ' दहा अंकाऐवजीं साडेनऊ रुपये मोजून राग शात होतो, हा नवा अनुभव आला मला ' अशी कोटी शेवटीं करून लेख चटकदार केलेला आहे. त्यात मानवी मनाचे पापुद्रे हलक्या हातानें उलगडले आहेत. ही एक मनोविश्लेषणपर कथा म्हणूनहि रसिकांनीं मान्य केली असती.

## विचारांचे सुवर्ण-कण

अर्धनारीनटेश्वराप्रमाणे लघुनिबधाचे अर्धाग ' कथा ' हें असलें, तरी ' निबंधा 'ला त्याचे अर्धें अग व्यापावयास मिळतेच. म्हणून कादंबरी किंवा लघुकथा या दोहोपेक्षा लघुनिबंध हे विचार पेरण्याला अधिक अनुकूल क्षेत्र. आणि सुदर भाषेत उदात्त विचार हें तर खास खाडे-करांचें वैशिष्टय ! त्यानें चमकणारे लघुनिबंध किती तरी आहेत. शब्द-सौंदर्य व विचार-सौंदर्य याचा ' मणि-काचन-योग ' झाल्याचीं कांहीं उदाहरणें पहा—

सुखाचें रहस्य उकलून दाखविण्यासाठी खाडेकर ' सुखाचा शोध '-मध्यें असें तत्त्व सांगतात, " विश्वमोहिनी सुवर्ण–रथांतून येत असलेली पाहून आपण हुरळून जातों. पण पुढें येऊन तिनें हात पसरला कीं आपण मुलखाचे कृपण होतो. कमींत कमी काय देतां येईल हें आपण पाहूं लागतों. आणि द्यावें तसें घ्यावें हा तर सुखाचा मूलमंत्र आहे, किंबहुना आधीं दुसऱ्याला दिल्याशिवाय–त्यागाच्या अग्निदिव्यांतून पार

पडल्यावांचून–मिळत नाहीं अशी जगांत एकच अपूर्व गोष्ट आहे—सुख ! ”

‘ त्यागांत सुख ’ हें तत्त्व ठीक असले, तरी सर्वांची प्रवृत्ति कशी आहे ? याचें उत्तर ‘ पुढे–पुढे ’मध्यें खाडेकर देतात, तें असें,— “ जो तो हातांतल्या सुखाकडे दुर्लक्ष करून पळत्या आनंदाच्या मागें धांवत असतो ! प्रत्येकाचा मत्र एकच–‘ पुढें–पुढे ! ’ भविष्यांतला अमर्याद आनंद लुटण्याकरिता मनुष्यप्राणी ही जी धावपळ करतो तिच्यांत वर्तमानाच्या मर्यादित आनंदाला मात्र तो निश्चितपणे मुकतो.”

‘ सुख जवापाडे । दुःख पर्वताएवढे ’ हा निवृत्तिपर सिद्धांत खाडेकराना मान्य नाहीं. त्याच्या कलावादी दृष्टीला जगांत चोहोंकडे सुखाचीं कारंजीं उडत असलेलीं दिसतात. ‘ शास्त्रीय सत्य ’ यांत ते म्हणतात, “ पहिल्या झोपेनंतर थोडीशी जाग आली असताना गंधर्व-नगरीप्रमाणें दिसणारी चादणी रात्र, प्रातःकालीं आपल्याबरोबर डोळे उघडून आनंदाने हंसणारें आकाश, दुपारच्या वेळीं रुसून बसणाऱ्या पोटाची समजूत घालणारी गोड भाकरी, यापैकीं एक एक गोष्ट म्हणजे सुखाचें कारंजेच नाहीं का ? ”

## आनंदी तत्त्वज्ञान

क्षणोक्षणीं जगात नावीन्याचे व सौख्याचे झरे वाहत असतात, असा उमदा विचार ‘ अविनाश ’ मध्यें मांडलेला आहे. तो असा—“ जग कितीहि जुनें झालें तरी प्रत्येक क्षणाला त्यातून नावीन्याचे झरे पाझरत असतात हें लहान मूलच आपल्याला शिकवितें. आपल्याला अत्यंत सामान्य वाटणारे दृश्य किती अद्भुतरम्य आहे हें कळायला त्याच्याकडे बालकाच्या दृष्टीने पाहिलें पाहिजे. जगातल्या सौंदर्याला नाश नाहीं, साहसाला नाश नाहीं आणि साधुत्वाला नाश नाहीं हें लहान मुलाच्या सहवासांतच प्रौढांना पटतें. ”

‘ सर्व आनदमय आहे ’ असा सिद्धांत खाडेकर ‘ अशोकाचीं फुलें ’ या निबंधात पुढील शब्दांनीं मांडतात, “ चांदण्या रात्रीइतकीच अंधारी

रात्रहि सुंदर वाटते, अशोकाच्या फुलाइतकेंच तेरड्याच्या फुलांतहि काव्य दिसूं लागतें. देवमाणूस होण्यापेक्षा माणूस म्हणून जगण्यांतच सार्थक आहे!" प्रेमपूर्ण अंतःकरण बाळगणाऱ्या माणसाला सर्वत्र आनंदच आनंद! जगांतील प्रत्येक वस्तु आनंददायक कशी होते हें 'दोन चित्रें' या निबंधांत खांडेकर पुढील शब्दांनीं सांगतात, "जग हेंहि एक आदि नि अंत नसलेलें चित्रमंदिर आहे. या मंदिरातला संपूर्ण आनंद एका चित्रांत रंगून दुसऱ्या चित्राकडे ढुंकूनहि न पाहणाराला कधींच मिळत नाहीं. गांधीजींचे सत्याचे प्रयोग वाचण्यात आल्हाद आहे आणि ठगाची जबानी वाचण्यांत काय मौज नाहीं? लहान मुलाचे पापे घेताना ओठामध्ये जो लुसलुशीत उन्माद उत्पन्न होतो त्याच्याशीं, आजारी आईचे पाय चेपतांना होणाऱ्या सुखाची तुलना करणे काय सर्वस्वीं चुकीचे ठरेल?"

## सात्त्विक गुणांचा प्रचार

सात्त्विक गुणांचें जीवनातील महत्त्व खांडेकरांनीं 'एक कात्रण' मध्यें जाता जाता वर्णिलें आहे. तें असें—"कीर्ति, संपत्ति, पराक्रम, प्रतिभा हे काहीं झाले तरी मानवी जीवनाचे वस्त्रालंकार आहेत. क्षणभर प्रेक्षकाचे डोळे दिपविण्याचें सामर्थ्य त्यांच्यात आहे. पण मानवी जीवनाचा आत्मा या असामान्य वस्त्रालंकारांत नाहीं. तो सर्वांना सामान्य असणाऱ्या प्रेम, वात्सल्य, भूतदया इत्यादि भावनात आहे."

प्रेम, सेवा, त्याग इत्यादि सात्त्विक गुणापासून किती आनंद लाभतो, हें खांडेकरांनीं 'होळी' या निबंधात काव्यमय रीतीनें सांगितले आहे. तें असें —"शुभ्र संगमरवरी दगडांचा भव्य ताजमहाल आनंददायक तर खराच; पण सुंदर कल्पनांनीं नटविलेलें रवींद्राचे काव्यमंदिर त्याहिपेक्षां आनंद-दायक नाहीं का? हिमालयाच्या शुभ्र गगनचुंबी शिखरापेक्षाहि महात्मा-जींनीं दीनांच्या परित्राणाकरिता पसरलेले पवित्र बाहु अधिक भव्य नाहींत असें कोण म्हणेल? दरींत उडी घेऊन खदखदा हांसणाऱ्या गिर-सप्पाच्या धबधब्याचा देखावा अद्भुतरम्य यांत शंका नाहीं; पण हांसत हासत देशासाठीं मृत्यूच्या दरींत उडी घेणाऱ्या तरुणांची मूर्ति त्यापेक्षांहि

अद्‌भुतरम्य भासत नाहीं काय ? " यांतील वाक्य-रचना किती प्रमाण-बद्ध व लययुक्त आहे ! तसेंच, 'एकवचन' या निबंधात प्रीतीची उत्कटता वर्णन करताना खाडेकर म्हणतात, " पर्वताची उंची जशी शिखराच्या रूपानें प्रगट होते, गायकाची गाण्याची तयारी जशी तानेतून बाहेर पडते, त्या-प्रमाणें प्रीतीची उत्कटताहि एकवचनातून प्रतिबिंबित होत असते. जणू कांहीं एकवचनात बालमित्रांचा निर्मळ स्नेह, वडील माणसाची निरपेक्ष माया, पतिपत्नींची एकान्तातील प्रीति आणि लहान बालकाची भावपूर्ण भक्ति, या सर्वांचें सुंदर संमेलनच झालेलें असते." लहानमोठ्या सर्व वस्तूंतून सुख शोषून घेण्याची वृत्ति माणसाने कशी ठेवावी हें खाडेकरांनी 'रबरी फुगे' या निबंधात नेहमींच्या दाखल्यानें सागितले आहे. ते म्हणतात, " विद्या, मैत्री, कीर्ति, प्रीति हेसुद्धा वेळोवेळीं जीवनाला शोभा आणणारे सुंदर रबरी फुगेच नाहींत का ? आपण ते फुगवून फार मोठे करूं लागलों तर ते फुटूनहि जातात. पण ते फुटून गेले किंवा शोभेच्या वस्तु म्हणून आपल्यापाशीं राहिले, तरी हे फुगे फुगविताना झालेला आनंद काहीं खोटा ठरत नाहीं !"

## तात्त्विक मीमांसा

बाह्यागावर भाळण्याची जगाची प्रवृत्ति आहे आणि म्हणूनच तें दुःखांत पडतें असा विचार ' कपड्याची किंमत ' या निबधात सागून खाडेकर म्हणतात, " जगातील सर्व दुःखाचें मूळ अंतरंगापेक्षा बहिरंगाला महत्त्व देण्याच्या प्रवृत्तींत आहे. ज्याचे कपडे अधिक छानछोकीचे त्याला अधिक मान हा अनुभव कुणाला आलेला नाहीं ? कपड्यापेक्षा मनुष्या-कडे आणि देहापेक्षा माणुसकीकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे, हें तत्त्व जगाच्या पचनीं पडेल तेव्हाच तें सुखी होईल. "

सामान्य माणसें रूढ चाकोरींतूनच जातात, हा अनुभव ' संकेत 'मध्यें खांडेकरांनीं पुढीलप्रमाणें मांडला आहे. " संकेत हे राजमार्गाप्रमाणें प्रशस्त असतात. त्यामुळें धोपट मार्गानें जाणारांना आणि सोबतीची अपेक्षा करणाऱ्याना ते आवडावेत हें स्वाभाविकच आहे. राजमार्गाच्या बाजूला असलेलीं तींच तींच घरें आणि तींच तींच दुकानें पाहून कंटाळा आला,

तरी नव्या पाऊलवाटेनें जाण्याचा धीरच होत नाहीं बहुतेक माणसाना ! त्यांना वाटतें आपण कुठें तरी चुकूं ! बिचाऱ्याना हें कळत नाहीं कीं, जो चुकतो तोच शिकतो ! ''

माणूस शरीराचा गुलाम असतो. ' इंद्रियाचीं दीनें । आम्ही केलों नारायणें ' असें तुकोबा सागून गेले. खाडेकर ' सारेच गुलाम ' मध्यें म्हणतात, '' व्यसन आणि मर्यादा हें जोडपे पदोपदीं भाडणारेंच असायचें! माणसाच्या शरीराइतकें छादिष्ट जगात दुसरें काहींच नाहीं. बालहट्ट, स्त्रीहट्ट आणि राजहट्ट हे पुरविल्याशिवाय माणसाला गत्यंतर नसते अशी एक समजूत आहे. पण शरिराच्या हट्टात या तिन्ही हट्टाचा अर्क उतरलेला असतो, असें म्हणायला हरकत नाहीं. शरीराला लहान मुलाप्रमाणेंच कुठल्याही गोष्टीच्या परिणामांची जाणीव असत नाहीं. उलट स्त्रीची आकर्षकता आणि राजाची सत्ता याचा संगम मात्र त्याच्यात झालेला असतो.'' मात्र निसर्गाची गुलामागिरी इतकी असली, तरी मानवाला इच्छास्वातंत्र्य आहे हें तत्त्वज्ञान विशद करताना खाडेकर लिहितात, '' निसर्गानें मनुष्याच्या रक्तात गुलामगिरीची आवड ठेविली असेल. पण आपण कशाचें गुलाम व्हायचे ते ज्याचे त्याला ठरविता येतेंच कीं ! ''

## जीवनाचें तत्त्वज्ञान

व्यक्ति व समाज याच्या संबधातील तत्त्व एका सुंदर दृष्टाताने खाडेकर सांगतात. ' साडे नऊ रुपये ' मध्ये ते लिहितात, '' समुद्राला मिळणाऱ्या नदीचे पाणी कितीहि गोड असले तरी संगमाच्या ठिकाणीं ते खारटच होतें. मनाचेंहि तसेच आहे. व्यक्तिदृष्ट्या आपलें मन कितीहि पुढे गेलें तरी समाजाशीं संबंध आला कीं, तें सामाजिक मनाइतकेंच मागासलेलें होतें ! ''

जगाचा विकास करण्यासाठीं मानवानें सतत लढत राहिलें पाहिजे— आयुष्य ही एक लढाई आहे, हा खाडेकरांचा लाडका सिद्धांत आहे. तो ''विसरलेला संदेश'' मध्यें माडताना ते लिहितात, ''ज्योतीचा जन्म जसा अंधार उजळण्याकरिता असतो, त्याप्रमाणें व्यक्तीचा जन्म हें जग अधिक पवित्र,

अधिक मंगल, अधिक उदात्त करण्याकरितां आहे. म्हणून जगांत जे जें अपवित्र असेल, जें जें अमगल असेल, जे जे अनुदात्त असेल; ते तें नाहींसें करण्याकरता लढत राहण, पराजय झाला तरी लढत राहण, प्रसगीं गुप्त-पणान प्रसगीं उघड, जरूर लागेल तेंव्हा शस्त्रानं—जरूर लागेल तेंव्हा बुद्धीनं, पण एकसारखं जगातल्या राक्षसी शक्तींशीं लढत राहणें हेच माझं जीवित-कर्तव्य होतं ! ”

## अलंकारिक भाषेची कैफियत

स्वतःच्या आवडीनिवडीचे रम्य प्रतिबिंब लघुनिबंधात पडावयास पाहिजे. पण आपल्या व्यक्तित्त्वाचे असे ठसे उमटण्याऐवजीं कोट्या, कथा व कविता याचे कण एकत्र जमविण्याचीच खाडेकरांना अधिक हौस दिसते. जगुं काहीं ‘ उपमा ’ निबधाच्या नायकाप्रमाणे खाडेकर वाचकाना आव्हानच देत आहेत, “ ज्यात बिलकूल साम्य नाहीं अशा दोन गोष्टी सांगा मला. त्यातल्या एकीची उपमा दुसरीला देता येते, हें मी सिद्ध करून दाखवितों. ‘ एक तास ’ मधील मंदाकिनीने चष्म्याची काडी मोडतांच ‘ चाळि-शीशीं माझी अक्षरशः काडीमोड झाली ’ अशी कोटि ते करतात. ‘प्रेम—कलह कीं कलह—प्रेम’ अशी शब्दाची उलटापालट करण्याचा गडकरीय गुण त्याचे अंगीं आहे, फार काय, Where There is a will या इंग्रजी म्हणींतील will चे ‘इच्छा’ व ‘मृत्युपत्र’ असे दोन अर्थ करून त्यानीं श्लेष साधला आहे !

अर्थात्, अशी अलंकारिक भाषा समर्पक असते तेंव्हा वाचकाचे चित्त रिझवते. पण तिचा अतिरेक झाला तर ? खाडेकराना एका लघुनिबंधांत आपल्या “ अलंकारिक भाषेची ” कैफियत द्यावी लागली आहे. “ ती रसाचा गळा दाबते, स्वाभाविकपणाचा खून करते, बुद्धीला भटकेपणाची संवय लावते ” इत्यादि आरोप अलंकारिक भाषेतच त्यांनीं माडले आहेत. ते खोडून काढतांना त्यानीं कुशल वकिलाप्रमाणे आपला बचाव केला आहे. “ अलंकारिक भाषेची निंदा ही जुन्या वाङ्मयांत आढळणाऱ्या शरीराच्या अगर स्त्रीच्या निंदेइतकीच खरी मानायची ! ” असें ठाम मत त्यांनीं

आरंभीं सांगितलें, पण पुढें योग्य तें तारतम्य संभाळण्याचा इषारा देतांना ते म्हणतात, " दागिने शोभादायक असतात म्हणून वाटेल तो दागिना वाटेल तिथें शोभतो असें मात्र नाहीं. कानांत सरी आणि गळ्यांत साखळ्या घालून एकादी बाई मिरवायला निघाली तर कौतुकाऐवजीं तिचें हंसेंच होईल. भाषेच्या बाबतींत असले वेडेचार नित्य घडतात. "

नव्यानव्या म्हणी बनवून त्या मधूनमधून वापरण्याची हौस खाडेकरांना आहे. " उतावळा शिकारी स्वतःला ठार करी, ' ' दान द्यावें झाकून आणि डायरी पहावी उघडून, ' ' जितक्या कुडी तितक्या आवडी ' इत्यादि काहीं म्हणी सुटसुटीत, अर्थपूर्ण व अलंकारिक आहेत. त्या म्हणी म्हणजे लघुनिबंधाच्या कंठातील सुवर्ण-मणीच !

## कल्पकतेचें स्वरूप

साधा विचारहि कल्पकतेच्या जादूनें मनोहर रीतीने मांडण्याची खांडे-करांची हातोटी असामान्य आहे. खुद्द कल्पकतेवरच आपली कल्पना चाल-वून ते म्हणतात, " कल्पकता ही शुक्राच्या चांदणीसारखी असते हेंच खरें ! तपेंच काय, पण शतकें, किंबहुना युगें लोटलीं तरी तिचें स्निग्ध तेज अणुमात्रहि मंद होत नाहीं. खाडेकराची कल्पकता अचपळ आहे. ती विजेप्रमाणें आकाशांत संचार करणारी आहे — क्षणात येथें, क्षणांत तेथें, अशी चंचल आहे. प्रा. शिवरामपंत परांजपे यांच्याप्रमाणेहि काहीं कांहीं वेळां ते कल्पनारम्य व वक्रोक्तिपूर्ण लिहूं शकतात. ' मजिन्या ' या प्रा. पराजपे यांना अर्पण केलेल्या आपल्या लघुनिबंध-संग्रहांतील बहुतेक सारे लेख असेच काव्य–कल्पनेनें नटलेले आहेत–निरनिराळे आभास दाखविणारे आहेत. एके ठिकाणीं त्यांची काळपुरुषाशीं भेट होते व त्याच्या पोतडींत गांधीजी व लेनिन यांचे फोटो आणि कोयता व टकळी हीं त्यांचीं आयुधें त्यांना दिसतात. आणि काळ-पुरुषाची सारी धांदल कशासाठीं ? तर ' नवा मनुष्य ' निर्मिण्यासाठीं. ' कवि, चोर आणि पोलिस ' यामध्यें पंढरीचा विठोबा रेशनकार्डासाठीं धांवपळ करीत आहे, दत्ताला मार्ग विचारीत आहे असा भास दाखविला

आहे. ' विसरलेला संदेश ' मध्यें श्रीकृष्णाची तक्रार निवेदिली आहे. खांडेकराची देवावर श्रद्धा नसल्याने त्यांनीं अनेक ठिकाणीं देवाला विनोदाचा विषय बनविलें आहे. त्यांचे गुरु श्री. कृ. कोल्हटकर याचा हाहि वारसा त्यानीं मिळविला आहे. ' गोष्ट जुनीच आहे. ' या निबंधात इसापची भेट झाल्याचा आभास त्यानीं निर्माण केला आहे त्यानीं कोठें रेशन नाकारणाऱ्या फैजपूरच्या गजराजाला निमित्त करून मानवावर टीका केली आहे, तर कोठे लखनौच्या सर्पराजास अनावृत पत्र पाठवून माणूस सापापेक्षाहि भयकर बनला असल्याचे सूचित केले आहे.

## शिवरामपंती रूपकें

' कुठं आहे तो मेघ ? ' हा लघुनिबंध प्रा. परांजपे यांची आठवण करून देण्याइतका देशभक्तिपूर्ण व कल्पनासंपन्न आहे. त्याचा लेखनकालहि विचारात घेण्यासारखा आहे. १९४४ सालीं जगात युद्ध पेटले होतें, देशात दडपशाही थैमान घालीत होती, गाधीजीप्रभृति राष्ट्रनेते तुरुंगात डाबलेले होते आणि बंगालच्या दुष्काळात लाखो लोकांची आहुति पडली तरी व्यापारीवर्ग आपला जीवघेणा काळाबाजार चालवीतच होता. या सर्व परिस्थितीचे प्रतिबिंब प्रस्तुत निबंधात खाडेकरानीं मोठ्या कौशल्याने उमटविलें आहे. प्रारभीं उन्हाळ्याचें वर्णन करतांना ते लिहितात, " त्या दिवशींच्या उकाड्याचा साराच नूर न्यारा होता. वाऱ्याचा सृष्टीशीं घटका दोन घटका चालणारा प्रेमकलह झाला नसून घटस्फोटाची मजल गाठण्याइतके त्या दोघांचें कडाक्याचें भांडण झालें असलें पाहिजे अशी कल्पना माझ्या मनांत पुनः पुन्हा येऊ लागली. अंगातून गळणाऱ्या घामाच्या धारा पाहून कुणीतरी टाचणीनें आपल्या शरीराला शेंकडों भोंकें पाडलीं असावींत असाहि विचित्र भास मधूनमधून होई." अशा स्थितींत माशाएवढा दिसणारा एक मेघ हत्तीएवढा झाला आणि तो आपलें सैन्य घेऊन आकाशभर तळ देऊन राहिला. त्यानें विमानाप्रमाणें घराघरावर जाऊन तेथें धान्याची साठेबाजी आहे काय, तें पाहिलें. ती दिसतांच त्यानें पोबारा केला. कारण जोंवर

समाजात विषम वाटणी आहे, तोंपर्यंत आपण आपली जल-संपत्ति या मानवप्राण्यावर उधळून काहीं उपयोग नाहीं–मूठभर श्रीमंत अधिक श्रीमत होतील व बाकीचे लोक भुकेनें तडफडतच राहतील असा विचार करून तो ढग परत गेला. या निबधात खाडेकराची तरल कल्पकता, सूक्ष्म टीका, पुरोगामी विचार, इत्यादि सारे गुण एकवटलेले दिसतात.

'काळे आणि गोरे' या निबधातहि शिवरामपंती काव्य आहे. त्यांत डोक्यावरील केसार्ची भाषणे देऊन युरोपियन व इतर लोक यांच्या वैषम्यावर टीका केली आहे. काळे केस द्वयर्थी भाषेने म्हणतात, " आम्ही आमच्या मालकीच्या प्रदेशात पाहुणा म्हणून याला प्रथम राहूं दिले. पण या गोऱ्या पाहुण्याने लवकरच आपला गोतावळा गोळा करायला सुरवात केली. हळू हळू पाढऱ्या केसाची या मस्तक प्रदेशात भयकर गर्दी होऊं लागली. आपल्याला ऐसपैस राहायला जागा मिळावी म्हणून किती काळ्या केंसाचे या गोऱ्यानीं खून केले असतील याची गणतीसुद्धा करता येणार नाहीं."

## निबंध कीं गद्य काव्य ?

खांडेकरांचे लघुनिबंध म्हणजे रम्य कल्पनेचीं कमळे फुलविणाऱ्या वायुलहरी. 'वायुलहरी' हा निबंध म्हणजे तर एक गद्यकाव्यच. आरंभापासून शेवटपर्यंत कल्पनामागून कल्पनानीं तो निबंध शृगारलेला आहे. वृत्तांच्या ठोकळ्यांत बसविला कीं तोच मजकूर 'काव्य' म्हणून खुशाल खपेल ! वाऱ्याचा खेळकरपणा वर्णन करताना खांडेखर लिहितात, " वायुलहरीचें तसें नाहीं. त्या आता कानगोष्टी करतील, तर आता कानशिलांत लगावतील. वायुकुमार घटकेत जलदेवीच्या खेळण्यातील गुलाबदाणी आणून तिच्यातील सुवासिक शीतळ तुषार अंगावर उडवील; तर दुसऱ्या घटकेला तेजाच्या हातातील ऊन पाण्याची झारी अंगावर ओतून चागले चटकेहि देईल............मेघाच्या पालखींतून मिरवत आणि विजेच्या चवऱ्या ढाळून घेत वर्षादेवी ज्यावेळीं पृथ्वीवर उतरूं लागते, त्या वेळीं तिच्या आगमनाची ग्वाही वाराच फिरवीत नाहीं कां ? "

जसा वायु, तसेंच जल. या निसर्गाचीं विविध रूपे किती सुंदर असतात, हें ' महापूर ' या निबंधात वर्णन करून खांडेकर सागतात, " जलदर्शनाने होणारा आनद काहीं निराळाच आहे हें काहीं खोटें नाहीं. दंवबिंदूंच्या रूपाने अवतरलेलीं तान्हुल्याचीं चुंबने, अल्लड तरुणतरुणींच्या हृदयाप्रमाणे खळखळत धाव घेणारे निर्झर, सुखवस्तु सासारिकासारखी दिसणारीं सरोवरे, आणि भोवतालच्या रुक्ष प्रदेशाला आपल्या मातृहृदयाने नदनवनाचे स्वरूप आणणाऱ्या नद्या याच्या दर्शनाने आनदित न होणारा अभागी आज उभ्या जगात तरी सापडेल का ? "

निसर्गाचा महिमा गाताना खाडेकर ' चादण्यात ' गुणगुणतात, " निसर्ग म्हणजे तर नावीन्याचे निधान, भव्यतेचे भाडार, सौंदर्याचा सागर, रमणीयतेचा रसनिधि ! "

चादणे हे निसर्गाचे रत्नखचित लेणेंच होय. त्याची जादू सागतांना खाडेकर म्हणतात, " भावना हेच जीवनांतले चादणे आहे. चद्रिका मातीच्या घरात सगमरवरी सौंदर्याचा साज चाढविते आणि बाभळीच्या झाडांना नंदनवनातील पारिजातकाइतकी मोहकता प्राप्त करून देते, नाहीं का ? अमावास्येलाच सारी भुतावळ बाहेर पडते ही जुनी कल्पना कांहीं अगदीं अर्थशून्य नाहीं. चादण्यात पिशाच्चे बाहेर पडतील तर त्यांचे चटकन् यक्षगधर्वांत रूपातर होईल. "

## कल्पनेचे विलास

नित्याचा पाऊस. पण त्याचे शब्दचित्र खाडेकर किती उंची रंगानीं रंगवितात, ते 'पुनर्जन्म' मध्ये पहावयास सापडतें. ते असें, " पाढऱ्याशुभ्र मोत्याच्या राशींनीं भरलेल्या मेघाच्या नौका आतील मौल्यवान् माल कुणालाहि दिसू नये म्हणून काळ्या पडद्यानें आच्छादित आकाशातून जात आहेत, आपल्या हक्काचे हें ऐश्वर्य आपल्याला मिळणार नाहीं या भीतीने पृथ्वीच्या तोडचें पाणी पळालें आहे, इतक्यात मूर्तिमत न्यायदेवताच वाटणारी वीज एकदम प्रगट होते आणि त्या नौकाना भराभर भोंके पाडून पृथ्वीवर मोत्याचा वर्षाव करते. "

'सायंकाल' चें वर्णन अगदीं काव्याला शोभेशा कल्पकतेनें खांडेकर करतात, तें असें—" गंगा-यमुनांच्या संगमामुळें प्रयागला जें पावित्र्य आलें आहे, त्याचें दर्शन सायंकालांतल्या प्रत्येक रंगछटेंत होत असतें. सौम्य होत जाणारा सूर्यप्रकाश आणि लाजत लाजत येणाऱ्या रजनीची छाया यांचें हें मधुर मीलन म्हणजे सृष्टिमंदिरातलें विविध रंगानें रंगविलेलें सर्वोत्कृष्ट चित्रच होय."

इतकें कशाला ? नुसतें कोळ्याचें जाळे ! पण त्याला खाडेकरांची प्रतिभा राजवाड्याचे सौंदर्य कसें मिळवून देतें पहा—" त्या दिवशीं टेंकडीवरच्या रस्त्यावर कोळ्याचें केवढे घर पाहिलें मी ! घर कसलें राजवाडाच होता तो. सूर्यकिरणानीं चमचमणारे त्या राजवाड्याचे चिमणे स्तभ किती आकर्षक दिसत होते. सूत काढण्याच्या शर्यतींत जर कोळ्याला भाग घेता आला असता, तर जास्तींत जास्त नंबराचें सूत काढून त्याने पहिला नंबर खास पटकावला असता !"

माणसाचे डोळे. त्यातहि खाडेकरांची काव्य-दृष्टि किती गूढ अर्थ पाहूं शकते. ते म्हणतात, " रवींद्रनाथाची काव्यशक्ति डोळ्यांना लाभलेली आहे; एवढेंच नव्हे तर चद्रशेखर रमणाची शास्त्रशक्तीहि त्याच्या ठिकाणीं आहे." डोळे व नाक यांच्यातील फरक खाडेकरानीं किती गंमतीनें दाखविला आहे, " पापण्याच्या दरवाजामुळें प्रत्येकाचे डोळे एखाद्या टुमदार बंदिस्त बंगल्याप्रमाणें सुरक्षित असतात. नाकाच्या धर्मशाळेंत अत्तराच्या सुगंधापासून माडी-दुकानांतल्या दुर्गंधीपर्यंत वाटेल त्यानें बिऱ्हाड करावें नाकाला त्या बाबतींत हूं कीं चूं देखील करतां येत नाहीं. पण डोळ्याच्या बंगल्यापाशीं अनिष्ट असा धुळीचा कण येतांच बंगल्याचे दरवाजे झटकन् झाकले जातात."

तसाच आरसा. त्याला खांडेकर 'स्थितप्रज्ञ' कां म्हणतात, तें ऐका, 'भंगुर कांच व चंचल पारा याच्या मिश्रणानें उत्पन्न झालेल्या आरशाची तुलना मर्त्य शरीर व चंचल मन याच्या पोटीं जन्म घेणाऱ्या प्रेमाशींच होऊं शकेल असें कवि-कल्पनेला वाटेल. वस्तु समोरून नाहींशी झाली कीं,

तिला पूर्णपणें विसरून जाण्याची शक्ति पाहून तत्त्वज्ञ त्याला स्थितप्रज्ञाच्या पंक्तीला बसवील. ”

## रम्य वर्णन-शैली

तारुण्याचें गुण-गान कोणता कवि करीत नाहीं ? ‘ ऐन पंचविशी’चें स्तोत्र फडके यानीं गाइलें आहेच. खांडेकर ‘ रम्य आणि रम्यतम ’ या निबंधांत बालपणाची रम्यता मान्य करतात, पण तारुण्याविषयीं ते म्हणतात, “ उंचावरून पुरात उडी टाकायची असो अथवा उच्च ध्येयासाठीं जीवित-संग्रामांत उडी टाकायची असो, तारुण्यच निधडेपणानें ते काम करूं शकतें......तारुण्य ही पहांटेची स्वप्नसृष्टि आहे, मर्त्य जगाला बिलगलेली यक्षभूमि आहे. ”

‘ दोन पाहुणे ’ या निबंधातहि खाडेकर तारुण्यावर असें रूपक रचतात कीं, “ तारुण्यातील दहा वर्षें म्हणजे काहीं सहारा वाळवंटातील प्रवास नव्हे. आकांक्षाचे हिमाच्छादित पर्वत, आशेची रम्य वनश्री आणि कर्तृत्वाचीं फलपुष्पे यानीं नटलेल्या प्रदेशांतील ते पर्यटन. ”

रोजचीं पत्रे !-पण खाडेकराच्या कल्पकतेच्या किमयेने त्याना केवढें मोल चढविलें आहे, पहा—

“ पत्रे अपत्यासारखीं असतात. आयुष्यात तीं नसलीं तर मनुष्याला अगदीं चुकल्याचुकल्यासारखे होतें. असलीं कीं, त्याचा व्याप जिवाला पुरे पुरे करून सोडतो ! पत्रें या आपल्या आयुष्यांतील तारकाच होत यांत शंका नाहीं. तसें पाहिलें तर तारकाच्या तेजाने पृथ्वी काहीं प्रकाशित होत नाहीं पण भयंकर अंधारानें भिऊन गेलेल्या मनाला त्याचा केवढा धीर असतो आणि आधार वाटतो. ”

तसेंच, दैनिक वृत्तपत्राचें वर्णन करताना खांडेकर आपली कल्पकता चालवितात व लिहितात, “ वर्तमानपत्र म्हटले म्हणजे जगातल्या साऱ्या सुखदुःखांचें प्रसूतिगृह ! दररोज थोडी थोडी अफू खाणाराला जसें कुठलेंहि विष बाधत नाहीं, त्याप्रमाणें दैनिकाच्या भक्ताला कुठलीहि बातमी भिववूं शकत नाहीं. ”

## कादंबरीचें कला-वैभव

खांडेकर हे कादंबरीकार असल्याचा पडताळा त्याच्या लघुनिबंधांतहि वारंवार येतो. ' भाडण ' मध्यें त्यानीं कोंकण व देश यातील सृष्टि-सौंदर्याच्या भिन्नतेतहि एकच आनद कसा अनुभवास येतो हें विस्तारानें वर्णन करून सागितलें आहे, ते असे —

" कोकण व देश याच्यातील सामान्य मनुष्याला दिसणारीं विविध सौंदर्यें आलटूनपालटून माझ्या डोळ्यापुढे नाचू लागलीं. नारळी-पोफळीच्या रायांत रमताना जी गमत वाटते, तीच पुरुषभर उचीच्या जोंधळ्यातून खळखळत जाताना अगर उसाच्या मळ्यातून पाठशिवणीचा खेळ खेळताना आपल्या अनुभवाला येत नाहीं का ? राताब्याचे पन्हे पिताना काय अगर गुऱ्हाळावर जाऊन काकवी चाखताना काय, जिभेला सारखेच पाणी सुटते. पिवळ्याजर्द बोंडूंनीं भरलेले काजूचे झाड पिकलेल्या पेरूनीं शोभणाऱ्या झाडापेक्षा कमी सुंदर दिसते असे कोण म्हणेल ? वादळी समुद्र आणि महापूर आलेली नदी हीं दोन्हीं निसर्गाच्या भव्य सुंदर स्वरूपाची सारखीच जाणीव करून देतात. डोंगरावरील जाळ्यातून करवदें शोधून काढणे आणि भुईमुगाच्या शेतांत जाऊन ओल्या शेगा काढणें यात अधिक मौज कशात आहे, हे सागता येणेच शक्य नाहीं. किर्र रानातून अपरात्रीं गाडी हाकीत असतांना घाटावरला गाडीवान जे गाणे गात असतो, त्याची मोहिनी रापण घालण्याकरिता होडींत बसून गेलेल्या कोळ्याच्या तोंडचे गाणे ज्याने ऐकले असेल. त्यालाच बरोबर कळू शकेल. घाटावरचा शेतकरी वाटसरूला मोठ्या प्रेमाने ओला हरभरा देतो, तर कोकणातला त्याचा भाऊ माडावरचे अडसर काढून त्याचे आदरातिथ्य करतो. "

त्याच निबंधात थोर विभूति व सामान्य माणसे याच्यातील अतर सुदर दृष्टांतांनीं दर्शविले आहे. ते असे —" टिळक आणि गोखले-दोघेही अफाट समुद्र. आमच्या कागदी होड्यानीं त्याचा विस्तार मोजायला आम्हीं निघालो होतो ! कोल्हटकर आणि खाडिलकर ! महाराष्ट्र शारदेच्या उद्यानांतील कल्पवृक्ष ! त्यांच्या साली काढून त्यावरून आम्हीं त्यांच्या

फळांची गोडी अजमावीत होतो. खरेंच, गतायुष्यांतील साऱ्या वादविवादा-कडे आणि भाडणाकडे पाहिलें कीं, डार्विनचा मनुष्याविषयींचा सिद्धांत खोटा वाटूं लागतो. वानरापेक्षा माजरच मनुष्यजातीचें पूर्वज अधिक शोभेल यात शका नाहीं. ”

कादंबरीप्रमाणे लघुनिबधाचा प्रारंभ खाडेकर कधीं कधीं चित्ताकर्षक करतात. ‘ रम्य आणि रम्यतम ’ या निबंधाचा प्रारभ पहा, “ मोटार सर्रकन् आवाज करून थाबली. माझ्या छातींत एकदम धस्स झालें. अपघाताच्या भीतीनें नव्हे ! मोटार किती नादुरुस्त झाली असेल या विचाराने ! एका सस्कृत सुभाषितकाराने भाडण नसलेले गाव, लबाडी न करणारा दुकानदार, गुंनभरहि सोने न चोरणारा सोनार वगैरे असभाव्य गोष्टींची एक यादी केली आहे. त्याच्या वेळीं मोटारी असत्या तर या यादींत, वाटेत न बिघडणाऱ्या मोटारीला अग्रपूजेचा मान त्यानें अगत्य दिला असता ! ”

मंदाकिनी या बालिकेचें पुढील अलंकारिक वर्णन कादबरींत शोभणार नाहीं काय ? ‘ सुभाषितें ’ या निबधात खाडेकर तें वर्णन पुढीलप्रमाणें करतात, “ मदा अगदीं नटूनथटून आली होती. लहानलहान तरगानीं जलाशयाचा पृष्ठभाग जसा मोहक दिसतो, तसा तिचा निळा फ्रॉक चुण्यांमुळे मोठा सुंदर वाटत होता. मंद चादण्यानें आकाशाचा निळसर रंग खुलून दिसावा, तशी बेतानें लावलेल्या पावडरीमुळें तिची सावळी मुद्रा दिसत होती. ”

## सूक्ष्म विचारांचा आविष्कार

सूक्ष्म विचार सुंदर उपमेनें निवेदन करण्यात खांडेकरांचें कौशल्य असामान्य आहे. ‘ एकवचन ’ या निबंधांत ते लिहितात, ‘ तुझें ’ आणि ‘ तुमचे ’ या दोन शब्दात किती विलक्षण फरक आहे ! पहिला शब्द उच्चारतांना किंवा लिहिताना आपण एखाद्या लताकुंजांत अथवा समुद्र-तीरावर बसलों आहों असा भास होतो. उलट दुसऱ्या शब्दाचा उच्चार

करतांना आपण रहदारीच्या रस्त्यानें जात आहों असें चित्र डोळयापुढें उभें राहतें......

'तुझें' आणि 'तुमचे'! पहिलें वचन प्रीतीचे तर दुसरें बहुमानाचें! जगांत दुसऱ्याला मान देणें सोपें आहे. पण प्रेम देणें? छे:! प्रेमाचीं फुलें लहर लागेल तेव्हांच हृदयाच्या वेलीवर फुलत असतात आणि बहुमानाचीं फुलें–कागदीं फुलें काय, हवीं तेव्हा बाजारात मिळतात."

काळपुरुषाचें शब्दचित्र 'दोन पाहुणे' मध्ये खाडेकरानीं पुढील शब्दांनीं काढलें आहे, "जगाच्या बागेतील त्या माळ्याच्या कंबरेला चकचकीत कोयती चमकत असली; तरी त्याच्या हातात पाण्याची झारी आहे."

सुभाषिताचें महत्त्व खाडेकर सागतात, "वस्त्रानीं मनुष्याच्या शरीराचें सौंदर्य वाढते, फुलानीं केसाचे सौदर्य वाढतें. सुभाषितें हींहि सुदर वस्त्रा-सारखीं अथवा मोहक फुलासारखींच नाहींत का? आपल्या मनाचें सौदर्य वाढावें अशी मनुष्याला इच्छा नसती, तर त्याला सुभाषितें कधींच आवडलीं नसतीं! सुभाषिताची आवड ही मनुष्याच्या मनाला लागलेली पूर्णतेची तहान आहे."

गप्पाचा उपयोग सागताना ते म्हणतात, "गप्पा मारणें म्हणजे मनानें सुंदर मोकळ्या हवेंत फिरणे! हवा खाऊन काहीं कुणाचे पोट भरत नाहीं. पण किती हुषारी येते मोकळ्या हवेंत फिरल्यामुळें! गप्पांनींहि तसेंच वाटतें! अर्थात् दूषित हवेत फिरणें जसें धोक्याचें; त्याप्रमाणें बातात रूपांतर होणाऱ्या गप्पा मारणें वाईट हे ओघानें आलेच!" जें गप्पाना लागू, तेच लघुनिबंधाला.

## व्यावहारिक दाखले

व्यवहारांतील दाखलेहि खाडेकर मधूनमधून देतात. 'मी आहें कीं' या निबंधांत आपली निराशा त्यानीं किती व्यावहारिक दृष्टांतांनीं सांगितली आहे, पहा—"माहेराहून आपल्या लवाजम्यानिशीं येणाऱ्या पत्नीचें स्वागत करण्याकरितां स्टेशनावर अगदीं वेळेवर हजर व्हावें आणि कड-

कट्टपाशीं बसलेल्या मद्रासी सद्गृहस्थांनीं ' गाडी दोन तास लेट आहे ! ' म्हणून सांगावें; किंवा एखादा लोकप्रिय चित्रपट पाहण्याकरितां मुद्दाम टॅक्सी करून आपल्या कबिल्यासह थेटराच्या दारात उतरावें आणि ' बॉक्सचीं तिकिटं तेवढीं शिल्लक आहेत ' हे व्यवस्थापकांचे शब्द कानावर पडावेत; अगदीं तश्शी स्थिति झाली माझी ! "

याहिपेक्षां सोपा दाखला ' तात्पर्य 'मध्यें आहे. तो असा—

" गोष्टींत एखादे तत्त्व असणें निराळें आणि तिचें तात्पर्य सागणें निराळें. जरदाळू आणि बदाम याच्याइतका फरक आहे या दोन्हींत. जरदाळू खाणाराला प्रथमच धोंडा शोधावा लागत नाहीं. वरचा गर खाऊन तोंड गोड झाल्यावर वाटले तर त्याने आतली बी फोडावी, वाटले तर फेंकून द्यावी. फारसें कांहीं बिघडणार नाहीं त्यामुळे. पण बदामाचें सर्वच कांहीं आगळे ! फोडण्याची यातायात केली नाहीं तर तो आणि रस्त्यावरचे खडे सारखेच. बरे, फोडून तरी आतली बी गोडच निघेल म्हणून काय नेम आहे ? मोठ्या आशेनें ती तोंडात टाकावी आणि— आणि काय ? प्रेमभंग झालेल्या नायकाचें अगदीं सुरेख चित्र कुणाला पाहिजे असलें तर त्याने त्या तोंडाचा फोटो घेण्याची झटपट व्यवस्था करावी. "

## विनोदाचीं साधनें

शब्दांचें लालित्य व कल्पनेचे रम्यत्व याप्रमाणेंच विनोदाचे चातुर्य— हाहि गुण खाडेकरांच्या लघुनिबंधांत विपुल प्रमाणात आहे. त्यासाठीं शब्द, कल्पना, विचार—या सर्वांचें साहाय्य ते घेतात. लहानमोठीं, भलींबुरीं, कृत्रिम—नैसर्गिक अशीं सारीं साधनें वापरून ते विनोद निर्माण करतात. नवख्या लेखकाप्रमाणें शाब्दिक कोट्याहि ते कशा करतात, हें ' वेडा हत्ती ' यामध्यें पहा—

" हे मूर्ख गजराजा, तुझ्या डोक्यात मोत्याच्या राशी असतात ही कल्पना तुझ्याइतक्याच वेड्या कवींनीं आपल्या डोक्यांतून काढलेली दिसते ! या बातमीवरून तुझ्या डोक्यात नुसते बटाटे भरलेले असावेत असा मला संशय येतो."

भल्याबुऱ्या उपमा–दृष्टांतांची भेळ किती खमंग लागते, हें ‘ काळे आणि गोरे ’मध्यें पहा—“ कुंकवावाचून जशी सवाष्ण नाहीं. लुटीवांचून जसं साम्राज्य नाहीं, थापावाचून जसं राजकारण नाहीं, तशी सभापतीवांचून सभा नाहीं.”

हाच विनोदाचा प्रकार ‘ उंबरातील किडे ’ या निबंधांत पहावयास सांपडतो तो असा—“ ठरलेल्या वेळीं सुटणारी मोटार ही शिकवणी न करणारा शिक्षक इंजेक्शन न देणारा डॉक्टर, पुढील तारीख न मागणारा वकील, कादंबरी, न वाचणारी कुमारिका, लघुकथा न लिहिणारा कॉलेजचा विद्यार्थी याच्या मालिकेतली अगदीं दुर्मिळ चीज आहे.”

तसेंच, एका सूत्रात कोणत्या तीन वस्तु गुंफल्या आहेत, तें पहा—

“ चहा, गप्पा आणि मुले हीं मर्यादित असतात तोपर्यंतच सुखकारक होतात हा अनुभव आजकाल कुणाला नाहीं ? पत्रात या तिन्हींचेहि फायदे आणि तोटे एकवटलेले असतात.”

‘ प्रेम-कलह कीं कलह-प्रेम ? ’ यातील शब्दाच्या उलटापालटीप्रमाणें कल्पनेची उलथापालथ ‘ माझे आवडते लेखक ’मध्यें केले आहे. ती अशी—

“ त्यांच्या पदाचा अर्थ लावता लावता माझे संस्कृत सुधारलें कीं, माझें संस्कृत चांगले असल्यामुळे त्याच्या पदाचा अर्थ मला लागला हें कोडें मात्र मला कधींच उलगडले नाहीं ! ”

## घरगुती वातावरण

खांडेकरांच्या लेखनातील जुने दाखले व नवे विचार यांचा सुंदर संगम ‘ दाढी आणि आरसा ’ या निबधात झालेला आढळतो. त्यांत प्राचीन संस्कृतींतून पुरोगामी विचार व्यक्त करून त्यानीं विनोदहि साधलेला आहे. प्रवासाला जावयाचें तर बायकोनें भाराभर कपडे ट्रंकेंत कोंबले. तेव्हां झालेल्या पति–पत्नीच्या संवादांत सलगीची भाषा, घरगुती वातावरण, चलनी भाषा वगैरे लघुनिबंधाचे सारें साहित्य आलेलें आहे. तो संवाद असा—

" गाड्या कांहीं आपल्या सोईनं सुटत नाहींत ! एखाद्या वेळेला कपडे वाळवायला वेळ मिळाला नाहीं तर ? "

" तर तुझं अर्ध लुगडं मी नेशीन ! "

" इश्श ! "

" इश्श काय ? नळराजाच्या अर्ध्या वस्त्रावर दमयंतीनं दिवस काढलेच होते कीं नाहीं ? "

" प्रवासाला निघालं कीं लहान मुलासारखी अवस्था होते इकडली !"

तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून मीं म्हटलें, " समान हक्कांचा काळ आहे हा ! तेव्हा बायकोचं अर्ध लुगडं नवरा नेसला तर त्यात नवल नाहीं कांहीं. उलट फायदाच आहे त्याचा ! "

" फायदा ? "

" हो ! एरवीं गोल नेसायला कांकूं करणारी बायको लुगड्याची लांबी निम्मी झाल्यावर तरी गोल नेसेलच कीं नाहीं ? "

## अतिशयोक्तीचे नमुने

अतिशयोक्ति हा तर विनोदाचा प्राणच. ' न आलेलीं पत्रें ' या निबंधांत खाडेकर लिहितात, " मीं दुसरें पत्र उचललें–तीन कादंबऱ्या, सात बोलपट कथा, एकशे एकवीस भावगीतें नि तीन खंडकाव्यें लिहिणाऱ्या इंग्रजी पाचवींतल्या विद्यार्थ्याचें होतें तें ! "

' प्रदर्शन ' मध्यें टांगेवाल्यांच्या आक्रमक वृत्तीचें वर्णन करतांना खांडेकरांनीं किती अतिशयोक्ति केली आहे, पहा–" टांगेवाल्यांनीं गराडा घातलेला गृहस्थ चोरी करतांना पकडलेल्या इसमासारखा दिसतो ! ' साहेब माझा टागा आहे ! ' म्हणून एक त्याचा उजवा हात धरतो, तर ' साहेब चला.' म्हणून दुसरा त्याचा डावा हात पकडतो. देवानें माणसाला अवघे दोन हात देण्यांत फार मोठें चातुर्य प्रगट केलें आहे असें या वेळीं वाटूं

लागलें. सहस्रार्जुनाच्या काळीं जर टागे असते आणि रथ मोडल्यामुळें अथवा दुसऱ्या कुठल्याहि कारणामुळें त्याच्यावर टागा करण्याचा प्रसंग आला असता, तर–तर त्याचे हजार हात धरायलासुद्धा टागेवाल्यानीं कमी केलें नसते ! ”

· पौराणिक दाखले देण्यात खाडेकर पटाईत आहेत. तसा पुराणाचा उपयोग न केल्याबद्दल त्यांनीं फडके याना एके ठिकाणीं उणेपणाहि चिकटविला आहे पण फडके हे आपला वाचक पुराणप्रिय नसून पश्चिमे-कडे तोंड करून बसलेला आहे असें मानीत असावेत. शिबि–नचिकेत–ययातीपेक्षा त्याना खिस्त–रिप् व्हॅन् विंकल–नीरो हेच आपल्या वाचकांना परिचित आहेत असें फडके गृहीत धरीत असावेत.

## विसंगतीचा विनोद

कल्पनेची चमत्कृति दाखवून ‘ पुनर्जन्म ’ मध्ये खाडेकरानीं विनोद निर्मिला आहे; तो असा, “ ज्या अमृताकरिता देवदानवानीं समुद्रमंथन केलें तें बहुधा दह्यात कालवलेले मेतकूटच असले पाहिजे अशी संशोधनाची कल्पनाहि त्यावेळीं माझ्या मनात चमकून गेली ! ”

स्वतःचा बडेजाव सागून खसखस पिकविण्याच्या पद्धतीचा उपयोग ‘ एक तप ’ मध्ये खाडेकरानीं केला आहे. ते लिहितात, “ जगांत देव असता तर हजारो निरपराधी लोकाना ( या यादींत माझे नांव नेहमींच पहिलें असे हें सागायला नको ! ) इतकीं विलक्षण दुःखे भोगावीं लागलीं असतीं कां ? ”

पत्रावर ‘ लेखकु ’ ने तारीख घातली, तींत महिना चुकला. यावर खांडेकरांच्या कल्पकतेने ‘ झोका ’ मध्यें किती उंच उंच उड्डाणें घेतलीं पहा, “ प्रत्येक पत्रावर १।५।३७ च्या ऐवजीं १–४–३७ ही तारीख आमच्या गजाननमहाराजानीं घातली होती. ध चा मा करण्यापैकींच प्रकार होता हा ! मेची पहिली तारीख कामगार–दिनाची–म्हणजे पर्यायानें वीर-

रसाची. पण टाकाच्या फटकाऱ्याने तिला 'एप्रिल फूल' करण्याचे श्रेय सदरहू बाल-लेखकाने घेतले होतें. तब्बल एक महिन्याचे अतर ! एवढ्यात किती घडामोडी होतात याची त्या विद्यार्थ्याला कल्पनाच नसावी ! चैत्री पौर्णिमेला मारुतीने जन्मतःच सूर्यबिंब धरण्याकरिता बुभुःकार केला; पण आपण चुकीने एक महिना मागें गेलों कीं, फाल्गुनी पौर्णिमाच गर्जून समोर उभी रहायची ! "

तसेच, 'परीक्षक'मध्यें एका विद्यार्थ्याने 'तिच्या' या शब्दातलि पहिलें अक्षर दीर्घ काढलें. त्यावर खाडेकराची कल्पनाशक्ति काय म्हणते, ऐका, "'तिच्या'—'तीच्या'! पहिली ती कशी खालीं पाहत चाललेली विनयशील स्त्री दिसते ! आणि दुसरी ? केसाना दगड बाधून दाखविणारी सर्कशींतील बाईच जणू काही ! 'तिच्या–तीच्या'–उद्गार चिन्हाची फौज पुढे उभी करावी एवढी अक्षम्य चूक ! एखाद्या सावळ्या लेखकाने पाहिली तर–हा-हा म्हणता हा गणिताचा पेपर अश्लील वाङ्मयात जमा व्हायचा ! "

देवाचा व आपला सवाद, कल्पकतेच्या बळावर, घडवून आणून खाडेकर 'विरहा'चे महत्त्व बिंबवितात, ते असे—'

"आणि म्हणून कधीं काळीं देव माझ्यापुढें उभा राहून "वत्सा, वर माग" म्हणून म्हणाला, तर, मी त्याच्यापाशीं एकच गोष्ट मागेन— "प्रिय जनाचा विरह !" हें ऐकून देवसुद्धा बुचकळ्यात पडेल ! कदाचित् तो माझी मूर्खांतहि गणना करील. पण मी मिस्किलपणाने त्याच्याकडे पाहात म्हणेन, "हे पहा देवा, तूं तरी स्वर्गसुख सोडून वारवार पृथ्वीवर अवतार का घेतोस ? विरहानें स्वर्गसुखाची गोडी वाढते म्हणूनच ना ?"

## सहानुभूतीची दृष्टि

केवळ कल्पकता हा एकच गुण खाडेकराच्या लेखनात नाहीं. त्या साधनानें वाचकाचीं मनें जिंकून तीं विशाल करण्याइतकी समाज मनस्कताहि त्याचे ठायीं आहे. "वाङ्मय–गुणात कल्पकता मला जेवढी

आकर्षक वाटे, तेवढीच भोवतालच्या सामाजिक अन्यायाची चीडहि माझ्या मनाला येई." हें त्याचें स्वतःचें वर्णन नसल्या प्रशसेचें नाहीं, सत्यस्थितीचेंच आहे. जगातील दुःखाकडे सहानुभूतीनें पहाण्याची उदात्त शिकवण खाडेकर नेहमीं देतात. त्याचे अनुकंपाशील अतःकरण त्याच्या लघुनिबंधातून अनेकवार प्रगट झाले आहे. 'निकाल द्या' या आपल्या पहिल्याच निबंधात ते म्हणतात, "शाळेंत एकाद्या मुलाचा अभ्यास झाला नसला कीं, .त्याला उनाडपणाचे शेलापागोटें द्यावयाला आम्ही एका पायावर तयार! त्या चिमण्या जीवाला एखादी चिंता जाळीत असेल अगर घरातील कामामुळे त्याला आवढा गिळायलाहि फुरसत मिळत नसेल, अशी कल्पनाहि आमच्या मनाला शिवत नाहीं. एखाद्यानें चोरी केली कीं, नाकाने वागीं सोलणारा समाज त्याची छीःथू करूं लागतो, पण ती चोरी पोटच्या पोरीचा प्राण वाचविण्यासाठी केली कीं श्रीमतीची हाव धरून केली होती हे मात्र कोणी पाहत नाहीं."

## प्रेमाची शिकवण

हाच सहानुभूतीचा, प्रेमाचा, सेवेचा मंगल संदेश मोठ्या कल्पकतेने व आकर्षकपणे 'महात्म्याचे अश्रु' या लघुनिबंधात खाडेकरानीं दिला आहे. 'मी सुखी नाही' हे गाधीजींचे तीनच शब्द! पण त्यामुळे लेखकाचे कवि-हृदय हलून गेले. त्या महात्म्याच्या अ–सुखाचा अर्थ काय? त्याचे कारण कोणते? त्याचा सदेश कोणता? अशा नाना विचारार्चीं चक्रे लेखकाच्या डोक्यात फिरूं लागलीं–तो कल्पनेच्या पखानी स्वर्गातहि गेला. तेथे गाधीजींप्रमाणेच बुद्ध व खिस्त, टॉलस्टॉय व तुकाराम हे सारे महात्मे अश्रु ढाळीत असल्याचे त्याला आढळले. त्याचे कारणहि त्याने त्याना विचारले व त्याच्या उत्तरावरून योग्य तो बोध घेऊन वाचकांना साागितला. या अश्रूचा महिमा वर्णन करताना प्रारभीं खाडेकर म्हणतात, "ज्याच्या डोळ्यात गगेचें पावित्र्य आहे, ज्याच्या हृदयात महासागराचे गाभीर्य आहे, ज्याच्या हृदयात साऱ्या मंगल ध्येयाना धीर देण्याची शक्ति आहे अशा महात्म्याचे शब्द होते ते! गांधीजींनीं अगदीं

अलीकडे जयकराना लिहिलेल्या छोट्या पत्रातले ते तीन शब्द–त्या तीन शब्दात त्रिभुवनातलें कारुण्य भरलें आहे असा मला भास झाला. मी सुखी नाहीं असे स्वतः महात्माजीच म्हणत होते. ''

अश्रूंचे कारण काय? असा प्रश्न लेखकाने केला असता, '' बुद्धदेव गंभीरपणानें उद्गारले, ' मी स्वतःच्या ससाराचा त्याग केला तो जगाचा संसार सुखाचा व्हावा म्हणून. त्या आशेन माझ मन त्यावेळीं फुलून गेलं होतं. आज ना उद्या नवं सुखी जग निर्माण होईल असं मला वाटत होतं. पण ती आशा-तीं फुलं आता कोमेजून गेलीं आहेत. '' हे नवें सुखी जग निर्माण करण्याचे महात्म्याचें स्वप्न साकार कधीं होईल? याचे उत्तर देताना लेखकाने एक पौराणिक दाखला दिला आहे. विराट राजाचे घरीं अज्ञातवासातील धर्मराजाचे कपाळातून रक्त साडू लागले. ते त्या धर्मात्म्याचे रक्त जमिनीवर पडता कामा नये, तसेंच महात्म्याचे अश्रु. म्हणून खाडेकर पटवून देतात, '' रक्त हे शरीराचे अश्रु असले तर अश्रु हें आत्म्याचे रक्त आहे. अलौकिक महात्म्याचे हे अमोल रक्त जमिनीवर पडू नये म्हणून जोपर्यंत जगातल्या सर्व उदात्त शक्ती धाव घेत नाहींत, हें पवित्र रक्त काढणाऱ्याला शिक्षा केल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं अशी प्रतिज्ञा करणारे अर्जुन जोपर्यंत प्रत्येक देशात विपुल प्रमाणात उत्पन्न होत नाहींत, तोपर्यंत मुत्सद्याची एक ठेवणींतली थाप किंवा कवींचें एक गोड स्वप्न यापलीकडे ' नवें जग ' या शब्दप्रयोगाला काहीं अर्थ नाहीं! ''

## तंत्रबद्ध लघुनिबंध

' रबरी फुगे ' हा खाडेकराच्या लघुनिबंधाचा एक नमुनाच म्हणता येईल. ' तू रागावणार नसशील तर–' अशी कादंबरीसारखी सुरवात आहे, लेखक रबरी फुग्याबरोबर खेळत होता, हें पाहिल्यामुळें रावसाहेबांच्या मनातील त्याचेविषयींचा आदर कमी होतो अशी कथा सागितलेली आहे आणि शेवटीं '' आयुष्य हाच एक मोठा फुगा आहे!–धरणीसुद्धां एक

फुगाच आहे " असें तत्त्वज्ञान जोडलेले आहे. पतंग म्हटला कीं, तो रंगीत कागद, त्या बारीक कामट्या व ते शेपूट; अशी सामुग्री लहान मुलाच्या डोळ्यासमोर उभी राहते आणि तो त्याला दोरा लावून आकाशात उंच उंच उडवीत तासन् तास रमत राहतो; तसाच प्रकार लघुनिबंधाचा झाला आहे. आरंभीं संवाद वा वर्णन, मध्यभागीं लघुकथेचे बीज व अखेरीस बारीकसें तत्त्वज्ञान, असे कोष्टकच सामान्य लेखकानीं त्याचें बनविले आणि छापाच्या गणपतीप्रमाणें, तसे ठोकळेबाज व ठरीव ठशाचे लघुनिबंध सर्वत्र आढळूं लागले.

या तकलुपी लघुनिबंधाच्या सुळसुळाटाचे वर्णन खुद्द खांडेकरांनींच एके ठिकाणीं पुढील शब्दानी केले आहे. " रिकामटेकडीं पोरें चार धोंडे गोळा करून जशीं चिचा पाडायला जातात त्याप्रमाणें कुणीहि उठावे, टाचणीपासून रणगाड्यापर्यंत आणि माकडाच्या शेपटीपासून तरुणीच्या शेपट्यापर्यंत कोणताहि विषय घ्यावा आणि त्यावर सुचेल ते लिहून वर लघुनिबंधाचा छाप मारावा, असा अराजकाचा काळ या वाङ्मयक्षेत्रात मध्ये थोडे दिवस निर्माण झाला होता. " तो अराजकाचा काळ सपून पुढे लघुनिबंधाचे राज्यच संपुष्टात आल्यासारखे झाले म्हटले तरी चालेल.

## संपन्न व्यक्तित्वाचा रम्य आविष्कार

स्वैरपणा व सहजपणा हे त्याचे प्राण—पण तेच नाहींसे होऊन कडक इस्त्रीची भाषा, नियमबद्ध मांडणी व कृत्रिम, उसने विचार—याच्या टाकसाळींत लघुनिबंधाचीं नाणीं भराभर पाडलीं जाऊ लागली. पण खांडेकर म्हणतात त्याप्रमाणे, " लघुनिबंध हा वैचित्र्यपूर्ण व्यक्तित्वाचा, विकसित रसिकतेचा आणि अनुभवसंपन्न आत्म्याचा आविष्कार आहे. " फडके यांनीं आपले स्वतंत्र व रम्य व्यक्तित्व आपल्या प्रत्येक लघुनिबंधात ओतलें आणि म्हणून ते निबंध आकर्षक ठरले. खांडेकरांचे निबंध ठरीव ठशाचे असले तरी त्यांच्या उज्ज्वल कल्पनाशक्तीनें ते तेजस्वी बनले व वाचकांचे डोळे दिपवूं शकले. इतर बहुतेक लेखक मात्र साचेबंद, ठोकळेबाज, यांत्रिक

असेच लघुनिबंध लिहित गेल्यानें त्यांच्या लोकप्रियतेला ओहोटी लागली. त्याच्या निबंधात लघुकथेची रम्यता नसते व निबंधाची विचारप्रेकताहि नसते. पण अशा खोट्या नाण्याचा सुळसुळाट झाला, तरी फडके–खांडेकरांच्या खऱ्या नाण्याचे मोल कधींच कमी होणार नाहीं.

## अभ्यासाच्या वाटा

(१) 'विपुल व कलासंपन्न साहित्य सतत निर्माण करण्यात फडके व खाडेकर या दोघाचाहि हातखंडा आहे, मात्र आशय व आविष्कार या बाबतींत दोघाच्याहि साहित्यात फारसें साम्य नाही.' हें तुम्हांस पटतें का ?

(२) "खाडेकराचे भाषावैभव अलौकिक आहे, कल्पनासौंदर्य रमणीय आहे व वर्णन–चातुर्य आल्हादकारक आहे" खाडेकराच्या लघुनिबंधांच्या आधारे हे विधान स्पष्ट करा.

(३) 'लघुनिबंध हा एक मध्यमपदलोपी समास आहे असें खाडेकरांच्या लेखनावरून वाटते,' असे का म्हटले आहे ?

(४) खाडेकराच्या लघुनिबंधातील तुम्हाला आवडणारे असे दोन लघुनिबंध कोणते ? त्यातील विषय कोणता ?

(५) ठोकळेबाज लघुनिबंध म्हणजे काय ? खाडेकरानीं या बाबतीत काय म्हटले आहे ?

# प्रा. अनंत काणेकर : : ३

‘आधुनिक लघुनिबंधाचा मराठी नमुना’ कोणाला पहावयाचा असेल तर त्यानें प्रा. काणेकराचे निबंध वाचावेत. चारदोन पानाचा छोटा आकार, अणकुचीदार भाषा व बुद्धिवादी दृष्टिकोनातून समाजवादी



विचारांची माडणी–आणि या सर्वांवर उपहासजन्य विनोदाचा फुलोरा.– असा काणेकराच्या निबंधांचा थाट आहे. त्यानीं निर्मिलेले ‘गणूकाका’ हे सनातनी चाकोरींतून जाणारे असल्यानें पूर्वपक्षासारखे शोभतात. त्यांच्या चित्रणात मनुष्यस्वभावाचें मार्मिक ज्ञान काणेकरानीं ओतलें आहे. ते पेन्शनर असून प्रतिगामी विचारसरणींचे दाखविले आहेत. तथापि त्याचे वर्तन परोपकारी व सुसस्कृत दाखविले आहे. कोल्हटकरांच्या पाङ्गुतात्याइतके काणेकराचे गणूकाका सुप्रसिद्ध आहेत.

## विचारांची चमत्कृति

ठराविकाच्या पलीकडे जाण्याची काणेकराची प्रवृत्ति आहे. अपवादाचें वैचित्र्य व सौख्य दाखविण्यात त्याची लेखणी तरबेज आहे. ‘बेधडक खोटें बोलणे, हेंच केव्हा केव्हा खरें बोलण्यापेक्षा फार चागलें’ असें लाबलचक व चमत्कृतिजनक शीर्षक ते आपल्या निबंधाला देतात. यातील ‘केव्हा केव्हा’ हे अपवादबोधक शब्द तरुण वाचकाच्या चित्तातून सह-

जच निसटतात व त्याला उरलेला उरफाटा सिद्धांत आश्चर्यजनक वाटतो. ' घड्याळाचे गुलाम, ' ' अज्ञानाचा आनंद, ', ' व्यवस्थितपणाचें वेड, ' ' पळण्याची कला, ' इत्यादि निबंधाचे मथळेसुद्धा किती कुतूहल उत्पन्न करणारे आहेत ! आणि त्यात ' थापा मारणें ही एक ललितकला आहे ' किंवा 'जगाचा खरा उद्धार आळश्याच्याच हातून होतो' अथवा ' अविचार हेच इहलोकातील क्षणभंगुर जीवन जगण्याचें एकमेव आणि अमोघ साधन आहे " अशीं विचित्र वाटणारीं वाक्ये वाचकाला भेटलीं कीं, त्याची जिज्ञासा वाढतेच. लेखाच्या शेवटीं त्या चमत्कारिक विधानाचा खरा अर्थ कळून त्याला निराळाच आनद प्राप्त होतो. ' अतिपरिचित नियमाच्या अंधारकोठडींत खितपत पडलेलें सत्य अपवादाच्या चिमुकल्या झरोक्यातूनच दृष्टीला पडतें. ' अशी मीमासा खुद्द काणेकरच एका निबधात करतात.

## विशिष्ट व्यक्तिमत्त्व

' मालाकार ' शास्त्रीबुवाचे ग्रथप्राय निबंध सोडाच, पण प्रिं. आगरकरांचे स्त्री-स्वातत्र्यावरील निबंध किंवा भारताचार्य चिंतामणराव वैद्य याचे ' अबलोन्नति 'पर लेख-याच्याशीं काणेकराच्या निबंधाची तुलना केली, म्हणजे मराठी निबंधानीं किती मजल मारली आहे हे कळून येतें. आणि त्याबरोबरच भाषा, माडणी, विषय व विचार या चारी अंगानीं या दोन्ही प्रकारात किती भिन्नत्व आहे हेंहि समजून येतें. शहरी जीवनाचा यात्रिकपणा व विचाराचा भाडोत्रीपणा याबद्दल काणेकर आपल्या निबधातून चीड व्यक्त करतात. केवळ स्वतःच्याच विचारात रगणाऱ्या स्वार्थी व अहंकारी माणसाच्या मनोवृत्तींतील दोष ते कुशलतेनें व सडेतोडपणें दाखवितात. समाजाच्या विषम आर्थिक रचनेचे भीषण परिणाम तर ते जातायेता केव्हाहि वाचकापुढें ठेवतात. स्त्री-पुरुषाच्या संबधातील निरनिराळ्या प्रश्नावर आपलीं ठाम मतें ते निर्भीडपणें मांडतात. काणेकरांचें मन मुख्यतः कवीचें आहे. त्यावर उच्च शिक्षणानें आधुनिक विचारांचे संस्कार खोलवर केले आहेत. शिवाय भारताच्या दक्षिणोत्तर

भागाचा प्रवास त्यानीं केला आणि रशिया व युरोप हेहि प्रत्यक्ष नजरे-खालीं घालण्याची संधि त्याना लाभली. याशिवाय वृत्तसृष्टीशीं जडलेल्या संबंधामुळेंहि ताज्या घडामोडींशीं व नव्या विचाराशीं ते समरस होऊं शकतात. त्याची भाषा सोपी व खोचदार आहे. त्यांचा स्वभाव मार्मिक व निगर्वी आहे. विद्वत्ता, प्रवास, अनुभव व चितन–या सर्वामुळे त्याचे जें सहृदय, विवेचक व पुरोगामी असे रुचिर व्यक्तित्व बनले आहे. त्याचीं विविध प्रतिबिबे म्हणजेच त्याचे लघुनिबध.

## कवि व नाटककार

श्री. अनत आत्माराम काणेकर याचा जन्म मुबई येथे ता. २ डिसेंबर १९०५ रोजीं झाला. ते १९२७ मध्ये बी. ए. झाले व १९२९ सालीं एल् एल् बी. झाले. सनद घेऊन ॲडव्होकेट म्हणून १९३० सालीं त्यानीं कोर्टात वकिली सुरू केली. तीन वर्षे वकिलीच्या धद्यात त्यानीं घालविलीं. पण त्याचे मन कज्जेदलालीच्या कागदपत्राऐवजीं ललित साहित्यांत रमत होतें. १९३३ सालीं त्याचे ‘ चादरात ’ हें कविताचे पुस्तक प्रासिद्ध झाले व ते एकदम प्रसिद्धीस आले. १९३३ सालींच पाच कलाप्रेमी नवविद्वानानी ‘ नाट्य मन्वतर ’ नावाची नाट्य-सस्था स्थापन केली. तिचे काणेकर हे एक सस्थापक होते. नाटके लिहून व नट म्हणून काम करूनहि काणेकरानीं मराठी रगभूमीची सेवा केलेली आहे.

## परदेशचा प्रवास

वृत्तपत्र-सृष्टींत काणेकरानीं १९३५ सालीं प्रवेश केला. ‘ चित्रा ’ या साप्ताहिकाचे संपादक म्हणून त्यानीं लौकिक मिळविला. ‘ आशा ’ या साप्ताहिकाचे सपादक म्हणून ते व रागणेकर यानीं वाचकाची सेवा केली. पाच वर्षे वृत्त-सृष्टींत काढल्यावर कॉलेजांतील प्राध्यापकाचा झगा काणे-करानी आपल्या अंगावर घेतला. मुबई येथील ‘ खालसा. कॉलेजात ’ १९४१ सालीं ते प्राध्यापक म्हणून काम करू लागले. तेथे पाच वर्षे काढल्यावर ‘ सिद्धार्थ कॉलेजा ’त ते अध्यापन करूं लागले. सध्या ते

तेथेंच प्राध्यापक म्हणून काम करीत असतात. नियतकालिकांतून ‘ पांढ-ऱ्यावर काळे ’ करून ते प्रासंगिक लेखन करीत असतात.

परदेशचा प्रवास करण्याचा योग काणेकराना १९३७ सालीं लाभला. त्यावेळीं ते युरोप व रशिया यातून मुशाफिरी करून आले. तिचे अनुभव ‘ धुक्यातून लाल ताऱ्याकडे ’ या पुस्तकात त्यानीं कुशलतेनें रेखाटले आहेत. १९४९ सालीं उत्तर भारताचा प्रवास त्यानीं केला व तो “ आमची माती–आमचे आकाश ” या पुस्तकात वाङ्मयरूपानें चित्रित करून ठेवला तसेच १९५० सालीं दक्षिण भारताचा प्रवास करून त्याचें वर्णन “ निळे डोंगर–ताम्बडी माती ” या पुस्तकात त्यानीं करून ठेवले आहे. त्याचे लेखन तरुणाचें आवडते आहे. त्यातहि त्याचे लघुनिबंध विशेषच प्रिय. १९३४ सालीं त्यानीं प्रसिद्ध केलेलीं ‘ पिकलीं पाने ” म्हणजे महाराष्ट्रातील तरुण हृदयाच्या ठोक्याचे पडसादच होत. ‘ जागत्या छाया ’ वगैरे त्याचे कथा–संग्रहहि लोकप्रिय झालेले आहेत. १९४१ सालीं बडोदे येथील ‘ वाङ्मय परिषदे ’ चे अध्यक्षस्थान त्यानीं भूषविले आणि १९५० मध्ये ग्वाल्हेर येथील ‘ वाङ्मय–परिषदे ’ चें अध्यक्षस्थान त्यानीं मंडित केले.

## ललित लेखकाचा मान

कवि, नाटककार, लघुकथाकार व लघुनिबंधकार–या चार नात्यांनीं काणेकर ललित साहित्यात भर टाकीत आहेत. या आपल्या ललित लेखनाने आपण समाजाचे सुख वाढीस लावीत आहोत आणि जनतेचें एक उपयुक्त कार्यच करीत आहो, असा यथार्थ अभिमान त्याना आहे. ते स्वतःला ‘ सुखस्वप्नाचे कारखानदार ’ समजतात व तें योग्य आहे. त्या नावाच्या निबंधात त्यानीं सर्वच ललित लेखकांची उत्तम कैफियत दिली आहे. ‘ हा कवि आहे ’ अशी आपली ओळख करून दिलेली ऐकताच प्रथम आपल्याला शरमल्यासारखे वाटले, पण पुढे विचारातीं त्या शरमेचीच शरम वाटली, असें सागून ते ललित लेखकाच्या भूमिकेविषयीं लिहितात, “ क्षणभंगुर सुखस्वप्नाचें गुंगवून टाकणारे तरल सौंदर्य ललित-

कृतींत असतेंच असतें, पण अगम्य मानवी जीवनाच्या प्रतिभेच्या प्रकाशानें सुगम्य केलेला एक जिवत खंड तिच्यात असतो. ललितकृति म्हणजे मानवी जीवनांतला जिवत धगधगीतपणा, पण त्यांतली अगम्यता नाहीं; आणि सुखस्वप्नातलें तरल सौदर्य, पण त्यातली क्षणभगुरता नाहीं! कागदाच्या कपट्यावर कायम ठसविलेलीं हीं सुखस्वप्नें आजच्याच मानवाने नव्हे, तर उद्याच्या मानवानेंही वाटेल तेव्हा मनमानेल तशीं अवलोकावीं आणि आपलें अपुरे मानवी जीवन पूर्णांशानें जगावे. उपयुक्तता हीच जर मानवी व्यवहारात अंतिम कसोटी असेल, तर ललित लेखकाला स्वतःची लाज वाटायला तर नकोच नको, पण अवनीतलावर कुठेही ताठ मान करून चालावयाचा अधिकात अधिक अधिकार त्यालाच आहे!"

## कलेचा मातब्बरी

कलाप्रेम किंवा ध्येयवाद–हींच मानवाचीं खरोखर वैशिष्टये होत. त्याचे महत्त्व सागताना काणेकर त्याच निबंधात लिहितात, " माणसात व इतर जनावरात फरक हाच, कीं इतर प्राण्याप्रमाणें माणूस खातो, पितो, औषधें घेतो, पण इतर प्राण्यापेक्षा त्याला आणखी एका गोष्टीची अत्यंत जरूर भासते आणि याचमुळे तो इतर प्राण्यापेक्षा श्रेष्ठ ठरतो. मानवी प्राण्याला केव्हा केव्हा सुखस्वप्नात रगून जावेसे वाटते."

या सुख-स्वप्नांचे महत्त्व काणेकर ' चमत्कारिक कल्पना ' या निबंधांत पुढील शब्दानीं निवेदन करतात. " चुकीची अगर बरोबर सुखस्वप्नें पहाण्याची दृष्टीच नसून आयुष्य सुखमय होण्यापेक्षा विरलेलीं का होईनात, पण दिव्य सुखस्वप्ने मनमुराद पहात आयुष्याची होळी झालेली मला परवडेल."

## जीवनाच तत्त्वज्ञान

काणेकराचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन आशावादी आहे. ' अपवादाचे उपयोग ' या निबंधात तो दृष्टिकोन माडताना ते म्हणतात, " या सुदर जगांत आपणाला मोजकेच दिवस काढावयाचे आहेत या तीव्र जाणीवेनें तें जितके कमी होत जातील तितके आपण शक्य तेवढा या

जगांतला अधिकच आनंद लुटण्याचा प्रयत्न करून आपलें परिमित आयुष्य पूर्णत्वानें जगण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

जीवनाकडे वीरवृत्तीनें पहाण्यास शिकविणारा झुंझार आशावाद काणेकरांच्या लेखनांत ओतप्रोत भरून राहिलेला आहे. 'मोठे शून्य 'मध्यें ते म्हणतात, "जीवन म्हणजे लढा; काका, मोठं जीवन म्हणजे मोठा लढा; त्या लढ्यातल्या जखमाही मोठ्या नी विजयही मोठा आणि अर्थात् त्या मोठ्या विजयाचं सुखही मोठं."

प्रगति झालेल्या मानवाला जास्त दुःखे असलीं, तरी त्याचें सुख वरच्या दर्जाचे असते, हा विचार काणेकर विनोदी पद्धतीनें मांडतात, तो असा—"दगडाला दुःख नाहीं आणि सुखही नाहीं. मागासलेल्या मानवाला सुख थोडं, पण त्याबरोबर दुःखही थोड. प्रगत मानवाला सुख मोठं आणि दुःखही मोठं. म्हणजे शेवटीं वजाबाकी शून्यच. मग प्रगति म्हणजे काय ? अर्थात् मोठं शून्य !"

जीवनाची कसोटी कोणती ? याला उत्तर काणेकर देतात, "कलेकरतां कलेचा कुणी कितीही आक्रोश करो, उपयुक्तता हीच मानवी जीवनात कुठल्याही गोष्टीची अंतिम कसोटी होय."

आणखी एका निबंधात ते म्हणतात, "माणसाच्या जीवापुढे मला तरी नाहीं खऱ्याची किंमत अधिक वाटत ! खरे काय किंवा खोटें काय, त्याची खरी योग्यता जीवनाच्या कसोटीवरच ठरवायची."

## विचाराचा समतोलपणा

काहीं अहंकारी माणसाना स्वतःचीं दुःखे पाल्हाळानें सागून लोकाचें कपाळ उठविण्याची खोड असते. त्याच्याबद्दलचा आपला तिटकारा काणेकर किती तीव्र भाषेनें व्यक्त करतात, पहा. "प्लेगचा फैलाव करणाऱ्या उंदराचा ज्याप्रमाणे मिळेल तेथें पकडून आपण नायनाट करतो, त्याप्रमाणें सर्व जगभर दुःख पसरविणाऱ्या या लोकाचा काहींतरी निकाल लावला पाहिजे, असे माझे प्रामाणिक मत आहे." जगाच्या काळजीनें सदासर्वदा सुतकी चेहरा धारण करणाऱ्याचाहि असाच खरपूस समाचार

काणेकरानीं घेतला आहे त्यांना एका कोंडवाड्यात कोडावें अशी विनोदी सूचनाहि त्यानीं केली आहे. पण सर्वसामान्य पहाता, काणेकर हे केव्हांहि आपले विचार दोन्ही बाजू नीट समजावून घेऊन, मगच माडतात. ते समतोलपणाने म्हणतात, " ही एकातिक गोष्ट झाली आणि स्वतःच्या दुःखाचे बाध प्रियजनासमोर मोकळे सोडले म्हणजे खूप हलकें वाटतें हेही खरें आहे. पण म्हणून उठल्यासुटल्या ' स्वत.च्या दुःखाचा मोबदला देऊन दुसऱ्याची सहानुभूति विकत घेण्याचा व्यापार ' करणें केव्हांहि [illegible] टरणार नाहीं ! "

आपलें जीवन सफल व सुखी करण्याची गुरुकिल्ली कोणती ? हे सागताना काणेकरानी मार्मिक विचार प्रगट केले आहेत. ' दुसऱ्याच्या डोळ्यानीं पहाण्याची सवय ' या निबंधांत ते लिहितात. ' आपली किती तरी भाडणे अशाच प्रकारचीं असतात. दुसऱ्याची भूमिकाच समजून न घेतांच आपण बोलतों आणि केव्हां केव्हा याचा परिणाम परस्पराच्या अत.करणात निष्कारण कडूपणा उत्पन्न करण्यात होतो. मला वाटतें, दुसऱ्याच्या डोळ्यानीं पाहण्याची थोडीशी तरी सवय आपण प्रत्येकाने लावून घेतली पाहिजे. " वेदातांतील आत्मौपम्यबुद्धीचा उलगडा किती सोप्या शब्दानीं येथे केलेला आहे आणि हेंच लघुनिबधाचे विशिष्ट कार्य. लघुनिबंध हा मित्राप्रमाणे गहन तत्त्व सहज बोलता बोलता समजावून देतो.

प्रसिद्धिची अवास्तव हाव असलेलीं माणसे आपण पहातो. पण मुळात प्रसिद्धी काहीं वाईट नाहीं हें तत्त्व ' प्रसिद्धि आणि प्रसिद्धि ' या निबंधात त्यानीं गमतीने पटविले आहे आणि शेवटीं सागितले आहे, " प्रसिद्धि—लोलुपता ही गोष्ट वाईट आहे, अस कुणीतरी म्हणतो. त्यांतली लोलुपता लुप्त होते आणि प्रसिद्धीच वाईट आहे, असं प्रत्येक जण म्हणूं लागतो. लोलुपता प्रसिद्धिचीच का, कुठल्याही गोष्टीची वाईट आहे. "

मनुष्य—स्वभावाची अचूक परीक्षा करून त्याचीं एकेक लक्षणे काणेकर सागतात आणि मनांतील कोणता गुंता किंवा गड काढून टाकला तर सुख लागेल हेंहि मानसशास्त्रज्ञाप्रमाणें निवेदन करतात. " माझा स्वभाव असा

आहे !" या निबंधात ते म्हणतात, "प्रत्येक मनुष्य आपल्याभोंवतीं काहींतरी नसत्या गुणाच्या चिनी भिंती उभारीत असावा. आपणात नाहीं तें आहे, असे भासविण्याचा हा मनुष्यस्वभाव म्हणजे आत्मसंरक्षणाचें एक मनोमय चिलखत !"

## सहानुभूतीचा दृष्टिकोन

इतराच्या दोषाची कारण-मीमासा करण्यास व त्या दोषाकडे सहानुभूतीनें पहाण्यास शिकविण्यास, काणेकराचे निबंध समर्थ आहेत. 'काहीं उपयोगी प्राणी' या निबधात ते कुत्सित टीकाकाराविषयीं असे उद्गार काढतात, "अंधपणाचें, बहिरेपणाचे किंवा असेच दुसरे एखादे शारिरिक व्यग असलेला दुःखीकष्टी मनुष्य ज्याप्रमाणे जगावर नेहमीं कातावतो आणि त्याच्या तोंडातून अकारण कटु शब्द बाहेर पडतात, त्याचप्रमाणे वाङ्मयातील विशुद्ध आनंद चाखण्याचे ज्याला इद्रियच नाहीं, अशा माणसाच्या लेखणींतून कुत्सापूर्ण विषारी शब्द बाहेर पडतात. मग अशा प्राण्यावर गहजब करावयाचा कीं त्याची कींव करावयाची ?"

एकादा थापाड्या भेटला, तरी काणेकर त्याच्या स्वभावावर आपल्या मानसशास्त्राचा शोधक प्रकाश पाडतील व त्याच्या थापाडेपणाची मीमासा अशी करतील, "प्रत्येक मनुष्याच्या डोळ्यासमोर त्याच्या अगदीं जिव्हाळ्याचे असे काहीं तरी एक ध्येय असते; आणि बहुधा ते साधणे शक्य नसतें. तेव्हा तें साधल्यानतर जो आनंद मिळणार असतो तो उपभोगण्याकरिता सत्यसृष्टींत ते साधत नाहीं तर नाहीं, निदान कल्पनासृष्टींत तें साधावे, आणि खरोखरीच सत्यसृष्टींत तें साधले आहे असे लोकाना सागून तो लोभनीय आनंद उपभोगावा, हाच निरागस हेतु थाप मारणाऱ्याचा असतो."

## मनुष्य-स्वभावाचें ज्ञान

मानवी ज्ञानाची मर्यादा ओळखण्याइतकी विवेचकता बऱ्याच कविजनामध्यें नसते; पण काणेकराच्या विवेकाचा ताजवा सदैव अचूक वजन

दाखवितो. ‘ प्रत्येकाचें वेड’मध्यें ते म्हणतात, “ मानवी जीवन अजूनही इतकें अगाध आणि अगम्य आहे, कीं कुणाही एका व्यक्तीच्या इवल्याशा शहाणपणाची–किंवा वैयाक्तिक वेडाची म्हणा पाहिजे तर–मोडकी किल्ली लावून जगाचे अफाट कोडे उलगड्याचा प्रयत्न करणें केव्हांही हास्यास्पदच ठरणार. ”

मनुष्यस्वभावाचे ज्ञान काणेकरांना सखोल आहे हे खरे, तथापि तें ज्ञानहि किती अपुरें आहे, याची जाणीव त्यांना आहे. ‘ मुखवटे’मध्यें ते प्राजलपणें म्हणतात, “ खरोखरच माणूस म्हणजे विवेकशक्तीचा अंगरखा चढविलेलें जनावरच नाहीं तर काय ? हा अंगरखा जरा कुठें फाटला किंवा तुटला, कीं नुसतें जनावर दिसूं लागतें. भिन्न भिन्न स्वभावांचे चित्रविचित्र मुखवटे घालून निरनिराळीं माणसें फिरतात, पण त्या मुखवट्याच्या आत दडलेल्या खऱ्या मनुष्यस्वभावाचा थांग कधीं कुणाला लागला आहे ? ”

भौतिक सुधारणांना सामोरे जाणारे काणेकर असले, तरी त्याच्या अतिरेकामुळे मानवाची मानसिक कुचंबणा होत आहे, हें जाणण्याइतकी त्याची विचार–शक्ति समतोल आहे. ‘ गर्दी’मध्ये ते लिहितात, ‘विसाव्या शतकातला सुशिक्षित मनुष्य अत्यंत आत्मनिष्ठ झाला आहे. पैसा, पदवी, प्रतिष्ठा, पाडित्य, इत्यादिकाच्या संगमरवरी भिंती उभारून आपण एका गंधर्वनगरींतल्या राजवाड्यात रहात आहों, अशा भ्रमात तो अधिक-अधिक समाजविन्मुख होत चालला आहे ! ’

व्यापक दृष्टिकोन का हवा ? याचे उत्तर एका घरगुती दाखल्यानें काणेकर देतात. ‘ जगाशीं संबंध ’ या निबंधांत ते असा सिद्धात माडतात, “ व्यवहारवादापुरती मनुष्याने कितीही सकुचित दृष्टी ठेवली, तरी जगाचा आणि आपला किती जिव्हाळ्याचा संबंध आहे, ही गोष्ट त्यानें विसरून जाता कामा नये. कळत अगर नकळत आपण जगाशीं संबंध ठेवतो. कळत अगर नकळत आपणाला जग हवें आहे. ”

हा सिद्धांत पटविण्यासाठीं ते असा दृष्टांत देतात कीं, “ कप झेकोस्लोव्हाकियाचा झाला, चहांतली साखर जावा किंवा मॉरिशस् बेटांतली,

मी दार्जिलिंग चहा वापरतों, तेव्हां चहाची पावडर दार्जिलिंगची. तो दुधाचा ‘ जग ’ आहे तो मेड इन् चायना—चीनमधला. काय—एक कप चहा पिताना जगाच्या किती भागाशीं तुझा संबंध आला ? ”

## समाजवादाचा पुरस्कार

समाजवादानेंच सर्व मानवाना खरे स्वातन्त्र्य लाभेल व त्याची प्रगति होईल, असा काणेकराचा ठाम सिद्धात आहे. म्हणून ‘ मनाचे पिंजरे ’ या निबंधात ते सागतात, “ परिस्थितीचे पिंजरे तोडून टाकल्याशिवाय मानवाची मुक्ति होत नाहीं म्हणतात. सामाजिक, आर्थिक, राजकीय, हरएक तऱ्हेच्या पिंजऱ्यांत मानवी व्यक्तित्व खुरटत चालल आहे, आणि हे पिंजरे ताबडतोब तोडून फोडून टाकले पाहिजेत.”

समाजवादाची शास्त्रशुद्ध भूमिका काणेकरानीं अनेक लघुनिबंधांत माडली आहे. ‘ एकाला जे अमृत, ते दुसऱ्याला विष ’यात ते लिहितात, “ सर्व उत्पादनाच्या आणि समाजहिताच्या साधनावर जोंपर्यंत सर्व समाजाची सत्ता नाहीं, आणि चढाओढीचें जीवन हेंच समाजाला शातिप्रद आणि हितावह आहे असें जोपर्यंत स्वतःला मानवतेचे मित्र म्हणविणारे, पण खरोखर बुद्धिवान् बदमाष असलेले समाजाचे नेते म्हणत आहेत, तोपर्यंत असले हे प्रकार चालावयाचेच.”

‘ बुद्धीला पटतें पण मनाला कसेंसेच वाटतें ’ या निबंधांत ते प्रतिपादतात, “ सारा समाजच जोपर्यंत मालकी हक्कावर उभारला आहे, तोंपर्यंत ही प्रवृत्ती उघड अगर थोडीबहुत प्रच्छन्न राहणारच; आणि एखाद्या प्रामाणिक माणसाच्या बुद्धीला कितीही पटलें, तरी या प्रवृत्तीला विरोधक अशी एखादी गोष्ट घडताच त्या साऱ्या प्रचंड ढिगातून हा निखारा धगधगणारच. मानवी संस्कृतीचा आणि सुधारणेचा इतिहास म्हणजे मनुष्याच्या बुद्धीचा उत्तरोत्तर विकास, आणि या बुद्धिमत्तेच्या प्रकाशांत सहज प्रवृत्तीचें नियंत्रण आणि शुद्धीकरण ! ”

## चित्तवेधक आविष्कार

हें समाजवादी तत्त्वज्ञान सुबोध व चटकदार करून माडणें हेच लघु-निबंधकाराचें कसब. तें काणेकराच्या अंगीं चागले आहे. ‘ दुसऱ्याच्या डोळ्यानीं पाहण्याची सवय ’ या निबंधात त्यांनीं पुढील दृष्टात दिला आहे. “ वाघाच्या आणि बकऱ्याच्या धडपडींत बकऱ्याने ‘ प्राण वांचवा,’ म्हणून आक्रोश केला असता, आमचे सुवर्णमध्यवादी म्हणणार कीं, “ थाबा ! बकऱ्याची बाजू समजली, आता वाघाची बाजू काय आहे ती आपण शातपणे समजावून घेतली पाहिजे ! आणि मगच काय करावयाचें तें ठरविले पाहिजे.”

याहिपेक्षा अधिक आकर्षकतेने हाच विचार काणेकरांनीं अधिक ठसठशीतपणें माडला आहे. ‘ निःपक्षपाती मतें ’ या निबंधात त्यानीं समाजातील तीन वर्गांचें जितकें मार्मिक शब्द-चित्र रेखाटलें आहे, तितकेच मर्मभेदक प्रहार, समान त्याग करावयास सांगण्याऱ्या प्रचारकावर केले आहेत. एका व्यंग–चित्राचें स्वरूप सागताना काणेकर लिहितात,

“ एक काळाकभिन्न पाण्याचा डोह काढला होता, आणि त्याला ‘ दुर्दशा ’ असे नाव दिले होतें त्या डोहात एक शिडी असून तिच्या बऱ्याचशा खालच्या पायऱ्या डोहाच्या पाण्यात बुडालेल्या होत्या. शिडीच्या अगदीं तळाला एक मजूर उभा असून त्याच्या शरीराचा सर्व भाग पाण्यात बुडालेला आणि फक्त डोके तेवढे पाण्याच्या बाहेर होते. त्या मजुराच्या वर एक मध्यमवर्गीय मनुष्य उभा असून. त्याच्याही वर शिडीच्या वरच्या टोंकाला धरून एक गलेलठ्ठ श्रीमत मनुष्य उभा होता. ” या तिघांनाहि एक उपदेशक सागत होता, “ बाळानो, सर्व जग दुर्दशेच्या तडाख्यांत सांपडले आहे. तेव्हा...तुम्ही प्रत्येकानें फक्त एकच पायरी खालीं उतरावी. ” पण या “ समान स्वार्थत्यागाचा ” परिणाम काय झाला ? तर श्रीमंत वरच्यावर सुरक्षित राहिला, मध्यमवर्गीयाचे पाय पाण्यांत बुडाले आणि गरीब मात्र पाण्यांत पार बुडून मेला ! सौम्य भाषेनें किती तीक्ष्ण टीका आहे ही ! गोड गोष्टींतून तिखट उपदेश करण्याचे असें कार्य लघुनिबंधच करूं शकतो.

## कौशल्याचा पुरावा

कला व प्रचार याचा असा बेमालूम मेळ घालण्याच्या कौशल्याचा कळस काणेकरानीं आपल्या ' दोन मेणबत्त्या ' या निबंधात केला आहे. " स्वतःसाठीं जगलास तर मेलास, दुसऱ्यासाठीं जगलास तरच जगलास " हें सामाजिक जीवनाचे तत्त्व या निबंधात माडले आहे, पण किती खुबीनें ? इन्कम टॅक्सच्या काळजीनें झोप उडालेला एक श्रीमत आणि डोळे खोल गेलेला व बोटभर दाढी वाढलेला एक कंगाल मजूर-नेता-या दोन मित्रांच्या वृत्तींतील स्वार्थी व परार्थी जीवनातील अंतर दाखवून. आणि त्या अतरावर प्रकाश पाडण्यासाठीं दोन मेणबत्त्याचा इतिहास सागितला आहे. घरीं गेल्यावर लेखक फळीवरल्या मेणबत्त्या शोधू लागतो. तेव्हा—" एक मेणबत्ती सबध जळून गेलेली होती. मेणबत्ती अशी क्वचितच जळते. तिचें अस्तित्व दाखविण्यापुरता फक्त पैशाएवढा मेणाचा अवशेष शिल्लक होता. दुसरी मेणबत्ती कित्येक दिवस फळीवर धूळ खात पडल्यामुळे मुंग्या-झुरळानीं ती सबध कुरतडून अजीबात निरुपयोगी केली होती. तशा स्थितींत पडलेल्या त्या दोन मेणबत्त्या पाहून का कुणास ठाऊक, मला थोडेसे हसू आलें आणि दुसऱ्या क्षणीं एक चमत्कारिक विचार माझ्या डोक्यात आला. ज्या दोन माणसाचा मी विचार करीत होतो तीं दोन माणसें या दोन मेणबत्त्यासारखीं आहेत ! आपला जीव निर्धोक ठेवण्यात स्वतःच्या सुखाची राखण करण्यात गुंतून पडलेल्या एकाचे आयुष्य कुरतडलें जात आहे आणि इतराना मंद, सुखकर प्रकाश देत दुसऱ्याची जीवनज्योत जळत चालली आहे. "

हा लघुनिबंध इतका परिणामकारक झाला आहे कीं, त्याच नावाचा व त्याच विषयावरचा एक निबंध खांडेकरानीं लिहिला आहे. दुसऱ्या मेणबत्तीला संधि मिळाली नाहीं म्हणून तिचें जीवन फुकट गेलें, असें उत्तरहि खांडेकरांनीं आपल्या निबंधात दिलें आहे. आणि तेंच काणेकरांच्या निबंधाचें यश ! हाच विचार वाचकाच्या चित्तात उत्पन्न व्हावा हा त्यांच्या लेखनाचा हेतु—आणि तो सफल झाला. समाजात गुणाच्या

विकासाला व विकसित गुणांच्या वापराला संधि मिळत नाहीं, हेंच सध्याच्या समाज-रचनेतील मोठे वैगुण्य आहे. तें काणेकरांनीं मोठ्या कौशल्याने पुढें माडलें, हे खाडेकराच्या पुरवणीनें सिद्धच केलें !

## भाषेची सहजता

लघुनिबंधाला साजेशी सोपी व खोचदार भाषा काणेकराची आहे. मधूनमधून कोठे सवाद, कोठे गोष्ट घालून ते आपला निबध अधिकच चटकदार करतात. कथा-कादबरीची भाषा ते कशी वापरतात, पहा. "मुलं कसलीं ? नष्ट कारटीं आहेत अगदीं ! गावाचीं आडदाड. सगळं घर घेतात डोक्यावर. नाही तर तुमचीं मुलं. किती शांत, गरीब. घरचं वळणच मुळीं तसं ! "

' घड्याळाचे गुलाम ' या निबधाचा शेवट किती खेळकर भाषेनें केला आहे, " नाहीं तर आपण आपले जातो आहोंत रोज वेळच्या वेळीं, आणि लोक लावताहेत आपली घड्याळे आमच्या जाण्यायेण्यावर !"

गणूकाका आता रागावणार हे कळताच कुतूहलाने आपली अवस्था कशी झाली, याचे शब्द-चित्र काणेकरानीं असे रेखाटले आहे, " आता वीस वर्षांनीं आपणाला एक भयकर, रोमहर्षक दृश्य पाहावयास मिळणार, म्हणून मीं श्वास कोंडून धरून वाट पाहात उभा राहिलो. "

## उपरोधाचें शस्त्र

उपरोधिक लिहून विनोद निर्माण करण्यात काणेकराचा हातखडा आहे. ' जगाशीं सबंध ' मध्ये ते सागतात, " आलिकडे अलिकडे मला जिरवणें, हा गणूकाकाचा व्यवसाय झाला आहे. मी जिरलो आणि माझा चेहरा गोरामोरा झाला म्हणजे गणूकाकाना अपरपार आनद होतो ! काल असेंच झाले. गणूकाकाबरोबर मी बोलत बसलो होतो. मी अगदीं बोलण्याच्या रंगात आलो होतो, "...मानवजातीच्या हिताकरिता सध्याची विषम समाजपद्धति आमूलाग्र बदललीच पाहिजे......" मी एखाद्या पुढाऱ्यासारखा किंवा दारुड्यासारखा बोलत होतों. "

याच उपरोधाच्या अतर्गोल आरशामध्ये आळस हा गुणासारखा दिसूं लागतो. आळसाची कैफियत देताना काणेकर लिहितात, " खऱ्या प्रतिभा-संपन्न लेखकाला खरोखरच आठ आठ दिवस विचार करीत तडफडावें लागते, तेव्हाच त्याच्या हातून एखादा सुंदर आणि अद्वितीय प्रवेश लिहिला जातो. तो जेव्हा एकदोन तासात काहीं तरी कागदावर लिहून काढीत असे; तेव्हा हे लोक त्याला उद्योगी समजत. उघडच आहे, कारण लिहिण्यामध्ये शारीरिक हालचाल होत असे. म्हणून तो उद्योग ! आणि मेंदूची हालचाल म्हणजे आळस ! " आळस म्हणजे चिंतन हे काणेकरांचें समीकरण किती आळशाच्या बाबतींत खरे ठरते ? अपवादाचें कौतुक करून विनोद पिकविणें हाच त्याचा हेतु.

उपरोधाची कमाल ' पुरुषाचा स्वभाव ' या निबधात काणेकरांनीं केली आहे. सनातनी लोकावर टीका करताना नवमतवादी काणेकराच्या लेखणीला सहजच स्फुरण चढते. ती लेखणी पुढील जहरी टीका करते. " पुरुषाइतकाच गाठोडीं उचलण्याचा हक्क स्त्रीजातीला देण्याकरितां गाठोडीं वगैरे दरवाजापासून प्लॅटफॉर्मपर्यंत ते कार्कूनाच न्यावयाला लावतात. बाकी आम्ही नवे लोक या बाबतीत ढिले खरे ! तत्त्वनिष्ठा आणि अर्थप्राप्ति याचा सुदर मिलाफ करणें शिकावयाचे असल्यास हे जुने लोकच आदर्श होत ! स्त्रियाना समान हक्क देऊनच्या देऊन त्यावर आणखी हमालाला द्यावयाच्या एका आण्याची ते बचत करतात. "

## विनोदाचीं साधनें

अतिशयोक्ति करून प्रतिपक्षाची टर उडविण्यात काणेकरांची लेखणी तरबेज आहे. ' नाट्य मन्वंतर 'चे हे संस्थापक साहजिकच पुराणमतवाद्यावर घसरतात व म्हणतात, " कुलीन स्त्रियांनीं रंगभूमीवर कामे करावीं, हीं मतें जर समाजात प्रसृत झालीं, तर प्रत्येक कुलीन स्त्रीला गंचाडी धरून रंगभूमीवर खेचण्यात येईल, या भीतीनें या लोकांच्या पोटात गोळा येतो, आणि आपल्या दीन, कुलीन बायकोचा " हे चांडाळ मला रंगभूमीवर ओढून नेत आहेत, मला वांचवा हो ! " असा आर्त, करुण स्वर याच्या कानांत घुमूं लागतो ! "

अशीच अमर्याद अतिशयोक्ति करून काणेकर "व्यवस्थितपणाचें वेड" चेष्टेचा विषय करतात व म्हणतात, " एखाद्या दिवशीं सूर्य जर किंचित् एका बाजूला कललेला या लोकाना दिसला, तर आकाशांत उडी मारून त्याला जागच्या जागीं ठेवण्याचा प्रयत्न करावयालासुद्धां हे लोक कमी करणार नाहींत ! "

निर्भेळ विनोद निर्माण करण्यातहि काणेकर यशस्वी आहेत. ' मनाचे पिंजरे ' या निबंधात ते सुरवातीलाच सांगतात, " मी दोन रुपयांना एक छत्री विकत घेतली. हो, हो, दोन रुपयाना छत्री. " दहाबारा रुपये छत्रीची किंमत बाजारात असतांना दोन रुपयाना तुम्ही कसली छत्री घेतली व ती कशाला ? असे प्रश्न कोणी करील तर काणेकर उत्तर देतात.

" छत्री घेण्यात आपला खरा उद्देश, ' का हो भिजतसे चाललांत ? छत्री नाहीं वाटतं ? ' अस कोणी विचारूं नये, किंवा भिजत चाललेल्याकडे इतर लोक, 'कोण वेडा हा !' अशा अर्थान टकमक पाहतात, तसं—अर्थात् ते स्वतः छत्री असूनही भिजतच असतात,—आपणाकडे कुणी पाहूं नये, हाच असतो. " हा आपला ' शोध ' वाचकाच्या मनावर ठसविण्यासाठीं काणेकरानीं गमतीचा हिशेब मांडला आहे. चार महिन्यांच्या पावसाळ्यात पाऊस पडतो निम्म्या काळात. त्याचा अर्धा भाग रात्रीचा जातो, त्याचा अर्धा वेळ आपण घरातच असतो आणि आपण पंधरा दिवस बाहेर पडलो, तरी जोराचा पाऊस चार वेळाच येतो, असा आयुष्याचा जमाखर्च देणारा ' हरिदासी ' हिशेब करून काणेकर विनोदाने म्हणतात, "चार महिन्यातून केवळ चार वेळा छत्रीचा आपणाला उपयोग होतो आणि इतक्या जोराच्या पावसांत आपण छत्री असूनही भिजतोच ! आणि तरीहि आपण वाटेल ती किंमत देऊन छत्री विकत घ्यायची यातायात काय करतो, ती हरवल्यावर सुस्कारे काय सोडतो, ती उडाल्यावर तिच्यामागून चिखलपाण्यातून वेड्यासारखे धांवतो काय आणि ती उलटी झाल्यावर भररस्त्यात वेड्या-वाकड्या उड्या काय मारतों ! छे, छे, पुढल्या वर्षापासून—

" छत्री छप्पर मुर्दाबाद ! "

अशा खुसखुशीत विनोदाने खमंग झालेले, खोंचदार भाषेनें चटका लावणारे आणि सहानुभूतीची दृष्टि व समाजवादाची दीक्षा देणारे काणेकराचे छोटेछोटे निबंध हे वाचकाच्या मनातील गाठी व अढी यांचीं कोळिष्टकें व जळमटे झाडून टाकतात आणि आशेचा, धैर्याचा व आनंदाचा झगझगीत प्रकाश पाडतात.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) काणेकराच्या लघुनिबंधाचे वैशिष्टय कोणते ? 'काणेकराच्या रुचिर व्यक्तित्वाचीं प्रतिबिंबें म्हणजे त्याचे लघुनिबंध,' हें रुचिर व्यक्तित्व कसें तयार झाले ?

( २ ) काणेकरानीं चौफेर वाङ्मय-निर्मिति केली ही गोष्ट त्याच्या लेखन-कार्याची माहिती देऊन सिद्ध करा

( ३ ) काणेकराचे जीवन व तत्त्वज्ञान आशावादी आहे, हें त्याच्या कोणत्या निबंधावरून दिसून येते ?

( ४ ) समाजवाद म्हणजे काय ? काणेकरानी आपल्या निबंधातून समाजवादाचा पुरस्कार केला आहे, हें खरें का ?

( ५ ) निःपक्षपाती मते, दोन मेणबत्त्या, व्यवस्थितपणाचें वेड, सुखस्वप्नांचे कारखानदार—या लघुनिबंधातील मध्यवर्ती कल्पना लिहा.

## डॉ. दांडेकर • ४

"सृष्टिसौंदर्याइतकाच सामाजिक प्रगतीशीं समरस होणारा एक मोठा दिलखुलास दोस्तच " अशी ओळख श्री. खाडेकरांनीं डॉ. दांडेकराची एके ठिकाणीं करून दिलेली आहे. दाडेकराच्या लघुनिबंधांत " प्रसन्न भाषेच्या द्वारें लेखकाचें जे व्यक्तित्व प्रकट होते, ते जितके वैचित्र्यपूर्ण तितकेच आकर्षक आहे. " अशीहि ग्वाही खाडेकरानीं दिलेली आहे. दाडेकर हे बडोद्याचे, महाराष्ट्र–गुजरातच्या सीमेवर रहाणारे. त्यामुळे त्यांचे शिक्षण गुजरातींतून झाले. पुढेंहि त्यानी गुजराती साहित्याचा व्यासंग वाढता टेवला. 'निवृत्ति–विनोद' या श्री. त्रिवेदी याच्या गुजराती ग्रंथाचे भाषातरहि त्यानीं केले आहे. मराठी, गुजराती, इंग्रजी व



संस्कृत या चार भाषात ते पारंगत आहेत. या बहुरंगी विद्वत्तेला चौरस प्रवासाचीहि जोड त्यानीं दिली आहे. शिवाय लालित्यात रमण्याची त्याची वृत्ति आहे. या सर्व गुणाच्या परिपाकानें त्याचें जें आल्हादक व्यक्तित्व निर्माण झालें, त्याचे प्रतिबिंब त्याच्या लघुनिबंधामध्ये पहावयास सांपडतें.

## विद्याभ्यास व ग्रंथलेखन

श्री. विश्वनाथ पाडुरंग दाडेकर यांचा जन्म १९०५ सालीं उत्तर गुजरातेंत म्हैसाणा येथें झाला. ते अठरा महिन्याचे असतांनाच त्याचे वडील वारले आणि सोळावे वर्षीं त्याना मातृ-वियोग घडला. वयाचे बारावे वर्षीं ते बडोद्यास शिक्षणासाठीं गेले. तेथे इग्रजी तिसऱ्या यत्तेंत त्यानीं आपलें नाव घातले. काठेवाडात व पुणे येथेहि त्याना शिक्षणासाठीं जावे लागलें. १९२३ सालीं ते मॅट्रिक झाले. मॅट्रिकमध्यें असतानाच त्यानीं 'सीमंतिनी' नावाचें नाटक लिहिलें. नतर ते अहमदाबाद येथील कॉलेजांत गेले. कॉलेजात त्यानीं इग्रजींतील नाटक–कादबऱ्याचा भरपूर आस्वाद घेतला. 'निर्मल प्रेम' नावाचे एक नाटकहिं लिहिले. एक वर्षानें ते बडोदे येथील कॉलेजात गेले. तेथे असताना 'चारित्र्य-सुधा' नावाची कादबरी त्यानीं लिहिली १९२७ सालीं ते बी. ए. झाले. 'आजच्या कळया' हा त्याचा कथासंग्रहहि याच वेळेस प्रसिद्ध झाला.

## वाङ्मयविषयक दृष्टि

एक पदवी व चार पुस्तकें गांठीं लावून दाडेकर पुणें येथे आले. तेथें लेडी ठाकरसी याचेकडे शिक्षक म्हणून त्यांनीं अडीच वर्षे काम केलें. १९३० सालीं ते एम्. ए. झाले–आणि बडोद्याच्या कॉलेजात प्राध्यापकाच्या खुर्चीवर जाऊन बसले. पुढें मराठींतील सामाजिक नाटकावर एक प्रबंध लिहून, पीएच्. डी. ही पदवी मिळवून ते डॉक्टर झाले. बडोदें येथील 'सहविचार या नियतकालिकाचे संपादक म्हणून त्यानीं काम केलें. १९३२ सालीं त्यानीं "केळकराचीं ६ नाटकें" हा टीकाग्रथ लिहिला. त्यामुळें त्याना विशेष प्रासिद्धि मिळाली. 'फेरफटका' हा त्यांचा लघुनिबंध-संग्रह १९३६ सालीं प्रकाशित झाला. त्याचे 'प्रत्येक पान न् पान लेखकाच्या रसिक बुद्धिमत्तेच्या सुवासानें दरवळते आहे' अशी प्रशस्ती आचार्य अत्रे यानीं केली. ललित वाङ्मयाकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन काय आहे हें सागताना प्रा. दाडेकर म्हणतात, "ललित वाङ्मय हें हेमगर्भाच्या मात्रेप्रमाणें तात्काळ गुणकारी किंवा च्यवनप्राशाप्रमाणें

शक्तीची वाढ करणारें नसून डाळिंबाच्या सरबताप्रमाणें मनाला शातवून ताजेतवाने करणारें आहे" मराठी नाट्य-सृष्टीवरील त्यांचीं पुस्तकेंहि सहृदय टीकेचे नमुने आहेत. "मराठी साहित्याची रूपरेषा" हा त्याचा मोठा ग्रथ १९५२ सालीं प्रसिद्ध झाला. त्यात इ. स. ९८३ ते १९५० पर्यंतच्या ललित साहित्याचा धावता आढावा घेतलेला आहे. त्यातहि त्याची रसिकता व मार्मिकता दिसून येते. या त्याच्या गुणाना स्वच्छदानें क्रीडा करावयास मिळते लघुनिबधात. त्या निबंधाचे चार संग्रह आतापर्यंत प्रसिद्ध झाले आहेत.

## आनंदी व आशावादी

एका रसिक, बहुश्रुत व सौंदर्य-लुब्ध अशा लेखकाची मूर्ति दाडेकराच्या सर्व लघुनिबधामधून वाचकाच्या डोळयापुढें उभी राहते. त्याची आयुष्याकडे पाहण्याची दृष्टि आनदी, आशावादी व प्रवृत्तिपर आहे आणि जगाकडे पाहण्याची दृष्टि सहानुभूतीची, समतेची व खेळकरपणाची आहे. त्यामुळे त्याचे निबध प्रो. फडके याच्या परपरेंत शोभतात. त्याच्या लेखनात नवमतवाद दिसत असला, तरी प्रा. काणेकराइतका तो सखोल, शास्त्रीय व समाजवादी असा नाहीं. इंग्रज कवि टेनिसन् याने रंगविलेल्या "कमल-भक्षी ( Lotus-Eaters ) तरुणा"चा सप्रदाय फडके-दाडेकर वाढवीत असतात. अर्थात् फडक्याच्या तुलनेनें दाडेकराची कल्पकता कोमट, विचार फिके व विनोद सपक असतो. पण आळसाची, विश्रातीची, विलासाची व स्वैरपणाची काय मौज आहे हें सा।णारें त्या दोघाचें 'तत्त्वज्ञान' आहे. खरे पाहता, तत्त्वज्ञान, ध्येयवाद, नीतिनिर्बंध इत्यादि शब्दच त्याना बावडे वाटतात. 'मागें फिरून पाहिले असता' या आपल्या निबधाचे अखेरीस दाडेकर खेळाडूपणानें म्हणतात, "येथे नकळत व अकारण मी तत्त्वज्ञानाच्या प्रातात ढवळाढवळ करूं लागलों असें आपणास वाटत असेल, तर ही पहा ठेवली लेखणी खालीं."

## जीवनाचें तत्त्वज्ञान

पण जें कांहीं 'तत्त्वज्ञान' म्हणून ते लघुनिबंधात माडतात, त्याचें सूत्र

'जगण्यात मौज आहे' हें आहे. हे जगणे म्हणजे केवळ 'खाना पीना और मजा मारना' असें स्वार्थी व भौतिक सुखापुरतेंच मर्यादित आहे, असें ते मानींत नाहींत. आपल्या तत्त्वज्ञानाचीं लक्षणें दाडेकरानीं स्वतःच 'जगण्यात मौज आहे' या निबधात विस्ताराने सागितलीं आहेत. ते लिहितात, "माझ्या अल्प समजुतीप्रमाणें काहीं विशिष्ट जीवनविषयक तत्त्वज्ञान मी माझ्या लघुनिबंधातून प्रतिपादन करीत असतों. मात्र तें जड वाटू नये म्हणून त्याची माडणी खेळकर शैलींत केलेली असते. मनुष्याचें ज्ञान वाढत आहे; जगाची प्रगति सतत होते आहे; मनुष्याच्या सुखसाधनात प्रत्यहीं भरच पडत आहे; मानवी जीवन अधिकाधिक विशाल, सुखी, संपूर्ण, संस्कारी बनते आहे; जगाच्या प्रगतीबरोबरच मनुष्याचें सुखहि यापुढें वाढणार आहे; पण आहे त्या परिस्थितींतही एकदरींत पाहताना जगण्यात मौज आहे; मात्र जगात वावरताना मनुष्यानें रसिकतेनें व खिलाड्‌ वृत्तीनें वागायला हवे. जगाच्या प्रगतीकडे पाहात असताना ते नश्वर नसून शाश्वत आहे, त्यात मौज आहे असे ठरतें."

दाडेकराचा असा ठाम विश्वास आहे कीं, जगाची कूच प्रगतीकडे चालू आहे, त्याचा विकास होत आहे, तें सुधारणेच्या मार्गावर पुढें आणि पुढेच जात आहे. तो आपला विश्वास ते पुढील शब्दानीं प्रगट करतात, " जग अधिक सुखी, अधिक निरोगी, अधिक संपन्न, अधिक समतायुक्त होत चालले आहे हें एक असून, त्याला अधिकाधिक चागले बनविण्याचा प्रयत्न शास्त्रज्ञ व समाजसेवक करीत आहेत हें दुसरें होय. असल्या प्रयत्नात ज्यानीं अशतः तरी भाग घेतला असेल, त्याना जगण्यात मौज वाटल्याखेरीज कधींच राहणार नाहीं."

## सुखाचा मार्ग

संसार हा सुखदुःखमिश्रित आहे हें तत्त्व पटविण्यासाठीं ते असा दाखला देतात कीं, "आपला संसार हा द्राक्षाप्रमाणें निव्वळ गोड किंवा चिंचेप्रमाणें निव्वळ आबट नसून बोराप्रमाणे आंबट-गोड असा आहे. द्राक्षें पुष्कळ खाववणार नाहींत, चिंच पुष्कळ खाववणार नाहीं,

परतु बोराचे तसें नाहीं. आपल्या ससाराचेहि असेंच आहे. दुःखामुळेच त्याची गोडी काहीं और बनली आहे." अशा छायाप्रकाशाच्या, चढ-उताराच्या मार्गानेंच आपल्याला आपल्या आयुष्याचा गाडा न्यावयाचा आहे. तो कोणत्या वृत्तीनें न्यावा हे सागताना, 'नियमितपणा'त ते सागतात, "मला सागावयाचे ते हे कीं, असली ऐट न दाखविता आलेल्या प्रसगातून शक्य तेवढा आनद, शक्य तेवढा फायदा, शक्य तितकें काव्य, हीं उपभोगावींत. आयुष्याची दिशा बदलावी लागली तर ती आनंदाने बदलावी. नदी नाहीं का वळणावळणानें वहात जात? मग आपल्याहि आयुष्यात वळणे लागलीं म्हणून काय झाले? उलट आयुष्याचें सौंदर्य वाढेलच त्यानें. क्वचित् एखाद्या वळणावर बाबूचें बन लागेल आणि तिथले संगीत ऐकून आपणालाच थाबावेंसे वाटेल. क्वचित् फळाफुलानीं बहरलेल्या वृक्षाना वळसा घालून जावे लागेल, आणि मग पक्ष्याचा मंजुळ रव व भ्रमराचा गुजारव हीं ऐकायला सापडतील. याहिपेक्षा क्वचित् वाटेत खडक आल्यानें पाणी जरी दुभगले, तरी हवेवर किती तरी मोती उधळलीं जातील, आणि त्यावर किती तरी इवलालीं इंद्रधनुष्ये नाचतील."

जीवनात आशा, उत्साह व आनद फुलवावा असेच आपले ध्येय असल्याचे सागताना ते म्हणतात, "वाचकाना आपल्या जीवनाविषयीं आशा, उत्साह व आनद वाटावा या हेतूने मनुष्याच्या ठिकाणीं काम-क्रोधादि ज्या सहज भावना आहेत त्याचा मुळींच तिरस्कार न करता त्याचें उदात्तीकरण कसे करावे हे मी सागत आलो आहे."

जीवनातील दुःख, संकटे, निराशा टाळून सुखच कसे वेचावे याचा धडा देतांना दाडेकर प्रगतीचा, चैतन्याचा, विकासाचा उपदेश करतात, तो पुढीलप्रमाणे—"ज्याला आपण आशावाद म्हणतो, आनंद म्हणतो, तें परिस्थितीच्या पुढे एक पाऊल टाकणें असतें. नैराश्यानें भरलेली कोणतीहि घटना घ्या, तिच्यापुढे एक पाऊल टाकलें कीं, आशेचीं सोनेरी किरणे चमकताना आढळतील आशानिराशेचे किंवा सुखदुःखाचे सीमाप्रात एकमेकाना लागून असतात. तुम्ही सीमोल्लघन करावयाचें नाहीं असें म्हटल्यावर तुम्हाला आशेच्या अन् सुखाच्या साम्राज्यात येता कसें येणार?

दुबळ्यासारखे तुम्ही जुन्यालाच चिकटून बसावयाचें निश्चित केल्यास तुम्हाला नव्या अन् चागल्या गोष्टी मिळणार तरी कशा ? ज्या स्थितींत असाल त्याच्यापुढे एक पाऊल टाकलेत कीं तुम्हाला हवें ते मिळेल. ”

दाडेकराचा पुढील आनदी व आशावादी दृष्टिकोन वाचकाना उत्साहदायक वाटेल असाच आहे. “ ज्या आयुष्यात आपणाला इतक्या विविध आनंदाचा उपभोग घेता येतो ते आयुष्य नीरस नसून सरस आहे. सृष्टीकडे आणि आयुष्याकडे थोड्याशा रसिकतेने व खेळाडू वृत्तीनें बघितल्यास असे खचित वाटेल कीं, जगण्यात मौज आहे. ”

## उदात्त ध्येयवाद

‘जाहल्या तिन्हीसांजा ’ या निबधात ते आपल्या जीवनाचे उदात्त ध्येय रगवितात ते असे—“ दिवसाचे काहींदेखील रात्रींत शिल्लक राहात नाहीं. जिकडे तिकडे रजनीचा अंमल. दिव्य विस्मृतीचा अंमल. आपणहि सारें सारे विसरून जावे, सर्व भेदभाव विसरावेत. मानापमान गिळून टाकावेत. दुरुत्तरे पचवून टाकावींत. दुखविलेल्या जीवाजवळ क्षमेची याचना करावी. दुःख देणाऱ्या जतूवर दयेची पाखर धरावी. प्रेमाची आरती घेऊन सर्वासर्वांना ओवाळायला निघावे आणि मग पहावें सृष्टींत केवढी आलटापालट होते ती. ”

हे समतेचे, प्रेमाचे व शातीचे जीवन लाभण्यासाठीं मनुष्यानें कोणतीं दृष्टि ठेवावी हे ‘ सर्व क्षणिक ’ या निबधात त्यानीं पुढील शब्दानीं सांगितले आहे. “ सौंदर्याचें, स्वातंत्र्याचे, सुखाचे क्षण जरी मिळवता आले, तरी त्या क्षणाकरिता सर्व आयुष्य कुरबान करायला हरकत नाहीं. दगडासारखे शाश्वततेचे जीवन कंठण्यापेक्षा इद्रधनुष्याचे क्षणिक जीवन पुरवले. ते तरल असले तरी सत्य आणि त्याहिपेक्षा सुदर आहे. ”

‘ पूर्णविराम ’ या निबधात कार्याची निवड कशी करावी व निवडलेल्या कार्याशीं एकनिष्ठ का रहावें, हें सागताना दाडेकर लिहितात, “ काहीं एक काम उत्कृष्टपणानं, शातीनं करता याव म्हणून दुसरीं कांहीं काम आपण होऊन बंद करण याच नांव पूर्णविराम होय. आणि असला

पूर्णविराम हा निराशाजनक नसून उत्साहद्योतक आहे. वाक्य लिहीत असताना आपण वाक्याच्या शेवटीं पूर्णविराम देतों. तो पुढें काहीं न लिहिण्याकरिताच देतो अस नसून पुढील वाक्य लिहिण्याकरिताहि देतो."

## चमत्कृतींची मांडणी

आता अपवादाचा गौरव करून व विषयाचीं मूल्यें उरफाटीं मांडून दाडेकर लघुनिबधात आवश्यक ती चमत्कृति कशी निर्माण करतात तें पहा. ' रेल्वे लाईन्स 'मध्ये ते लिहितात, " सरळ मार्गानें काहींहि करीत असताना थोड्याशा आडरानात शिरल्याशिवाय आपणाला बरेंच वाटत नाहीं—निदान मला तरी बरे वाटत नाहीं. त्या आडरानात शिरून सरळ रस्त्याकडे बघण्यात मला मौज वाटते. सरळ रस्त्याचें खरे स्वरूप—त्याचें खरें महत्त्वहि अशा वेळीं कळायला सुलभ जातें. शिवाय सरळ रस्त्याला साक्ष ठेवून आडमार्गानें जात असताना खाचखळगे लागले तरी वाट चुकण्याची भीति मुळींच नसते."

रिकामपणामुळे पुढच्या कामाला उत्साह कसा मिळतो, हें ' विहार '-मध्ये त्यानीं सागितले आहे, तें असें—" श्रम करणाऱ्या मनुष्यांकरिता रिकामपणाची व विश्रातीची जरूरी आहे. रिकामपणाने मनुष्याची कार्य-क्षमता तर वाढतेंच, पण त्याहीपेक्षा अधिक म्हणजे नवनिर्मिती काहीं तरी तो करूं शकतो. जगाच्या ज्ञानात व आनदात तो आधिक भर घालूं शकतो. जगाकडे बघण्याचा त्याचा दृष्टिकोन नावीन्यपूर्ण व प्रसन्न बनतो. नाहीं तरी बैलाप्रमाणे काम करणाऱ्या लोकाऐवजीं माणसाप्रमाणें काम कर-णाऱ्या बुद्धिमान लोकाचीच समाजाला अधिक गरज असते आणि ही गरज श्रम करणाऱ्यांना स्वच्छंदाने विहार जोंपर्यंत करता येत नाहीं, तोंपर्यंत भागणें शक्य नाहीं."

तसेंच 'घर-घरटें'मध्यें ते म्हणतात, " शिष्टाचाराच्या बंधनाखालीं बाह्य जगात वावरत असताना आपल्या मनावर भयंकर ताण पडलेला असतो. तो ताण मोकळा झालाच पाहिजे—शिष्टाचाराच्या सरक्षणाकरिताहि झाला पाहिजे. कारण तसा तो न झाल्यास मनुष्य बाहेरहि वेडावाकडा वागूं

लागेल. मनुष्याने मोकळेपणाने घरात वागणे हे सामाजिक स्थैर्याच्या दृष्टीनेंहि योग्य आहे."

'नियमितपणा'मध्येंहि ते म्हणतात, "काहीं काळ तरी प्रत्येकानें स्वच्छंदानें डोंगर-माथ्यावर हुंदाडावें, रानात भटकावें आणि लाटाची लीला पाहात समुद्रकिनाऱ्यावर खुशाल तासन्‌तास बसावें. जगातील विविध अनुभव अवश्य घ्यावेत, आणि मग पाहावें कीं, आपल्या आयुष्यात आनंदाचा अविनाशी झरा निर्माण झाला आहे किंवा नाहीं तें."

## सूक्ष्म चिकित्सा

व्यवहारात त्रास कोणाला हात नाहीं? पण तो मनात रिचवून समाजात आनंदाचा फुलबाग फुलविण्याचा सर्वांनीं प्रयत्न केला पाहिजे, असें तत्त्व 'घर–घरटें'मध्ये दाडेकरानीं सांगितले आहे. नुसतें तत्त्व मांडून स्वस्थ न बसता त्याची कारण-मीमांसाहि त्यानीं जाताजाता सांगितली आहे. ती अशी "आपणाला वाटते, आपल्या खाजगी गोष्टी, खाजगी आवडी-निवडी, याचे प्रदर्शन जनात कशाला करा? लोकाना कुठे आहे आपल्या-विषयीं विचार करायला फुरसद? कुठे आहे त्याना कळकळ? शिवाय त्यानाहि त्याचीं सुखदुःखे–मानापमानाचे प्रसंग–असणारच. अशा परि-स्थितींत कृत्रिम का होईना—आनंदाचे, प्रसन्नतेचे, सुखाचें वातावरण निर्माण करणे व करविणें हेच इष्ट नाहीं का?"

निसर्ग कसा आहे आणि मानवानें आपली बुद्धि कशी वापरावी, याचा तात्त्विक विचार दाडेकरानीं 'निसर्ग निसर्ग आहे, पण' या निबंधात मांडला आहे, तो असा—"निसर्ग सुष्ट नाहीं आणि दुष्टहि नाहीं. निसर्ग निसर्ग आहे. बगळ्याने मासे खाणें, कोळ्यानें मासे पकडणें इत्यादि प्राथमिक स्वरूपाची हिंसा हा निसर्गाचा किंवा जगाचा स्वभावच आहे मुळीं. एका जीवानें दुसऱ्या जीवावर जगणें हा निसर्गाचा क्रमच आहे. पण हा क्रम वाढवून त्यात माणसानें माणूस खाणें, एका राष्ट्रानें दुसरें राष्ट्र गिळकृत करणें यांचा अंतर्भाव करणें चुकीचें ठरेल. कारण मनुष्याला ईश्वरानें बुद्धि दिली असून, दुसऱ्यावर आक्रमण केल्यावाचून त्याला जगणें शक्य आहे."

## समतोल विचार

मानवानें आपल्या बुद्धीचा एकदा उपयोग करावयाचें ठरविलें कीं, सुखापेक्षा कर्तव्याची व व्यक्तीपेक्षा समाजाची मातब्बरी त्याला सहजच अधिक वाटूं लागते. ‘ काळी पोत ’ ‘ लेडीज रूम,’ ‘ कोथिंबिरीच्या काड्या,’ ‘ मी आणि तरुण स्त्रिया,’ ‘ मिळवुनी त्रिभुवनींच्या ललना ’ इत्यादि निबंधातून दांडेकरानीं व्यक्तिसुखाचा व भोगवादाचा प्रचार चालविला आहे असा भास होतो हें खरें आणि खेळ, विसावा, धूम्रपान, संगीत हेंच आयुष्याचें परमसाध्य असें वाटण्याइतका ठसा तरुण वाचकाच्या चित्तावर उमटतो हेंहि खरें; पण या साबणाच्या पाण्यातील रंगीबेरंगी फुग्याचे महत्त्व किती, हेंहि दांडेकर मधूनमधून पटविण्यास विसरत नाहींत हें विशेष. ‘ जगण्यात मौज आहे ’ या निबंधांत ते असा हितोपदेश करतात. “ परोपकारापासून होणारा आनंददेखील आयुष्यात रस उत्पन्न करूं शकतो. आपल्याजवळ दोन पैसे असल्यास त्यातील एक गरिबाला दिल्याने, आपणाला जी विद्या येत असेल ती अविद्य मनुष्याला शिकविल्यानें, आपले सामर्थ्य बलहीनाच्या रक्षणार्थ वेचल्याने, आपली वाणी दुसऱ्याना आनदविण्याकरिता वापरल्याने, आपली लेखणी वाचकाची कळी उमलविण्याकरिता चालविल्यानें जो एक विशिष्ट प्रकारचा आनद होतो तो मिळविण्याकरिता जन्मच्या जन्म कोणाला जगावेसें वाटणार नाहीं ! ” विचाराच्या या समतोलपणाबरोबरच वाक्यरचनेलाहि किती समतोल आला आहे हें पाहण्यासारखे आहे. सुंदर विचार सुंदर भाषेनें व्यक्त झालेले येथें दृष्टीस पडतें.

## सामाजिक जाणीव

‘ काळ खेळतो आहे ’ हें निबधाचे शीर्षक “ कालः क्रीडति ” या श्रीशंकराचार्यांच्या सूत्रावरून लेखकाला सुचले आहे. पण या नावातील ‘ काळ खायला आलेला नसून खेळायला आला आहे ’ अशी आपली खेळकर भूमिका लेखकानें माडली आहे. घोड्याच्या ट्रॅम जाऊन पेट्रोलच्या आल्या व आतां बस धावूं लागल्या, पणत्या जाऊन विजेचे दिवे आले

इत्यादि बदल दाखवून व जर्मनी–जपानांतील क्राति वर्णून लेखकानें सूचक प्रश्न विचारला आहे, "वैयक्तिक उन्नति, प्रगति, सुधारणा झाली, पण बहुजन-समाजाचे काय ? तो कुठे आहे ?" अशी सामाजिक जाणीव बारीक बारीक प्रसगांतून हसतखेळत देणारे लेख लघुनिबंध या संज्ञेस अनेक अर्थांनीं पात्र ठरतात.

गहन विचार, सूक्ष्म चिकित्सा व आकर्षक माडणी या तिन्ही दृष्टींनीं 'जाहल्या तिन्हीसाजा' हा निबध सरस आहे. त्यात लेखक म्हणतो, "आपण आणि काळोख. जगातील सर्व बधने गळलीं जाऊन कुठल्या-तरी महाशक्तीच्या समोर आपण उभे आहोंत, आणि त्या शक्तीच्या आत आहोत; ती शक्ति आपल्याभोवतीं अगदी वेढून आहे; आपण तिच्याच-पैकीं एक अंश आहोत, ह्या किंवा असल्या भावनेने अतःकरण उच-बळून येते. आणि मग जो काहीं आनंद अनुभवायला सांपडतो तो केवळ अनिर्वचनीय."

## भाषेचा खेळकरपणा

लघुनिबंधाला योग्य अशी मनमोकळी, लवचीक व खेळकर भाषा-शैली दाडेकर सर्वत्र वापरतात. 'आळस' मध्ये ते म्हणतात, "माझें आपणाला मनापासून आणि हात जोडून असें सागणें आहे कीं, या फिकी-रींत आपण पडू नका. काहीं थोडें फाजील उद्योगी लोक आळसाला खुशाल आपला शत्रू मानोत. माझी तर दिवसानुदिवस अशी खात्री होत चालली आहे कीं, आळस हा मनुष्याचा शत्रू नसून मित्र आहे, दुष्मन नसून दोस्त आहे. कसा तें सागतोंच आता आपणाला."

'मार्गे फिरून पाहिलें असता' या निबंधाचा प्रारंभ लघुकथेला साजेसा आहे. तो असा—"समजा, तुम्ही परगावीं जायला निघाला आहात. तुम्ही गाडीच्या खिडकीपाशीं उभे आहात, गाडीनें शिटी वाज-विली असून उलट एंजिन ड्रायव्हरनें 'कुकुऽऽकु' असें उत्तर दिलें आहे. पाणी प्यायला किंवा इतर काहीं खाद्य खरीद करायला गेलेल्या

उतारूंची डब्यात शिरण्याची तारांबळ उडून धाड्धाड् असे डब्यांचे दर-वाजे लागले जात आहेत. गाडीला किंचित धक्का बसून गाडी हळुहळू चालायला सुरवात झाली आहे. आणि अशा वेळीं तुम्हीं मागें फिरून पाहिलेंत तर तुम्हाला काय दिसेल ? ”

‘ रेल्वे लाइन्स ’ हा निबंधहि नावीन्यपूर्ण आहे. आगगाडीचे रूळ पाहून लेखक असें तत्त्व सागतो, “ त्या चकचकणाऱ्या परंतु पुढें पुढें अस्पष्ट होत जाणाऱ्या रेल्वे लाइन्सकडे पाहिलें कीं दूरच्या आणि वेगळ्या मुलुखाची सारखी आठवण होते, मनात त्याच्याविषयीं कल्पनातरंग उभे राहातात............प्रवास न करता प्रवास केल्याचें श्रेय आपणाला मिळेल. ”

## विनोदाचे तुषार

काहीं रुक्ष, अरसिक शाश्वततावादी लोक समोरच्या सुखाला व सौंद-र्याला पारखे कसे होतात, हें पटविण्यासाठीं दाडेकरानीं एक गंमतीचें उदाहरण दिलें आहे. हे लोक आइस्क्रीम पुढें आले असतां म्हणतात, “ क्षणापूर्वीं हें आइस्क्रीम निव्वळ साखरेचं दूध होतं. इतकंच नाहीं, तर अर्ध्या तासानं पुन्हा तें दूधच होणार. तस्मात् या क्षणिक गोष्टीचा आम्हाला स्वीकार करता येत नाहीं. ” असा विनोदाचा झंकार मधून-मधून दाडेकराच्या लघुनिबंधातून उठत असतो. ‘ न्हावीदादा ’ हा त्याचा निबंध कोल्हटकराच्या ‘ हजामती ’ ची आठवण सहजच करून देतो. एका समर्पक उपमेचा उपयोग दाडेकरानीं विनोदासाठीं कसा केला आहे पहा. “ तुळतुळीत डोक्याच्या अंगणात घेऱ्याचें वृंदावन उभारून त्यात शेंडीरूपी तुळशीची स्थापना एखाद्यानें केली, कीं तो शंभर टक्के सनातन-धर्माभिमानी आहे असें मोळे लोक मानीत असत. ”

अशाच विनोदाची झालर ‘ आपण आहों गायी ’ या निबंधांतहि लावलेली आढळते. आपला सिद्धांत गंमतीदार भाषेनें सांगतांना ते म्हण-तात, “ पूर्वीच्या स्त्रिया गायी होत्या, म्हणून हल्लींच्या स्त्रियांनीं म्हशी व्हावें किंवा वाघिणी व्हावें असें कोणीच म्हणणार नाहीं. म्हशीं काय

आणि वाघिणी काय, शेवटीं पशुकोटींतीलच होत. स्त्रियांनीं तसल्या पशुकोटींत कधींच जाऊं नये. त्यांनीं मनुष्यकोटींत राहाण्याचा प्रयत्न करून त्यांतच आपली अधिकाधिक उन्नति करावी. ''

वाचकाच्या ओठावर स्मिताची लकेर पसरेल न पसरेल इतका माफक विनोद करण्याच्या केळकरी परंपरेंत दाडेकर शोभून दिसतात. ' जमेचिना-घडेचिना ' या निबंधात ते मिस्किलपणानें म्हणतात, '' सकाळीं मला उठविण्याच्या कामीं कपबश्यांच्या आवाजाखेरीज बाकीचे सर्व आवाज ( म्हणजे प्रिय माणसाचे आवाजदेखील ) अगदीं म्हणता अगदीं निष्फळ ठरले आहेत. हा एकच आवाज असा आहे कीं, तो ऐकून मी खडबडून जागा होतों आणि ताज्यातला ताजा चहा जो असेल तो मिळविण्याचा प्रयत्न करतों; म्हणजे दिवसांतला माझा पहिला महान् उद्योग म्हणजे चहा घेणें. आता ही गोष्ट कांहीं मोठी सागण्याजोगी नाहीं हें मला पटतें आहे. पण इतर गोष्टी आपणांला जमतच नाहींत तिथें काय करणार ! ''

## फसवी मांडणी

' निर्वासित माणसें ' या निबंधात चमत्कृतिसाठीं ते अशीं कांहीं विधानें करतात कीं, तीं कच्च्या वाचकाला खरीं वाटावींत, पण तीं सत्याच्या वा विवेकाच्या कसोटीस उतरणारीं नसावींत. उदाहरणार्थ– ''जगात जर मला कोणाची अत्यत भीति वाटत असेल तर ती निर्व्यसनी मनुष्याची ! त्याच्याइतका भयकर प्राणी दुसरा कोणीहि नसेल ! त्याचें भयकरत्व त्याच्या निर्व्यसनापासून निर्माण झालेले असतें. ''

तसेंच '' एका दृष्टीनें निर्व्यसनी माणसाना मी समाजाचे शत्रु समजतों. वसुंधरेवर ज्या हजारों वस्तु निर्माण होतात, त्यापैकीं कांहीं थोड्यांचाच ते स्वीकार करतात आणि बाकीच्याचा स्वीकार करणें हें ते व्यसनाच्या सदरात घालतात ! ते ज्यांचा स्वीकार करतील त्या जीवनोपयोगी चिजा व बाकीचीं सर्व व्यसनें ! किती भयंकर समीकरण आहे हें ? ''

केवळ एक गंमत म्हणून असे विचार एका कानानें ऐकावयाचे व दुसऱ्या कानानें सोडावयाचे. त्यांची शास्त्रीय चिकित्सा केली कीं, त्याचें

स्वारस्य गेलें. फूल नुसतें हुंगावयाचें, त्याचें पृथक्करण करणें अरसिकपणाचे. ' उद्योगी मनुष्या ' तहि दाडेकर असेच विनोदी विचार लिहितात, " ज्या उद्योगीशीलतेपायीं ॲटमबॉम्बसारखे शोध लागून हिरोशिमा बेट किंवा नागासाकी बंदर यातील लक्षावधि निरपराध मनुष्यप्राण्याचा क्षणार्धात सहार होऊ शकतो, ती पुष्कळाच्या ठिकाणीं नाहीं हेंच जगाचे भाग्य म्हणावयाचे. छे ! छे ! मनुष्य हा स्वभावतः आळशी आहे हेच ठीक आहे. '' या त्याच्या विधानातील सहाराचे मूळ उद्योगात नसून अविचारात, स्वार्थात, द्वेषात आहे हें वाचकानें ओळखावयास हवे.

## काव्यमय कल्पना

काव्यकल्पना व भाषालंकार याचे भाडवल दाडेकराजवळ बेताचेंच आहे. पण त्या भाडवलाचा वापर योग्य ठिकाणीं करण्याचे कौशल्य त्याचे ठायीं आहे. ' जाहल्या तिन्हीसाजा 'मध्ये रात्रीचें वर्णन ते किती चातुर्याने करतात पहा, " एखाद्या गारुड्याने आपल्या पोतडींतून अनेक चित्र-विचित्र जिनसा काढून अद्‌भुतरम्य विश्व निर्माण करावें, आणि मग खेळ सपला कीं, पुन्हा सर्व वस्तु पोतडींत ठेवून द्याव्यात, त्याप्रमाणे प्रकृतिदेवी दिवसा आपल्या पोतडींतून सर्व वस्तु बाहेर काढते आणि रात्र झाली कीं पुन्हा तमाच्या पोतडींत त्या ठेवून देते."

' मध्यरात्र ' हें कल्पना—विलासाला केवढें रम्य क्षेत्र. फडके यानीं ' सहल 'मध्यें व प्रा. कुसुमावती देशपाडे यानीं ' मध्यरात्र 'मध्यें आपा-पल्या शैलीने तिचें वर्णन केलें आहे. दाडेकराची वर्णनशैली पहा, " ती चादणी मध्यरात्र होती. द्वादशीचा चंद्र पश्चिमेकडे कलत चालला होता. त्याच्या वरच्या अंगाला मृग नक्षत्र आकाशाची शोभा वाढवीत होतें. जरा पलीकडे व्याधाची तेजस्वी चादणी एखाद्या रूपगर्वितेप्रमाणें आविचल आव्यतेंत उभी होती. जिकडे तिकडे नीरव अगाध शातता होती. रात्रीं कुत्रीं ओरडतात, पण त्या वेळीं तींहि ओरडत नव्हतीं ! जिकडे तिकडे निःशब्द शांतताच पसरली होती. लख्ख पाढऱ्या चांदण्याच्या दुधानें न्हाल्यासारखीं घरें व सडका दिसत होत्या. चांदण्यांतील त्या सावल्या

फार मोहक, आकर्षक दिसत होत्या. जणूं काहीं श्याम वर्णाच्या देव-कन्याच चादण्यात विहार करीत आहेत! तसल्या त्या मध्यरात्रींच्या सावल्यातून जात असताना एखाद्या यक्षाच्या नगरींतून तर मी जात नाहीं ना, असें मला वाटलें."

पर्जन्यकाळाचे अलंकारिक वर्णन 'आनंदाचे संकेत'मध्ये दांडेकरांनीं केलें आहे, तें असें—"एखादे वेळीं ढगावर ढग जमा होऊन सैनिकाच्या रागा लागल्यासारख्या दिसतात, तर एखादे वेळीं पातळ ढगाची धाबळी परिधान केल्यासारखे आकाश दिसतें. एखादे वेळीं बाणाच्या वेगाने पावसाच्या धारा पडतात, तर एखादे वेळीं फुलबाजीप्रमाणें मंद मंद भुरभुर सुरू असते. पण काहींहि असलें तरी निसर्गाचें आनंदाचें साधिक गाणें या ऋतूत सुरू असते.

## मनोहर वर्णन-शैली

एका तळ्याचे शब्द-चित्र दांडेकरांनीं किती सुंदर व यथार्थ काढलें आहे, पहा—"त्यात काहीं पांढरीं व काहीं लाल कमळे होतीं. कमळाच्या पानावरून स्वतःच्या लहानग्या शरिराचा तोल सावरीत पाणकोंबड्या फिरत होत्या. रंगलेल्या ढगाचीं प्रतिबिंबें पाण्यात पडून, त्यालाहि एक शोभा आली होती. जलाशयाच्या काठावर बसून एक कोळ्याचा मुलगा गळानें मासे पकडण्याचें काम करीत होता."

'विहार' मध्यें नानाविध पाखराचीं जीं वर्णने दांडेकरांनीं रंगविलीं आहेत, तशीं मराठींत थोडींच सापडतात. आकाशात स्वच्छंदानें उडणाऱ्या पारव्यांचें वर्णन असें—"सुमारें दोन-अडीच तासानीं ताऱ्याप्रमाणें लुकलुक करणारे पारवे पुन्हा पुष्पगुच्छाप्रमाणे दिसू लागले, आणि थोड्या वेळानें ते खालीं आपल्या खुराड्याकडे आले. किती ताजे नि तेजस्वी दिसत होते! किती डौलदार त्याची चाल होती. किती प्रेमानें ते एकमेकाशीं खेळत होते. क्रीडा केल्यानें, विहार करून आल्यानें, ते उल्हसित दिसत होते. निःस्वार्थी, निर्हेतुक विहारापासून किती आनद होतो हें त्याच्याकडे पाहिलें असताना कळून येण्याजोगे होतें."

पाढऱ्याशुभ्र बगळ्याची आकाशातील माला तर कोणालाहि कवीच बनवील—कविगुरु कालिदासानें तर तिला " अस्तंभतोरणा " चीच उपमा दिली आहे. दाडेकर वर्णितात, " पाढरे बगळे आकाशातून जात असताना फार मनोहर दिसतात. अर्धचद्राकृति किंवा सरळ रेषेत व्यवस्थितणे आणि जलद उडणाऱ्या बगळ्याकडे माझे लक्ष वेधलें जाते. फार सुदर दिसतात ते. ताज्या मोगऱ्याच्या हारासारखी आकाशात उडणारी बलाकमाला दिसते. "

जशीं पाखरे, तशीं फुले—फार काय, पाने-पिकलेलीं पानेंहि. ' काळ खेळतो आहे ' मध्ये त्याचे मनोरम वर्णन दाडेकरानीं केले आहे, तें असे- " विशेषत: हिंवाळ्याच्या शेवटीं व वसताच्या पूर्वी या रस्त्यावर फारच शोभा दिसते. पिवळी, लाल, किरमिजी, भुरकट वडाचीं पाने जाणाऱ्या-येणाऱ्यावर जणूं अभिषेकच करीत असतात. टप टप टप, अगदीं हळूवारपणे गमतीने खालीं येणाऱ्या त्या पानाकडे पाहिले कीं वाटते, काहीं गूढ संदेश घेऊन येणारे हे देवदूत तर नसतील ! त्या पिवळ्या पिवळ्या पानावरून चालत असताना वाटतें, कीं आपण सोन्याच्या चुऱ्यावरून चाललो आहोत किवा सोनेरी कोराटीच्या फुलावरून चाललो आहोत—आणि अशी कल्पना मनात येताच आपलीं पावले आपल्या नकळत हलकीं होतात, मंदावतात आणि आपले हृदय उदात्त भावनानीं भरून जाते. "

## अलंकारांच्या माला

आळसात ( वास्तविक चिंतनात ) घालविलेल्या वेळाचे फळ दाडेकर किती काव्यमय भाषेनें सागतात पहा—" हृदयाचें कमळ उमलून त्यातून पराग स्रवूं लागतात. आत्म्याचा गुजारव सुरू होतो. आत्मा नाचू लागतो, हृदय डोलू लागते. हा अपूर्व देखावा पाहून आपल्या डोळ्यातून आनंदाश्रु वाहूं लागतात. आणि आपण आळसात वेळ घालविला नसून आनंदात घालविला असे वाटूं लागतें. असल्या आनंदाचा उपभोग घेतला आहांत का कधीं आपण ? "

आपला आशावादी संदेश देवालयाच्या दृष्टांतानें दाडेकर माडतात तो

असा—" निराशेच्या सभागृहातून आपण आत गेलों, कीं आशेचे मंदिर दिसूं लागते. त्या मंदिरात एकदा जाऊन तर पाहा. आनंदाचा नंदादीप तेथें अनंत काळपर्यंत उत्साहाचीं किरणे फेकीत असलेला आढळेल."

तसेंच, ' कीर्ति 'वर दृष्टांतामागून दृष्टांताच्या सुगंधी माला ते वहातात. त्या अशा—" पाण्यावर ओढलेल्या रेघेप्रमाणें किंवा वाळूवर काढलेल्या आकृतीप्रमाणें कीर्ति क्षणभंगुर नाहीं. तसेंच ती संगमरवरी दगडावर किंवा ताम्रपटावर खोदलेल्या अक्षराप्रमाणे चिरकाल टिकणारीहि नाहीं. कीर्ति ही दिव्याप्रमाणे आहे एका दिव्यावर दुसरा दिवा लावला गेला कीं, मूळच्या दिव्याचे काम संपलें. तसेंच एकाच्या कीर्तीने दुसऱ्याला कीर्तिकर बनविले कीं तिचें कार्य संपलें. कीर्तीचीं फुले प्रगतीच्या पारिजातकावर येतात. भोंवतालचे वातावरण सौरभयुक्त करणे हें फुलाचे काम. समाज सुखी करणें हे कीर्तीचे काम. कीर्ति ही स्वतः टिकण्याकरिता नसते; समाजाला टिकविण्याकरिता असते."

## लेखन-प्रकारांचा संकर

दांडेकराच्या काहीं काहीं लघुनिबंधामध्ये इतर वाङ्मय-प्रकाराचेंच प्राबल्य झालेले आढळते. ' सारखे चेहरे 'मध्ये केवळ विनोदी उदाहरणेच आहेत—निबंधाला अवश्य असा विचाराचा एखादा कण तरी त्यात असावयास हवा होता. तसेंच ' जमेचिना, घडेचिना ' या निबंधात काहीं विफल योजनांची नुसती जंत्रीच दिली आहे. लवकर उठणे, कपडे नीटनेटके घालणे, पहिला नंबर मिळविणे, वक्तृत्व रंगविणे, इत्यादि कार्यांत आपल्याला यश आलेले नाहीं हें त्यात त्यानीं चटकदारपणे सांगितले आहे. पण सर्व लेखातून विचाराचे बारीकसे सूत्र गुंफलेलें असावयास पाहिजे, तें नाही. ' सर्व क्षणिकं 'मध्ये फुलें, दांपत्य, औदार्य, विद्याप्रेम, इंद्रधनुष्य इत्यादि जीवनातील सौंदर्य-स्थळाची यादी दिलेली आहे. ' निर्व्यसनी माणसें ' दगडाप्रमाणें असतात, अनुदार असतात, समाजाचे शत्रु असतात असा एकांगी सिद्धांत चमत्कृतिजनक म्हणून दांडेकर मांडतात आणि हिटलर-चर्चिलचें साम्य-वैषम्य दाखवितात; पण शिवाजी-टिळक-गांधीजी

इत्यादि निर्व्यसनी नेत्यांचें जीवन काय दर्शवितें? इतका गंभीर विचार लघुनिबंधात करावयाचा नसतो, असे उत्तर दाडेकर देतील, हें उघड आहे.

'पूर्णविराम' मध्यें आरभापासून अखेरपर्यंत सवादच आहेत. तसाच प्रदीर्घ सवाद 'आपण आह्मो गार्यी' यात पसरलेला आहे. साठीच्या घरांत पोंचलेल्या दोन म्हाताऱ्या स्त्रियाच्या त्या संवादातून स्त्रियाचे परावलंबन सूचित केले आहे व आधुनिक स्त्रीचा स्वतत्र बाणा चित्रित केला आहे. 'मिळवुनि त्रिभुवनींच्या ललना' मध्ये एक भास निर्माण करून नानाविध सुदर स्त्रियाच्या सहवासाची अतृप्त इच्छा लेखकानें काल्पनिक रीतीनें पूर्ण करून घेतली आहे. 'उपरण्याचे उपयोग' स्वराज्य–प्राप्ती-करिताहि करा असा एकातिक प्रचार करणाऱ्या संस्थानिकाचे सुमारें दहापानी व्याख्यान लघुनिबधाला लोढणेच ठरण्यासारखे नाहीं काय? 'शक्तीचा अपव्यय' यातील कल्पना गडकऱ्याच्या 'चिंतातुर जन्तु' या कवितेसारखीच आहे. विजेचे पखे, रानगुलाब, युवतींचे विभ्रम, मॅट्रिकचे विद्यार्थी इत्यादिकाच्या गुणाची उधळपट्टी चालली आहे, अशी कुरकुर त्यात आहे. संवाद, वर्णन, शब्दचित्र--हा लघुनिबंधाचा एकएक अवयव ठरेल, पण त्यामुळे लघुनिबंधाला पूर्णता येत नाहीं. तसे सकल अंगानीं परिपूर्ण असेहि लघुनिबध दाडेकरानीं लिहिले आहेत.

## अभ्यासाच्या वाटा

(१) डॉ. दाडेकर याच्या विविध लेखनकार्याची थोडक्यात माहिती लिहा.

(२) "खरंच जगण्यात मौज आहे" या निबंधातील मध्यवर्ती कल्पना लिहा. जीवनाचा कोणता आदर्श लेखकाने या निबंधात वाचकासमोर माडला आहे?

(३) डॉ. दाडेकराची भाषा प्रसन्न आहे असे खाडेकर म्हणतात. हें विधान तुम्हास पटतें का? उत्तर लघुनिबंधाच्या आधारें लिहा

(४) 'जाहल्या तिन्हीसाजा', 'निर्व्यसनी माणसें', काळ खेळतो आहे' 'आळस' या निबंधातील विचारसरणी थोडक्यात लिहा.

(५) जीवन आनंदपूर्ण करण्याची गुरुकिल्ली दाडेकराच्या मतें कोणती?

# सौ. कुसुमावती देशपांडे : ५

'साहित्यिक दांपत्य' म्हणून देशपांडे-पतिपत्नींचा उल्लेख गौरवानें होण्या-सारखा आहे. सौ. कुसुमावतीबाईंचे पति श्री. आत्माराम रावजी देशपांडे हे 'अनिल' या टोपण नावानें नवकवींमध्ये मानाचे स्थान मिळ-



वून बसले आहेत. न्यायाधीशाचे उच्चासनावर त्यांनीं अठरा वर्षे काम केले असून नंतर 'समाज-शिक्षण-विभागाचे' संचालक म्हणून त्यांनीं सेवा केली. आता 'समाज-विकास-योजने'मध्ये केंद्रीय सरकारचे विशेषाधिकारी म्हणून ते काम करीत आहेत. अशा विद्वान कार्यकर्त्याला शोभण्याजोग्याच त्यांच्या सहचारिणीहि आहेत. त्यांचें मूळचें नाव कुसुम जयवंत. त्यांचे वडील रा. ब. रामकृष्णराव हे वकिलीचा व्यवसाय करीत असत. वऱ्हाडातील अमरावती येथे ता. १० नोव्हेंबर १९०४ रोजीं कुसुमचा जन्म झाला. तेथेच त्यांचे प्राथमिक व बरेचसे माध्यमिक शिक्षण झाले. पुढें त्या पुणे येथें हुजूरपागेंत शिक्षण घेण्यास आल्या. १९२१ सालीं मॅट्रिकमध्ये त्या उत्तीर्ण झाल्या, त्या 'लक्ष्मण जगन्नाथ वैद्य' शिष्यवृत्ति मिळवून. पुढे त्या फर्गसन कॉलेजात दाखल झाल्या. तेथें चार वर्षें अध्ययन करून त्या नागपूर विद्यापीठाच्या बी. ए. च्या परीक्षेस १९२६ सालीं बसल्या. त्या परीक्षेंत त्यांनीं पहिल्या वर्गांत पहिला क्रमांक पटका-

वून मोठा लौकिक मिळविला. त्याना सरकारची एक शिष्यवृत्ति मिळाली व त्या इंग्लंडला उच्च शिक्षणासाठीं गेल्या. तेथें लंडन येथील वेस्टफील्ड कॉलेजामध्यें इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास करून त्यानीं १९२९ मध्यें बी. ए. ( ऑनर्स ) ची पदवी संपादन केली. पदवीसह मायदेशीं परत आल्यावर त्याचा विवाह त्याच वर्षी झाला.

## प्राध्यापकाचें काम

नागपूर येथील कॉलेजात १९३१ पासून इंग्रजीच्या प्राध्यापिका म्हणून कुसुमावतीबाई अध्यापनाचे काम करीत आहेत. अध्यापनाबरोबर लेखनाकडेहि त्या लक्ष पुरवीत असतात. ' दीपकळी,' ' दीपदान ' व ' मोळी ' या नावाचे त्यांचे तीन लेख-सग्रह प्रसिद्ध झाले आहेत. त्यामध्ये काहीं लघुनिबंध आहेत व काहीं लघुकथा आहेत. त्याच्या लघुनिबंधामध्यें मोजके शब्द, रेखीव वर्णन व रम्य कल्पना याच्या जोडीलाच सूक्ष्म तर्कशक्ति व खोल सहानुभूति हेहि गुण आढळतात. समाजातील दीन-दुःखी अशा उपेक्षिताबद्दलची त्याची प्रेमळ भावना त्याच्या लघुनिबंधामध्यें, मंद-सुगधी वायुलहरीप्रमाणे, सर्वत्र पसरलेली असते. ' टीकाकार ' म्हणूनहि त्याची कीर्ति आहे. ' मराठी कादंबरीचे पाहिले शतक ' या नावाचा त्याचा एक मोठा टीका ग्रंथ ' मुबई मराठी साहित्य संघा'नें प्रकाशित केला आहे. नागपूर येथील ' विदर्भ साहित्य संघा'चें अध्यक्षपद त्याना लाभलेले आहे. मुबईच्या १९५० सालीं भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या टीका-विभागाचे अध्यक्षपद त्याना देण्यात आलें होते.

## काव्य-कल्पनेची चमक

स्त्री-मन म्हणजे कवि मन. त्याची साक्ष सौ. कुसुमावती देशपाडे याचे लघुनिबंध वाचताना ठायीं ठायीं पटते. त्याची भाषाशैली कोरीव आहे-एखाद्या कवितेला शोभेशी आहे. वेचक शब्द योजून त्याच्या द्वारा आपल्या मनांतील सर्वच्या सर्व भाव प्रगट करण्यांत त्या यशस्वी आहेत. त्यांची भावना जितकी उंच कल्पना करूं शकते, तितकीच त्याची बुद्धी सखोल चिकित्सा करूं शकते.

नदींत दिवे सोडण्याचा एक प्रसंग. सामान्य लोकाना तो एक वार्षिक खेळच वाटतो. पण त्यांतुन त्यानीं कल्पकतेचा किती प्रकाश पाडला आहे पहा, 'पौर्णिमेचे चांदणें आणि–कुबेराच्या ऐश्वर्यानें लवथवत्या लाटाना आपल्या पदरावर' नाचविणारी नर्मदा. तिच्या घाटावरील दीपदानाच्या सोहळ्याचें मनोहर वर्णन करून लेखिका त्या दिव्याच्या रागेवर एकेक कल्पना कशा लढवीत आहे पहा. "आल्हाद व गूढता. काजव्याच्या स्फुलिंगाएवढा आपला प्रकाश घेऊन एकेक दीप डोलत डोलत निघाला कीं आपल्या भोवतालच्या वीतभर लहरींना तरी व्यक्त स्वरूप देई, त्या अखड निळ्या प्रवाहातून त्याना उचलून धरी. त्याच दिव्याचें ते इवलेसें प्रतिबिंब आपल्या परीने नदीच्या अंतरंगात किती खोल खोल शिरायचा प्रयत्न करी. कित्येक दिवे पैलतीरावर जाऊन पोचले होते, तिथे ते विसावून इतराना आपली निःशब्द हाक देत होते. त्या लुटुपुटीच्या दीपस्तंभामुळें नदीच्या विस्ताराची, तिच्या गाभीर्याची आज जणू नव्यानेंच जाणीव झाल्यासारखी वाटे. कित्येक दिवे त्या अखड वाहत्या जीवनाचें क्षितिजापर्यंत संशोधन करायलाच जणू निघाले होते!"

## निसर्गाचीं शब्दचित्रें

काहीं कवि अरुणाचें रम्य वर्णन करतात, तर काही सध्यादेवीचें चित्र रगवितात. परतु ऐन मध्यान्हाचे किंवा मध्यरात्रीचे वर्णन करणारे कवि थोडे! आणि त्या निसर्ग–वर्णनातून आपल्या मनःसृष्टीचे दर्शन घडविणारे कवि तर त्याहूनहि थोडे. केशवकुमार (प्रा. अत्रे) यानीं 'दुपार-वर' एक हृदयगम कविता केली आहे, पण ती अपवादच. कुसुमावतीबाईंनीं मात्र दुपारची निरनिराळ्या ऋतूमधील स्वरूपें गद्यामध्ये पण काव्याला साजेशा शैलीनें रेखाटलीं आहेत. नागपूरकडील मे महिन्यातील दुपारची अनिमिष स्तब्धता! तशा दुपारीं एखाद्या शेतांत आपण गेलों, तर तेथील निसर्ग कसा दिसतो, याचें रेखीव शब्दचित्र लेखिकेनें काढले आहे, तें असें:—
"दृष्टीच्या सीमेपर्यंत काळी शुष्क जमीन पसरली होती. शब्दांच्या पलीकडे जिचें दारिद्र्य गेलें आहे, अशा एखाद्या स्त्रीच्या अंगावरील

फाटक्या चिंध्याप्रमाणें वाळून कोळ झालेल्या गवताचे अवशेष भाजणाऱ्या वाऱ्यानें उगीचच भुरभुरत होते. दूरवर नजर फेकली तर मधूनच मृगजलाचे तरंग दिसत, मधूनच ती काळीभोर जमीनच तरळल्यासारखी—खालवर हालल्यासारखी वाटे. ”

आणि हिंवाळ्यातील दुपारीचें वर्णन तर लेखिकेनें अत्यंत बहारीनें केले आहे, तें असे—“ हिंवाळ्यातली दुपार तरी काय कमी मनोरम असतें ? त्या वेळच्या ऊबदार हवेची गोडी अस्सल सुखवाद्यानादेखील पटेल. तिचा आस्वाद घेत उन्हात पडले असत ना डोळ्याना चारी बाजूंना जणू समृद्धीची ऊब दिसू लागते. हेमन्ताचे सोनें सगळीकडे पसरलेलें असते. गव्हांवर सोनेरी ताबूसपणा चढायला सुरवात होते. कडूनिंबाच्या पानाचें सोनें होऊन तीं गरगरा शिवाशिवी खेळत हिंडू लागतात. जसजशी शिशिराची कळा ओसरूं लागते, तसतश्या भिंगाऱ्यांच्या झाडावर निव्वळ सोनेरी शेंगाच शेंगा लटकूं लागतात, तर पिवळ्या काचनाचे झाड एकेका फादीवर एकाद-दुसरेंच सुवर्णमय फूल घेऊन डोलू लागतें. ”

तसेंच “ माध्यान्हीच्या वेळेत समतोलपणाचे स्वारस्य, गंभीरतेचा आनद साठवलेला आहे, तींत उच्छृंखलपणा नाहीं, भडकपणा नाहीं. अभिजातपणाला साजेसे तिचें सौंदर्य आहे. प्रगल्भ हृदयाप्रमाणे तिचीं दुःखे निःशब्द आहेत. त्याच्याप्रमाणेंच तिचा आनंद शात आहे. ”

## चंद्रास्ताचें वर्णन

एकादा कवि ज्याप्रमाणें निसर्गातील दृश्य आपल्या हृदयात साठवून घेतो आणि नंतर आपल्या प्रभावी शब्द-सामर्थ्यानें ते हृदयातून जसेच्या तसें बाहेर काढून वाङमयद्वारा रसिकापुढें ठेवतो, तसे कौशल्य लेखिकेनें ‘ चंद्रास्ता ’च्या बारीक व विस्तृत वर्णनांत दाखविले आहे. मावळत्या चंद्राचीं बदलतीं स्वरूपे व शेवटीं दोन बिंदु मात्र दिसणे याचे साक्षात् दर्शनच त्यानीं घडविलें आहे. प्रारंभीं त्या सागतात, “ एक शब्दहि न

बोलता त्या भयाण, काळवंडलेल्या पाण्यानें भरास आलेल्या तलावाच्या कड्यावर जाऊन बसणें व डोळ्यादेखत त्या टेकडीच्या माथ्याजवळ...... माथ्याखालीं......झराझर ओढल्या जाणाऱ्या चंद्रकलेकडे, पातें न लवूं देता पहात राहणे, याशिवाय दुसरें काय करणें शक्य होते? ''

तळ्यावर बसून मावळती चंद्रकला कशी दिसत होती, हे सांगताना लेखिका म्हणते, " मावळत्या चंद्रकलेच्या पायाशींच पसरलेला तो शांत जलाशय तिचे रूप आपल्या अंतरंगात साठवण्याचा प्रयत्न करता करताच काळवंडत चालला होता. ती खालीं सरकली. तिची कोर टेकडीच्या माथ्यावर क्षणभर विसावली व खालीं गेली. चंद्रकलेचीं दोन शकलें झालीं ! जाता जाता तिनें त्या टेकडीला दोन सोनेरी शिंगाचें वैभव बहाल केले, या विचाराने क्षणभर मौज वाटली, तरी खरोखरी तिच्या त्या विद्ध स्वरूपाच्या व्याकुळतेनेच मन व्यापून गेले. तीं टोके झपाट्यानें खालीं.. खालीं...जात होतीं. बोटभर...अर्धें बोट...आता नुसतेच दोन बिंदु ! ! '' बिंदुमात्र भासणारी ती चंद्रकलाहि क्षितिजाच्या कडेपलीकडे गेली. अंधार पसरला. पण त्यातहि प्रकाश भरून राहिला होता. अशा विचित्र निसर्गाचे वर्णन लेखिकेनें मनोरम केले आहे, त्यातच राजकीय पुढाऱ्याच्या तुरुंगवासानंतरच्या देशातील परिस्थितीचाहि रंग मिसळल्याने त्या वर्णनाला विचाराची घनता व सखोलता प्राप्त झालेली आहे. तें वर्णन असे—" ती दिसेनाशी झाल्यावर, क्षणभर सारें जग अंधारून आलें, तरी पुन्हा त्या चंद्रकलेच्या आकृतींत तोंवर सामावलेला प्रकाश आता अंधाराच्या कणाकणातून प्रस्फुरित होऊं लागला. तमाचे कण कण उजळले, प्रकाश आला नाहीं, पण अंधारहि राहिला नाहीं. तिथे केवळ चैतन्यच राहिलें. एखाद्या विराट आंदोलनाच्या नेत्याला काहीं काळ अज्ञातवास स्वीकारणे प्राप्त झाले, तर क्षणभर त्याचे सर्व कार्य लयाला गेल्यासारखे वाटतें, त्याची तपस्या वाया गेली, असें वाटूं लागतें. परंतु लवकरच त्याच तपस्येचे तेज समाजाच्या अनेक कणातून स्फुरूं लागतें. त्याच्याच मंत्राच्या नादाने दशदिशा मुखरित होतात. तो पुनः मोकळेपणाने वावरूं लागेपर्यंत जीवनाची

प्रसन्नता नाहींशी झाली, तरी त्या मधल्या अंधकारातहि धीरोदात्त वृत्तीचा विश्वास कायम राहतो. तसेंच त्या चंद्रकलेच्या विश्वात झालें होतें."

## मानवतेची हाक

'अप्सराची भेट' हा लघुनिबंध म्हणजे कल्पकता व विवेक याचा संगमच. शहरातील सधन व सुविद्य स्त्रिया खेड्यात जातात, पण कशाला? तर केवळ वन–भोजनाला. तेथील निसर्ग–सौंदर्याचें आकंठ पान त्या करतात, पण तेथील मानवाकडे पूर्ण दुर्लक्ष करतात. हा विरोध लेखिकेने कौशल्यानें चित्रित केला आहे. तिनेंच 'चंद्रास' या निबधात म्हटल्याप्रमाणे, "सृष्टीचीं काहीं गुपितें, तिच्या जीवनातले अत्युत्कट क्षण, तिच्याशीं वेळीं–अवेळीं साहचर्य ठेवणाऱ्या जीवानाच अनुभवायला मिळतात हेच खरें."

'अप्सराची भेट' या निबंधाचा प्रारभहि लघुनिबंधाला अनुरूप असा आहे. खेड्यातील एक शिक्षक मार्मिक व तटस्थ निरीक्षकाची भूमिका घेऊन म्हणतो, "मी होय! मी या पलिकडे दिसणाऱ्या खेड्यातल्या शाळेंत शिक्षक आहे. मन फार वैतागलं म्हणून कोसभर चालत येऊन या तलावाच्या काठाशीं बसलो आहे जरा. मी कसला हो कवि! मराठी सात इयत्ता व एक वर्ष ट्रेनिंगचं—एवढच आमचं शिक्षण. त्यात कुठें कविता करता येतात?"

निसर्गाचे सौंदर्य किती शातिदायक! त्याचा लाभ तरी गरीब ग्रामीण जनता का घेत नाहीं? असा प्रश्न त्या शिक्षकाला प्रथम पडतो. तो म्हणतो, "काळोखातल्या संधिप्रकाशात तो कुंदाचा ओथंबला बहर अन् मोगऱ्याच्या उमलत्या कळ्या ढगाआडून डोकावणाऱ्या लहानशा चांदण्यासारख्या चमकतात! त्याच्या सुवासानं मला तरी भोंवतालच्या वस्तुस्थितीचा थोडा वेळ पूर्ण विसर पडतो; पण त्याबरोबरच नेहमीं वाटतं, हें तरी सुख या इथल्या गावकऱ्यांनीं का लुटूं नये? त्याचा खरोखरच श्रमपरिहार होईल. या नाजूक, लाजाळू फुलाच्या सहवासांत राहून त्यांच्या अंतःकरणाचं स्वाभाविक मार्दव कायम राखलं जाईल; त्यांत आशेचा

जोम लुकलुकत राहील. रात्रीच्या त्या शात आकाशाखालीं पडून त्यांना शाति लाभेल. त्याच हृदयाकाशही तसंच विशाल होईल !! " हा निसर्गाचा शाति-प्रेमाचा सदेश ग्रहण करण्याइतकीहि स्वस्थता खेडूत जनतेच्या ठायीं नाहीं हे लेखिकेने सूचकपणें सांगितले आहे.

## ग्रामीण दुर्दशेचें चित्रण

खेड्यातील तळे खेड्यातील जनतेसारखेंच होते. त्या दोघाचे साम्य तो शिक्षक पुढील शब्दानीं सागतो, " सध्याची त्याची ही स्थिती किती केविलवाणी आहे. अगदीं आमच्या खेड्यासारखी. तिथलंही जीवन असच या डबक्यासारख झाल आहे. परिस्थितीन गति मारली—मन मारलीं—उत्साहाच्या ज्योति मालवल्या. शेतीचे सर्व व्यवहार चालू असतात, पण किती निर्जीवपणे ! एकेकाचे चेहरे पहावे हर कसे विझल्यासारखे दिसतात. एकामागून एक वाईट हंगामाचीं इतकीं वर्ष गेलीं, कीं पुन्हा आशेचं रोपटं लागायला त्याना मनच राहिलीं नाहींत. त्याचे दगड बनून गेले !"

या दगडी जीवनात, 'शिलावस्थे'तील आयुष्यात मानवतेची ज्योत पेटविणें किती अवघड ? याचें उत्तर लेखिका पुढील शब्दानीं देते, ' जिथं आशेला जागा आहे, जिथ कुठून तरी सहाय्याची अपेक्षा आहे, भोवतालीं कुणाला तरी जाणीव होण्याचा संभव आहे, तिथ प्रयत्नवादाला जागा आहे. पण जिथं माणुसकीची नीचतम परिसीमा झाली, तिथं झगडून काय करता ? तिथं मग निर्विकार, अचेतन शातीच बरी !"

वनभोजनासाठीं आलेल्या त्या अप्सराचे, त्या पऱ्यांचे, त्या भूषा-सुंदरींचें लक्ष दीन-दरिद्री खेडूताकडे जाते कशाला ? ते खेडूत कसे होते ? " सहजसवादी निसर्ग त्या वळवासारख्या चैतन्यौघानें प्रफुल्लित झाला; पण त्या लवलवत्या पानाच्या वृक्षांखाली मानवजात होती, त्या विहीरीच्या आसऱ्यानें मोटेच्या हौदावरही मानवी जात होती. कसे तरी होते त्यांचे चेहरे ! कांहींसे दूरत्वाच्या भावनेनें व्यापलेले-तर काहींसे विस्मयचकित कुतूहलानें, जिज्ञासेनें एकमेकाशीं बोलूं पाहणारे, तर संकोचानं, भीतीनें दडपलेले ..अगदीं स्तब्ध, केविलवाणे, उभेच उभे...!! " मानवांचेच

दोन समूह बंधुबंधूचें व बहिणीबहिणीचें नातें ! पण श्रीमंतीची इतकी खोल दरी त्या दोन मानव-समूहामध्यें निर्माण झालेली होती कीं, एकाची ओळख दुसऱ्यास नव्हती. " एकीनंही, आल्यापासून जाईपर्यंत, झाडाखालच्या मानवजातीकडे-मान वळवून पाहिल नाहीं. अप्सरा ना त्या." या शेवटच्या तीन शब्दानीं, शहरातील विलासी मानवावर लेखिकेनें किती तीक्ष्ण टीका केली आहे !

## यांत्रिक जीवनाचे नमुने

शहरातील यात्रिक जीवनातील नीरसपणा प्रकट करणारे दोन लघुनिबंध लेखिकेने लिहिले आहेत. कचेरी व घर या दोन खुटाभोंवतीं, घाण्याच्या बैलाप्रमाणे, दररोज फिरत रहाणाऱ्या एका कारकुनाचे मन त्या ठराविक जीवन—क्रमाविरुद्ध बड करून उठते, असे ' गवताचे पाते ' यात दाखविलें आहे. त्याच्या जीवनातील कंळीपणा व्यक्त करणारी सुरवातच अशी केलेली आहे कीं, " सदाशिवराव चालले होते—एकच होते सारे. पावणे अकरा वाजता ठराविक रस्त्याच्या एका कडेने कचेरीकडे आपल्या चाकाचीं लोटागणें घालणे व साडेपाच वाजता त्याच रस्त्याच्या दुसऱ्या बाजूनें उलट लोटांगणे घालणें, हे तिला (सायकलीला) देखील आता पुरते माहीत झालें होते. एखादा रस्ता ओळखीचा झाला कीं, गाडीवान झोपला, पानाच्या दुकानावर थाबला किंवा पाठीमागच्या खटाऱ्यात जाऊन गप्पा मारीत बसला, तरी बैल नाहीं का सरळ जात ? त्यातलीच एक पायरी पुढे गेले कीं, सायकलने सदाशिवरावाना बिनचूक कचेरींतून घरीं आणून सोडणे संभवते." तेच काम, तोच रस्ता, तेंच जेवण या तोच-तो-पणाचा कंटाळा येऊन सदाशिवराव मनात म्हणतात,

" जगात म्हणे काव्य आहे, सौदर्य आहे. कुणाला दिसेल तें ? माझ्यासारख्या त्याच चाकोरींतून पिळवटून निघणाऱ्या प्राण्याना ? आम्ही साधारणात जन्मलो,—साधारणात वाढलो; साधारणात उदरनिर्वाह करणार. आमच्या मृत्यूतदेखील कुणाला हेलावून सोडणारें कांहीं नसणार ! कशाला आहे हें जिणे...आम्ही कारकुनाचीं मुलें—कारकुनाचेच बाप होणार."

या विचाराच्या कोंडमाऱ्याने त्याचे आयुष्य भकास झालें, आयुष्य आळणी बनलें. "परिस्थितीच्या ठराविकपणामुळें त्याचे मन एकसारखें आकुचन पावत होतें. त्यांतील हवा कोंदाटून विषारी बनली होती. त्याच विषानें त्याची जीवनरुचि मारून टाकली होती."

## निसर्गाचा प्रभाव

मानवी जीवनाचे हे यत्र घराबाहेर पडले ते अगदीं त्रस्त-निराश स्थितींत. पण बाहेरील विशाल व प्रसन्न निसर्गाचा त्याच्या मनावर परिणाम झाला. वर असंख्य तारकानीं चमचमणारे अथाग आकाश आणि मार्गे प्रशस्त मैदानावर पसरलेला गवताचा ' काळसर हिरवा गालिचा.' हें सर्व सृष्टीचे वैभव पहाता पहाता सदाशिवरावाच्या मनातील सकुचितता व निश्चेतनता नाहींशी झाली. एक गवताचें पातें पाहूनहि त्याना त्यातील रसरशीतपणाची जाणीव झाली—आणि ते घरीं परतले ते नव्या आशेनें, ताज्या उत्साहाने आणि जीवनाचा प्रसन्न दृष्टिकोन घेऊनच. हें विचार-परिवर्तन सहा पानाच्या लघुनिबंधात स्वाभाविकपणे व चटकदारपणें वर्णन करण्यात लेखिकेने मोठे चातुर्य दाखविले आहे.

तसेच चातुर्य 'झिमझिम्' या निबंधातहि दृष्टीस पडते. शाळेत शिक्ष-काचे काम करणारी शांता आपल्या एकाकी जीवनाला विटली होती त्या जीवनाची कल्पना लेखिकेनें एकदोन प्रसंगावरून सहज आणून दिली आहे. शाळेतून घरीं आल्यावर तिचे एकेरी व ठरीव आयुष्य कसें सुरू होई हे सागताना लेखिका म्हणते, "पाच वाजता ती आपल्या दोन जोड-खोल्याच्या बिऱ्हाडासमोर उभी राहून कुलूप काढीत होती. कडी निघाली व इहलोकीच्या तिच्या सबंध संसाराचे दार उघडले गेलें. प्रत्येक वस्तु सकाळीं दहा वाजता जिथे होती तिथेच स्तब्धपणे उभी होती. टेबलावरच्या पुस्तकाची खडी ताजीम, वह्याची बैठक, तिरकस ठेवलेल्या घड्याळाचा कोन जसाचा तसा कायम होता. त्यासमोरची खुर्ची अर्धी टेबलाखाली सरकवलेली होती. कोपऱ्यातल्या पलंगावर घातलेल्या रगीत आच्छादनावर एकसुद्धा सुरकुती पडलेली नव्हती. भिंतीवर एकदोन चित्रें,

एकदोन तसबिरी होत्या. त्यावर बसायला दिवसभरांत एक चिमणीदेखील आली नसावी. सर्व आपापले काटकोन राखून, सरळ लटकत होत्या. त्यांत एक तिच्या भावाची होती.”

## मानवतेचें दर्शन

शाळेतील त्याच त्या कामाबद्दल शातेला पुढे गोडी वाटेना, उलट औदासीन्य वाटू लागले—तिटकाराहि आला. तिचे मन बंड करून उठले. ‘आजारी’ म्हणून तिनें शाळेत चिठी पाठविली व मनमोकळेपणे, स्वच्छंदाने वागावयाचे ठरविले. शातेच्या मनाचीं हीं सूक्ष्म स्थित्यंतरें लेखिकेने हळुवारपणे रेखाटली आहेत. तिच्या शाळेतील गैरहजेरीचा परिणाम मुलींच्या मनावर काय झाला हेहि कौशल्याने दाखविले आहे. ‘बाई’च्या आजारीपणाची चर्चा करतां करता त्याना सुख देण्याचा विचार, त्या मुलींच्या मनात उत्पन्न होतो आणि त्या सर्वजणीं एका मुलीबरोबर काहीं फुले पाठवितात. तीं फुले पाहताच शाताबाईचे मन ‘कृतज्ञतेने भरून आले–’ तिचे औदासीन्य पार गेले. सदाशिवरावाच्या मनाचा कोंडमारा गवताच्या पात्याने नाहींसा झाला, पण शातेच्या चित्तवृत्तीची कोंडी फोडण्यास मुलींच्या मनातील माणुसकी व तिचे प्रतीक बनलेल्या फुलातील निसर्ग या दोहींचा उपयोग झाला. शिक्षकीच्या सहाऱ्यातील हिरवळ म्हणजे विद्यार्थ्यांची भक्ति. तिच्यावरच सत्ता–वैभवशून्य असा शिक्षक कसा जगत असतो याचे मनोहर शब्दचित्र लेखिकेने शातेच्या रूपाने काढलें आहे. एक प्रकारे ही समाज–परिस्थितिवरच टीका नाहीं काय?

## ‘नवी स्त्री’

स्त्री-जीवनाच्या करुण-उदात्त छटा ‘माउली’ वगैरे लघुनिबंधातून लेखिकेनें उमटविल्या आहेत. सरस्वतीची कर्तव्य-निष्ठा सूचक पद्धतीनें त्यांनीं वर्णिली आहे. नवऱ्यानें व्यसनी बनून तिला टाकले व जिंदगीहि फुंकून टाकण्याचे ठरविलें, तरी सरस्वती साऱ्या घराण्याचा भार उचलीत होती, कारभार चालवीत होती, फार काय गावकऱ्यांच्या अडीअडचणीहि

दूर करीत होती. "गांवातल्या अगदीं क्षुल्लक माणसापासून सर्वांचे ससार सावरायचा प्रयत्न मी करते–सर्वांना नीतींचा उपदेश करते. माझा संसार कोण सावरून देईल?' असा प्रश्न तिचे मन तिला करते. तिची मैत्रीण लीला तिला माहेरीं नेण्यास येते. तेव्हा ती आपल्या पतीचे घर सोडून जाण्यास नाखूष असते. पण 'कशि या त्यजूं पदाला' म्हणणाऱ्या सिंधूची अशरण अवस्था तिची नाहीं. ती पतीबरोबर आपली समान-भूमिका मानते. त्या समानतेची जबाबदारी उचलण्याचे धैर्यहि ती दाखविते. ती लीलेला म्हणते, "एक भागीदार व्यवहार बुडवूं लागला, तर दुसऱ्यानें पळ काढायचा का त्याला बाजूला सारून आपल्या हातीं सूत्र घ्यायचीं?...भागुबाईची वृत्ति, लतेच जीवन मला कधींच पसत नव्हत," एक बाणेदार, स्वाभिमानी व कर्तबगार 'नवी स्त्री'च लेखिकेने सरस्वतीच्या रूपाने वाचकापुढे उभी केली आहे. "मानवी मनाचे चैतन्य व जोम राखावयाला निसर्गाच्या सौदर्याची किवा उदात्ततेची आवश्यकता" असते हें कुसुमावतींनीं 'गवताचीं पाने' वगैरे लघुकथा-मध्ये मार्मिकतेने दाखविले आहे. तसेच 'माउली' सारख्या कथा-मध्ये "एकाद्या साध्या व्यक्तीच्या अंतःकरणात आपल्याला अशा चैत-न्याचे व जोमाचे अखड झरे दिसून येतात," हा मानव–समाजातील अनु-भवहि सूचित केला आहे.

## भावपूर्ण कथाच !

विचाराचे प्राधान्य असल्याने अशा लेखाना 'निबध' म्हणता आलें, तरी त्यात 'कथे'चा अश पुष्कळच आहे. पिसारा, वादळ, पिटोरी अमावस्या, इत्यादि लेख तर शुद्ध लघुकथाच आहेत. उत्तम कथामध्ये जेवढे विचारसूत्र असते, तेवढेच त्यामध्येहि आहे. खरे लघुनिबध असे कुसुमावतीबाईंनीं थोडेच लिहिले आहेत. बहुतेक कथा–मिश्रित निबंध आहेत. कथेला अवश्य ते भावनाचे भाडार आणि निबंधाला जरूर ती विचाराची तार्किकता या दोन्ही गुणाचा सांठा त्याचे ठायीं विपुल आहे. त्याचा वापर मात्र त्या फार जपून करतात एवढेच.

## कलाकाराचें कर्तव्य

कुसुमावतीबाईंच्या लेखणींत भावनापूर्ण लघुकथा व विवेकपूर्ण निबंध—दोन्हीहि यशस्वीपणे लिहिण्याचे सामर्थ्य असल्याचा 'विसार' तेवढा त्याच्या आजवरच्या लेखनाने दिलेला आहे. "श्रेष्ठ कलाकाराला नेहमींच कांहीं तरी सांगायचें असतें. ज्याची त्याला प्रचीति आली, जें त्याच्या जिवाला जाऊन भिडले, जें अव्यक्तपणे पण उत्कटपणें त्याला पटलें, ते व्यक्त करण्यासाठीं त्याची धडपड असते. निवेदन, अनुभवाचे दान, हे त्याचें मुख्य कार्य असते." असे त्याचे विचार—सूत्र आहे. त्यास अनुसरून आपल्या 'अनुभवाचें दान' करण्याचे कामीं त्या यापुढें औदार्य दाखवितील काय ?

## अभ्यासाच्या वाटा

(१) 'लघुनिबंधातहि कुसुमावती आपल्या काव्य—कल्पनेची चमक दाखवितात;' या काव्य—कल्पनेचीं उदाहरणें द्या

(२) कुसुमावतींनीं रंगविलेल्या निसर्ग—चित्रापैकीं कांहीं चित्रें लेखिकेच्याच शब्दात रेखाटा.

(३) 'शहरी जीवन निसर्ग सौंदर्याचें भोक्ते आहे, मानवतेकडे मात्र त्या जीवनानें पाठ फिरविली आहे,' कुसुमावतींच्या लघुनिबंधाच्या आधारें हें विधान स्पष्ट करा.

(४) कुसुमावतीच्या लघुनिबंधात स्त्री—जीवनाचें चित्रण कोणत्या प्रकारचें आलें आहे ?

(५) यंत्रयुगाबद्दल खांडेकर, काणेकर व कुसुमावती देशपांडे यांनीं व्यक्त केलेले विचार एकत्र लिहा. त्या विचारात कांहीं साम्य—वैषम्य आहे का ?

## या पुस्तकांतील
## लेखकांचीं कांहीं वाचनीय पुस्तकें



★

# शिखरे-वाङ्मय

## चरित्रें

| | रु. आ. |
|---|---|
| म. गांधींचें चरित्र | ८— ० |
| गांधी—जीवन—कथा | ३— ० |
| राष्ट्र—पिता गाधीजी | १— ० |
| गाधी—रण—गीता | १— ० |
| राष्ट्र—जनक टिळक | १— ४ |
| लोकमान्य टिळक | ०— ८ |
| सुधारकाचार्य आगरकर | १— ८ |
| डॉ. राधाकृष्णन | ०— ८ |

## प्रबंध

| | |
|---|---|
| गांधीजींचे रामराज्य | १— ० |
| साम्राज्य व स्वराज्य | १— ० |
| सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म | ०—१२ |
| आजकालचे साहित्यिक | १— ० |

## कादंबरी

| | |
|---|---|
| थोरली आई | १— ८ |
| आईची कृपा | १— ० |
| भावनाचा नाच | २— ० |
| जिवलग | १— ८ |

## नाटकें

| | |
|---|---|
| वैष्णवजन | १— ० |
| आठ साल | १— ० |

## लघुकथा

| | |
|---|---|
| क्राति—किरण | १— ० |
| गंगेचे थेंब | २— ० |

विनोदकार

# अ नु क्र म

## श्री. कृ. कोल्हटकर : : : १

जेवणांत जसे मीठ, तसा साहित्यांत विनोद. एखाद्या उपवनांत चिमणासा झरा झुळझुळतांना दिसला म्हणजे जितका आल्हाद होतो, तितका वाङ्मयात विनोदी भाग वाचावयास मिळाला म्हणजे होतो.



संसारात बालकाचे मनोहर हास्य कोणाला रिझवीत नाहीं ? तेंच आनंद फुलविण्याचे कार्य विनोदाचे आहे. वाचकाच्या कपाळींची आठी मोडून त्याच्या ओठावर स्मिताची लकेर पसरविणारा विनोद सर्वांनाच आकर्षित करूं शकतो. मराठी–वाङ्मयांत विनोदाची शाखा पल्लवित होण्यास इंग्रजी साहित्याचा संपर्क कारण झाला. पाश्चात्य लोक जात्याच प्रवृत्तिपर दृष्टीचे, खेळाडू वृत्तीचे व विनोदी स्वभावाचे. इंग्रजींत डिकन्स, फ्रेंचमध्यें मोलियर, अमेरिकनमध्ये मार्कट्वेन–यासारखे हास्यरसाचे सम्राट त्या त्या साहित्यांत निर्माण झाले. ‘ युरोपियन वाङ्मयाचा पायाच विनोदावर उभारलेला आहे ’ असें मि. चेस्टर्टन म्हणतात. त्या मानानें मराठींतच काय, पण संस्कृतांतहि विनोदाला स्थान कमी शृंगार, वीर व करुण हे तीन रसच प्रमुख मानले जातात. बाकीचे हास्यादि सहा रस आनुषंगिक–पांडवामधील नकुल-सहदेवाप्रमाणें गौण. “ हास्य हा स्वतंत्र रसच नव्हे ” असें म्हणण्यापर्यंत भरतमुनींनीं मजल मारली आहे. तथापि मनुष्यस्वभाव जात्याच थोडाफार

विनोदी असतो. ' हंसणारा प्राणी तो मानव ' अशी व्याख्या करण्याइतकें तें त्याचें वैशिष्ट्य आहे.

## लोकशाहींत विनोदाला वाव

पशु-पक्षी इत्यादि मानवेतर प्राण्याना हास्याची देणगी देवाने दिलेली नाहीं. मानवाच्या जीवनात मात्र ती उपजत प्रवृत्ति आहे. या प्रवृत्तीचा विकास मानवाच्या बुद्धीबरोबर होत असतो. ही बुद्धि जितकी स्वतंत्र व विकसित असेल, तितका मनुष्य आपल्या जीवनात आशा व आनंद निर्माण करूं शकतो. वस्तुमात्रातील विरोध शोधून काढणे हें विनोदाचे उगम-स्थान. हें विरोध शोधण्याचे काम सूक्ष्म व स्वतंत्र बुद्धिच करूं शकते. प्रत्येक व्यक्तीला बुद्धि-स्वातंत्र्य लोकशाहींत मिळते. व्यक्ति-स्वातंत्र्य व समतेची भावना या तत्त्वावर उभारलेल्या लोकशाहींत विनोदी वृत्तीला खूप वाव मिळतो. याचे पुरावे इग्लंड व अमेरिका या देशात आढळतात. तेथील वाङ्मयात हास्यरसाला प्रमुख स्थान प्राप्त झालेले आहे. किंबहुना, विनोद हें मानवी संस्कृतीचें विशिष्ट लक्षण आहे असे तेथे मानलें जातें. सुसंस्कृत माणूस विनोदी वृत्तीचाच असतो. तो जगाकडे विशाल व खेळाडू दृष्टीने पहातो. अर्थात् या विनोदाचा स्फोट, ज्याच्यात्याच्या अभिरुचीप्रमाणें सातमजली हास्याच्या स्फोटापासून ओठावरील सूक्ष्म स्मितापर्यंत असेल.

## प्राचीन वाङ्मयांतील हास्यरस

संस्कृतातहि हास्याच्या आविष्काराचे सहा प्रकार कल्पिले आहेत. संस्कृत वाङ्मयात हास्यरसाला स्वतंत्र व महत्त्वाचें स्थान दिलेले नसलें, तरी त्या रसाचे ओघ, ओहोळ व पाझर थोडथोडे सर्वकालीं आढळतातच. ऋग्वेद हा जगांतील सर्वांत प्राचीन ग्रथ. त्यातील मंडूकसूक्त हास्यरसानें थबथबलेलें आहे. संस्कृत नाटकातील ' विदूषक ' हा तर हास्याचा ठेकेदारच. काहीं स्वतंत्र विनोदी खंडकाव्येहि संस्कृतात आहेत. पण एकंदर प्रमाण पहातां, हास्यरस हा गीर्वाण वाणीचा नावडता पुत्रच दिसतो.

संस्कृत वाङ्मयात विनोदाचा विभाग एकशतांशहि नाहीं—आणि जो अल्पस्वल्प विनोद आहे, तो शृंगारराजाचा चोपदार म्हणूनच आहे—त्याला खुलावट आणण्यापुरताच आहे. आणि मराठींत? "याहि वाङ्मयात संस्कृताप्रमाणेच हास्यविनोद शोधून शोधून, खरवडून—खरवडून काढावा लागतो" असा निष्कर्ष श्री. न. चिं. केळकर यानीं आपल्या "हास्य-विनोद-मीमासा" या ग्रंथात माडला आहे. मराठींतील आद्य गद्य ग्रथ म्हणजे महानुभावाचे 'लीलाचरित्र'. त्यांत विनोद आहे, पण अगदीं बिंदुमात्र. प्राचीन मराठी वाङ्मय मुख्यतः संतानीं रचलेलें. त्याचे विषय अध्यात्मपर. त्यात बाडेवार भक्तीचा वा वैराग्याचा. विनोदाचा कोठला? तरी तुकाराम—नामदेवाच्या काहीं काहीं अभंगांतून विनोदाची लकेर ऐकूं येते. एकनाथानीं तर भारूड वगैरेंमध्यें हास्याचे फवारे जोराने उडविले आहेत. पण एकदरींत मराठी मनच मुळीं तार्किक व गंभीर. खडकाळ प्रदेश व दरिद्री परिस्थिति यामुळें हिशेबी बनलेल्या मराठी मनाच्या बंदिस्त दालनात हास्यविनोदाच्या खेळाना वाव कोठला!

## "मराठीचे विनोदाचार्य"

इंग्रजी वाङ्मयातील स्वतंत्र विनोदी लेखन वाचून मराठी लेखकाना आपणहि तसें लिहावे अशी स्फूर्ति झाली. त्या स्फूर्तीचा प्रकट प्रवाह वाहविण्याचें श्रेय श्री. कृ. कोल्हटकर यानाच आहे. त्यांनीं मुख्यतः सामाजिक सुधारणेचा प्रचार करण्यासाठीं विनोदाचें शस्त्र वापरले आणि हिंदु समाजातील जुन्या चालीरीतींवर तें गोड हत्यार यथेच्छ चालविलें. त्यांच्यापूर्वी मालाकार चिपळूणकर किंवा प्रिं. आगरकर हे उपहासादि साधनांनीं आपल्या निबंधाना विनोदाचा खमंगपणा आणीत असत आणि नाटकांतहि विनोदी पात्रांचा धुडगूस चालू असे. पण विनोद हाच प्रधान विषय समजून त्याचा विस्तार आपल्या लेखांतून स्वतंत्रपणें करणारे कोल्हटकर हेच "मराठीचे विनोदाचार्य" ठरतात. त्यांची शुद्ध विनो-दाची परंपरा गडकरी—अत्रे—प्रभृतींनीं पुढें चालविली आहे. शब्दनिष्ठ विनोद हा तर सर्वांना सुलभच असतो. पण प्रसंगनिष्ठ, स्वभावनिष्ठ व

कल्पनानिष्ठ अशा विनोदाच्या एकापेक्षां एक चढ पायऱ्याहि हे तीन विनोद-वीर चढलेले आहेत. कोट्या, श्लेष, अतिशयोक्ति, विसंगति, उपहास इत्यादि साधनांनीं विनोद निर्माण करणारीं स्वतंत्र पुस्तकेहि थोडीफार फुलूं लागलीं. 'संशयकल्लोळा 'पासून ' अंमलदारा 'पर्यंतच्या नाटकातील प्रसगच मुळीं हास्योत्पादक आहेत. ' भावबंधना 'तील प्रेमळ व खेळकर धुंडिराजाचा स्वभाव हा विनोदाचा सर्वश्रेष्ठ नमुना. त्याला कारुण्याची व उदात्तपणाची धार दिल्याने तर तो विनोद रसिकाचें चित्त प्रसन्न व उन्नतहि करतो. विनोद-विषयाबद्दल तिटकारा उत्पन्न न करता अनुकंपा निर्माण करणारें हास्य हेंच सुसंस्कृत होय. ' डोळ्यात असू व ओठांत हसूं ' असा त्याचा दुहेरी परिणाम होतो.

## विनोदाची उच्चनीचता

शृंगार व अश्लीलता याच्या सरहद्दी जशा एकमेकींना लागून आहेत, तशाच विनोद व निंदा यांच्या सीमाहि सलग्न आहेत. हिमालयातून वाट चालतांना एक पाऊल घसरले कीं, खोल दरींत आदळून कपाळमोक्ष होण्याचेच भय असते, तसेंच सभ्यतेची रेषा ओलाडली कीं शृगाराला अश्लीलतेची कळा येते व विनोद हा टवाळकींत जमा होतो. तसें होऊं न देण्याचें पथ्य मराठींतील फारच थोड्या विनोदकारानीं पाळले आहे. टोल्याला टोला आणि शिवीला शिवी देणारा लेखकच विनोदी म्हणून कैकवेळां मानला जातो किंवा दुसऱ्याची टवाळी व कुचेष्टा करणाराहि विनोदाचीं पिसें लावून मोराप्रमाणें हिंडतो. पण शुद्ध हास्य-रस याहून फार वेगळा आहे. जीवनातील विरोध व विसंगति पाहून रागावण्याऐवजीं हसणें, अपयश आलें असतां निराश न होता खेळकरपणानें त्याचा स्वीकार करणें आणि मनाचा तोल कायम राखून जीवनाचा रथ शातपणें व आनंदीपणे हाकणें हें विनोदकारांचें कर्तव्य आहे. बुद्धीच्या चमत्कृतीपेक्षां व शब्दाच्या कसरतीपेक्षां भावनेच्या मोकळेपणावर व उल्हसितपणावरच खरा विनोद अवलंबून असतो.

## विनोदाची फलश्रुति

विनोद ही एक जीवनाकडे पहाण्याची वृत्तिच आहे. केवळ बुद्धीच्या चापल्यानें, एका शब्दाचे अनेक अर्थ करून, हशा पिकविणें हें काम ' कोटी ' ( Wit ) करते. पण विनोदाचे कार्य यापेक्षां व्यापक आहे. जगातील घडामोडीमधील विसंगति बारीक नजरेनें हुडकून काढून ती लोकापुढें मार्मिकपणें माडण्याची कामगिरी विनोद करतो. आयुष्यांतील साऱ्या व्यवहाराकडे हसऱ्या, खेळकर वृत्तीनें पहाणे व त्या सर्वांतून आनद वेचणे हें विनोदाचे कार्य आहे. समाजाच्या नानाविध कृतींतील लपून बसलेले दोष आपल्या बुद्धीच्या प्रकाशात विनोदाच्या चिमट्यानें पकडून ते लोकासमोर हसतखेळत माडणे व ते दोष दूर करण्यास त्यास प्रवृत्त करणें ही विनोदाची फलश्रुति मानली जाते. दाभिकपणा, जीर्ण रूढि वगैरे सामाजिक व्यंगावर शस्त्रक्रिया करण्यापूर्वीं विनोदाचा क्लोरोफर्म देणे सुखाचें असनें. पण अगदीं अलीकडे, असा काहींहि हेतु मनात न धरता विनोद करण्याचा सप्रदाय पाश्चात्य राष्ट्रात उत्पन्न होत आहे. ' विनोदासाठीं विनोद ' निर्माण करणाऱ्या या संप्रदायाला ' Nonsense ' असेंच नाव दिलें जातें. चार घटका खो खो करून तुम्ही हसला कीं, त्या विनोदाचें काम झालें. त्यामुळे तुमच्या मनावरील कारुण्याचा ताण कमी झाला किंवा गाभीर्याच्या गाठी उलगडल्या कीं खलास ! टेकडीवरून किंवा समुद्रकिनाऱ्यावरून मोकळी हवा खाऊन येणें आणि अशा विनोदाने पोट धरधरून हसणें या दोहोचा उपयोग सारखाच. सुट्टीच्या, सणाच्या वृत्तींत तेव्हा आपण प्रवेश करतो. त्यामुळें आपल्या आयुष्याला नवी गोडी, नवी उमेद, नवा मोकळेपणा, नवा उत्साह येतो.

## समाज-सुधारणेचें साधन

आगरकरानीं निबंधांतून, आपट्यांनीं कादंबऱ्यांतून आणि केशवसुतानीं काव्यांतून सामाजिक सुधारणेचा जसा प्रचार केला, तसा विनोदाचार्य श्री. तात्यासाहेब कोल्हटकर यांनीं आपल्या नाटकांतून केला. विनोद

आणि नाट्य—हीं केवळ रंजनाचीं कोमल साधनें. पण कोल्हटकरांजवळ त्या जणुं दोन तोफा होत्या—त्यांतून निघणारे गोळे जीर्ण मताचे व दुष्ट रूढींचे किल्ले जमीनदोस्त करीत. अस्वल गुदगुल्या करून आपणाला ठार मारतें म्हणतात, तसें कोल्हटकराचें, टीकागर्भ विनोदी लेखन विरोधकाना हसतां हसतां नामोहरम करीत असे. त्यांच्या लेखनाचें बाह्यांग जितकें हास्यकारक, तितकेंच त्यांचें अंतरंग क्षोभकारक. त्याच्या विनोदी लेखाच्या पोटींहि सामाजिक सुधारणेची तळमळ असे. विनोदी लेखाचा स्वतंत्र संप्रदायच त्यानीं मराठींत निर्माण केला. हास्यरसाचे ते बादशहा होते आणि गडकरी व अत्रे हे त्याचे माडलीक होत.

नाट्य व विनोद या दोन्ही क्षेत्रात आपलें स्वतंत्र पीठ निर्माण करणारे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर नागपूर येथे ता. २९ जून १८७१ रोजीं जन्मले. त्यान्चें बालपण बुल्ढाणा व अकोला येथे गेले. सहावें वर्षीं त्यांची आई वारली. तथापि त्याच्या सापत्न आईनें त्याचें संगोपन मोठ्या वात्सल्यानें केले. त्याचें स्मरण ठेवून श्रीपाद कृष्णानीं आपलें पहिले नाटक 'वीर-तनय' आपल्या सापत्न मातेस अर्पण केले. त्यांचे वडील उमरावतीस प्रथम हायस्कूलमध्यें शिक्षक होते. पण पुढे सरकारी नोकरींत शिरले व कारकुनापासून असिस्टंट कमिशनरच्या जागेपर्यंत चढले. नाटकाचा नाद लहानपणापासूनच श्रीपादाला होता. मराठी पाचवींत असतानाच त्यांनीं एक एक संगीत नाटक लिहिलें आणि इंग्रजी पाचवींत असताना 'सुख-मालिका' नावाचें नाटक लिहिलें. शास्त्रीबुवाच्या 'निबंधमाले'चीं त्यानीं पारायणावर पारायणें केलीं. त्यामुळे त्यांना मातृभाषेची सेवा करण्याची स्फूर्ति मिळाली. शास्त्रीबुवाचे बंधु लक्ष्मणराव हे त्यांना शिक्षक होते. इंग्रजी नाटकें व कादंबऱ्या याचा फडशा हायस्कूलमध्यें असतानाच त्यांनीं पाडला. १८८५ सालीं ते विवाहबद्ध झाले व १८८८ मध्यें ते मॅट्रिकमधून मुक्त झाले. नंतर ते पुण्यास आले व डेक्कन कॉलेजांत दाखल झाले.

## नाट्य व विनोद

तात्यासाहेब केळकरहि त्यावेळीं त्या कॉलेजांत होते. दोघांचीहि आवड

एकच असल्यामुळें त्याची मैत्री जमली व ती पुढें पुढें वाढतच गेली. दोघांनींहि कॉलेजच्या संमेलनातील नाटकांत कामें केलीं. 'मृच्छकटिकां-तील विटाचे काम कोल्हटकरांनीं केलें. दोघेहि खंदे टीकाकार, मार्मिक विनोदकार आणि सामाजिक विषयात सारखेच पुरोगामी. केळकरांना लोकमान्याचा सहवास लाभला आणि त्यामुळें राजकारणात प्रतिष्ठाहि मिळाली. उलट कोल्हटकर १८९१ मध्यें बी. ए. झाल्यावर १८९७ सालीं एल्‌एल्. बी. होऊन, अकोला–खामगाव–जळगाव अशा आड-गांवीं वकिलीकरिता राहिले. पण त्या कोपऱ्यांत राहूनहि त्यांनीं जी नाट्याची व विनोदाची निर्मिति केली, ती स्वतत्र संप्रदाय स्थापण्याइतकी महत्त्वाची ठरली.

नाटकाशिवाय कविता, लघुकथा व कादंबऱ्या याहि कोल्हटकरानीं रचल्या आहेत. 'बहु असोत सुंदर' हें सर्वतोमुखीं झालेले महाराष्ट्र–गीत कोल्हटकराचेच. 'सुदाम्याचे पोहे' हा बत्तीस विनोदी लेखांचा त्यांचा संग्रह लोकप्रिय झालेला आहे. ज्योतिषावरहि यानीं एक ग्रंथ लिहिला आहे. सागली येथें १९१८ सालीं भरलेल्या ज्योतिष–संमेलनाचे ते अध्यक्ष होते. पुणें येथें १९२२ सालीं भरलेल्या कवि-संमेलनाचे ते अध्यक्ष होते. नाट्य-समेलनाचेंहि अध्यक्षपद त्याना देण्यात आलें होतें. १९२७ सालीं पुणें येथें भरलेल्या 'महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे' अध्यक्षस्थान त्यांनीं भूषविलें. मंदमंद होत चाललेली व अर्धांगवायूची काजळी धरलेली, त्यांची जीवनज्योत १९३४ सालीं विराम पावली.

## आनंद-निर्मिति व समाज–सुधारणा

कोल्हटकरांनीं १९०२ पासून १९२२ सालापर्यंत वीस वर्षांत बत्तीस विनोदी लेख लिहिले. या लेख-संख्येवरून व एक श्लेष साधून या विनोदी लेखांच्या संग्रहाला "साहित्य–बत्तिशी" असें नाव देण्यात आलें. त्याचप्रमाणें त्यांनीं सर्व लेखात सुदामा नांवाची सनातनी व्यक्ति आपले अनुभव सांगत आहे, अशी भूमिका घेतली असल्यामुळें या लेख-संग्रहाला "सुदाम्याचे पोहे" असेंहि नांव दिलेलें आहे. पांडुतात्या व बंडूनाना

हे सुदाम्याचे दोन मित्र कल्पिलेले असून या त्रिकूटांच्या साध्याभोळया, बावळट, क्वचित् आचरटहि लीलांमधून कोल्हटकरानीं हास्य–रस पिकविलेला आहे.

केवळ हास्य–रस पिकविणारे कुलूप, आमचे बैठे खेळ, चोरांचें संमेलन, साहित्य परिषदेची तयारी, म्हातारपणचे कायदे, मुंबईचा दीपोत्सव, मुंबईचे प्रदर्शन, साक्षीदार, गवई, इत्यादि लेख आहेत. ‘ लेखनकलेचीं स्थित्यंतरें, ’ ह्यासारखे काहीं लेख गभीरच आहेत. ते लिहिताना लेखकानें आपला विनोदाचा मुखवटा काढून बाजूस ठेवलेला दिसतो.

या दोन वर्गांशिवाय कोल्हटकरानीं आपल्या विनोदाचा जो तिसरा वर्ग पाडलेला आहे, तो दुहेरी स्वरूपाचा आहे. सामाजिक सुधारणाविषयक आपल्या विचाराचें वाहन म्हणूनच त्यांनीं विनोदाचा तेथें उपयोग केला आहे. हे प्रचारी लेख जितके विनोदी तितकेच जहरी आहेत. हे लेख म्हणजे दुधारी तरवार आहे. ती एकीकडे वाचकांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु काढते, पण त्याचवेळीं त्याच्या मर्मस्थानांतून रक्तबिंदुहि काढते. प्रिं. आगरकरानीं ‘ हे भीषण, बीभत्स, अमंगल हिंदुधर्मा ! ’ असे रोखठोक आव्हान सडेतोड भाषेंत देऊन त्या धर्मांतील खुळ्यावेड्या चालीरीतींवर सरळ व निकराचा हल्ला चढविला; तर कोल्हटकरानीं तेच जळजळीत विचार हास्यानें खदखदणाऱ्या भाषेने मांडले.

शिमगा, प्रेतयात्रा, परलोक, विधवाचें केशवपन इत्यादि किती तरी विषय दोघाचे समान आहेत आणि त्यावरील दोघाचे विचारहि समानच आहेत. पण एकाच्या लेखणींतून त्वेषाच्या व आवेशाच्या ठिणग्या उडत आहेत; तर दुसऱ्याच्या कलमांतून वक्रोक्ति, उपहास वगैरेंचीं रंगीबेरंगी फुलें निघत आहेत. आगरकरांची छातीठोक टीका ऐकून सनातनी वाचक क्षुब्ध होईल व क्षोभ ओसरल्यावर विचारास प्रवृत्त होईल. कोल्हटकराच्या टीकेचीं वाघनखे विनोदाच्या मखमली हातमोजाखालीं झांकलेलीं असल्यानें त्याच्या ओचकाऱ्यांची जाणीव होत असताहि वाचकाच्या हसून हसून मुरकुंड्या वळतील, पण हास्याचा पूर ओसरल्यावर त्याच्या डोक्यात विचारांचीं चक्रें फिरूं लागतील. एकाचें धर्मयुद्ध

आहे, तर दुसऱ्याचा गनिमी कावा आहे. एकाला लोकक्षोभ सोसावा लागला, समाजाची अप्रियता पदरीं घ्यावी लागली पण नवविचारांचे प्रवर्तक म्हणून महान कार्य करता आले; तर दुसऱ्याला लोकप्रियता लाभली, साहित्यात प्रतिष्ठा मिळाली आणि ‘ विनोदाचार्य ’ ही पदवी प्राप्त झाली. एकानें पुराणमताभिमानी समाजाची बुद्धि जागी केली, तर दुसऱ्याने त्याच्या हृदयात कालवाकालव निर्माण केली.

## कोल्हटकरांची भूमिका

“ मी आजपर्यंत आपल्या धर्मांतील व आचारातील असमर्थनीय प्रकारसुद्धा नवीन व बिनतोड प्रमाणानीं नटवून व अनेक वेळीं वडाची साल पिंपळास लावून सुधारकापुढे माडीत आलो आहें ” अशी आपली भूमिका ‘ माझे टीकाकार ’ या लेखांत सुदामा माडीत आहे. सुदामा हा ‘ प्रच्छन्न सुधारक ’ आहे हें बिंग लोकानीं ओळखले. तेव्हा सुदाम्यानेंहि आपले पांघरूण फेकून आपले खरें मत स्वच्छ शब्दानीं पुढीलप्रमाणें माडलें आहे. “ रूढि हीच आमच्या आचारांची नियामक होऊन बसली आहे ...प्रत्येक समाजाच्या चालीरीती त्याच्या तत्कालीन परिस्थितीस अनुरूप असाव्या लागतात....रूढीच्या सबबीवर तरुण जर रागूं लागला...तर तें शोभेल कां ? ” हा प्रमुख विचार माडण्यासाठीं, कोल्हटकर म्हणतात, “ माझ्या पुराणमताभिमानी वाचकांच्या शिव्याशापांचा उपसर्ग मला स्वतःस लागूं नये म्हणून ‘ सुदामा ’ या नावाचा मानसपुत्र उत्पन्न केला.’ सुदाम्याच्या नकली मूर्खपणाचेंआडून हिंदूच्या सनातनी रूढीवर आपण शर-संधान का केले याचें कारण त्यानीं जे दिले आहे, तें कोणासहि पटण्यासारखें आहे. पाश्चात्य वेडगळ चालीवर टीका का करीत नाहीं ? या आक्षेपास उत्तर देतांना ते लिहितात, “ आपलीं व्यंगें पाहून जसें अंतःकरण तुटतें, तसें इतरांच्या व्यंगांनीं तुटणें केवळ अशक्य आहे. ” कोल्हटकराचें अंतःकरण आपल्या समाजासाठीं तुटत होतें हें खरें, पण त्यांच्या विनोदाच्या शस्त्रानें कधींकधीं समाजाचें अंतःकरण तुटलें गेलें हें विसरतां कामा नये. आपल्या देवधर्मांतील न्याय्य, बुद्धिग्राह्य व हितकारी

भाग कोणता व वेडगळ चालीं कोणत्या याचा सहानुभूतिपूर्वक विचार त्यांनीं केला नाहीं. त्यामुळें काहीं कांहीं लेखांना निष्कारण कटुता व तीक्ष्णता आली.

## शाब्दिक कसरती

श्लेष, कोटया वगैरे शब्द-लीला करून खसखस पिकविणें हा कोल्हटकरांच्या हातचा मळ असे. " द्रौपदी ज्याप्रमाणें कर्णाला भाळली त्याप्रमाणे आम्हीहि लबकर्णाला भाळणारच. " ' मी आपल्या अंकगणितात पित्याचा अंक शोधू लागलो,' ' सुधारकाच्या दांत विचकण्याबद्दल आमचा एकदत देव त्यांची बत्तिशी एक दिवस पाडील, ' इत्यादि वाक्यात कर्ण, अंक, दात या शब्दावर श्लेष साधून हास्य निर्माण केले आहे. तसेंच एकटया दांताचे निरनिराळे प्रयोग करून किती भिन्नभिन्न अर्थ साधतां येतात हें कोल्हटकरानीं ' म्हातारपणचे फायदे ' यात दाखविले आहे. ते लिहितात, " ठेंच लागून पडल्यास दात पडण्याची म्हाताऱ्यास मुळींच भीति नसते. शिवाय म्हाताऱ्यावर ' दात कोरून पोट भरण्याचा ' कोणी आरोप ठेवीत नाहीं, किंवा ' याच्यापाशीं दातावर मारण्यास एक पैसाही नाहीं. ' असा दारिद्र्याचाही आळ त्याजवर येत नाहीं. दुसऱ्यावर ' दांत ठेवण्याचा ' किंवा 'दातीं तृण धरून शरण जाण्याचा' संशयही त्याच्याबद्दल कोणी घेत नाहीं. त्याने कोणाची कितीही आगळीक केली, तरी त्याला त्याजकडून ' बात्तिशी रंगविण्याची ' धमकी मिळत नाहीं. त्यानें कोणाचा कितीही उपहास केला, तरी त्याला ' दांत कां विचकतोस ? ' असें म्हणण्याची छाती होत नाहीं. तसेंच त्यानें सांगितलेली गप्प केवळ ' दंतकथा ' आहे असें त्याच्या तोंडावर कोणासही सांगतां येत नाहीं; व त्याचीं गालफडें बसलेलीं असल्यामुळें ती ' कपोलकल्पित ' आहे असेंही म्हणवत नाहीं."

' वस्तादजींचें न येणें हेंच माझ्या रोगावर वस्ताद औषध ' असे श्लेषहि मनमुराद आहेत. याशिवाय जोडा ( पादत्राण, दांपत्य ), महिषी

( राणी, म्हैस ), समाचार ( सात्वन, पारिपत्य ), व्हिक्टोरिया ( राणी, वाहन) इत्यादि श्लेषाची खैरात सर्वत्र आहे.

अशा शब्दाच्या गंमती वाचतांना प्रथम एकदां वाचकांच्या बुद्धीला गुदगुल्या होतात. पण अशी बुद्धिनिष्ठ कोटी ही पुनः पुनः आनंद देऊं शकत नाहीं. शब्दाच्या अनेक अर्थाचा उपयोग कोल्हटकरानीं विनोदासाठीं विविध प्रकारानीं केला आहे. ‘ भाषा व इतिहास ’ या लेखांत अतिष्ट व्युत्पत्ति शोधणाऱ्याची त्यानीं चेष्टा केली आहे. ‘ मचव्यातून आले म्हणून मत्स्य’ अशा मूर्खपणाच्या व्युत्पत्त्या, केवळ ध्वनिसाम्यावरून, जे बसवितात, त्यांची रेवडी उडविण्यासाठीं कोल्हटकरांनीं या लेखात काहीं शब्दाचीं कुळें अशीं सांगितलीं आहेत. हृदय ( हृ = हरण करणें, दया = करुणा ) = निर्दय, मस्तक ( मस्त ) = मादक पदार्थांनीं मस्त असणारा अवयव; श्वश्रू ( श्व = उद्या, श्रू = ऐकणें ) = सुनेनें केलेली विनति जिला उद्या ऐकूं येते ती. छात्र ( छत्र = छत्री ) = गुरूवर छत्री धरणारा.

## अपेक्षा–भंगांतून हास्य

अपेक्षा–भंग आणि अतिशयोक्ति या दोन पायावरच विनोद बहुधा सर्वत्र चालत असतो. लहान मुलानें डोक्यावर आजोबाचें पागोटें घालून व हातांत काठी घेऊन, वाकत वाकत व खोकत खोकत चालण्यास प्रारभ केला कीं, आजूबाजूची मंडळी खो खो हसूं लागतात. ‘शारदा’ नाटकांतील वल्लरी म्हाताऱ्या नवऱ्याचे सोंग करते, तेव्हा प्रेक्षकाची हसून हसून मुरकुडी वळते, याचे कारणहि हा अपेक्षा–भंगच. उलट एकादा म्हातारा लहान मुलाचें टोपडें घालून रागूं लागला, ‘ घोडा, घोडा ’ करू लागला, तरीहि हशा पिकतोच. कारण लहानाने जें करावें अशी आपली अपेक्षा, ती पहिल्या प्रकारच्या दृश्यांत जशी फसते, तशीच वृद्धाकडून आपण करीत असलेली अपेक्षाहि दुसऱ्या प्रकारात भंग पावते-आणि म्हणून त्यातून हास्य निर्माण होतें. असे अपेक्षा–भंगाचे सुखद धक्के कोल्हटकर जाता येता देतात. मृच्छकटिकांतील शकाराप्रमाणें, जुन्या घडामोडींची उलथापालथ ’भाषा व

इतिहास' यात त्यांनीं पुढीलप्रमाणें केली आहे. " शहाजीस मी एकदा अकबरशहाचा बाप बनविले व त्याजकडून खर्ड्यांची लढाई लढवून त्याच्या विजयी समशेरीच्या साहाय्यानें त्या लढाईत शिकंदर बादशहाचा फडशा उडविला ! "

## अमर्याद अतिशयोक्ति

विनोदासाठीं अतिशयोक्ति अलंकाराचा तर कोल्हटकर वर्षावच करतात. अंतर्गोल व बहिर्गोल आरशात माणूस जसा खूप लठ्ठ किंवा खूप उंच दिसतो; तसा चमत्कार विनोदाच्या सृष्टींत होतो. स्वप्न-सृष्टि व विनोद-सृष्टि—या दोहोंतहि स्वाभाविकता व संभवनीयता पहावयाचीच नाहींत. हीं नेहमींचीं बंधनें तोडून, कल्पनेच्या पंखावर बसून लेखक किती उंच उंच जातो व काय काय गंमती दाखवितो हें पाहताना हसूं येतें. अशी अतिशयोक्ति करण्यात कोल्हटकर दुसऱ्या कोणास फारसे हार जाणार नाहींत. 'याचक' या लेखात कोल्हटकर लिहितात, "एके समयीं नानांकडे चार भिक्षुक, तीन पुराणिक, दोन शास्त्री, दोन गवई, दोन कथेकरी, एक ज्योतिषी, एक अष्टावधानी व एक बहुरुपी इतके पाहुणे गोळा झाले होते; आणि त्यानीं आपल्या अनियमितपणाने, भाडखोरपणाने, लोचटपणानें व खादाडपणानें साऱ्या घरात गोंधळ माजवून दिला होता. "

'साक्षीदार' या पहिल्या लेखात साक्षीदाराच्या अचाट स्मरण–शक्तीचीं उदाहरणे अतिशयोक्तीने दिलीं आहेत. कोल्हटकर लिहितात, " दुसऱ्या एकानें लहानपणीं पाळण्यात ऐकलेल्या वांटणीसंबंधाच्या गोष्टी चाळीस वर्षांनंतर अचानक न्यायसभेपुढें आणिल्या ! यापलीकडचे उदाहरण कृष्णाच्या भाषणास हुंकार देणाऱ्या गर्भस्थ अभिमन्यूशिवाय एकही आढळणार नाहीं अशी माझी खात्री आहे. "

सुदामा टेनिस खेळूं लागला तेव्हां त्याचे प्रताप काय झाले, याचें वर्णन 'आमचे बैठे खेळ'मध्ये कोल्हटकरांनीं पुढीलप्रमाणें केले आहे. " कोणाची बत्तिशी तर कोणाची चाळिशी, कोणाची पगडी तर कोणाची बरगडी, स्थानभ्रष्ट करण्याचा आमच्या चेंडूनीं सपाटा लाविला. आमच्या

टेनिसच्या आखाड्यापासून अर्ध्या मैलाच्या टापूत बॅट घेतल्याशिवाय कोणीही फिरकेनासा झाला. तेव्हांपासून मूल खोड्या करीत असल्यास आई आमच्या चेंडूचा धाक दाखवू लागली, व घोडा पाणी पीत नसल्यास घोडेस्वार त्यास ' तुला पाण्यात टेनिसचा चेंडू दिसतो की काय ? असा प्रश्न विचारूं लागला. "

टेनिसनंतर बुद्धिबळ खेळण्याचा नाद या त्रिकूटाला लागला. तो नाद किती बेसुमार होता, याचें वर्णन कोल्हटकर पुढील अतिशयोक्त भाषेनें करतात, " एकदां मी खेळता खेळतां कुटलेली सुपारी तपकीर म्हणून ओढल्याचें व तपकीर सुपारी म्हणून तोंडात टाकिल्याचे आठवतें; दुसऱ्यांदां तर मी विडी म्हणून उटच तोंडात धरून पेटवूं लागलो होतों. पांडूतात्यानीं एकदा सबंध हत्ती सुपारी म्हणून तोंडात टाकिला, आणि तो दातानीं फुटेना म्हणून दुसरा हत्ती अडकित्त्याने कातरून गट्ट केला."

## विविध कलांचें ज्ञान

खेळाप्रमाणेच चित्रकलेचाहि नाद या त्रिमूर्तीला लागला. एका गांवठी नाटकमडळीच्या पडद्यावर हे तिघे मित्र खूष होते. त्या पडद्यावरील चित्रकला कशी होती ? तर–" उन्हाळ्यात शाकुतलातील उपवनाचे पडदे दोन बाजूंना सोडून त्यांमध्यें बसल्यास आम्हांला उन्हाची मुळींच बाधा होत नसे, व हिंवाळ्यात हरिश्चद्र नाटकांतील वणव्याच्या पडद्यासमोर आम्ही प्रहारन्प्रहर हात शेकीत बसत होतों. "

' चित्रकार ' या लेखांत पांडुतात्यांच्या चित्रकलेची महती गमतीनें गाइली आहे त्यांच्या चित्रांचा परिणाम प्रेक्षकांवर किती जबरदस्त होई हें सांगताना कोल्हटकर म्हणतात, " त्याचीं देवादिकांचीं चित्रें पाहून लोक नास्तिक होण्याच्या बेताला आले. त्यांचीं सुंदर स्त्रियांचीं चित्रें पाहून भावी कवींच्या प्रतिभा बाल्यावस्थेंत करपून खाक होऊं लागल्या ! त्याचें रतीचें चित्त पाहतांच प्रेक्षकांची बोबडी वळून ' रति ' ऐवजीं ' हिडंबा ' हा शब्द त्यांच्या तोंडांतून चुकीनें निघूं लागला. "

सुदाम्यानें संगीताची साधना कशी केली याचा इतिहास ‘ गवई ’ या लेखांत मौजेनें सागितला आहे. टर्रेहुसेनखा सुदाम्याला संगीताचे धडे कसे देत, तें ऐका—“ गाण्यांतील मूर्छना म्हणून जो प्रकार आहे तो मला चागला साधावा म्हणून ते मला खरोखरीची मूर्छना येईपर्यंत यथेच्छ मार देऊन रडवीत असत, खटका यावा म्हणून माझी शेंडी धरून जोरानें हिसका देत व तान चागली यावी म्हणून हिंवाळ्यात सकाळीं पाठीवर थंड पाण्याच्या घागरी ओतीत असत. ”

त्याच लेखात गवयाना काहीं सूचना केल्या आहेत. त्यात शब्द-निष्ठ विनोदहि साधलेला आहे. तो भाग असा—“ गाण्यापूर्वीं दोन तास विण्याच्या किंवा सतारीच्या तारा जुळविण्यात किंवा तबला लावण्यात दवडावे. कारण तारा चढविताना आपण श्रोत्याची उत्कंठाही त्याच मानानें चढवित असतो हें पक्के समजावें. कधीं कधीं ती अगदीं तुटण्याच्या बेतास येते. गवई तंबुऱ्याच्या खुऱ्या पिळीत असतां किंवा तबल्यावर थाप देत असता कितीकदा तरी त्याचे कान पिरगळण्याची किंवा गालावर थप्पड देण्याची इच्छा श्रोत्याच्या मनात झालेली दिसून येते ! ”

## अतिशयोक्तीचा कळस

‘ झोप ’ या निबंधात पाडूतात्याच्या झोंपेचे विनोदी प्रकार अतिशयोक्तीने वर्णिले आहेत. त्याचें नुसते घोरणे कसे असे हे कोल्हटकर पुढील शब्दांनीं सांगतात, “ त्यांच्या घोरण्यामुळे त्यांच्या जवळपासच्या इसमांचा जरी डोळ्यास डोळा लागत नाहीं तरी त्यानें त्याची स्वतःची कधींच झोंपमोड झाली नाहीं. त्यांच्या घोरण्याच्या आवाजात चिलटाचें गुणगुणणें लोपून जातें, त्याचप्रमाणें घड्याळाचा गजरहि लोपून जातो... त्या स्वरांत कुत्र्याचें भुंकणे व गस्तवाल्याचा साद दोन्हीहि गडप होतात.”

नानांच्या घराचें कुलूप फोडलें, त्यामुळें नानांच्या मनावर काय परिणाम झाला याचे अतिशयोक्तीचें वर्णन पहा—“आम्हीं स्वतः लोहारास बरोबर घेऊन नानांच्या घरीं गेलों व तें कुलूप एकदाचें फोडिलें. पण त्यामुळें नानाचा आमच्यावर इतका घुस्सा झाला कीं, ते पुढें पंधरा दिवस-

पर्यंत आमच्याशीं नीटपणें बोलेनातच! तीन दिवस तर त्यांनीं त्या मोडक्या कुलपाकरितां अशौच्य धरिलें होतें!"

अतिशयोक्तीची कमाल मर्यादा कोल्हटकरानीं "वर्तमानपत्रकर्ता" या लेखात गाठली आहे. थापेबाज जाहिरातीवर सरळ टीका करण्याऐवजी ते लिहितात, "माझ्या छापखान्यातील एका इसमास सधिवात झाला होता, तो त्यावरील औषधाच्या जाहिरातीवरून रूळ फिरविल्यानेंच बरा झाला. तसेंच माझ्या नोकरापैकीं एक कुणब्याचा मुलगा तोतरे बोलत असे, त्याला त्यावरील औषध देऊन पाहिलें तेव्हा त्याचा तोतरेपणा समूळ गेला, इतकेंच नाहीं, तर तो मराठी भाषा शुद्ध बोलू लागला. कोडावरील मलमाची जाहिरात माझ्या पत्रात ज्या जागीं नेहमीं असते, ती जागा दर आठवड्यास कमी कमी पाढरी होत चालली आहे; आणि रक्तपितीवरील औषध एका महारोग्यास देऊन पाहिलें, तेव्हापासून त्याचा रोग समूळ नाहींसा झाला आहे, कारण ते रामबाण औषध पोटात जाण्याला व त्याचा प्राण बाहेर येण्याला एकच गाठ पडली."

## वकिलींतील अनुभव

कोर्टातील बहुतेक साक्षीदार थापेबाज असतात, पढविलेले असतात. त्यांची लबाडी वर्णन करून सागताना कोल्हटकर म्हणतात, "कधीं कधीं चोराने घरात शिरून कडी लाविली असताही साक्षीदाराची चाहूल ऐकताच त्याने कडी उघडून न त्याला आत घेऊन नंतर त्याला साक्षी ठेवून चोरी केल्याचे आमच्या ऐकिवात आहे!"

पोटांत खोटेपणा डाचत असल्यानें साक्षीदार वर पाहून जबाब देत असतो. त्याच्या या क्षुद्र कृतीला लेखकानें किती उच्च कारण जोडलें आहे, पहा—"साक्षीदार जबानी देताना बहुतकरून वर आढ्याकडे पहात असतो; जणूं काय आपला खरेपणा जाहीर करण्याकरिता तो त्रिकालज्ञानी ईश्वरास आव्हानच करीत आहे."

भिन्नभिन्न साक्षीदारांच्या असत्यांतून किती गंमतीची विसंगति निर्माण होते, हें कोल्हटकर पुढील शब्दानीं निवेदितात, "विवक्षित प्रसंगीं

कोणती वेळ होती असें त्यांना विचारल्यास एकाचें प्रातःकाळ तर दुसऱ्याचें संध्याकाळ असें मत पडेल, व तिसऱ्याचें मत त्या वेळीं रात्र झाली असून प्रकृत साक्षीदाराशिवाय सर्व गाढ झोंपेंत होते असें पडेल ! तीन साक्षीदारांत अशी त्रेधा होण्यासारखें मतवैचित्र्य !............आम्हीं चौघां साक्षीदारास एका घडलेल्या प्रसंगाच्या काळाविषयीं विचारलें असतां एकानें शपथेवर ( साक्षीदार शपथेशिवाय तोंडातून ब्रही काढीत नाहींत. ) असें सागितलें कीं, त्या प्रसंगीं पावसाची मुसळधार सुरू होती; दुसऱ्याने सागितलें, थडी पडल्यामुळें चोहोंकडे आगट्या पेटल्या होत्या, तिसऱ्यानें वसंतपूजा चालली असून चादण्यात अगास उट्या लावीत असल्याचे निक्षून सागितले ! ''

स्वत: कोल्हटकर वकील असल्यानें कोर्टांतील लफडीं व कुलंगडीं त्याना चांगलीं ठाऊक होतीं. तीं आपल्या सूक्ष्म बुद्धीने वेचून व स्मृतीवर कोरून त्यानीं अशा विनोदी शैलीने वाचकापुढे ठेवलीं आहेत कीं, कोणालाहि त्या लबाड साक्षीदाराचा राग येण्याऐवजीं हसूच लोटावे.

## काव्य-कल्पनेची रम्यता

केवळ एकाचे दहा व दहाचे शंभर-अशी अतिशयोक्ति करण्यास मोठेसें कौशल्य लागत नाहीं. ' एक हात लाकूड, दोन हात ढलपी ' असें सोघळें बोलणे साधेभोळे खेडवळहि बोलतात. ' मिया मूठभर, दाढी हातभर ' अशा अतिशयोक्तीनेहि विनोद निर्माण होतो, पण तो उथळच म्हटला पाहिजे. त्याच्या पोटात रमणीय काव्य-कल्पना, उदात्त विचार किंवा सहानुभूतीची भावना भरलेली असेल; तरच तो विनोद उच्च प्रतीचा समजला जातो. कोल्हटकर हे प्रतिभाशाली नाटककार असल्यानें त्याच्या विनोदाचा प्रांतहि काव्य-कल्पनेनें झळाळलेला आहे. समाजसुधारणेचा प्रागतिक व बुद्धिवादी विचार तर बहुतेक सर्वच लेखांतून स्फुरण पावत आहे. सहानुभूतीनें थबथबलेले भाग मात्र कोल्हटकरी विनोदांत फारच थोडे आढळतात. आपल्या विरोधीपक्षीयांची खूप फटफजिती करून त्यांचा पाणउतारा करण्याचीच त्यांची वृत्ति आहे.

प्रतिपक्ष्यासुद्धा सर्व जगाकडे प्रेमळ दृष्टीने व आनदी मुद्रेनें पहाण्याची संवय त्याना फारशी नाहीं.

कल्पना-विलासाच्या दृष्टीने ‘ आमचे बैठे खेळ ’मधील राणीचे वर्णन पहा—“ पत्त्याच्या डावातील एकटी राणी जरी घेतली तरी तिच्या डोळ्यात मत्स्य, गतींत कूर्म, कटींत नारसिंह, बाध्यांत वामन, हृदयात परशुरामाचा परशु, भिंवयात रामाचे धनुष्य, काळ्या व कुटील केसांत कृष्ण, गळ्यात बौद्धाचा शंख व जिव्हेत कलकीची तरवार, याप्रमाणें बहुतेक सर्व अवतार तिच्या ठायीं वसत असतात. ”

“ उच्चनीच कल्पनातील विरोध हेच विनोदाचें सर्वस्व ” असें कोल्हटकराचें मत होते. ‘ हजामतीची नीतिमीमासा ’ या नावातहि असा विरोध आहे. हजामतीच्या कलेत इतर कलाचा त्रिवेणी-संगम कसा झाला आहे हे उसन्या गाभीर्यानें सागताना कोल्हटकर म्हणतात,—खरें म्हटलें तर हजामत ही चित्र, नाट्य, गायन इत्यादि कलामध्यें एक उच्च व मूर्धस्थानापन्न कला आहे. हातीं वस्तरा घेऊन रक्तानें डोकें रगविणारा न्हावी कुंचलें घेऊन रगविणाऱ्या चिताऱ्यापेक्षा कमी आहे असें म्हणतां येणार नाहीं. तसेच हातीं आरसा देऊन सगळ्या तोंडास साबणाचा फेस लावणे व पात्राच्या तोंडास रग देऊन सजविणें यातही फारसे अतर नाहीं. डोक्यास पडणाऱ्या जखमामुळे विव्हळणाऱ्या मनुष्याचे रडगाणें जर हिशेबात घेतले तर गाण्याचाही भाग अस्पृश्य नसतो, असें कोणासही शपथ घेऊन म्हणता यावयाचे नाहीं. ”

आमच्या स्त्रियाचे जीवन सकुचित असतें, हा विचार “माझ्या भीष्म-प्रतिज्ञेचा विजय ” या लेखात शास्त्रीय परिभाषेनें कसा माडला आहे, पहा, “ स्वैपाकघर, माजघर हाच आमच्या बायकाचा खरा भूगोल आणि घरातील गाऱ्हाणीं व शेजाऱ्याच्या नालस्त्या हाच त्याचा खरा इतिहास आहे. पक्वानें करणें हेंच त्याचें रसायनशास्त्र, आणि कुंकू लावणें व गोंदणे हीच त्याची चित्रकला आहे. पतीचें हृद्गत जाणणें हें त्याचें गणित, आणि चाळणें, पाखडणें, व निवडणें हें त्याचें तर्कशास्त्र होय.”

## विरोधाभासाची मौज

' भविष्य कथनाचीं साधनें ' या लेखातील विरोधाभासाचा पुढील नमुना हास्यकारक आहे—" वेधशालासही अशी वाझ भाकितें करण्याची भारी हौस ! त्याची सगळी इमारत वातावणावर उभारलेली असावयाची. तेव्हा ती बऱ्याच वेळा वाऱ्याच्या हेलकाव्याबरोबर सत्यापासून दूर गेलेली आढळल्यास नवल नाहीं. जेव्हा वेधशाला अनावृष्टीचें भाकीत करते तेव्हा सर्व सृष्टि अतिवृष्टीमुळे जलमय झाली म्हणून समजावें; व तिने पावसाचें भविष्य केले म्हणजे लागलीच सगळे जग वायूशास्त्रवेत्याच्या डोक्याप्रमाणे कोरडे ठणठणीत पडतें."

' गवई ' हा लेख शुद्ध विनोदी आहे. सतारीची तार वाजूं लागताच श्रोत्याना किती आनंद वाटतो, हें कोल्हटकर मार्मिक विरोधाने सागतात, " तारायंत्राची तार एका ठोक्याबरोबर निराशेस हद्दपार करिते किंवा आनंदाचे उच्चाटन करिते. विद्युत्यत्राची तार एका धक्क्यासरशी सजीवास निर्जीव करिते व निर्जीवास सजीव बनविते. इमारतीच्या वर डोकावून पहाणारी तार खुद्द विद्युल्लतेस जलसमाधि घ्यावयास लावते. सतारीची तार एका झणत्काराबरोबर हजारो श्रोत्यास स्वर्गसुख देऊन तिच्या अगदीं उलट कृति करते."

' यात्रिक चमत्कार ' या लेखात कोल्हटकरानीं आपल्या कल्पनाशक्तीला स्वैर सोडले आहे. शतपावली करणें, लहान मूल कडेवर घेणे, दात घासणे, व्यायाम करणे, स्वयंपाक करणें, जेवण वाढणे, फार काय, ' शिंक आल्याबरोबर नाकातील सगळा खजिना दुसऱ्यावर हजाऱ्याप्रमाणे न उडवितां नाकास पदर लावणे',–इत्यादि दैनदिन कामाचीं यत्रें कशीं काढता येतील याच्या तपशीलवार योजना मोठ्या कल्पकतेने या लेखात दिलेल्या आहेत. यंत्रकलेचा पल्ला किती मोठा आहे हे विरोधाभासाच्या साहाय्याने कोल्हटकर पुढीलप्रमाणें सागतात, " एका मिनिटास शेंकडो प्राण घेणाऱ्या बंदुका आणि एका जाभईबरोबर शेकडों शरीरें छिन्नभिन्न करणाऱ्या तोफा मनुष्याच्या कल्पकतेचेच फळ असून त्या आग-

गाड्यांच्या व आगबोटींच्या सख्ख्या बहिणीच होत. एका वर्गांतील बहीण या जगातल्या एका प्रदेशाहून दुसऱ्या प्रदेशास पोहोंचविते, व दुसऱ्या वर्गांतील बहीण या जगातून दुसऱ्या जगात पोहोंचविते, इतकेंच काय तें या दोन वर्गांमध्ये अंतर आहे."

## यांत्रिक काव्यावर टीका

नमुन्यासाठीं सुदाम्याचे काव्य-यत्र पहा. "काहीं दिवसानीं जर कवितेचेंही यत्र निघाले तर त्यात मोठेसे नवल वाटावयास नको ! आता एका पेटींत कोशातील सारे शब्द घालून ते एकादा दाडा फिरविल्यानें निरनिराळ्या वृत्ताच्या साच्यात पडावे अशी योजना त्या यंत्रात करावी लागेल......अशा कवितेत दाडा फिरविणाराच्या तोडातील तबाखूच्या रसापेक्षा निराळा रस सापडण्याचा सभव जरा कमी आहे हे मला कबूल आहे, पण या यत्राबरोबरच्च रासिकाच्या डोळ्यातून पाणी काढणारीं व त्याच्या बरगड्या हलविणारीं यत्रे काढून तीं अनुक्रमे त्याच्या डोळ्यास व कार्खेत अडकविल्यास ही उणीव दूर होईल अशी खात्री आहे." अशा यंत्रातून कशा स्वरूपाचे काव्य बाहेर पडेल ? तर "पाला नाला जोडा फोडा । बाबा काका मामा आत्या ।" याचा अर्थ काय ? तर "बागेत पुष्करिणीजवळ नायिका नायकाच्या काळ्या मिशा पाहून आनंदित झाली." हा अर्थ कसा निघतो ? याचें जे वर्णन कोल्हटकरानीं केले आहे, ते वाचकाच्या हसून हसून मुरकुंड्या वळविणारे आहे.

## स्वभावांतील विसंगति

झोंप, लग्न, कुलूप—किती नित्याचे विषय. सर्वसामान्य लोक झोप घेतात, लग्न समारंभ पाहतात आणि कुलपें लावतात—उघडतात. पण त्या मामुली प्रसगांतूनहि विसंगति कोठें दिसतें, हे कोल्हटकरासारखा एकादाच प्रतिभावान लेखक पाहतो आणि अतिशयोक्तीच्या, शब्द-लीलाच्या व काव्य-कल्पनाच्या साहाय्यानें नटवून—थटवून ती विसंगति अशा खुबीनें वाचकाच्या डोळ्यापुढें ठेवतो कीं, त्याला त्यातून नवेंच सौंदर्य, नवाच अर्थ दिसूं लागतो.

एक झोप घेतली कीं तिचे भोक्ते किती नानाविध असतात हें कोल्हट-करांनीं सविस्तर सागितलें आहे. त्याचप्रमाणे त्या झोपेचे शत्रु जे ढेकूण, त्यांच्या लीला कशा अजिंक्य आहेत हेंहि गंमतीने वर्णिले आहे. ढेकूण ‘ गनिमी काव्याची ’ लढाई कशी करतात, आणि त्या लढाईत नामोहरम होऊन सुदाम्यानें सहकुटुंब काशीयात्रा कशी केली, परत आल्यावर ढेक-णानीं चवताळून मारा सुरू केल्यामुळे सुदाम्यानें घरोघर ढेकूण वाटण्या-साठीं दौरा कसा काढला, पण घरोघरचेच ढेकूण त्याच्या बंडीअंगरख्यांत कसे शिरले, शेवटीं ‘ आपल्या हातानें घरावर निखारा ठेवून ’ सुदामा बायकामुलासह एकेका वस्त्रानिशीं घरातून बाहेर कसा पडला—इत्यादि पराक्रमांचा बोलपट पहाताना कोणास हसू लोटणार नाहीं ? बङ्गनानानीं तर ढेकणाना कटाळून “ आत्महत्येचा निश्चय केला. त्यानीं एकदा मोठ्या कड्यावरून उडी मारली. पण उडी मारिताना कड्याच्या पायथ्याशीं पोहो-चेपर्यंत डोक्यास ऊन्ह लागू नये ( ते दिवस उन्हाळ्याचे होते. ) म्हणून त्यानीं जी छत्री उघडून हातात घेतली होती तिच्यामुळे त्याचा हेतु सिद्धीला गेला नाहीं. दुसऱ्या एका खेपेस तळ्यात बुडून जीव देण्याचा निर्धार करून ते तळ्यापर्यंत गेलेही. ते दिवस हिवाळ्याचे असल्यामुळे पाणी बर्फासारखें थंडगार झाले होते. बङ्गनानानीं उडी मारण्यापूर्वीं पाण्यास हात लावून बाघितला, तों त्याच्या अंगावर शहारे आले. ते पाहून नानानीं आपला बेत पुढील उन्हाळ्यापर्यंत तहकूब ठेविला. ” यातील अतिशयोक्ति जितकी हास्यकारक, तितकाच नानाचा भोळेपणाहि. मनुष्य—स्वभावातील भोळे-पणा, विसरभोळेपणा, मूर्खपणा, छादिष्टपणा - असे एकेक दोष म्हणजे विनोदाची एकएक खाणच होय.

## जीर्ण चालींचा उपहास

सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रात आपल्या मताविरुद्ध जे लोक होते, त्याचा उपहास कोल्हटकरानीं अनेक लेखातून केला आहे. शिमग्यासारख्या बीभत्स चालीवर कितीहि सरळ व सडकून टीका केली, तरी सनातनी समाज ती चाल सोडीत नाहीं. तेव्हा उपहास करून कोल्हटकरांनीं त्या

रानटी चालींतील मूर्खपणा उघड केला आहे. ‘ शिमगा ’ या लेखाचा प्रारभच उपहासप्रचुर आहे. तो असा–“ आपल्या धोरणी पूर्वजांनीं आपल्या हिताकरिता ज्या कित्येक उपयुक्त संस्था काढल्या त्यापैकींच शिमग्याचा सण ही एक आहे ” हा सण पूर्वापार रूढीप्रमाणें पाळल्यानें कोणते फायदे होतात, हें शास्त्रीय स्वरूपात माडण्याचा आव आणून कोल्हटकरांचा मानसपुत्र सुदामा म्हणतो, “ चोहोंकडे होळ्या पेटविल्याने हवा स्वच्छ होते, पाचजन्य केल्याने फुप्फुसें साफ होतात व शेणाच्या शिडकाव्यानें आरोग्य वाढतें हें कोणीही कबूल करील. ” शिमग्याचा कार्यक्रम जोरदारपणें व व्यवस्थितपणें पार पाडण्यासाठीं बड्डूनाना काय करीत ? तर “ गणपतीच्या मेळ्यातील पोराना जशी कवाईत शिकविली जाते, तशी शिमग्याकरिता पोरें तयार करितानासुद्धा त्याना एकेका रागेत पाचपाच अशी उभीं करून मोहरक्यानें शीळ फुकल्याबरोबर पाचजन्याची सरबत्ती एकदम कशी उडवावी याची तालीम चागल्या रीतींनें देण्यात येते. ”

या विषयाच्या विवेचनात आजूबाजूच्या जुन्या चालीरीतींचाहि समाचार याच लेखात घेतलेला आहे. रेशमी मुकट्यांत वीज असते, हें कळल्यापासुन सुदाम्यानें काय युक्ति केली पहा, “ जेवणाच्या पाटाजवळ एक लहानसें छिद्र पाडून त्यात लाबवर पोहोंचेल अशी एक तार विकत आणिली. तेंव्हापासून ती तार माझ्या करगोट्याला अडकवून व छिद्रांत सोडून नंतर मी पाटावरच मुकटा नेशीत असे व हें रहस्य इतराना समजूं नये म्हणून अंगावर शालजोडी घेऊन जेवावयास बसत असें. ” रेशमी वस्त्रात वीज असते, या तत्त्वावर सोंवळ्याचे समर्थन कोणी करतात. त्याचा फोलपणा अतिरेकाने ( Reductio ad Absurdum ) सिद्ध करताना कोल्हटकर लिहितात,–“ वाटे, कीं न जाणों निऱ्या करता करता वीज चमकून तिनें मला भस्म करून टाकिले, तर माझे देशहिताचे विचार जागचे जागींच राहतील. माझ्या स्वतःच्या जिवाबद्दल मला मुळींच पर्वा नव्हती; पण माझ्या देशाबद्दल मला वारंवार हळहळ वाटे, असो. याप्रमाणें मीं विजेच्या भीतीनें दोन दिवस आजाराचें मिष करून ओवळ्यानेंच अन्न खाल्लें. ”

## लोकभ्रमावर प्रहार

माजर आडवे जाणें, विधवा समोर दिसणें वगैरे अपशकुन मानण्याच्या मूर्ख चालीरीतींवर 'मालाकार' चिपळूणकरांनीं कोरडे उडविले आहेतच, पण कोल्हटकराच्या विनोदाचा रेशमी चाबूक कसा आहे पहा—" प्रथम युद्धाच्या रसद, तोफखाना, रिसाला, पायदळ या खात्याच्या जोडीस शकुन व भाकीत हीं खातीं निर्माण केलीं पाहिजेत. पुनः शकुनखात्याचीं विधवाखातें, माजरखाते, पालखाते शिंकखातें इत्यादि पोटखातीं करून त्याजवर योग्य सर्कसवाल्याच्या किंवा इतर अधिकाऱ्यांच्या नेमणुकी केल्या पाहिजेत. सैन्याच्या जशा कवायती होतात तशा विधवाच्या, माजराच्या, पालींच्या वगैरे झाल्या पाहिजेत. भाकीत–खात्यात फलज्योतिष सामुद्रिक, रमल इत्यादि निरनिराळीं पोटखातीं करून त्यावर हुषार तज्ञाच्या नेमणुकी केल्या पाहिजेत. "

अशा पोकळ व आचरट रूढीबरोबरच, गणेशोत्सवासारख्या चैतन्यदायक प्रथेवरहि त्यांनीं आपलें उपहासाचे शस्त्र चालविलें. लो. टिळकांनीं सुरू केलेल्या या उत्सवातील क्रांतिकारकता चिरोलने ओळखली, पण तणाबरोबर फुलवेलीहि कापणाऱ्या माळ्याचा आवेश कोल्हटकराच्या सुधारकी लेखणींत शिरला. गणपति-उत्सवात तोंडपाटिल्की करणाऱ्या शब्दशूर व्याख्यात्याची टर उडविण्यासाठीं कोल्हटकर 'गणेशचतुर्थी' या लेखात लिहितात, " हल्लीं गणपत्युत्सवात जे वक्ते धर्माभिमानाविषयीं नुसत्या तोंडाच्या हात हात लांब गप्पा मारतात, ते जर हातभर शेपूट लावून व अंगावर काळेपिवळे पट्टे ओढून नाचू लागतील तर धर्मास अधिक बळकटी येईल अशी माझी समजूत आहे. "

बडूनाना सनातनी, अस्पृश्यता पाळणारे. हें त्यांचें व्रत किती काटेकोरपणें चाले याची माहिती 'धर्मांतर' या लेखात पुढीलप्रमाणें दिली आहे, " आमचे बंडूनाना तर वर्णव्यवस्थेचे नियम पाळण्यात इतके दक्ष आहेत, कीं ते अतिशूद्राचा स्पर्श झाल्यास ज्याप्रमाणें सचैल स्नान करितात; त्याप्रमाणें महार–मांगांच्या खात्यात रकमा मांडिल्यावर लेखणीचें टोंकही

पाण्यानें धुवून टाकितात. त्यानीं त्या कामाकरिता एका निराळ्या दौतीची योजना केली असून त्या अस्पृश्य दौतीची त्याच्या कलमदानावर सावली पडणार नाहीं, इतक्या अतरावर ती ठेवण्याची ते नेहमीं खबरदारी घेतात.”

हुंड्याच्या चालीवर कितीकानीं दातओठ खाऊन टीका केल्या आहेत. पण हिरव्या ताटाने गुराला मारावे म्हणजे मार खाता खाताहि तें ताट चाटीत असते, त्याप्रमाणे सुदाम्याची विनोदी टीका सुखदायक आहे. ‘लग्नसमारभ’ या निबधात सुदामा म्हणतो, “ नुकतेच मी महाराणी व्हिक्टोरियाचे चरित्र वाचलें होतें. त्यात त्याचे अलौकिक गुण वाचून माझ्या मनावर इतका काहीं ग्रह झाला, कीं तेव्हापासून मला त्याच्या मुखवट्याचा सग्रह करण्याचा फार नाद लागला. किती तरी वेळा कुळा-कडून रक्कम आल्यावर मी तासचे तास राणीसाहेबाच्या मुखाकडे राज-भक्तीने सद्गदित होऊन पहात बसलों आहें ! राणीसाहेब तर आम्हांला सोडून गेल्याच, त्याच्या रौप्यमय प्रतिमाचा तरी वियोग होण्याचा मजवर प्रसग न येवो ! ”

## रूढीवर टीका

‘चित्रगुप्ताचा जमाखर्च’ या लेखात श्रीगजाननासमवेत त्याच्या उंदरा-वरच बसून सुदामा परलोकाचा प्रवास करतो, तेव्हा त्याचे मित्र बंडूनाना व पाडुतात्या हेहि पापपुण्याचीं गाठोडी पाठीशीं बाधून आलेले त्याला दिसतात. जप-तप, उत्सव–समारभ, व्रत-वैकल्यें इत्यादि त्याच्या धार्मिक कृत्याच्या नावाने चित्रगुप्ताच्या वहींत जमेच्या बाजूस एकहि आकडा पडला नाहीं, उलट अतिशूद्राची मरणापासून केलेली मुक्तता व अनाथाश्रमास दिलेली देणगी या परोपकाराचीच गणना पुण्यात झालेली होती; असें या लेखांत दाखविले आहे. लेखातील परलोक–प्रवासाची कल्पना व त्याची विनोदी भाषाशैली यामुळें वाचक शेवटपर्यंत हसत असतो --आणि लेख सपल्यावर व हंसे ओसरल्यावर त्याच्या बुद्धींत लेखकानें खऱ्या धर्माचें जें स्वरूप सूचित केलें आहे, त्याचा प्रकाश पडतो.

सनातनी समाजाची कुचेष्टा करण्याची पराकाष्ठा ‘भविष्य–कथनाचीं

साधनें' या लेखांत कोल्हटकरानीं केली आहे. ते भविष्य सांगतात, " आजपासून पाचशें वर्षांनीं हिंदुस्थान देशातील प्रजासत्ताक राज्याच्या· तर्फे शंकरमामंजी युरोपवर राज्य करतील व विधवा-केशवपन, असंमत वैधव्य वृद्ध-बाला-विवाह, सहगमन, जातिभेद वगैरे आर्यसंस्था तेथे स्थापून जारीने अमलांत आणतील; स्त्रियाना शिक्षणामृत पाजल्यास जलसमाधीची व ओंवळ्यानें जेवल्यास अग्निकाष्ठ भक्षण करण्याची शिक्षा सुनाविली जात जाईल, आणि गणपतीची थट्टा केल्यास हत्तीच्या पायीं तुडविलें जाईल. "

## विडंबनाचे नमुने

साधा कुलूपाचा विषय घेतला, तरी कोल्हटकर त्यावर विनोदाची इमारत उठवितात व त्या इमारतींत उपरोधाचा दारूगोळा ठासून भरतात. याचा एक नमुना-" इतर कुलपे मात्र विवाहाच्या बाबतींत आर्यभूमीस पूर्णपणें शोभण्यासारखींच असतात. म्हणजे प्रत्येक कुलपास एका वेळीं दोन दोन किल्ल्या विकत मिळतात. शिवाय दोन्ही हरवल्यास तिसरी करण्याचीही त्याना धर्माज्ञा आहे. "

वर्तमानपत्रातील विक्षिप्त वार्तांचें विडंबन करता करताहि सनातन्यांना कोपरखळी देण्यास कोल्हटकर चुकत नाहींत. सुदाम्याच्या वृत्तपत्रातील एक बातमी शेवटच्या टीकेसह वाचा—" लब्रेडो येथे एक धरणीकंपाचा धक्का बसला. त्यामुळे जमिनीला जी एक मोठी भेग पडली तिच्यातून शेषाचें मस्तक दिसत होते. शेषाच्या मस्तकावरील मण्यामुळें त्या भेगेत चोहोंकडे प्रकाशच प्रकाश झाला होता. याउप्पर आपलीं पुराणे खोटीं असें म्हणण्याचें धाडस कोण करील ? "

ब्रिटिश सरकारवर टीका करण्याच्या वाटेस कोल्हटकर फारसे जात नसत. तरी 'हजामतीची नीतिमीमांसा' या लेखांत ते लिहितात, " वाटींतील व वस्तऱ्याचें पाणी आमच्या अंगातील पाणी नेहमीं जिवंत ठेवीत असतें. हत्याराच्या कायद्यात वस्तरे व नराण्या याचा समावेश केला नाहीं हे आमच्या इंग्रज प्रभूचे आमच्यावर डोंगराएवढे उपकार आहेत. "

कोणत्याहि मताचा कैवार न घेतां केवळ मानवी वर्तनातील विसंगति दाखवितानाहि ते उपरोधाचा आश्रय करीत. आनंदासाठीं चाललेल्या गायनात काहीं काहीं गवई किती कष्ट घेतात व देतात हें सागतांना ते म्हणतात, " आवाज जन्मताच कर्कश असेल तर फारच चागलें. तसा नसेल तर रेंकून म्हणण्याचा अभ्यास ठेवावा. कारण तुमचा आवाज जितका कर्णकटु असेल तितकी तुमची तुमच्या गायनपटुत्वाबद्दल कीर्ति अधिक होणार हें निश्चित समजावे. "

व्याजस्तुतीचा उत्तम नमुना ' साहित्य–परिषदेची तयारी ' मध्यें आढळतो, तो असा —

" उरता उरले सुधारक ग्रंथकार हे बेटे मोठे विघ्नसतोषी व घरबुडवे ! यानीं विधवाचे केशवपन बंद करून व स्वतः डोक्यावर छपरें ठेवून देशी न्हाव्याचा धंदा बंद केला ! पुराणे बद करून देशी वातींचा कारखाना सपशेल बुडविला ! "

## भाषेची क्लिष्टता

विनोदाला अनुरूप अशी सहजसुंदर, लवचीक व प्रसन्न भाषाशैली कोल्हटकर यांची नाहीं. कदाचित् त्या काळच्या पाडित्य-प्रदर्शनाच्या संवयीचा हा प्रभाव असेल किंवा चिकित्सा करण्याच्या त्याच्या लेखन–शैलीचाहि हा परिणाम असेल. " स्मृतिपटावर उमटणाऱ्या चित्राचें स्पष्टत्व बहुधा काल–सान्निध्याशीं व्यस्त प्रमाणावर असते " या वाक्यातील अर्थ, मौजेने विनोदी लेख वाचणाऱ्या, किती वाचकाच्या डोक्यात उतरेल ? तसेंच, " जी बीभत्स गोष्ट प्रतिक्रिया म्हणून हटकून होणार ती जर आपण आपखुशीनें व स्वीकारली तर ती क्रियेच्या ठिकाणीं होऊन बसेल व तिची प्रतिक्रिया अर्थात् सभ्य वर्तन, सभ्य भाषण हीं होऊन बसतील. " या वाक्याचा ' गद्यपदार्थबोध ' तयार झाल्यावरच सामान्य वाचक त्यातील हास्यरसाचे घोट घेणार ! ' हा उदीर हिमालयाच्या धाकस्या भावाचें अपत्य असल्यामुळें गणपतीचा ( म्हणजे गिरिजेच्या मुलाचा ) मातुलहि ठरतो ! ' इत्यादि कल्पनेची गुतागुंतहि उकलणें विनोदप्रिय

वाचकाला कठीणच. 'याचक' वगैरे कांहीं लेखाचा बराचसा भाग तात्विक चर्चेनें रुक्ष झालेला आहे. 'लेखनकलेचीं स्थित्यंतरें' या लेखांत विनोद एकाददुसऱ्या वाक्यात लपून बसला असेल तेवढाच ! अतिशयोक्तिपूर्ण कल्पना व अलकारपूर्ण वाक्यरचना साधण्याच्या हव्यासामुळेंहि कोल्हट-कराच्या लेखनात कृत्रिमता व क्लिष्टता आलेली असावी. तथापि कांहीं कांहीं स्थळें मात्र केवळ अलकारिक लेखन-शैलीचे नमुने म्हणूनहि वाचनीय आहेत.

## अलंकारिक भाषाशैली

'चित्रगुप्ताचा जमाखर्च' हा सारा लेखच प्रा. शि. म. परांजपे याच्या कल्पना-शक्तीला शोभण्यासारखा आहे. त्यात कोल्हटकर लिहितात, "त्याच्या जमाखर्चाच्या वह्याचे कागद सज्जनाच्या धवल कृत्याचे केलेले असून ते प्रणयीजनाच्या प्रेमरज्जूंनीं एकत्र बाधलेले होते. त्याच्या दौतींतील शाई दुर्जनाच्या कृष्णकृत्याच्या कषायापासून बनविली होती. त्याच्या तराजूची दाडी पापपुण्याची पर्वा न बाळगणाऱ्या मनुष्याच्या मगजाची घडविली असून ती पारड्यातील वजनास मुळींच दाद न देण्यासारखी भक्कम होती. त्या तराजूंचा काटा चंचल मनुष्याच्या स्वभावापासून निर्माण केला होता."

'मुंबईचा दीपोत्सव' पाहण्यासाठीं गेलेल्या सुदाम्याला गाड्याची राग कशी दिसली ? तर "ही गाड्याची राग म्हणजे मुंबई शहरानें आपल्या गळ्यात घातलेली इंद्रनील मण्याची एक विस्तीर्ण मालाच दिसत होती व या मालेमध्यें त्याच्या रथ्यारूप असंख्य हस्तांकडून क्षणोक्षणीं नवीन रत्नें ओंविलीं जात होतीं."

'कुलूप' या लेखात किल्लीचें वर्णन कोल्हटकरानीं मार्मिकपणे केलें आहे, तें असें—"मानवजातीच्या मूळ पुरुषाचा अध:पात झाला तो केवळ स्त्रीमुळें. कुलपाचा अध:पात होण्यासही त्याची स्त्री कारणीभूत होते; व चमत्कार हा, कीं ॲडमचा नाश जसा ईव्हच्या फाजील जिज्ञासेमुळें झाला तसा कुलपाचा स्थानभ्रंशही किल्लीच्या अतिजिज्ञासेमुळेच होतो.

ही विचित्र स्त्री पतीच्या पोटांत शिरून आतील खाचाखोचांची पूर्ण माहिती करून घेते, व अंतीं हृदय काबीज करून पतीच्या निश्चळपणाचा भंग करून टाकिते. फार काय सागावें, या स्त्रीचा पतीवर इतका पगडा असतो, कीं ती अतरल्यास कुलूप आपल्या धन्यालासुद्धा दाद देत नाहीं!"

'साक्षीदारा' चे वर्णन कोल्हटकर पुढीलप्रमाणें करतात, "या प्राण्याचे मातापितर 'पुराव्याची गरज' व पोटगी भत्ता' हे होत. गरज ही कल्पकतेची आई, हें नातें तर प्रसिद्धच आहे. आई एक असल्यामुळे साक्षीदार व कल्पकता हीं अर्थात् बहीणभावडें झालीं."

युक्तिवाद करतानाहि कोल्हटकर अलकाराचा उपयोग कसा करतात पहा, "शनीची साडेसाती सुरु झाल्याबरोबर जर मनुष्यावर अनर्थांची पर्णाळिका येत असेल, तर मुळामुठा नदीस पूर आल्यानें आकाशगंगा गढूळ का होऊ नये?"

## युद्धाचें रूपक

डासाढेकणाच्या चावण्याला युद्धाचे मोठें स्वरूप देऊन कोल्हटकरानीं विनोद खेळविला आहे. त्याचा एक नमुना-"ढेंकूण हें माणसाशीं जमिनीवर लढतात तर त्याचे साथीदार त्याच्यावर वैमानिकाप्रमाणें आकाशातून हल्ला करितात. रणवाद्य वाजविण्याचें कामही या साथीदाराकडेच असतें. तुम्हीं आपल्या कानाचीं रध्रें कोणत्याही बाजूस फिरवा, त्यानीं तिकडे आपला मोर्चा फिरविलाच म्हणून समजावें त्याच्या वाजविण्याकडे तुमचा कान नव्हता अशी सबब पुढे करण्याला ते तुम्हाला जागाच ठेवीत नाहींत, कधीं कधीं तर नाकालाच कान समजून ते त्यात आपल्या तुताऱ्यासह प्रवेश करितात, व मनुष्याला शिंक येऊन त्याची झालेल्या चुकीबद्दल खात्रीं होईपर्यंत ते त्यातून बाहेर पडत नाहींत. सामान्य गाण्याबजावण्यात चिजेतील मुख्य अवसान ज्या स्वरावर असतें, त्या स्वराचें ठिकाण दर्दी माणसाखेरीज इतराना सहसा उमगत नाहीं. पण ढेकूण आपलें वायुवाद्य मनुष्याच्या रक्तात खुपसून जोराने फुंकीत बसला असता त्याचें साथीदार वादनातील बहारीच्या स्थलीं त्याच्या (मनुष्याच्या, ढेंकणाच्या नव्हे.)

गालाचा पापा घेऊन त्याला इतका प्रेमळ इशारा करितात, कीं तो नुस्ती मानच हलवून न राहता त्या गालावर जोगची थापही मारतो. या प्रकारें वादनास जरी नाहीं तरी गालास चागलाच रंग चढवितो. ”

## निर्भेळ विनोदाचे मासले

कोल्हटकराच्या निर्भेळ विनोदाचे सुरेख नमुने म्हणजे ‘ चोराचें संमेलन ’ व साहित्य-परिषदेची तयारी.’ तो काळ संमेलन–परिषदांच्या प्रारंभाचा होता. इंग्रजी शिकलेले तरुण निरनिराळ्या कार्यांसाठीं सभा भरवीत, सस्था स्थापीत आणि व्याख्याने–ठराव वगैरेंचे बुडबुडे उडवीत. स्वतःच्या क्षुल्लक कृतीचेहि मोठे नगारे वाजवून ‘ अहो रूप अहो ध्वनिः ’ असा परस्पर–प्रशसेचा सहकारी व्यवहार चाले. राजकीय, सामाजिक, धार्मिक, व्यावसायिक, जातिविषयक सभाना ऊत आला होता. जो उठतो तो संमेलन भरवितो, भाषण करतो, ठराव माडतो आणि सरकाराकडे मागण्या व समाजाला सूचना करतो. या पोकळ कार्यावर आपल्या विनोदाचे फवारे कोल्हटकरानीं या दोन लेखातून सोडले आहेत.

गांवात चोरांचा सुळसुळाट झाला, त्याच्या सगतीचा परिणाम आपल्यावरहि काय झाला हें सागताना सुदामा म्हणतो, “ एखादा चोर जवळून जात असल्यास मीं नुसतें आपलें अगच चोरावें. नंतर मी स्वतःच्याच पैशाची चोरी करूं लागलों, म्हणजे असें, कीं या पेटींतला पैसा त्या पेटींत ठेवावा आणि त्या पेटींतला दागिना या पेटींत दडवावा; आणि हें कृत्य चालले असताना कोणी मजकडे पहात आहे कीं, काय म्हणून चोहोंकडे सभय दृष्टीने पहावें. होता होता मी बड्नानाच्या घरचा फाटका जोडा चोरण्यापर्यंत मजल आणिली. बड्नानानाही मजप्रमाणेंच चोरीची संवय जडूं लागली होती. मी जो जोडा त्याचे घरून चोरून आणिला म्हणून सांगितलें, तो वास्तविक मूळचा माझाच असून त्यानीं चोरीच्या लहरींत माझ्या घरून पळविला होता.” होता होता गावकऱ्यापेक्षा चोराचीच संख्या त्या गावात जास्त झाली. चोरानीं आपल्या संमेलनासाठीं लागेल ती वस्तु कोणाच्याहि घरातून बिनबोभाट आणली. सुदामा

च बडूनाना याच्या रुमालाचा उपयोग मंडपाच्या छतासाठीं झाला, आणि बंडूनानाची शेंडी मंडपाच्या दाराशीं ठेवलेल्या बोकडाच्या चित्राला लावली होती ! अशा प्रकारें ' आमचे गावकरी अगदीं नखशिखांत पाहुण्याच्या आदरातिथ्यात गुतलेले होते.

स्वागताध्यक्षांनीं आपल्या भाषणात चौर्यविद्येचा महिमा कथन करताना मोठ्या गाभीर्याने सागितलें, " अर्थशास्त्राचा एक मोठा सिद्धान्त आहे, कीं देशाची भरभराट होण्यास त्यातील सपत्ति देशातले देशात फिरत राहिली पाहिजे. चोरीचा धंदा नसता तर हें तत्त्व पुस्तकातल्या पुस्तकातच राहिलें असते. सपत्तीचे स्थलातर होण्यास अनुकूल असा चोरीशिवाय दुसरा एक तरी धंदा दाखविता येईल का ? "

## चौर्यविद्येचा महिमा

अशा अपूर्व समेलनाला अध्यक्षहि तसाच नको का ? त्याचें गुणवर्णन करताना स्वागताध्यक्ष सम्या रामोशी यानीं विशेष गोष्ट ही सागितली कीं, " हातून चोरी झाली नाहीं अशी त्याची एकही रात्र वाया गेली नाहीं. अध्यक्षमहाराजानींही तेच व्रत चालू ठेविले आहे हें निराळें सागण्याची जरूरी नाहीं. याचे हें व्रत चालण्याला या समेलनामुळें विघ्न येईल असें कोणी समजू नये. कारण आज रात्रीं येथल्या रहिवाश्याना आपलें हस्तलाघव दाखविण्याचा याचा निश्चय झाला आहे. "

शेवटीं अध्यक्ष सराप्पा भिल्ल याची हातचलाखी सागून स्वागताध्यक्षांनीं सर्वांना चकित केलें: एका बड्या खटल्यातून त्याना वकिलानें वाचविलें. तेव्हा यानी आपल्या वकिलास उदार होऊन ज्या पन्नास हजार रुपयाचें बक्षीस दिले, ते रुपये वकीलसाहेबाच्याच घरीं चोरी करून मिळविले होते."

' चोराच्या समेलनात ' अकरा ठराव झाले. त्यातील काहींमध्यें उपहासाची दारू ठासून भरलेली आहे. ब्रिटिश सरकारनें विनापरवाना हत्यारें वापरण्यास सर्वांना बदी केली, याचा निषेध राजकीय पक्ष आपापल्या सभापरिषदातून जोरजोरानें करीत. पण चोराच्या समेलनात संमत झाला तो ठराव असा—" चोरी होताना घरमालकाकडून चोराना हत्यारांनीं

इजा होण्याचा फार संभव; परंतु हत्याराचा कायदा करून ती भीति दूर केल्याबद्दल ही सभा सरकारचे मनःपूर्वक आभार मानिते. " यापेक्षा दुसऱ्या कोणत्या शब्दानीं सरकारची शोभा करता आली असती ? गुद-गुल्या करून माणसाला ठार मारणाऱ्या अस्वलासारखीच ही विनोदाची पद्धत नाहीं काय ?

जशी सरकारावर, तशीच साहित्यिकावरहि चोरानीं एका ठरावान्वयें चोरटी टीका केली. तो ठराव असा—" चोर व ग्रथकार या उभयताचा हेतु अर्थचौर्याचाच असल्यामुळें दोघाचे एकच समेलन भरविण्यात यावें अशी ग्रथकाराच्या समेलनास विनति करण्यात यावी. "

या लेखाचा शेवटहि बहारीचा केला आहे. ' पाहुण्याना बिदा करून ...आम्ही जड अंतःकरणानी पण हलक्या खिशानिशीं घरोघर परत आलो ' असा गमतीचा विरोधाभास लेखाच्या कळसासारखा शोभत आहे. असाच अनुरूप शेवट ' कुलूप ' या लेखाचा केलेला आहे. बङ्नानाच्या कुटुंबानें दिलेल्या टोमण्याने ' त्याच्या तोंडाला 'आपोआप कुलूप बसलें,' ही अखेर किती मजेची आहे ! अशीच विनोदी समाप्ति ' साहित्य—परि-षदेची तयारी ' या लेखाचीहि केलेली आहे.

## साहित्यिकांचें व्यंग-दर्शन

'साहित्य-परिषदेची तयारी' हा लेख तेवीस पानाचा आहे. तो आरभा-पासून शेवटपर्यंत निर्भेळ विनोदाने भरलेला आहे. साहित्य—परिषदेची तयारी करण्यासाठीं सुदामा,बङ्नाना व पाडुतात्या या मित्र—त्रयाला प्रथम साहित्यिक बनावें लागले. प्रत्येकानें एका महिन्यात एक एक बडा ग्रथ लिहून छापूनहि प्रसिद्ध केला ! सुदाम्याने एका इंग्रजी कादबरीचें भाषातर केले आणि " स्वतंत्र ग्रंथ " म्हणून जाहीर केलें. मूळ कादंबरीतील सुधारकी विचार हाणून पाडण्यासाठीं सुदाम्यानें कादंबरीचा शेवट असा केला, " हें सुधा-रकी जोडपें आगगाडींतून एका पुलावरून प्रवास करीत असता एकाएकीं पूल मोडून त्यांचा डबा पुढील एंजिनासह पुलावरून खालील नदींत पडला, आणि तो व मागील डबे जोडणारी साखळी धक्कयानें त्या डब्या-

पासून अलग झाली. इतक्यात कर्मधर्मसंयोगानें एक भयकर धरणीकप होऊन मागील डब्यापुढें एकाएकी एक टेकडी उभी राहिली व यामुळे त्या डब्याचा बचाव झाला. त्या डब्यात एकूण एक उतारू सनातनधर्माभिमानी होते ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. ''

कृत्रिम प्रसगाची गर्दी करून सनातनी विचार पुरस्कारणाऱ्या कादंबरीकारावर किती तिखट टीका आहे ही ! नवल हें कीं, असे अकल्पित प्रसग त्याच्याच शिष्याने कल्पून 'प्रेम–सन्यास' नाटकात दडपून घातले ! आणि नाटकाचा शेवट स्वाभाविकपणे सुधारकी तत्त्वज्ञानाप्रमाणें होणे योग्य असता, लोकमताला वश होऊन, नायक–नायिकाचे पुनर्विवाहाऐवजीं मृत्यु घडविले ! गुरूची ही टीका प्रसिद्ध झाली १९१४ सालीं आणि शिष्याचे नाटक रगभूमीवर आले १९१२ सालीं ! तें नाटक पाहून त्याचे विडबन करण्यासाठीं तर कोल्हटकरानीं वरील मजकूर लिहिला नसेल ना ?

सुदाम्याने कादबरी लिहिली, तर बडूनानानीं अकलिपीच उलटीसुलटी करून छापली आणि ' शुद्धिपत्राला शुद्धिपत्र ' जोडून ग्रंथाचें वजन वाढविले ! त्याहूनहि ' वजनदार ' ग्रथ पाडुतात्यानीं तयार केला, तो म्हणजे डायरी !–तीहि जुन्या सालची ! तरी पाडुतात्या ग्रथकार बनलेच ! त्या उच्च पदावरून ते आपल्या दोघा दोस्ताना कृपाळूपणे म्हणतात, ''तुमचा हा पहिलाच प्रयत्न आहे हें मला ठाऊक आहे. मी तुमच्यापासून फारशी अपेक्षा करीत नाहीं. '' आणि आपल्या अनुभवाचे सार म्हणून ते पोक्तपणाने सागतात, " एकदरींत ग्रंथकर्तृत्व ही काहीं मोठीशी गोष्ट नाहीं. आपण लक्ष पुरवीत नाहीं तोंवरच त्याचा बाऊ वाटतो. पण तें काम हातीं घेतलें कीं हातच्या मळासारखें वाटू लागतें.'' अंगीं प्रतिभा नसताना कवि म्हणून आणि ज्ञान नसताना लेखक म्हणून समाजात मिरविणाऱ्या व वर्तमानपत्रात झळकणाऱ्या साहित्यिकाची हीं विडंबन–चित्रें जितकीं हास्यकारक तितकींच टीकापूर्णहि नाहींत काय ?

अशा तीन प्रचड ग्रथाच्या जनकानीं प्रास्ताविक सभा घेतली. गर्दी झाली तर ती मोडण्यासाठीं दोन पोलिसहि बोलावले. पण त्या " दोन

पोलिसांचें घोरणें वर्ज्य केल्यास सारी सभा चित्राप्रमाणें स्तब्ध राहिली होती." कारण सभेकडे कोणी फिरकलेंच नाहीं! वर्गणी गोळा करण्यासाठीं 'आम्ही ज्या ज्या रस्त्यानीं जावें, ते ते रस्ते ओसाड होऊन गावाचे इतर भाग माणसानीं गजबजून जावे!" गावात प्लेग पसरल्याच्या बातमीसह साहित्यिकाना निमंत्रणे पाठविलीं गेलीं. त्याना संमेलनाच्या दिवशीं कडक उपास घालण्याचाहि निर्धार कळविला गेला! पण निमत्रण-पत्रिकाचें उत्तर आलें नाहीं कीं एकाहि साहित्यिकानें येण्याचे केले नाहीं. कारण?—निमत्रणाच्या पाकिटावर पत्ते लिहावयाचे राहिले होते—म्हणून त्या पाकिटाचा गठ्ठा 'डेड लेटर ऑफिस'मधून या त्रिमूर्तींकडे परत दाखल झाला!

## बोध व विनोद

'यशःसिद्धीचे सोपे व अचूक मार्ग' या गंभीर व लाबलचक नावानें जो लेख कोल्हटकरानीं लिहिला आहे, त्यात नवस, दृष्ट, शकुन, जादू, तोडगे, वशीकरण, सत्यनारायण, इत्यादि लोकभ्रमावर खरपूस टीका आहे आणि ती सारी हास्य उत्पन्न करणारी आहे. बुवाबाजीच्या चमत्कारिक प्रकारावरहि त्यानीं आपल्या विनोदी शस्त्राचे हसरे प्रहार केले आहेत. पाण्याचें दुर्भिक्ष झाले असताना कोणकोणत्या आपत्ति लोकावर येतात व त्या कशा निवाराव्यात याचें वर्णन करताना त्यानीं कल्पनामागून कल्पना लढविल्या आहेत. फार काय, 'धर्मांतर'मधील नुसत्या तीन खुर्च्या मोडक्या कशा होत्या याचे वर्णन त्यानीं केलें आहे, तेंहि खसखस पिकविणारे आहे. रोग-निवारणासाठीं एक मुलगा खिस्ती व दुसरा मुसलमान होतो—आणि अखेरीस दोघेहि परत हिंदुधर्मात येतात, या साऱ्या उलथापालथी जितक्या हास्यकारक तितक्याच बोधप्रद आहेत. आपल्या विनोदी लेखाचें साध्य काय? हें खुद्द कोल्हटकरानीं पुढील शब्दानीं सागितलें आहे व तें सर्वांसच पटण्यासारखें आहे.

"या लेखनपद्धतींत लेखकाची भिस्त अन्वयापेक्षा व्यतिरेकावर, सादृश्यापेक्षा विरोधावर व बुद्धीपेक्षा कल्पनेवर असल्यामुळें तिचा वाचकावर

उत्कट ग्रह होतो. तिनें वाचकास प्रथम जरी राग आला तरी त्याचे चित्त शांत व स्थिर होताच त्याच्या कल्पनेसमोर टीकाविषयीभूत प्रकारांतील विरोध उभा राहून त्याच्या बुद्धीसही त्याची हास्यास्पदता पटू लागते; रागाची जागा लाजेकडून घेण्यांत येते, व टीकाकार आपणास हिणविण्यात आनद मानणारा आपला हितशत्रु नसून आपलीं वैगुण्यें हसतहंसत दाखविणारा आपला निस्सीम मित्र आहे अशी शेवटीं त्याची खात्री होते."

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) विनोदाचे उत्पत्तिस्थान कोणते ? लोकशाहींत विनोदी वृत्तीला खूप वाव मिळतो हें खरे का ?

( २ ) संस्कृत व मराठी या वाङ्मयात विनोदाचें स्थान व स्वरूप कोणतें आहे ?

( ३ ) कोल्हटकराच्या विनोदी लेखाचे मळ प्रयोजन कोणते आहे ?

( ४ ) ' विनोद म्हणजे समाज–जीवनावरील टिका ' याचे स्पष्टीकरण करा

( ५ ) ' अमर्याद आतिशयोक्ति ', ' विसंगति ' ' शाद्बिक कसरत ' यावर आधारलेल्या विनोदाचीं उदाहरणे कोल्हटकराच्या लेखनाच्या आधारें द्या

( ६ ) ' विनोदाचार्य ' ही पदवी कोल्हटकराना का देण्यांत येतें ?

# रा. ग. गडकरी : : : २

"माझ्या अंगीं विनोद नसता, तर मला आत्महत्याच करावी लागली असती" असे उद्‌गार म. गाधीर्नी काढले होते. महात्म्या-इतकीच अल्पात्म्यानाहि विनोदाची गरज नसते. नाहीं तर, एकारलेलीं,



त्रासलेलीं व आबलेलीं आयुष्ये कंठण्याचीं पाळी त्यांचेवर येते–किंबहुना त्या आयुष्याचा अत लहानसहान कारणावरूनहि केल्याचे आढळते. यत्राला जशी स्प्रिंग किंवा बैलगाडीला जसें वंगण, तसे मानवी जीवनाला हास्य होय. "गालांतल्या गालात हसण्याच्या तलम सुतापासून घोड-हशाच्या राकट दोरखंडापर्यंत" सर्व प्रकारचे हास्य–पट विणण्यात गडकरी चतुर आहेत.

गडकरी हे कवि, नाटककार व विनोदी लेखक या तिन्ही नात्यानीं मोठे यश मिळवून गेले. नाट्य व विनोद या दोन क्षेत्रात ते कोल्हटकराचे चेले होते—'सवाई चेले' होते. काव्यात कोल्हटकरापेक्षा त्यांची कल्पना-शक्ति अधिक उत्तुग आणि रमणीय. नाटकामध्येंहि पद–लालित्य व रसोत्कटता या दोन गुणाचे बाबतींत त्यांनीं गुरूवर ताण केली. तसेंच विनोदाच्या क्षेत्रात गुरूपुढें मजल मारून त्यानीं उपमा–उत्प्रेक्षा–श्लेषादि अलंकाराच्या 'धावाचीं शतकें' काढलीं, अतिशयोक्तीचे सीमापार टोले लगावले, काव्य–कल्पनेची गोलंदाजी तर त्यानीं प्रेक्षकाना तोंडात बोट

घालावयाला लावण्याइतक्या चपलतेनें केली आणि प्रतिपक्ष्याचा उपहास करून त्याला वाचकाच्या चित्तांतून 'बाद' करण्यांतहि ते अधिक यशस्वी ठरले. या गुरू-शिष्याच्या विनोदाची तुलना करून "हास्य-विनोद-मीमासा" कार श्री. न. चिं. केळकर यानीं असा निर्णय दिला आहे कीं, "विनोदी लेखक या नात्यानें गडकरी याची प्रतिभा कोल्हटकरांच्या प्रतिभेपेक्षा अधिक पैलूदार व पल्लेदार आहे."

## प्रांतांचा शेजारधर्म

राम गणेश गडकरी याचा जन्म ता. २४ मे १८८५ रोजीं गणदेवी येथे झाला. किर्लोस्कराचें मृत्यु-वर्ष हेंच. मराठी नाट्यकलेचा उत्कर्ष करणारे किर्लोस्कर महाराष्ट्राच्या एका सरहद्दीवर जन्मास आले, तर त्या नाट्यकलेचा विकास करणारे दुसरे नाटककार गडकरी हे महाराष्ट्राच्या दुसऱ्या सीमेवर जन्मास आले. अशा रीतीनें कर्नाटक व गुजरात या दोन्ही प्रातांनीं आपला शेजारधर्म पाळला आहे ! गुजरातेंतील नवसारी तालुक्यात गडकऱ्याचा जन्म झाला. लहानपणींच त्याचे वडील वारले. त्यामुळे गरिबीचे काटेकुटे त्याच्या मार्गावर पसरले गेले. त्यावरूनच रखडत-खरडत जाऊन गडकऱ्यानीं मॅट्रिकची वेस वयाच्या एकोणिसाव्या वर्षी ओलाडली. पुढे फर्गसन कॉलेजात त्यानीं एक वर्ष काढलें. तेथें त्याना गणित विषयानें अडविलें. पहिल्या वर्षाच्या परीक्षेंत त्यांना अपयश आलें आणि तेथेंच त्याचें शिक्षण खुंटले.

## तरुणांचे लेखक

'बाळकराम' या टोपण नावानें त्यानीं विनोदी लेख लिहिले, 'गोविंदाग्रज' या उपनावानें काव्य-रचना केली, आणि 'राम गणेश गडकरी' या उघड नावानें ते नाटककार म्हणून महाराष्ट्र रसिकांपुढें आले व चमकले. कोट्या पेरून विनोदाची खसखस पिकविण्यांत त्यांनीं आपल्या गुरूवरहि ताण केली. 'रिकामपणची कामगिरी' या लेखमालेंत ठकीच्या लग्नाचे जे विचित्र अनुभव त्यांनीं दिले आहेत, ते कोणाच्याहि हंसून

हंसून मुरकुंड्या वळविण्यासारखे आहेत. ' कवीचा कारखाना ' यात जितका विनोद भरलेला आहे, तितकीच टीकाहि ठासलेली आहे. यापेक्षां गडकऱ्यांचें काव्यातील यश अधिक उत्तुग व उज्वल. कोल्हटकराच्या मानानें तर त्यानीं काव्याच्या मुलखात फारच मोठी मजल मारली. त्यांची कल्पकताच अनिवार, उच्छृंखल, गगनचुंबी. नादमधुर शब्दरचना, रम्य काव्यकल्पना आणि हृद्य प्रेमभावना ह्या तीन गुणानीं नटलेलीं त्याची नाटकेहि तरुणाचे अत:करण सहज जिंकू शकलीं.

## तीन विनोद-मूर्ति

'प्रेमसंन्यास', 'पुण्यप्रभाव' 'एकच प्याला' व 'भावबधन' हीं चार काय तीं त्याचीं पूर्ण नाटकें. पण गेल्या सुमारे चाळीस वर्षांत त्याच्या यशाचे निनाद सतत निघत आहेत 'सुरसुदरी' नावाचे गुजराती नाटक त्यानीं अगदीं लहानपणीं लिहिले होते, पण तें नष्ट झाले. तसेच 'तोड ही माळ' हें नाटकहि कालवश झाले. 'राजसन्यास' व 'वेड्याचा बाजार' हीं त्याचीं नाटके अपूर्ण आहेत. 'गर्व-निर्वाण' हें प्रल्हादाच्या कथेवरील नाटक अपुरेंच आहे. या अपूर्ण नाटकापैकीं 'राजसन्यास' हें इतकें अपूर्व आहे कीं, त्याला तोड मराठी नाट्यसृष्टींत दुसरी नाहीं. गडकऱ्याच्या काव्य-कल्पनेला येथें नुसती उधाण भरती आली आहे. पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें त्याच्या प्रतिभेच्या सकल कला या नाटकात विकसल्या आहेत. एकाच प्रवेशात, एकाच वेळीं, चारचार रस खेळविण्याचे अजब्र सामर्थ्य या भाषा-प्रभूने येथें दाखविले आहे. गडकऱ्याच्या कल्पनासृष्टींतून निर्माण झालेलीं गोकुळ, धुंडीराज व तळीराम हीं तीन पुरुष-पात्रे प्रेक्षकाना खदखदा हसावयास लावून जशीं अमर झालीं आहेत, तशीच सिंधु, शिवांगी व लतिका हीं तीन स्त्रीपात्रें रसिकाना ढळढळा अश्रु ढाळावयास लावून त्यांच्या हृदयात कायमचें वास्तव्य करून राहिलीं आहेत. अशी विविध व बहुमोल साहित्य-सेवा करून गडकरी ता. २३ जानेवारी १९१९ रोजीं निधन पावले.

## शाब्दिक लीलांचें पीक

गडकऱ्यानीं आपल्या नाटकांत विनोदाचा शिडकाव मुक्तहस्तानें केलेला आहे. 'वेड्याचा बाजार' हें तर बोलूनचालून प्रहसनच. 'गिळ, गिळ, कोटी गिळ' अशी सक्ती एका पात्राने दुसऱ्यास करावी, इतकी बेसुमार उधळपट्टी त्या नाटकात कोट्याची केलेली आहे. कोट्या करण्याचें गडकऱ्याचें वेड या नाटकांत मोकाट सुटलें आहे. आणि शब्द-लीलाचें वेडें पीक सर्वच नाटकात आहे. 'एकच प्याला'तील तळीरामाचा, 'भावबधना'तील इदु-बिंदूचा, पुण्यप्रभावातील 'नुपूर–किंकिणी व सुदाम–दामिनी याचा, 'प्रेमसन्यासात' गोकुळचा आणि राजसंन्यासातील जिवाजी–देहूचा हे सारे कथाभाग हास्यरसाने थबथबलेले आहेत. त्यातहि भावबधनातील धुडिराजाच्या विनोदाला कारुण्याची व उदात्ततेची जोड मिळाल्यानें तर तो अलौकिक साधला आहे.

## लग्न–पद्धतीवर टीकास्त्र

नाट्य किंवा काव्य यामध्ये गडकऱ्याचा विनोद वावरतो, पण तो कसा? तर, मोठ्या माणसाच्या दिवाणखान्यात लहान मुलानीं दबून, थबकून चालावे तसा. तींच मुलें मोकळया पटागणावर गेलीं म्हणजे स्वच्छदानें उडूबागडूं लागतात; तसा गडकऱ्याचा विनोद त्याच्या विनोदी लेखात मोकळेपणाने विहार करीत असतो. त्याच्या विनोदी लेखाचा संग्रह 'बाळकराम' या नावाने प्रसिद्ध झालेला आहे. 'रिकामपणाची कामगिरी' व 'कवींचा कारखाना' या दोन लेखमाला त्या पुस्तकात प्रमुख आहेत. पहिल्या लेखमालेचा विषय 'ठकींचें लग्न' हा आहे. ठकी म्हणजे कुरूपतेचा अर्क. तिचे लग्न जमविण्यासाठीं तिचे वडील तिंबूनाना, आबाभटजी आणि लेखक बाळकराम हे तिघेजण जिवापाड श्रम कसे करतात, समाजाचा कोपरा न कोपरा कसा धुंडाळतात आणि त्यावेळीं लग्नातील रूढी व माणसाचे स्वभाव–दोष या दगडधोंड्यावर ते कसे ठेचाळतात याचें वर्णन बारकाईनें, कोटीबाजपणानें व कल्पकतेनें गडकऱ्यानीं केलें आहे. तें वाचून ज्याचें पोट दुखणार नाहीं असा रसिक वाचक विरळा.

आणि हंसता हंसता लग्नपद्धतीवर दांत ओंठ खाणार नाहीं असाहि वाचक विरळाच सांपडेल. कोल्हटकराचे पाडुतात्या व बंडूनाना हे मानसपुत्र जितके चिरंजीव; तितकेच गडकऱ्याचे बाळक्या व तिंबूनाना.

एखाद्या शालजोडीला छिद्र पडून आतील अंग उघडें दिसावें त्याप्रमाणें गडकऱ्यानीं केलेल्या लग्नपद्धतीच्या या विडंबनामध्यें क्वचित् त्याचें अंतरींचे विचार सरळपणें उघड झाले आहेत. ते असेः— " माझ्या दयाशील वाचकभगिनींनो ! स्त्रीजातीचा अभिमान धरा ! अगदीं नाइलाजामुळें का होईना-पण अशा रीतीनें आपल्या पोटच्या गोळ्याचें प्रदर्शन करावयाला तयार होणाऱ्या ' घर'च्या मंडळींच्या आड या, आणि दुसऱ्याच्या आंतड्याची अशी हेटाळणी करावयास सरसावणाऱ्या आपल्या उच्छृखल मुलाबाळाना आळा घाला ! "

## विसंगत वस्तूंची गल्लत

" लग्न पहावें करून " या लहानशा म्हणींत वधूपित्याच्या हालाचें ब्रम्हाड साठवलेले आहे. नुसत्या नकटीच्याच नव्हे, तर प्रत्येक मुलीच्या ' लग्नाला सतराशें साठ विघ्नें ' येतात. त्या विघ्नांचा आरंभ वरसंशोधनापासून होतो. लग्नाचे मुहूर्त वैशाखात असतात, त्यावेळीं वसंतऋतू असतो. वसंतऋतूंत कोणकोणते फेरफार होतात, त्या रम्य व क्षुद्र घटनाची गंमतीदार गल्लत या लेखाचे आरभींच दिली आहे, ती अशी— " वसंतऋतूत आपल्या या सृष्टीमध्ये केवढाले फेरफार घडून येतात हें नव्यानें कशाला सागावयाला पाहिजे ! झाडाना पालवी फुटते, आंब्याला मोहोर येतो, वेलींना फुलें येतात, ठिकठिकाणच्या वक्त्याना शब्द फुटतात, पांढऱ्या सशाना पोरे होतात, मेंढ्यावरची लोंकर कातरतात, कोकिळेला कंठ फुटतो, छऱ्यावर नवे अभ्रे चढतात, शहरबाजारांतून खेडेगावच्या पाहुण्यांना ऊत येतो, मोराला नवा पिसारा फुटतो, कुत्र्याना लूत लागते, तोरणांकरवंदाचें पेंव फुटतें, कुलिंगडें विकावयास येतात. "

या साऱ्या बऱ्यावाईट घडामोडींमध्यें वरपक्षाचीं माथीं फिरतात ही महत्त्वाची घटना गडकऱ्यानीं सांगितली आहे. एरवीं फडतुस मानला

जाणारा ' नवरबाप ' लग्नाच्या मोसमांत स्वतःला काय समजतो याचें वर्णन करताना गडकऱ्यानीं अतिशयोक्तीची तार पुढीलप्रमाणें छेडली आहे. " महंमद् गिजनीच्या धनलोभाने तो स्वार्थपरायण होतो, नेपोलियनच्या महत्त्वाकांक्षेनें तो आपल्या मुलाकडे पाहतो, नाना फडणिसांच्या व्यवहारकौशल्याने तो मुलाची किंमत ठरवितो, शिवछत्रपतींच्या धाडसानें वाटेल त्या विजापूरकरावर तो त्या रकमेचा मारा करतो आणि नादिरशहाच्या क्रूरपणानें ही रक्कम वसूल करून घेतो. "

## कंगालाची आढ्यता

थोरथोर ऐतिहासिक पुरुषाच्या सद्‌गुणाचे संमेलन आपल्या अंगीं मानणारा हा वरपिता किती कगाल असतो, याचे वर्णन तर गडकऱ्यानीं फार मजेशीर केलेले आहे. एका वरपित्याचें घरीं बाळकराम व तिंबूनाना गेले असताना " एका मूळच्या चौकोनी, पण जुनेपणामुळे कोपरे फाटून जवळजवळ लबवर्तुळ होत आलेल्या सतरजीवरील केर एका बुरणुसानें झाडून आम्हा दोघाना लोडवजा ठेवलेल्या वळकटीजवळ मोठ्या मानानें नेऊन बसविलें. तिंबूनानाना, वळकटीशीं टेंकून बसवून मी सतरंजीवर शक्य तितकीं भोकांचीं बेटें चुकवून बसण्याचा प्रयत्न केला. वळकटींतल्या कापसाचाहि सपाट पसरटपणा जाऊन हजारो गुठळ्यामुळें ठिकठिकाणीं त्याचे सघ निर्माण झाले होते. वळकटीच्या या उंचसखल पृष्ठभागाशीं आपल्या सपाट पृष्ठभागाचा कसातरी सलोखा संभाळून तिंबूनाना स्वस्थ बसण्यासाठीं सारखे चळवळ करीत होते. "

' फाटकी सतरंजी, वळकटीची बेबंदशाही, मोडकी खुर्ची, अंगठे तुटलेल्या वहाणा '—अशा वैभवाच्या वरपित्यानें शेवटीं मोठ्या आढ्यतेनें तिंबूनानाना सुनावलें, ' या जन्मीं आम्हास कर्तव्य नाहीं. ' वरपित्याच्या तोंडीं ' यंदा आम्हांस कर्तव्य नाहीं. ' हें उद्दाम उत्तर इतके रुळलेलें असतें कीं, विचार न करताच ते त्याचा उच्चार करतात; आणि म्हणूनच ' यंदा'च्या ऐवजीं ' या जन्मीं ' असे हास्यास्पद शब्द वरपित्याच्या तोंडून निघाले. वरपित्याची कंगाली दरीइतकी खोल आहे, तर त्याची

आढ्यता पर्वतासारखी उंच आहे. या विषमतेंतूनच विनोद निर्माण होतो.

## उपहासाची धार

वधूपरीक्षेची चाल किती लज्जास्पद आहे याचे चित्र वरेरकरानीं ' हाच मुलाचा बाप ! ' या नाटकात रंगविलें आहे. गडकरीहि आपल्या या विनोदी लेखमालेत उपहासानें लिहितात—" या वधूपरीक्षेत साधारणतः गाय, म्हैस किंवा घोडी घेताना दाखविण्याइतकीच व्यावहारिक अपूज्यबुद्धि दाखवावयाची असते. मात्र ही परीक्षा नवऱ्यामुलाच्या बापानें किंवा दुसऱ्या कोणीतरी करावयाची असते. स्वतः वराचा यात कांहीं एक संबंध असता कामा नये ! आणि ते गैर आहे, असे धर्मलंड सुधारकाखेरीज कोण म्हणणार ? "

वरपक्षाच्या कुरेंबाजपणाइतकेच विघ्न आकाशातील ग्रहाचे. त्याचें प्रतिबिंब कागदावरील पत्रिकेत उमटते. त्या पत्रिकेंतील ग्रहाचे वास्तव्य कशा प्रकारचें असते हे गडकरी पुढील विनोदी शब्दानीं सागतात : " एखाद्या वेळीं सारे ग्रह दोनतीन घरातच दाटीवाटीने वसति करून व बाकीचीं घरे ओसाड पाडून, पत्रिकेला विजापूर–हंपीसारख्या उजाड पडलेल्या प्राचीन शहरांचें वैभव आणतात, तर एखाद्या वेळीं, इंग्लिशमनप्रमाणें एकेका घरांत एकेकजण राहून पत्रिकेला लोणावळे–महाबळेश्वर यासारख्या हवेशीर ठिकाणाचा नकाशा बनावितात. "

## सातमजली अतिशयोक्ति

लग्नाचा एक जोडा जमविण्यासाठीं वधूपक्षाला अनेक जोडे फाडावे लागतात-किंबहुना वरपक्षाकडून जोडे खावेहि लागतात ! यामुळे मुलीचा जन्म झाल्याचे कळताच तिच्या बापाचे तोंड आंबट होते. अर्थात् आता हा काळ बराचसा पालटला आहे. स्त्री–शिक्षणाच्या प्रसारापाठोपाठ प्रौढविवाह आले आणि त्यांच्यामागोमाग प्रेमविवाहहि येत आहेत. प्रौढ व सुशिक्षित वधूवर आपापले विवाह स्वतःच ठरवित आहेत. त्यामुळें हुंडा, करणी, पत्रिका, मुहूर्त किंबहुना जात, धर्म इत्यादि निर्बंधाचे

साखळदंडहि आता रेशमी फितिप्रमाणें सहज कातरले जाऊं लागले आहेत स्त्रीपुरुषांना समानता राज्यघटनेनेंच प्राप्त झाली आहे. व्यवहारांतहि ती दृष्टीस पडत आहे. पण अजून ही समता व लग्नाची निर्विघ्नता समाजाच्या सर्व थरामध्यें मुरलेली नाहीं. गडकऱ्याच्या वेळीं तर तिची चाहूलहि फारशी ऐकू येत नव्हती. हुंड्यासाठीं स्वतःला जाळून घेणारी स्नेहलता आणि सासुरवासाने गांजल्या गेलेल्या बालवधू शेकडों होत्या त्यामुळें कन्येचा जन्म तें तिच्या पित्याला प्राणसंकट वाटे. अशा परिस्थितींत बडूनानानीं एका नववधूला चुकून ' अष्टकन्या सौभाग्यवती भव ' असा आशीर्वाद दिला. त्याचा परिणाम किती भयंकर झाला हे गडकरी अतिशयोक्तीने वर्णन करून सांगतात:—

" या आशीर्वादामुळे—आशीर्वाद कसला ? शापच तो !-त्या ठिकाणीं ताबडतोब केवढा गोंधळ उडाला, याची तुम्हाला कल्पना करतां येणार नाहीं! त्या जातींत कन्याप्राप्तीमुळें आईबापाच्या घरादाराचें वाटोळे होण्याचा खात्रीचा संभव असतो, आणि तिंबूनानांच्या तोंडून ते अभद्र शब्द असल्या मंगल प्रसंगीं निघालेले ! मग काय विचारता ! बायकामंडळींत रडारड सुरू होऊन पोक्त्यापुरवत्या बाया नवऱ्यामुलीला पोटाशीं धरून कुरवाळूं लागल्या. इकडे पुरुषमंडळी रागाने लाल होऊन आमच्याशीं लगट करून दंगल करूं लागली. तिंबूनाना एखाद्या निर्ढावलेल्या ' डाबिसा 'प्रमाणे कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडेतिकडे पाहात होते. मी मधूनमधून ओरडत होतों कीं, " अंगाला हात लावू नका ! कायदेशीर इलाज करा ! " पण माझें म्हणणे त्या गर्दींत ऐकतो कोण ? अखेर मोकळ्या मनानें व मोकळ्या हातानें धक्काबुक्की सुरू होऊन माझी व तिंबूनानाची कणिक चांगलीच तिंबून निघण्याचा रंग दिसूं लागला. "

## टीकेचीं गुप्त शस्त्रें

शेवटीं तिंबूनानावर खटला भरण्यात आला. त्या खटल्यात त्यांना न्यायाधीशानें कोणत्या शिक्षा सुनावल्या हें गडकऱ्यानीं मार्मिकपणें सांगितलें आहे, त्या शिक्षा अशा:—'मानापमान' नाटकांतील प्रत्येक

पदाचा अन्वयार्थ लावण्याची शिक्षा फर्मावितों. हें सर्व वाचन होईपर्यंत तुम्हांला पुण्यांतल्या एखाद्या खानावळींतच जेवावें लागेल. आणि दर आठवड्यास 'वीकएड' तिकीट काढून सदर्न मराठा रेल्वेच्या तिसऱ्या वर्गांतून पुण्याहून मिरजेपर्यंत प्रवास करावा लागेल. यापेक्षा कमी शिक्षा तुम्हांला करताच येत नाहीं ! ''

खाडिलकराच्या पदातील क्लिष्टतेवर, पुण्याच्या खाणावळींतील भिकार जेवणावर आणि एस. एम. आर च्या गाडींतील गर्दीवर जाता जाता पण किती तीक्ष्ण टीका गडकऱ्यानीं केली आहे ! या भयकर शिक्षा रद्द करून न्यायमूर्तींनीं अपिलात दयाळूपणाने ''तिच्या मानाने काहींच नाहीं'' अशी शिक्षा तिंबूनानाना दिली. ती कोणती ? तर ''तीन वर्षें सक्त मजुरी व एक हजार रुपये दंड ! '' बाळकरामाच्या प्रार्थनेमुळे तिंबूनानाना मुलीचें लग्न जमेपर्यंत मोकळे सोडले.

## ठकीचें स्वरूप-वर्णन

रूप, पैसा, जात, कुल, गोत्र-इत्यादि नाना चाळण्यातून अनुरूप वर मिळणे ठकीला जड गेलें हें स्वाभाविकच आहे. कारण '' ठकीची अग-कांति सुवर्ण रंगाची आहे, मात्र ही सुवर्णरचना सोनेरी किंवा तांबड्या शाईनें करून भागावयाचें नाहीं. या रगामुळे ठकीच्या बहुतार्शी गैरहजीर भोंवयाची उणीव, किवा धांदरटपणाने डोळ्याबाहेर येऊन भोंवतालच्या प्रदेशात बागडणाऱ्या काजळाचा फाजीलपणा, हीं दोन्हीहि तिऱ्हाइतांच्या चटकन् लक्षात येत नसत. महाकवि कालिदासाने शकुतलेच्या सौंदर्यसर्व-स्वाची जी लतिकेशीं तुलना केली आहे, तीच ठकीच्या बाबतींतहि सत्याला न सोडता करून दाखविता येईल; इतकेच नव्हे, तर एखाद्या लतेशीं पूर्ण सदृश न व्हायला शकुतलेच्या ठिकाणीं जी एक मोठी उणीव होती, तीसुद्धा ठकीच्या वर्णनात भरून निघाली आहे कारण, शकुंतले-प्रमाणेंच ठकीचे ' बाहू ढापे लतिकेच्चे ' व ' कर पल्लव साचे ' असून शिवाय एखाद्या लतिकेप्रमाणे ठकीच्या एका डोळ्यात फूलहि आहे ! ''

अशा ठकीच्या लग्नाचे मोहिमेवर तिंबूनाना व बाळकराम निघाले.

' मुलाला सासू नाहीं ' अशी अडचण एका ठिकाणीं दाखविण्यांत आली. तेव्हा ती दूर करण्यासाठीं नानानीं पहिल्या मुहूर्तालाच स्वतःला चतुर्भुज करून घेतलें. त्यातून एक नवीच अडचण दुसऱ्या स्थळीं उपटली. ती म्हणजे वरपक्षाने नानाच्या नूतन पत्नीलाच उपवर वधू समजून लग्नाला होकार दिला !

## अतिशयोक्तीच्या सरी

ठकीचें लग्न जमविण्यासाठीं ही मडळी पुण्यास आली तेव्हा नवा पोषाख करण्याची सूचना बाळकरामाने केली. त्याच्या खर्चाचा अदाज पाऊणशेच्या घरात गेला. तो ऐकताच नानाचा जीव गुदमरला व ते म्हणाले, ' बाळकराम वेड्या, उगीच पैसे पाण्यात घालण्यात काय हशील ? तुझ्या पोषाखाचा खर्च म्हणजे निव्वळ बुडीत खर्च ! जावई पोषाखा-बरोबर ठकीलाहि पत्करील हें तू विसरतोस ! तेव्हा त्याच्यासाठीं कां नाहीं हवा तसा खर्च करणार !

चल, पत्कर तूं ठकीला आणि —

नंतर चार दिवसानीं मी सावध झालो ! " अतिशयोक्तीची तार याहून लाब कोणाला खेचता येईल ? पावसाच्या सरीवर सरी कोसळाव्या, तशीं अतिशयोक्त विधाने करण्यात गडकरी चतुर आहेत. बाळकरामानें आपलें नाजूक हृदय वरसशोधनाच्या कामाला अपात्र असल्याचें ठरविलें. आणि त्याचे जागीं दुसरें बळकट हृदय बसाविण्यासाठीं एका दवाखान्यात त्याला नेण्यात आलें. तेथे तिघाचीं प्रेतें त्या दिवशीं आली होतीं. त्यापैकीं कोणाचें काळीज अधिक कठीण, यावर टीका करताना गडकरी लिहितात, " सूक्ष्मदर्शक यत्राने शोधून पाहताहि शास्त्रीबुवाच्या हृदयाचा थाग न लागल्यामुळें त्याना हृदयच नव्हतें असें सिद्ध झालें; आणि दरोडे-खोराचें हृदय काळजासकट उफराटें लोंबकळत असलेलें आढळून आले. अखेर सर्वानुमतें त्याचीच निवड झाली. पुढें मला दोन दिवस कोकाई-नच्या पिपात भिजत घातल्यावर माझें हृदय कापून काढून त्याच्या जागीं त्या दरोडेखोराचें उफराटें हृदय सुलट करून चिकटवून दिलें." या विनो-

दाऱ्या मखमली हातमोज्यामध्यें टीकेचीं किती तीक्ष्ण वाघनखें लपवून ठेवलेलीं आहेत !

याहिपेक्षां अधिक अतिशयोक्ती करण्याची सुरसुरी गडकऱ्याच्या कल्पना-शक्तीला आली. नानाचे पागोटे दीडशे हात लांबीचें होते. आणि त्याचा अंगरखा ?—" नानांनीं स्वतःसाठीं जुन्या दक्षिणी तऱ्हेचा गुडघ्याशीं गोष्टी सांगणारा मलमलीचा अंगरखा बरोबर आणलेला होताच. त्याचे हात चुण्यांचे असून त्यापैकीं एकेकाची लांबी इतकी होती, कीं दोहींचे नेहमींच्या हाताएवढाले तुकडे पाडले असते तर हजार हातांच्या सहस्रार्जु-नालाहि त्या अंगरख्याच्या बाहेरची तसूभर धादोटी लावल्यावांचून उपयोग करून घेता आला असता. नानाच्या फार तरुणपणीं त्यांनीं एकदा ' विदाऊट तिकीट ' प्रवास करून पाहिला होता. त्या प्रसंगीं ' मशार-निल्हे ' अंगरखा त्याच्या अंगात होता. बोरीबंदर स्टेशनवर तिकीट-कलेक्टरला ' पास ' असें सांगून झटक्यासरशीं बाहेर येताना त्याने आपला हात धरल्याचे गिरगावात येईपर्यंत नानाना कळलें नाहीं, असें ते सांगत असतात ! "

## लग्नाचें बाजारी स्वरूप

पैज मारून व कंबर बांधून बाळकराम व तिंबूनाना लग्नाच्या मोहिमेवर निघाले. आपल्या आगमनाची वर्दी तमाम पुणेकराना देण्यासाठीं त्यानीं नाटका-सिनेमाप्रमाणें मोठमोठ्या जाहिराती 'झाडून साऱ्या भिंताडावरून व बुरुजावरून फडकावून दिल्या.' औषधाच्या जाहिरातीची चेष्टा करण्यासाठीं त्यानीं वर्तमानपत्रातील जाहिरातींत अशीहि सवलत जाहीर केली कीं, "दोन मुली एकदम करणारास एक मुलगी इनाम ! ही सवलत तिंबूनानाच्या धाकट्या चारी मुलींचीं लग्ने होईपर्यंत देण्यात येईल. " अशा जाहिराती फडकवून मोठ्या जाम्यानिम्यानें त्यानी शाळेत व धर्मशाळेत—फार काय गोशाळेत व चित्रशाळेतहि वरसंशोधन चालू केले. वेड्याच्या दवाखा-न्यातहि ते गेले. तेथील डॉक्टरांनीं त्याचा मेंदू तपासण्यास सुरवात केली, तेव्हां " डॉक्टरमजकूर नानांचा मेंदू तपाशीत असतां त्याचें डोके एका

तरुण हिंदु विद्यार्थ्यांनें धरून ठेविलें होतें; तेवढ्यात नानांनीं त्याचे पाय धरून पोरीला पदरांत घेण्याची विनति करावयाला सुरवात केली."

## मोहिमेंतील मौजा

बाळक्याची मोहीम जोरात सुरू झाल्यामुळें सर्व पुणेकरांना त्याची माहिती मिळाली व धास्ती वाटू लागली. त्याना चुकविण्याचा जो तो प्रयत्न करूं लागला. त्यामुळे पुणे शहरात कोणते अनर्थ ओढवले तें ऐका, "एखाद्या शाळेच्या दाराशीं आमची गाडी उभी राहताच सर्व शाळाभर एकदम शुकशुकाट होऊन इन्स्पेक्टरची तपासणी आल्याप्रमाणे शाळेंत शातता होत असे. कित्येक कच्च्या दिलाचे तरुण तर रात्रीं-अपरात्रीं दडपल्यासारखे होऊन आमच्या नावाने बरळत दचकून उठत. आमच्या तोडाला तोंड देण्यापेक्षा वाटेल त्या सकटाला तोड देण्याची तरुणाची तयारी दिसूं लागली. एकदा तर नदींत डुबत असलेल्या एका तरुणानें आम्हाला घाटावर पाहाताच तोंड चुकविण्यासाठीं तळाशीं बुडी मारून कायमची जलसमाधि घेतली."

शेवटीं फर्गसन कॉलेजातहि ही मंडळी आपल्या बैलगाडींतून गेली. तेथें फारच गंमतीचे प्रसग घडले. "गाडीवाल्यानें कॉलेजसमोरच्या सुंदरशा बागेंत बैल चारणीला घातले होते, नानाचा चिमण्या गावढळ मूर्खपणाच्या बेफिकीरपणानें प्रत्येक वर्गात जाऊन, कमरेवर हात ठेऊन त्याची तपासणी करीत होता. आणि आबाभटजींनीं तोंडाच्या तोफेत तंबाखूचे सारखे बार भरून पाढऱ्यास्वच्छ भिंतीवर इंग्रजी राज्याचा रंग चढविण्याचा सपाटा चालविला होता. आमच्याबरोबरच्या पशूंचा आणि नरपशूचा हा आचरटपणा पाहून मला मनस्वी राग आला, पण मी त्या लोकाना काहीं हाटकणार तोंच विद्यार्थ्यांचें थवेच्या थवे उतावळ्या उत्कंठेने आमच्या दालनांत जमूं लागले." कॉलेजातील तरुण विद्यार्थी या विक्षिप्त मंडळीकडे पाहून हंसू लागले. त्याच्या हसण्याच्या निरनिराळ्या तऱ्हाचें वर्णन गडकरी पुढीलप्रमाणें करतात.—"ठिकठिकाणीं सहकारी तत्त्वावर निरनिराळ्या प्रकारच्या हंसण्याचे छोटेखानी कारखाने सुरू होऊन त्यातून गालांतल्या गालात हंस-

ण्याच्या तलम सुतापासून घोडइंशाच्या राकट दोरखंडापर्यंत सर्व प्रकारच्या मालाची पैदास होऊं लागली. ”

## सनातनी चालींचा उपहास

पुरुषासारखे पुरुष असणाऱ्या तिंबूनानांना व बाळक्याला ठकीच्या लग्नाची इतकी यातायात; मग ज्या मायभगिनींवर आपल्या मुलीचें लग्न जमविण्याची पाळी येत असेल, त्यांचे हाल किती होत असतील! ‘उन्हातान्हातून दारोदार उंबरठे झिझविणाऱ्या’ एका म्हातारीची करुण कहाणी सागून शेवटीं गडकरी उपरोधानें लिहितात—“आम्ही आमच्या बायकाना घरातच कोंडून ठेवितो, त्याच्या शहाणपणाला चुलखंडांतच होमून टाकतों, वगैरे बाष्कळ बडबड करण्याऱ्या चारगट सुधारकांनीं या गोष्टीकडे जरूर लक्ष द्यावे. त्या आईच्या शहाणपणाला गावगन्ना मोकळें सोडून व त्रिखड धुंडाळायला लावून सारी गंमत निर्विकार मनानें पाहणाऱ्या समाजानें बायकावर आणखी कोणतीं जबाबदारीचीं कामें टाकावयाला पाहिजेत ! ”

## रबरी फुगे कीं बाँबगोळे ?

ठकीच्या लग्नाची काळजी वाहणाऱ्या व जबाबदारी पतकरणाऱ्या बाळक्याने तिच्या संसाराची घडी बसवून द्यावयास नको काय ? ‘स्वयंपाकघरांतील गोष्टी’ या नावाच्या लेखांत विनोदाचा मालमसाला ठेचून भरला आहे. “झाऱ्यापळ्याच्या शस्त्रास्त्रानीं सायुध झालेली आचारी, पाणके, वाढपी आणि खटपटी यांची चतुरंग सेना ” स्वयंपाकघराच्या किल्ल्यांत कोणती मर्दुमकी गाजवितात, या क्षुद्र वस्तूंचें वीरश्रीयुक्त वर्णन करून गडकऱ्यानीं चागला विनोद निर्माण केला आहे.

स्वयंपाकघरांतील निरनिराळ्या पदार्थांच्या नांवावर कोट्या करूनहि गडकऱ्यांनीं हास्यरस उत्पन्न केला आहे. “ चापटपोळया, धम्मकलाडू, बर्फीची चटणी, विहिणीची रेवडी, कणिक तिंबणें, पोळ्या लाटणें, अंगाचा तिळपापड, पाठीचें धिरडें, मनांतले माडे, थंडा फराळ, माणसांचे मेतकूट,

घरादाराचें खोबरे" इत्यादि शाब्दिक कोट्या म्हणजे केवळ हास्याची हवा भरलेले रबरी फुगे नव्हेत, तर स्त्रीवर्गाच्या असहाय्य अवस्थेवर केलेल्या टीकेचे ते बॉबगोळे आहेत. कांहीं पदार्थांत स्त्रियाचे दोषहि मार्मिकतेने सूचित केले आहेत. उदाहरणार्थ 'थंडा फराळ' पहा—"दुपारचीं जेवणें झालीं म्हणजे खुशाल तणावून द्यावें व चुलीला वाटाण्याच्या अक्षदा द्याव्या. संध्याकाळीं 'तिकडून' कामकाज करून कंटाळून घरीं येणें झाल्यावर आजाराची सबब सागावी. 'तिकडे' बहुतकरून चुलीची आराधना करण्याचा कंटाळा असतोच! अशा वेळीं हजार हिश्शांनीं 'थंडा फराळ' करून वेळ भागवावी लागते. हा पदार्थ उपासालासुद्धा चालतो."

## नकली कवींचें विडंबन

गडकऱ्याच्या विनोदाचा दुसरा प्रमुख विषय म्हणजे 'कवींचा कारखाना.' ते स्वतः उज्ज्वल प्रतिभेचे कवि होते. 'ट ला ट व प ला प' करणारे इतर लुंगेसुगे कवि त्याच्या डोळ्यापुढे होते. 'सालोमालो' कांहीं तुकारामाच्याच वेळीं होते असें नव्हे, ते वर्तमानकाळातहि आहेत. त्याच काव्याचे आणि काव्य-गायनाचे वेड याचे गडकऱ्यानीं निर्भीड विडंबन केलें आहे. आपल्या या विडंबनाच्या शर-संधानातून आपण सत्कवींना वगळतों असे त्यानीं प्रारंभींच गाभीर्याने व विनयानें सागितलें आहे. किंबहुना, त्याचा कैवार घेऊन, नव्या कवीची तरफदारीहि केली आहे. 'जुनें काव्य तेवढें चांगले, नवे हिणकस आहे' असे आरोप करणाऱ्याचा त्यानीं खरपूस समाचार घेतला आहे. पण त्यानंतर मात्र "गणदासाची व प्रासपुत्राची' यथेच्छ रेवडी उडवली आहे.

## विरोधाभासाचे नमुने

काव्याच्या विविध विषयाचे वर्णन गडकऱ्यांनीं विरोधाभासाने पुढीलप्रमाणें केलें आहे, "कवितेनें वीराना आणि प्रणयीजनांना उत्साह दिला आहे आणि वीरानीं व प्रणयीजनांनी कवितेला विषयांचा पुरवठा केला

आहे. सुंदर स्त्रियानीं कवितेला वरच्या दर्जाला चढविलें आहे, तसेंच कवितेनें सुंदर स्त्रियांना चढवून ठेविलें आहे. कवितेनें किती तरी लोकाना शुद्ध वेडे केलें आहे, तर शुद्ध वेड्यानीं किती तरी कविता केली आहे !"

एकंदर वाङ्मयात सत्काव्य व भिकार कविता याचे प्रमाण काय असतें हें लहानमोठ्या विषयाच्या उपमा देऊन गडकऱ्यांनीं मौजेने सागितले आहे, तें असे, " मिठाईच्या पुड्यात पेढ्याचे बत्ताशाशीं, मोरीसाठीं केलेल्या मिश्रणात फेनाइलचे शुद्ध पाण्याशीं, माळ्याच्या पुड्यांत गुलाबाचें कण्हेर फुलाशीं, पूना मेलच्या प्रवासात थाबावयाच्या स्टेशनाचें न थाबावयाच्या स्टेशनाशीं, मोठमोठ्या ऑफिसातून वरिष्ठ अधिकाऱ्याचे कारकुनांशीं, क्लबांच्या बैठकींतून 'त्या' बाटल्याचे सोडा-लिमलेटच्या बाटल्याशीं, प्रेम-याचनेच्या संवादांतून रमणीच्या शब्दाचे वल्लभाच्या शब्दाशीं, किंवा एकदर समाजात शहाण्याचे मूर्खाशीं, जे प्रमाण असते, तेंच पहिल्या प्रकारच्या कवितेचे दुसऱ्या प्रकारच्या कवितेशीं असते. "

## काव्य-गायनाचें वेड

अशा दुसऱ्या प्रकारची आपली कविता वाचून दाखविण्यासाठीं आपल्या एका कविमित्रानें 'भर बुधवारात' बैठक कशी मारली आणि तेथे 'तमासगिराचा ताडा' कसा जमू लागला व सत्राव्या कडव्याचे स्पष्टीकरणार्थ सोळावे, सोळाव्यासाठीं पधरावें-करीत सारे शोक-काव्य त्याने बाळक्याला कसे पाजले, त्यामुळें बाळक्याने " दुःखावेगाच्या भरात बेशुद्ध झाल्याचे सोग करून धाडकन् धरणीवर अंग टाकले ! " अशी अतिशयोक्ति करून गडकऱ्यांनीं काव्य-गायनाचे परिणाम कथन केले आहेत. तसेंच, मोरबांना मूल झालें व तें मेलेंहि—अशा हर्षशोकमिश्रित प्रसंगींहि भाबूराव कविता प्रसवले नाहींत. म्हणून स्मशानात गावकरी आनंदानें जमले. जत्राच भरली जणूं तेथें. पण सभा चालू असतां भांबूराव कविता घेऊन आला, तेव्हां "विसूनाना धाडकन् खालीं पडले. अध्यक्षांनीं डोळे पाढरे केले ! दिशा धुंद झाल्या ! दिवसां उल्कापात होऊं लागले ! अशनिपात सुरू झाला ! "

कवीच्या टोपण नावावर टीका करतांना गोविंदाग्रजांनीं नाव शब्दावर पुढील कोट्या केल्या आहेत; " नाव मिळविण्याइतकी अक्कल नसल्यामुळेच कवीला सग्यासोयऱ्यांच्या नावावर भिस्त ठेवावी लागत असेल, अशी क्षुद्र कल्पना लढवून कोणी कोणी या प्रघाताला नावें ठेवण्याचा प्रयत्न करतात, परंतु त्यात नांवापुरतेंसुद्धा तथ्य नसते. "

तसेच ' रम्य ते बालपण ' म्हणून नेहमीं मिटक्या मारणाऱ्या साहित्यिकाची चेष्टा करताना उपरोधाने गडकरी म्हणतात, " अहाहा ! तें बाळपण आणि त्या लीला ! ते अर्ध्या तिकिटाने प्रवास करणे ! तें निम्या दराने नाटक पाहणें ! तें सर्वांनीं कौतुक करणें ! माझ्या लहानपणीं शेजारपाजारच्या बायकानीं पटापट चुंबनें घेऊन माझे लाड पुरवावेत; पण तेच आता— ! वाचकहो, बाळपणींचे सुख अवर्णनीय आहे, असें म्हणतात ते कांहीं खोटें नाहीं ! "

हास्य निर्माण करण्याजोग्या उपमा गडकरी कशा देतात याचा एक नमुना पहा. " जीं गुजराथी अक्षरें देशावरच्या धाब्याच्या घरांसारखी दिसतात तींच कवितेंत या खुणाच्या योगानें, रिकाम्या टोपल्या वाहणाऱ्या मुंबईतल्या हेलकऱ्यासारखी किंवा नारळीच्या चोंडाचीं ने–आण करणाऱ्या मलबारी मजुरासारखीं दिसावयाला लागतात. "

## मानवी स्वभावाचें निरीक्षण

काव्यापाठोपाठ नाट्याचाहि विषय गडकऱ्यानीं आपल्या विनोदासाठीं निवडला. ते स्वतः यशस्वी नाटककार होतेच, पण त्याशिवाय नाट्य–गृहाच्या दारावर उभें राहून तिकिटें तपासण्याचेंहि काम त्याना कांहीं काळ करावें लागलें होतें. त्यांच्यासारख्या तल्लख कल्पनाशक्तीच्या व सूक्ष्म निरीक्षण–शक्तीच्या माणसाला त्या नाट्य–द्वारा–भोंवतीं मानवी स्वभावाचे किती तरी मजेशीर मासले पहावयास मिळत. त्या सर्वांवर बारीक टीकेची छिनी चालवून त्यांनीं ' नाटक कसें पहावें ' ही लेखमाला

लिहिली. ' नाटक कसें लिहावे ' ही लेखमाला ' सवाई नाटकी ' या नावानें लिहून त्यांनीं मराठी नाटकातील ठोकळेबाजपणा व कृत्रिमपणा यावर शस्त्र धरले. सूत्रधार-नटी याच्या प्रवेशावर टीका करूनच त्यानीं ही लेख–माला सपविली. सूत्रधाराकडे विसराळू अजागळ, नाटकाच्या जाहिरातीचा मक्तेदार, देवाची प्रार्थना करणारा व रसिकापुढे नाटकाची तरफदारी करणारा वकील, उपवर पोरीचा बाप व नाटकद्वेष्ट्या हटवादी बायकोचा निश्चयी नवरा—अशा पाच भूमिका असतात, हे सागताना गडकरी एका उपमेनें सांगतात, " बार्शी लाइट रेल्वेचा अर्धगौर गार्ड, गाडी चालत असेपर्यंत गार्ड, स्टेशनवर उभी राहावयाचे बेतात असताना उतारूजवळून तिकिटे घेणारा तिकिट कलेक्टर, गाडी उभी असेपर्यंत स्टेशनावर झपाट्याने येरझारा घालणारा स्टेशनमास्तर व शेवटीं गाडी सुटावयाचे वेळीं बावटा दाखविणारा पोर्टर, हे चार निरानिराळे हुद्दे सभाळून असतो. सकृद्दर्शनीं याची कर्तबगारी मोठीशी वाटते खरी; परंतु नाट्यसृष्टीमधील गौरमुख सूत्रधार त्याच्या उज्ज्वलतेस काळिमा लावल्या-खेरीज राहणार नाहीं. " पैसे न खर्चता नाटक पाहणाऱ्या फुकट्याचा एक वर्ग असतो. त्याचा उपहास करण्यासाठीं त्याना राष्ट्रीय नेत्याच्या दर्जाला पोचवून गडकरी म्हणतात, " नाटकवाल्यांनीं आपल्याला नाट-काला फुकट सोडलेच पाहिजे ही याची स्वराज्याची कल्पना, गांवच्या गडबड्या लोकाचा धुमाकूळ ही याची स्वदेशी चळवळ, लोकांना नाट-कार्ची तिकिटे न घेण्याचा उपदेश करणे हा याचा बहिष्कारयोग आणि नाटक चालले असता दंग्याधोप्याना उत्तेजन देणे हेच याचे राष्ट्रीय शिक्षण! क्वचित् प्रसगीं नाटकगृहाभोंवतीं लोकाना न येऊ देण्याचें ' पिकेटिंग '—सुद्धा अंमलांत येतें ! "

नाटक फुकट पहावयास मिळावें म्हणून हे आबटशोकी लोक नटाच्या, मॅनेजराच्या ओळखी कशा जोडतात, त्याच्यापुढे लाचारीचें लागूलचालन कसें करतात; हें सागून गडकरी म्हणतात, " रजपुताचें साहस, इग्रजांची चिकाटी, कोंकस्थांचा कावा, मिशनऱ्यांचा मुर्दाडपणा वगैरे यच्चयावत् विशिष्ट गुणांचा या वेळीं नाटकगृहासमोर बाजार भरतो ! "

## कल्पकतेची मौज

एक आठवडा म्हणजे किती दीर्घकाळ आहे, हें ठसविण्यासाठीं गडकरी विनोदाने लिहितात, " त्या दिवशीं ज्याना प्लेगची नुसती गाठ आली असेल त्यापैकीं बऱ्याच माणसांच्या नावामागे आज रा. रा. ऐवजीं कै. झळकूं लागले असेल. त्या सध्याकाळीं होऊं घातलेल्या नाटकाच्या जाहिराती आजला फाटून कर्त्यांच्या कीर्तिध्वजाप्रमाणे भिंताडावर फडकत असतील. त्या वेळीं घड्याळजीकडून दुरुस्त करून आणलेलीं घड्याळें आज पुन्हा दुरुस्तीला लायक होऊन बसलीं असतील. तत्कालीन शिल्लक राहिलेलीं तार्जी भर्जी आज इतकी शिळीं झालीं असतील कीं, निर्बुज गिऱ्हाइकाना देण्यासाठींसुद्धा ताज्या भज्याच्या प्लेटींत एकाद–दुसऱ्यापेक्षा जास्त घुसडून देण्याची निर्ढावलेल्या हॉटेलवाल्याची हिंमत होत नसेल. त्या सकाळीं एखाद्या श्रीमत दिवाणखान्यांतील संगमरवरी फरशीप्रमाणें तकाकणारे घोटणारे चेहरे आजमितीस एका गावच्या गुरेचारणीची सोय करण्याइतक्या कुरणासारखे झालेले असतील. "

## जीवनावर प्रकाश

मनुष्य स्वभावात लपून बसलेली विसंगति आपल्या मार्मिक दृष्टीनें वेचून काढून ती हास्यकारक रीतीनें माडण्यात गडकरी कुशल होते. तर्कालंकारचूडामणि प्रो. कोटिबुद्धे हे जाडे विद्वान; पण त्याना आपल्या आठ–दहा महिन्याच्या बाबूला काहीं खेळविता येत नाहीं, हें ' दीडपानी नाटकात ' त्यानीं चातुर्यानें दाखविले आहे. दहाबारा वर्षाची मनुताई मात्र ' बाबुड्या रे छकुल्या रे ' करून बाबूचें रडें थाबविते असें दाखवून शेवटीं ' गंभीर तत्त्वज्ञाना'ची हास्यास्पदता स्पष्ट केली आहे.

याहिपेक्षा मधुर असें ' दीडपानी नाटक ' म्हणजे ' संगीत मूकनायक ' त्याच्या प्रथम पृष्ठावर " रूढीच्या शिळाछापांत छापिलें ' व ' मनुस्मृतीच्या ॲक्टान्वयें सर्व हक्क हिंदुसमाजासाठीं कायमचे राखून ठेवले आहेत. " असें वर्णन आहे. लेखकाचें नांव ' दीड शहाणा ' आणि नाटकाची प्रस्ता-

वना ‘ नाटक हें संसाराचें चित्र आहे ’ एवढीच. श्री. कृ. कोल्हटकराच्या नाटकाचे नांव घेऊन व त्यातीलच पात्रें उचलून मध्यमवर्गातील तरुणाचा जन्म कारकुनीची पखाल वहातां वहाता निरर्थकपणे कसा जातो याचे सुंदर चित्र या नाटिकेत आहे. शाळेतील विनोदी संवाद पहा—

दिपोटी—काळीचा वसूल करण्याची अकबराची रीत काय होती ?

विक्रांत—( काळा पडतो. )

दिपोटी—छट्टू कधीं मेला ?

विक्रांत—( त्याला मेल्यापरीस मेल्यासारखे होते. )

दिपोटी—पेशवाई बुडविल्याचें खापर कोणाच्या माथीं फुटतें ?

विक्रांत—( डोके खाजवितो. )

दिपोटी—पिवळा समुद्र कुठें आहे ?

विक्रांत—( त्या समुद्रात बुडाल्याप्रमाणें गुदमरतो. )

दिपोटी—पाणलोट कशाला म्हणतात ?

विक्रांत—( डोळ्यातून घळघळा पाण्याचे लोट वाहूं लागतात. )

कोल्हटकराचा विक्रांत ‘ मूकनायक ’ असला, तरी तो पुढें बोलका नायक होतो; परंतु गडकऱ्याचा नायक हा जन्मापासून मरेपर्यंत एक अक्षरहि तोंडावाटे न काढून खरोखर मूकच राहतो. त्याच्या जीविताचे गुण-वर्णन त्याच्या मृत्यूनंतर करताना स्मशानात जमलेली मंडळी म्हणतात, “ एक चांगला मनुष्य गेला ! कोणाच्या अध्यात ना मध्यात ! कधीं खटखट नाहीं कीं कधीं ठकठक नाहीं ! उभ्या जन्मांत याच्या हातुन च्यारचौघानीं नावे ठेवण्यासारखे काहीं झालें नाहीं तेवढ्या आठ मुलांखेरीज. ( चिता धडकते. तिच्या जाळानें पेटून पडदा जळतो. ) ”

‘ सकाळचा अभ्यास ’ या प्रहसनात घरातील मुले अभ्यास करताना त्यांचें चित्त कसे वावडत असतें हें गडकऱ्यांनीं मजेशीरपणे रंगविले आहे.

विनोदी लेखामध्ये गडकऱ्यांचा कोटीबाजपणा स्वच्छंदानें विहार करीत आहे. ‘ चेहरा व पडदा पडतो,’ ‘ नाकीं गमन करतों, ’ इत्यादि

शब्दावर कोट्या करून गडकऱ्यानीं खसखस पिकाविली आहे. अर्थात्‌च या विनोदी लेख-सग्रहात कोठेकोठे कृत्रिमता व क्लिष्टताहि आली आहे. पण कल्पना-शक्तीचा स्वैर विलास आणि तिच्या पोटीं समाज-सुधारणेची तळमळ हे दोन्ही गुण या लेखात प्राचुर्यानें तळपतात.

## अभ्यासाच्या वाटा

(१) विनोदाचे अनेक प्रकार आहेत त्या प्रकाराची नावे व उदाहरणें कोल्हटकर व गडकरी याच्या लेखनाच्या आधारे द्या.

(२) कोटी म्हणजे काय ? गडकऱ्याच्या लेखनातील तुम्हाला आवडणाऱ्या काहीं कोट्या द्या

(३) ‘कवीचा कारखाना’ व ‘नाटक कसे पाहावे’ हे विनोदी लेख लिहिताना गडकऱ्याच्या मनात कोणते हेतु होते ?

(४) श्री न. चि. केळकर लिहितात ‘विनोदी लेखक या नात्याने गडकरी याची प्रतिभा कोल्हटकरांच्या प्रतिभेपेक्षा अधिक पैलूदार व पल्लेदार आहे’ विवेचन करा.

# आचार्य अत्रे : : : ३

“सभ्य गृहस्थहो ! ” हे किती मामुली शब्द ! पण ते व्यासपीठावर उभे राहिलेले आचार्य अत्रे याच्या मुखातून बाहेर पडले, तरी श्रोत्यांमध्यें हशा पिकतो. “ आज संध्याकाळीं ” असें ते पुढें म्हणाले



कीं पुनः हशा ! “ आपण येथें ” पुनः हशा; “ कां जमलों ” तरी हशा ! गंभीर विषय असला तरी हशा ! शोकसभा असली तरीसुद्धां ! ! असा अकारण व अमर्याद हशा वाक्यावाक्याला निर्माण करण्याची सिद्धि अत्रे यांना वश झाली आहे. सर्वांना सहज कळणारी सफाईदार भाषा, कोटीला प्रतिकोटी लढविण्याचा हजरजबाबीपणा आणि विसंगति शोधून काढणारी सूक्ष्म दृष्टि या तीन गुणामुळें अत्रे याचे सारे लेखन व भाषण विनोदानें बहरलेले असतें. त्याच्या विनोदांत जशी व्यक्तिनिंदेची धुळवड असते, तशीच काव्य-कल्पनेची रंग-पंचमीहि असते. कोल्हटकर-गडकऱ्याप्रमाणें ते आपल्या विनोदाचा उपयोग सामाजिक सुधारणेच्या प्रचाराचें साधन म्हणून फारसे करीत नाहींत. “ विनोदासाठीं विनोद ” हेंच त्याचें ब्रीद—आणि तो विनोदहि ‘ पोटफोड्या ’. नरसोपंत केळकर किंवा वामनराव जोशी यांच्याप्रमाणें विनोदाचा मंद सुगंध सर्व लेखभर दरवळत

ठेवण्याइतका सूक्ष्मपणा अत्रे याच्या अंगीं नाहीं. ते स्वत सकट सर्वांना ' खर्ची ' घालून विकट हास्याचे अमाप धन जमा करतात.

## दोन घटका मनोरंजन

' नाताळ ' म्हटलें कीं ख्रिस्ती लोकाना गर्दी, मौज, दंगा यांचीं दृश्ये दिसतात; त्याप्रमाणे ' अत्रे ' म्हटले कीं, महाराष्ट्रीयांना स्वैरपणा, खेळाडूपणा व आनदीपणा याच्या मूर्ति दिसूं लागतात. 'सुटी' म्हटलें कीं शाळेतील मुले जशीं हरखतात आणि क्रिकेटचा सामना पाहण्यासाठीं क्रीडागणाकडे धाव घेतात; तसे ' अत्रे ' याचे व्याख्यान आहे असें कळताच श्रोतृवर्ग ' आज हसून हसून आपल्या बरगड्या दुखणार ' अशा अपेक्षेनें सभागृहाकडे जातो. ढोलगें वाजूं लागलें, पेटारा उघडला आणि मुंगूस–अजगराची लढाई किंवा माकडाची कारवाई सुरू झाली कीं, तो गारुड्याचा खेळ पहात शेकडों प्रेक्षक तासन् तास उभे रहातात ना ? त्याच भावनेने हजारो श्रोते अत्रे याचे विनोदप्रधान भाषण ऐकत असतात. त्यांचेकडून आपण काहीं विचार मिळवावयाचा आहे किंवा स्फूर्ति घ्यावयाची आहे अशी कल्पना चुकूनहि कोणाच्या डोक्यात नसते.

संसारांतील भगभगी, कचेरींतील कटकटी, राजकारणातील उलाढाली इत्यादि डोक्यातील सारा माल घरीं ओतून ठेवूनच श्रोतृवृंद अत्रे याच्या व्याख्यानाला जातो व आपल्या मनाची झोळी हास्याच्या चिंचाबोरानीं भरगच्च भरून आणतो. त्याच्या लेखना–भाषणात एकाद्या विषयाची आकडेवार माहिती किंवा युक्तिपूर्ण मुद्दे अथवा तर्कशुद्ध प्रतिपादन यांची अपेक्षा फारशी कोणी करीतच नाहीं. ' दोन घटका मनोरंजन ' व्हावें या हेतूनेंच लोक त्याच्या लेखा-भाषणाची चव चाखतात. आणि त्यातच अत्रे यानाहि सार्थक्य व साफल्य वाटत असावें. त्यानीं स्वतःच विनोदाचें कार्य काय असतें हें पुढील शब्दानीं सागितलें आहे, " दुःखाना हंसावयाचे, तीं हंसण्यावारीं न्यावयाचीं, हसून हंसून तीं विसरून जावयाचे, हा विनोदाचा खरा हेतु आहे....जीवनसत्त्वें शोषून घेणारे चिंतेचे आणि दुःखाचे जे अनंत जंतु आहेत, ते विनोदाच्या पिचकाऱ्यानीं मारले

जातात; एवढेंच नव्हे तर जीवनाच्या अभिवृद्धीस हर्ष, आनंद, खेळकर-पणा, तारुण्य हीं जीं द्रव्ये आवश्यक असतात, त्याचा पुरवठादेखील विनोदामुळेंच होतो.'' दुःख–नाश व आनद–लाभ ही विनोदाची दुहेरी कामगिरी अत्रे आपल्या लेखणीने व वाणीने बजावीत असतात. ' महा-राष्ट्राला हसावयास मींच शिकविले ' हें त्याचे काहींसें आत्मप्रौढीचे वचन पुष्कळ अंशीं सत्य आहे असे म्हणावें लागते. विनोदाचा धबधबाच त्याच्या वाणींतून व लेखणींतून वहात असतो. त्याचा स्वभाव, त्याची वृत्तिच विनोदी, खेळाडू, दिलदार आहे.

कोल्हटकर यानीं विनोदाची जी नवी पायवाट रुळविली, तिचा गडकऱ्यानीं राजमार्ग बनविला आणि अत्र्यानीं तो राजमार्ग सर्वसामान्य लोकानाहि खुला केला.'केशवकुमार'या टोपण नावाने त्यानीं आधीं विडबनपर व नतर प्रसादपूर्ण अशा कविता लिहिल्या. रसिकाच्या मान्यतेस पावलेल्या ' रवि-किरण' मडळावर उपहासाचे शस्त्र चालविणाऱ्या त्याच्या कविता, 'झेडूचीं फुले' या पुस्तकात संग्रहीत केलेल्या आहेत आणि त्याची स्वतत्र काव्य–संपदा ' गीत–गगा ' या पुस्तकात साठविली आहे.

## शिक्षण-शास्त्रांत निष्णात

प्रल्हाद केशव अत्रे याचा जन्म १८९८ सालीं सासवड येथे झाला. पुरदर किल्ल्याच्या नैसर्गिक सौंदर्यावर व ऐतिहासिक अभिमानावर त्याचे बालपण पोसले गेले. त्यानंतर शिक्षणासाठीं ते पुणे येथे आले. भावेस्कूल मध्ये त्यानीं दुय्यम शिक्षण घेतले व १९१४ सालीं ते मॅट्रिक झाले. पुढे पाच वर्षानीं फर्मसनमधून ते बी. ए. झाले. त्यानीं काव्य व नाटके या विषयाचे सपाटून वाचन केले. त्यावेळीं मराठी वाङ्मयात कवि व नाटककार म्हणून प्रकर्षाने तळपणारे गडकरी याचा परिचय त्याना घडला. लवकरच ते त्याचे मित्र झाले व भक्त बनले. बी. टी. च्या परिक्षेंत अत्रे १९२९ सालीं पहिल्या वर्गात पहिला नंबर मिळवून उत्तीर्ण झाले. इग्लंडला जाऊन ते टी. डी. होऊन आले. शिक्षणशास्त्राच्या या पदव्या पाठीशीं बांधून

त्यानीं पुणे येथील ' कॅंप एज्युकेशन सोसायटीच्या ' हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून सुमारें वीस वर्षे काम केले. त्या हायस्कूलचे कांहीं वर्षे ते प्रिन्सिपल होते. नंतर त्यानीं केवळ स्त्रियाकरिता ' आगरकर हायस्कूल ' नावाची संस्था रास्ता पेठेत स्थापन केली. शाळेतील विद्यार्थ्यांकरिता त्यानीं 'अरुण वाचन माला' व ' नवयुग वाचन माला ' काढल्या. पुणे नगरपालिका व मुंबई महापालिका यांचे सदस्य म्हणून त्यानीं लोक-सेवा केली. १९३० सालीं पुणें येथे भरलेल्या पहिल्या कवि संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. नाशिक येथील साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्याना १९४२ सालीं मिळाले आणि मराठी पत्रकार समेलनाचे अध्यक्षस्थान त्यानीं कोल्हापूर येथे १९४८ सालीं भूषविले.

## विनोदाचे प्रकार

' वीरवचन ' व ' गुरुदक्षिणा ' ही त्यांचीं शालेय नाटकें आहेत. त्यांचे सार्वजनिक स्वरुपाचे पहिले नाटक ' साष्टांग नमस्कार ' हे १९३३ सालीं रंगभूमीवर आले आणि ' कवडीचुंबक ' हे त्यांचे ताजे नाटक १९५१ सालीं साहित्यिकानीं उभे केले. अठरा वर्षांत त्यानीं सुमारे दहा नाटके लिहिली आणि तीं केवळ विनोदाच्या बळावर लोकप्रिय करून दाखविलीं. त्यांचा पक्ष एकच आणि तो म्हणजे साहित्यिकाचा; त्यांचा विषय एकच आणि तो म्हणजे विनोदाचा,त्यांचे ध्येय एकच आणि तें म्हणजे रंजल्यागांजलेल्याना क्षणभर हसविणे. श्रोत्याला खो खो हसविणे हे त्यांचे एकमेव साध्य. त्यासाठीं ते स्वतःचेंहि विडंबन करण्यास कमी करीत नाहींत, मग इतरांची कथा काय ? आपल्या बुद्धीची चमक दाखविणाऱ्या कोट्या करून ते जसा शब्दनिष्ठ विनोद साधतात, तसाच चमत्कृतिजनक घटनांची सांगड घालून ते प्रसंगनिष्ठ विनोदहि निर्माण करतात. स्वभावनिष्ठ विनोद केव्हा केव्हां फुलविण्याइतकी सहृदयता त्यांचे ठायी आहे.

## शब्द-लीलांचे तुषार

विनोद पिकविण्यासाठीं कोट्याश्लेषादि शब्द-लीलांचा पाऊस पाड-

ण्याची सवय कोल्हटकर–गडकऱ्याप्रमाणें अत्रे यांना नाहीं. तथापि माफक बुद्धीच्या वाचकांना व श्रोत्यांना सहज कळणारा तो विनोदाचा प्रकार असल्यानें त्याचा मधूनमधून अत्रे वापर करतात. ‘ भ्रमाचा भोपळा ’ हें त्यांचें नाटक म्हणजे शुद्ध प्रहसनच आहे. त्यांत हास्यरस सर्व दिशानीं उसळत आहे. शब्दावरील कसरतीहि त्यांत बऱ्याच आहेत. जगद्‌गुरु डॉ. कुर्तकोटी याच्या सत्कारप्रसगीं अत्रे यानीं एक अशी कठाळी कोटी केली की —“ या जगद्गुरूना कोणी शालजोडी द्या किंवा शालजोडींतले द्या, त्याना त्याचा आनंद वाटणार नाहीं किंवा रागही येणार नाहीं.”

## कोट्यांची खैरात

कविवर्य तांबे यांच्या साठीसमारंभाचे वेळीं भाषण करतांना अत्रे यांनीं “ ताम्बे नावानें ताबे असले तरी गुणानें सोनें आहेत. ” अशी सहज सुचणारी पण गौरव गाणारी कोटी केली. कवितेतील ‘ अन् ’ ची चेष्टा करतांना ते एकदा म्हणाले, “ एकानें कवितेंत ‘ अन् ’ शब्द वापरला कीं बाकीच्यानीं कवितेची ‘ अन्नान्नस्थिती ’ करून टाकली म्हणून समजा. ” एका सभेत रा. फाटक आले असतांना “ प्रत्येक मनुष्य जर ‘फाटकांतून’ शिरू लागला तर पंचाईतच व्हायची.” अशी कोटी अत्रे यानीं करताच टाळ्याचा कडकडाट ठेवलेला. ‘ कॉंग्रेसचा भय्या ’ म्हणून हिंदु-सभेवर अत्र्यानीं जेव्हा सोटा उगारला होता, त्यावेळीं स्वा. वीर सावरकरावर टीका करताना ते म्हणाले, “ त्या एका इतिहास–प्रसिद्ध उडीवर या मंडळीच्या साऱ्या उड्या आहेत.” याहिपेक्षा अधिक कोटीबाजपणा पंढरपूर येथील भाषणांत त्यानीं केला. सानेगुरुजींचें उपोषण चालू असताना केलेल्या भाषणांत ते असे म्हणाले, “ नरसोपंत केळकर व सोनोपंत दाडेकर म्हणतात कीं, विठोबापुढें एक नवीन दांडा बाधावा आणि तेथपर्यंत स्पृश्य-अस्पृश्य भक्ताना येऊं द्यावे. आमची ह्या ‘ दांडे ’ कर मंडळींना विनंती आहे कीं, मेहेरबानी करा आणि हिंदुधर्माच्या पायात आणखी नवीन कोलदाडे घालूं नका ! ”

साठी शब्दांवर कोटी करुन ती विशेष चातुर्याची नसल्याची कबुली

स्वतः अत्रेच देतात. ते म्हणतात, " सामान्य माणसाच्या वयास साठ वर्षे उलटलीं म्हणजे त्याची बुद्धि नाठी होते. मला वाटतें, तरुणांनीं म्हाताऱ्या मंडळींशी भाडण्यासाठीं ही युक्ति प्रचारात आणली असावी. परतु कवींच्या बाबतींत बुद्धीचा प्रश्नच नसतो. ताबे याच्या वयाला साठी; पण त्याची भावना मोठी काहीं फारशी चागली नाहीं कोटी ! "

सह्रोक्ति अलंकार साधून अत्रे यानीं एका कविसंमेलनांत हंशा पिकविला होता. सर्वत्र चलन पावलेलें अत्रे यांचें तें विधान असें— " प्रेम, खोकला व स्फूर्ति या तीन गोष्टी कधींहि दाबून ठेवतां येत नाहींत. उलट त्या जितक्या दाबाव्यात तितक्या अधिक जोरानें उसळून प्रकट होतात. तेव्हा संमेलन भरविण्याची स्फूर्ति आमच्या कांहीं मंडळींना झाली तिचें अपत्य म्हणजे प्रस्तुत संमेलन ! "

## विसंगतीचें दर्शन

एका व्यासपीठावर एकदां अत्रे व खांडेकर हे दोघेहि ललित लेखक बसलेले होते. दोघाचीहि लोकप्रियता समान असली तरी दोघाच्या शरीरयष्टीमध्यें मात्र दोन ध्रुवाचें अंतर आहे. अत्रे यानींच जाहीरपणें सागितल्याप्रमाणें ते " बेरड वृत्तीचे व ठणठणीत प्रकृतीचे " साहित्यिक आहेत. त्याचे वजन पूर्वीं १२८ पौंड होतें पण पुढें तें १९० पौंड झाले आणि अलीकडे तर २२० वर गेले. याच्या उलट स्थिती खाडेकराची. या विरोधाचा उपयोग अत्रे यानी विनोदनिर्मितीसाठीं कसा करून घेतला पहा–" 'वृद्ध कवि' म्हणजे शुद्ध विरोधाभास आहे. याचप्रमाणे विरोधाभासाचे आणखी कांहीं नमुने आहेत. कवि हा कधींही वृद्ध नसतो; मुत्सद्दी हा केव्हाही तरुण नसतो, ( हंशा ) मास्तर हा केव्हांही लठ्ठ नसतो. ( प्रचंड हंशा, वक्त्यासह सर्व लोक श्री. वि. स. खाडेकर याच्या कृश देहयष्टीकडे पाहतात; पण त्याच वेळीं श्री. खाडेकर हे हंसत हंसत श्री. अत्रे याच्या सुदृढ देहाकडे बोट दाखवून 'हाही एक विरोधाभासच' असे म्हणतात; त्यामुळे पुन्हां हंशा व एकदीड मिनिटपर्यंत सारखा हंशा व स्टॅंपिंग. ) "

कवीच्या लेखनांतील व परिस्थितींतील विसंगति रंगविताना अत्रे यानीं असा मौजेचा विरोधाभास निर्माण केला आहे कीं-" फुलावर पुडेच्या पुडे लिहिणारा कवि चुकून पैशाचेंदेखील फूल विकत घेताना आढळत नाहीं. समाजात फार चिखल माजला आहे, म्हणून केविलवाणा हंबरडा फोडणाऱ्या कवीच्या अगणात गुडघाभर चिखल साचला तरी तें त्याच्या गावींदेखील नसते. रस्त्यावर एकादा दगड पडला तर तो बाजूला फेकण्याची तो तसदी घेत नाहीं. उलट तो दगड कोणाच्या तरी कोमल चरणतळाला लागावा म्हणजे तो चरण रक्तबंबाळ झाल्यावर आपल्याला कविता करायला संधि मिळेल अशी त्याची कल्पना असते. 'तुंगगिरीची उशी करून इद्रधनुष्याची तुतारी फुकण्याच्या' गप्पा मारणारा हा कवि त्याच्या घरीं गेलो तर, विड्या फुंकीत पडलेला असतो."

अतिशयोक्ती करताना विनोदी वक्त्याला सारासार-विचार कुठून राहणार ? कविसमेलनाची महती गाताना अत्रे गरजतात, " दर गावीं आणि दररोज जरी कविसमेलने भरलीं तर तीं नको कुणाला आहेत ? "

अतिशयोक्तीचा आणखी एक नमुना--" शकराचार्य शीख होण्यास तयार आहेत ही बातमी ऐकताच काहीं शीखाचे सर्व केस आनदातिशयाने सायाळीच्या पाठीवरील केसाप्रमाणे ताठ उभे राहिले असतील, तर काहीं सनातन्याच्या शेंड्या मागल्यामागे गळून पडल्या असतील."

## अन्य रसांचें साहाय्य

अत्रे याच्या वाङ्मयातील सिंहासनावर हास्यरस बसलेला आहे. त्यावर चवऱ्या वारण्याचे कार्य वीर व शृंगार या दोन रसाकडेच बहुधा असते. क्वचित् बीभत्स रसालाहि वेठीस धरले जाते. 'साष्टाग नमस्कारा'ची जन्मकथा सागताना ते म्हणतात, "ऐन सकटाचे वेळीं दगा देणाऱ्या खात्रीच्या मित्राप्रमाणे माझ्या आळसानेहि माझ्याशीं दगलबाजी केली व सांगावयाला सकोच वाटतो—अखेर मला प्रस्तुतचे नाटक 'झालें !' याचप्रमाणें 'मी वक्ता कसा झालो' या लेखात आपल्या वक्तृत्व कलेचा इतिहास निवेदन करतांना त्यानीं शाळेतील आपल्या व्याख्यानाचा शेवट पुढील-

प्रमाणे वर्णिला आहे. " लहान मूल आपल्या आईला कांहीं विशिष्ट प्रसगीं ' झाल ' म्हणून ज्या स्वरात सूचना देते तशा केविलवाण्या स्वरात झालं म्हणून किचाळून मी बाकाबर जाऊन बसलो. मुलाचीं तर हसता हसता पोटे दुखून आलीं. पुढे कित्येक दिवस वर्गातल्या मुलानीं माझे ' झाल ' असे टोपण नाव ठेवले होतें. "

एका सभेत " मी पेट्रोलचा पप आहे " असें म्हणून स्वतःला खचीं घालून अत्रे यानीं हशा पिकविला, तर एकदा गोविंदाग्रज स्मृतिदिनाचे वेळीं ते म्हणाले, " ही अत्र्याची पुण्यतिथी आहे कीं गडकऱ्याची ? "

## भाषेंतील प्रसाद

अत्रे याच्या लेखणींतून प्रसन्न भाषा सरसर उतरत असते. लो.टिळकाच्या वक्तृत्वाचे वर्णन चारच सफाईदार वाक्यामध्यें त्यानीं केले आहे, ते असे— " लोकमान्य टिळक याचे व्याख्यान म्हणजे साक्षात् सिंहगर्जनाच होती. त्याचे व्यक्तित्वच असें थोर होते कीं, व्याख्यानाला उभे रहाताच समोर द्रोणागिरीचा कडाच उभा राहिल्यासारखे सभेला वाटे. त्याचा आवाज कर्कश असे. बोलताना मधूनमधून ते डोळे मिचकावीत असत. तथापि त्याचा एकएक शब्द म्हणजे घणाचा घाव. प्रत्येक वाक्याच्या अखेरीस ते सभेकडे असे गुरकावून पहावयाचे कीं, श्रोते आपल्या जागच्या जागेवर गार." तसेच राष्ट्रीय नेत्याच्या नावावर त्यानीं पुढील प्रसन्न व सहजसुदर कोट्या केल्या आहेत. " मोहनदास गाधी ! स्वातंत्र्याची मुरली वाजवून चाळीस कोटी जनतेला जो मोहनी घालतो तो मोहन ! जवाहरलाल ! हिंदी जनतेचा गळ्यातले पृथ्वीमोलाचे जवाहर म्हणजे एक रत्न आहे ते ! जयप्रकाश ! त्यांच्या नावातच मुळीं जय आणि प्रकाश भरलेला आहे ! "

## हजरजवाबी भाषण

" या हलव्याच्या कविता वाचल्या कीं, माझ्या अंगावर काटा उभा राहतो " अशी सुंदर अलंकारानीं नटलेलीं व सूक्ष्म टीका करणारीं वाक्यें अत्रे आपल्या लेखा—भाषणात मधूनमधून पेरतात. तसेंच " अत्रे एक कीं दोन ? " अशी शंका एका वर्तमानपत्रानें प्रदर्शित केली असताना अत्र्यानीं

त्या शब्दावर कोटी करून असें उत्तर दिले कीं, " वर्तमानपत्राच्या बातमीदाराना एकाचे दोन करून सागण्याची संवय असते. " टोल्याला टोला देऊन शाब्दिक मारामारी करण्याची खुमखुमी अत्रे याना खूपच आहे. काहीं अस्पृश्य बाधवानीं शकराचार्यांना पाद्यपूजेसाठीं बोलाविले असताना " मठ अस्पृश्य वस्तींत जात नाहीं. " असा श्रीकडून जबाब आला. त्याला उत्तर देताना अत्रे खोचकपणाने म्हणतात, "बरोबर आहे ते. कारण मठ फक्त ओंकारेश्वरावर जातो. ' तसेच एका सनातनी वैद्याच्या दवाखान्यात उद्या अस्पृश्य येऊन बसतील अशी भीति काहीं सनातनी लोकांनीं प्रगट केली. तेव्हा अत्रे यानीं असा सूचक व भेदक विनोद केला कीं, " हरिजन शास्त्रीबुवाच्या दवाखान्यात जाणार नाहींत, कारण त्याना काहीं दिवस जगावयाचें आहे. "

## टीकेचें फल

सनातनी समाजावर टीका करताना अत्रे यांच्या भाषणात ' राणा भीमदेवी ' आवेश संचारलेला दिसतो. " धर्म मेला, शास्त्रे जाळा " वगैरे एकातिक विधाने करूनच न थाबता ते अशींहि बेछूट वाक्ये उच्चारतात कीं, " वरातीपुढे कोपऱ्याकोपऱ्याने जसे नारळ फोडतात तशाच प्रकारे असले कुजके मेंदू धारण करणारीं सनातनी टाळकीं धरून कचाकच फोडावींत ! " असा नाटकी आवेश समाजसुधारकाला शोभतो काय ? न्या. रानडे किंबहुना प्रि. आगरकरसुद्धा सामाजिक सुधारणेचा तीव्रतेनें प्रचार करीत आणि विरोधी मताचे जोराने खंडनहि करीत. पण तें युक्तीवादाच्या आधारानें. अत्रे मात्र युक्तीवादाचे शस्त्र टाकून असली डोकेफोडीची भाषा बिनदिक्कत वापरतात. तिची फलश्रुती क्षणभर टाळ्या मिळविण्यापलीकडे दुसरी काय असणार ? समाजाचें मन हातीं घेऊन एखाद्या कळीप्रमाणे हलके हलके शांतपणे उमलवित राहणें हेंच खऱ्या समाज-सुधारकाचें ब्रीद असतें.

## रुक्षतेलाहि रमणीयता

रम्य विषयाची विनोदी माडणी करणें फारसें कठीण नाहीं; पण रुक्ष

विषयहि विनोदी पद्धतीनें माडणे ही जातिवंत विनोदी लेखकाचीच बहादुरी. पाहुणे, खानावळी, थापा, विसराळूपणा इत्यादि विषय म्हणजे विनोदाचे मक्तेदार. ते कोणी कसेहि रगविले तरी त्यांतून थोडाबहुत हास्यरस ठिबकावयाचाच, पण हुडणावळ, मॉटफर्ड सुधारणा किंवा सायमन कमिशनचा वृत्तात असे नीरस विषयहि हास्यरसात घोळून केळकर माडीत असत. अत्रेहि या कामीं मोठे कसबी आहेत. शुष्क लाकडी ओडक्याना ते हिरवी पालवी फोडू शकतात पुणे येथे घरभाडेकरूचे समेलन भरले असताना अत्रे अध्यक्ष होते दुसरा एखादा अध्यक्ष असता तर त्याने भाडेकरूच्या हालाचे व दारिद्याचे कठाळी व कटाळवाणे भाषण करून श्रोत्यास रडकुडीस आणले असतें. पण अत्रे हे श्रोत्याना कधींच रंजीस आणत नाहींत— उलट त्याचे रजन मात्र भरपूर करतात. त्या समेलनातील अत्रे याचें भाषण आरभापासून शेवटपर्यंत हास्यरसाने दुथडी भरले होते, त्याची विनोदशक्ति व कल्पनाशक्ति या दोघाचा सुदर नमुना म्हणून पुढील उतारा सस्मरणीय आहे.

" आता माझ्या वयाला पन्नास वर्षे होंत आलीं. तरी मालकींचे घर असू नये याचा मला राहून गहून विषाद वाटतो. मी मनात नेहमीं म्हणतों कीं, देवा, मी जन्मभर असाच भाडेकरू रहाणार काय रे ? जगात दरिद्री माणूस तोच कीं, एवढ्या विशाल पृथ्वीतलावर ज्याच्या मालकीची एक टीचभर जागा असत नाहीं ? उद्या स्वर्गात गेल्यावर–अर्थात् ही नुसती कविकल्पनाच आहे !–देवाने जर विचारलें कीं, " लेका, माझ्या पृथ्वीवर एवढी तुझी हयात गेली, तुला स्वतःच्या मालकीचे एक घरदेखील बाधता आलें नाहीं ! चिमण्या अन् कावळेदेखील स्वतःचीं घरटीं बाधतात. एवढें देखील तुला कसें साधले नाहीं रे ? ' तर देवाला आपण काय उत्तर द्यावें ! "

## सहृदयतेचा ओलावा

" मला मारामारीची फार आवड आहे " असें जरी अत्रे सांगत असले; तरी त्याचें हृदय प्रेमळ आहे. भल्याभल्या वाग्वीराशीं ते निकरानें

दीर्घकाल झुंज खेळत आलेले असले, तरी त्यांचें अंतःकरण सरळ व विशाल आहे. त्यात द्वेष, मत्सर, असूया, अहकार, तुच्छता-बुद्धी इत्यादि क्षुद्र विकाराना वाव नाहीं. समोरासमोर उभे राहून ' दोन द्यायचे व दोन घ्यायचे ' असा त्याचा मर्दानी बाणा आहे. थोर व्यक्तींचा गौरव करताना तर त्याची सहृदयता व कृतज्ञता उचबळून येते. सानेगुरुजींच्या उपोषणाच्या वेळी तर त्याच्या अतःकरणातले सारे सात्त्विक भाव आषाढींतील चंद्रभागेप्रमाणे वाहूं लागले. तसेच श्री. लक्ष्मीबाई टिळक याच्या ' स्मृतिचित्राचे ' प्रकाशन-समयीं त्यानीं जें भाषण केले त्यात त्याचा दिलदारपणा काठोकाठ भरून ओसंडत आहे. ते अत्यत नम्र भावाने म्हणतात, " पूर्वी ज्याप्रमाणे देवलोक वर विमानात बसून पराक्रमी पुरुषावर ' साधु साधु ' म्हणून पुष्पवृष्टि करीत असत, त्याप्रमाणे आमची वृद्ध मंडळी आम्हा तरुणाच्या पराक्रमाचे जर कौतुक करतील तर अशा वृद्धाच्या पायावर आम्ही आनंदाने डोकीं ठेवूं. "

हरिजनाच्या मंदिरप्रवेशासाठीं पंढरपुरात प्रायोपवेशनाचें निर्वाण माडून बसलेल्या साने गुरुजींवर, काहीं क्षुद्र जंतु भलते आरोप करीत होते. तेव्हां अत्रे यानीं आतडे पिळवटून अत्यंत हृदयस्पर्शी उद्गार काढले, ते असे—" देश हेच माझे घर, अशा वृत्तीने राहणारा हा माणूस. दुसऱ्याच्या तुळशीपत्रालादेखील शिवायचा नाहीं. चंदनाप्रमाणें यानें महाराष्ट्राकरिता आपला देह झिजवला आहे. ह्यानें काग्रेसकरितां आपल्या रक्ताचे पाणी केलें आहे आणि हाडांचीं काडें केलीं आहेत. निवडणुकीचीं व्याख्यानें देऊन हा माणूस उरीं फुटला आहे हो ! नका हें महाराष्ट्रातलें मोलाचे धन असे वाया घालवूं ! फुलपांखराच्या पंखाला धक्का लावायलादेखील ज्याला भय वाटतें, अशा ह्या निष्पाप आणि निरागस जीवाबद्दल नका असें भलतें सलतें बोलूं ! " अशीं सहृदयतेनें थबथबलेलीं व प्रसादपूर्ण भाषाशैलीने बहरलेलीं अत्रे याचीं भाषणें थोडीं असतात हें खरें, पण तीं हजारो श्रोत्यांना मंत्रमुग्ध करूं शकतात व त्यांचीं अंतःकरणे हलवूं शकतात.

## हास्यपूर्ण कथा

अत्रे यांच्या लेखात व भाषणात तर जागोजाग विनोद पेरलेला असतोच; पण त्याशिवाय काहीं खास विनोदी गोष्टीहि त्यांनीं रचलेल्या आहेत. लघुकथेच्या कसोटीस त्या फारशा उतरणार नाहींत. विनोदाचें गाठोडें अडकविण्यासाठीं त्यांनीं कथेची खुटी आपल्या लेखनात बसाविली आहे इतकेंच. रहस्यकथेप्रमाणे एखादे गुपित अत्रे आपल्या गोष्टींत दडवून ठेवतात आणि अखेरीस ते उलगडून दाखवितात, तेव्हा वाचकाला अपेक्षाभंगाचा सुखदायक धक्का मिळतो.

‘ गुत्त्यात नारद ’ या गोष्टींत नारदाचे बिडंबन इतके केलें आहे कीं, तें वाचताना एखाद्या सनातनी वाचकाची शेंडी संतापानें नारदाप्रमाणेंच ताठ उभी रहावयाची ! नारदाच्या तोंडीं शिवीगाळ घातली आहे, त्याला सिगारेटचा झुरका मारावयास लावला आहे. फार काय एका वैदू बाईकडे पाहताच त्याच्या काळजाचा ‘ फालूदा ’ झाला आहे. पण अखेरची कलात्मक कलाटणी अत्रे यानीं अशी दिली आहे कीं, तो नारद म्हणजे एक सिनेमातील नट होता ! तेव्हा संतापाऐवजीं हास्याचे कल्लोळ वाचकाच्या चित्तात उठतात. ‘संदेश’कार कोल्हटकराच्या ‘माधवाश्रमांत शिवाजी’ या विनोदी लेखाची आठवण करून देणारी अत्रे याची ही गोष्ट आहे. शिवाजीच्या आगमनाचे परिणाम कोल्हटकरानीं एका प्रकारें वर्णिले आहेत, तर नारदाच्या येण्यामुळें उडालेला हलकल्लोळ अत्रे पुढील शब्दानीं सागत आहेत, “नारदमुनी आत शिरतांच एकच हलकल्लोळ उडाला ! ‘नारदमुनी आले ! ’ ‘ नारदमुनी आले ! ’ अशी एकच आरोळी उठली ! खेडवळ गिऱ्हाइकाचे ‘ गल्लास ’ तडातड हातातून गळून पडले ! पाढरपेशी मडळी आपलीं ग्लासे बाकाखालीं दडपून तोंडें उपरण्याच्या बोळ्यानें पुसूं लागलीं. वैदु लोकाची कैकाडी कचकच एकदम थाबून त्याची निशा निम्मी उतरल्यासारखी झाली ! ”

## विनोदाच्या क्लृप्त्या

‘ माधुरी ’ या गोष्टींतहि अशाच एका सोंगांतून अत्रे यानीं विनोद

निर्माण केला आहे. चिंचवडच्या ' चंद्रिका ' या मासिकाचे संपादक चिंतामणी चंद्रचूड हे आपली लेखिका माधुरी हिच्यावर भाळले होते. पण त्याना पुढें कळून आले कीं, माधव मराठे या तरुणानेच माधुरी हें टोपण नाव घेऊन आपल्याला चकविले व लुबाडले. 'अज्ञात सुंदरीस' या गोष्टींतील विनोद तर अगदीं शालेय आहे. स्त्री, दांत, फणी व वहाण या चार वस्तूंना उद्देशून चार कवींनीं केलेल्या कविता एका साप्ताहिकात गल्लतीनें एकत्र छापल्या गेल्या, त्यामुळे एकीचे वर्णन दुसरीस चिकटून विनोद निर्माण झाला आहे, तो असा---

" किती वानूं सौंदर्य तुझें बाले,<br>
सदा बाई गे तोंड तुझें काळे<br>
दात अर्ध्याहुन अधिक भगलेले<br>
चामड्याचे तुज बंद लाविलेले ! "

'मृच्छकटिका'तील शकाराच्या जातीचा हा विनोद उच्च प्रतीचा नाहीं.

## समाजाचें निरीक्षण

यापेक्षा ' धंद्याची अदलाबदल ' या गोष्टींत लेखकानें केलेलें समाज-स्थितीचे सूक्ष्म निरीक्षण दृष्टीस पडते. बुद्धिजीवि वर्ग उद्योगधंद्यामध्यें शिरत आहे, तर बहुजनसमाज बौद्धिक शिक्षणाचे दार ठोठावीत आहे, हे समाजातील संक्रमण बरोबर हेरून अत्रे यानीं चिंतोपंत कारकून व शिदोबा न्हावी यांचीं चित्रें रंगविलीं आहेत. केस या शब्दावर कोटी करताना ते म्हणतात-" केस कापणारा मनुष्य आपल्या मित्राचा केसाने गळा कापूं शकतो याची मला कल्पना नव्हती. "

पण या शाब्दिक विरोधापेक्षां अधिक उच्च प्रतीचा विनोद केला आहे तो विसंगतींतून. शिदोबाचा मुलगा पदवीधर होतो आणि चिंतोपंताचा मुलगा सलून काढतो. या परस्पर-विरोधी घटनांचे परिणाम समाजावर काय होतात हें अत्रे यांनीं पुढील प्रसंगांनीं मार्मिकतेनें दाखविलें आहे, " शिदोबाचा मुलगा बी. ए. झाला त्याच दिवशीं चिंतोपंतांनीं शिदोबाचें सलून आपल्या ताब्यांत घेतलें व दुकानावर लावलेल्या नांवाच्य

पाटीवर " शिदोबा तळेगावकर " ह्या अक्षराऐवजी ' गजानन चिंतो भोपळे यांचें विश्वामित्र हेअर कटिंग सलून ' अशा अक्षराचा फरक जाणाऱ्यायेणाऱ्याना दिसूं लागला. शिदोबाचा मुलगा बी. ए. झाला म्हणून मागासलेल्या वर्गाच्या पुढाऱ्याकडून अभिनंदनाचा वर्षाव त्याजवर होऊं लागला, तर चिंतोपंताच्या चिरंजीवाच्या ' विश्वामित्र हेअर कटिंग सलून ' वर सनातनी ब्राह्मणाकडून शिव्यांच्या लाखोल्याची व पुरोगामी सुधारकाकडून उत्तेजनपर संदेशाची वृष्टि होऊ लागली. "

' कावळा व रिपोर्टर ' या लेखात हृद्य विनोद फारसा नाहीं. बातमी-दारांवर उपहासपर टीका मात्र आहे आणि ती बातमीदारापेक्षा टीकाकारानाच अधिक शोभणारी आहे. " पवित्र वस्तूंना आपल्या घाणेरड्या स्पर्शाने विटाळणारी या रिपोर्टराची काळी कर्तबगारी कावळ्यानादेखील काळीठिक्कर पाडील ! " हें वर्णन टीकाकाराला किंवा व्यंग-शब्द-चित्र-कारालाच साजणारे नाहीं काय ? "

## रम्य कथा-सप्तक

' साखरपुडा ' या संग्रहातील शेवटच्या सात कथा म्हणजे अत्रे यांच्या लेखनकलेचा एक तेजस्वी व रमणीय असा पैलूच होय. त्यांनीं शालेय जीवनाचा साक्षात अनुभव वीस वर्षे उघड्या डोळ्यानीं व कवीच्या मनाने घेतला होता. त्यामुळे शाळेतील यांत्रिक अभ्यासक्रम आणि उमलत्या मुलाचा सदाफुली उत्साह यामधील विसंगति त्यानीं अचूक शोधून काढली आणि अत्यंत रेखीव भाषेने व्यक्त केली. ' कुणी बोलायचं नाहीं ' अशी करडी ताकीद देऊन मास्तर कॅटलॉग लिहित होते त्याचा उग्रपणा व मुलाचा हळुवारपणा यांचीं विरोधी दृश्यें त्यानीं किती वेचक शब्दानीं रंगविलीं आहेत पहाः—

" टर्र र्र र्र ! टर्र र्र र्र ! " ताशावर छडी वाजवितात तशी मास्तरानीं टेबलावर छडी वाजविली आणि वर्गाकडे पाहून डोळे फिरविले. बटबटीत होते त्याचे डोळे. लालही पण दिसत होते. कपाळावर आठ्यांचें जाळें पसरलेलें. ओंठावर मिशा पिंजारलेल्या.

झाडाच्या फादीवर चिमण्या बसाव्यात तशीं पोरे बाकावर एकमेकाला बिलगून बसलीं होतीं. गुलाबाच्या गेंदाप्रमाणे गोजिरवाणीं त्याचीं तोंडें, चिमणेसे ओंठ, चिमणेसे गाल आणि हरणासारखे काळेभोर टपोरे डोळे. भित्र्या डोळ्यानीं बिळातून ससा बघतो तसे त्यानीं मास्तराकडे पाहिलें. बाधावरचे कोंवळे गवत उघड्या वाऱ्यात कापतें, तशीं तीं कापत होतीं."

मुलाच्या विकासशील मनाला स्वस्थ बसणें कसें आवडेल? पण मास्तरानीं बजाविले, "कुणी बोलायच नाहीं!" "कुणी हलायचं नाहीं!" "कुणी हंसायच नाहीं!" बिचारी मुले स्वस्थ बसलीं. पण "फळ्याच्या मागें कोपऱ्यात एक बीळ होतें. त्यातून एक उंदराचे पिल्लू डोकावत होतें. इवलेसे त्याचे तोड आणि इवलेसे त्याचे डोळे. चिमुकल्या टिकल्या-सारखे लकलक करीत होते. हळूच तोड बाहेर काढी आणि हळूच मागे आंत जाई. कुणी तरी पाहिलें ते आणि सोबत्याला खुणविले पायाच्या चिमुकल्या करगुळीने. साऱ्या मुलाना कळले ते. चोरट्या डोळ्यानीं तीं बघू लागलीं तिकडे. पिल्लू बाहेर आले चागले. एवढासा जीव. पण किती धीट! मास्तराच्या खुर्चीपर्यंत आले ते. मास्तरानीं पाहिले तर मारतील ना त्याला ते! मुले घाबरून बघू लागलीं. पण ते कसे लबाड! भरकन् पुन्हा परत पळाले बिळाकडे."

किती साध्या सुटसुटींत शब्दात अत्रे यानीं हे गद्यकाव्य फुलविले आहे. साने गुरुजींच्या शैलीचीच जणु दुसरी आवृत्ति! श्री. मोडकाचे खारीचे वर्णन जसे संस्मरणीय आहे, तसेच अत्र्याचे हें उंदराचे. त्याचप्रमाणें पतंग उडविणाऱ्या मुलाचेहि वर्णन बोलकें आहे. ते असें, "चिमुकला त्याचा हात. कर्दळीच्या कोंबासारखा. निमुळता व नाजूक. पतगाला हिसके देतांना वरखालीं नाचे, आणि तोंडही किंचित् वर उचललेले, अर्ध्या उमलत्या फुलांच्या गेंदाप्रमाणे. गालावर लालभडक ठिपके. जशा कांहीं जास्वंदींच्या कळ्या चिरडलेल्या त्याजवर. पतंग वर उडाला की, गालावर हंसू उमलें. खालीं आला कीं हसूं मावळे. पतंग गिरक्या खाई, तशी याची चिमुकली मानही ऐटींत हले कमळाच्या देंठासारखी मागेंपुढें."

## जीवन व निसर्ग

" ठोकळ्याचें चित्र, कविता, फुलाचे विभाग, कुत्र्याचें पिल्लूं" या गोष्टींत मुलाची नैसर्गिक भावना व प्रौढाची यांत्रिक: शिस्त याचा विरोध खुबीने वर्णिला आहे. जिवंत निसर्गावर मुलाचीं स्वतंत्र मने मोहून जातात, पण त्या निसर्गाकडे पाठ फिरवून व वेळापत्रकावर डोळे लावून शिक्षक आपला ठराविक अभ्यास ठराविक पद्धतीने घेतात आणि त्यात ज्याचे मन रमत नाहीं अशा विद्यार्थ्यांना टोकतात. हे चित्रित करून अत्रे यानीं प्रचलित शिक्षणपद्धतीवर किती तीव्र टीका केली आहे! डॉ. टागोर याच्या 'शांतिनिकेतना'तील शिक्षण-पद्धतीचा पुरस्कारहि त्यानीं सहजतेनें केला आहे.

वर्गातील ठोकळ्याचे चित्र न काढिता दत्तने पोपटाचे काढिले, म्हणून मास्तरानीं त्या चित्राचे तुकडे केले हे एका कथेत सांगितलें आहे; तर दुसऱ्या कथेत असे दाखविले आहे कीं, मास्तर वर्गात " पिक म्हणजे कोकिळ, गाणारा काळा पक्षी ' असें टिपून व्यावयास सांगत होते. पण शाळेबाहेर कूजन करण्याऱ्या कोकिळेकडे त्याचे लक्ष नव्हते. निसर्ग व शाळागृह यातील हा विरोध अत्रे यानीं किती बारकाईने व बहारीनें वर्णिला आहे पहा—

" कुऊऽ–कुऊऽ–कुऊऽ–!

आंब्याच्या फांदीवर बसून कोकिळा गात होती. झाडावर मोहोर बहरला होता. त्याचा घमघमाट चोहीकडे दरवळला होता. वाऱ्याच्या गार झुळकेत हिरवींपिवळीं पाने सळसळत होतीं. आभाळ अगदीं निळेभोर होते. कुठे मधून एखादा लहानसा पांढरा ढग तरंगत होता. ऊन लख-लखीत पडले होते. वेलींवर ओठ उघडून फुले हंसत होतीं. कळ्या डोळे मिटून डोलत होत्या. जाईचा मांडव फुलून पांढरा दिसत होता. त्यावर चिमण्या इकडून तिकडे नाचत होत्या. त्याची मंजुळ चिवचिंव कानाला गोड लागत होती.

शाळेच्या अंधाऱ्या खोलींत मास्तर मुलाना कविता शिकवित होते. डोळे मंदावले होते. भिंती मळकटलेल्या होत्या. काहीं ठिकाणीं त्याचा गिलावा पडून गेला होता. शाईचे शिंतोडे जागोजाग उमटलेले होते.

फाटक्या पुठ्यावर चिकटविलेले वेळापत्रक वर लोंबत होतें. जमिनीवर धूळ साचलेली होती. कागदाची चिटोरीं इकडे तिकडे पसरलेलीं होतीं. बाकाखालून शेंगाचीं फोलपटे पडलेलीं होतीं. ”

विद्यार्थ्यांनीं सभेंत गोंगाट न करतां विषयाची दुसरी बाजू शांतपणें ऐकून घ्यावी असे तत्त्व जे हेडमास्तर सांगतात; तेच विद्यार्थ्याला कांहीं बोलूं न देता छडी लगावतात. मानवी स्वभावातील अशीच विसंगति ‘कुत्र्याचें पिल्लू’ या कथेतहि अत्रे यानीं दाखविले आहे. बाबानीं कुत्र्याच्या पिल्लाला घराबाहेर पावसांत फेकून दिले आणि त्या पिल्लावर प्रेम करणाऱ्या चिंतूला पाठ करावयास लाविले, ‘ प्राण्यावर दया करा.’ अशा विसंगतीचें दर्शन विनोदी पद्धतीनें जो घडवितो; तो लेखक मानवाचा हितकर्ताच ठरत नाहीं काय ?

## विडंबक कवितांचें दालन

विडंबनपर काव्यें रचूनच अत्रे यानीं प्रथम मोठा लौकिक कमावला. त्याचेंपूर्वी कांहीं कांहीं कवींनीं विडंबन–कविता केलेल्या होत्या. पण अत्रे यांची कल्पनेची भरारी मोठी, विनोदाची तानहि उंची आणि काव्य-संख्याहि विपुल. प्रसन्न रसिकता आणि सफाईदार भाषा यांच्या तटातून अत्रे यांचीं हास्य-सरिता दुथडी वाहत आहे. त्यांच्या विडंबनपर काव्यात टीकेची तीक्ष्णताहि आहे. “ वाङ्मयाच्या वरातींत कोतवाली घोड्याप्रमाणे पुढे पुढे नाचणाऱ्या घोडकवींच्या गळ्यात सणासुदीचे दिवशीं माळा करून घालावयाला उपयोगी पडावीं,” म्हणून अत्रे यानीं ‘ ना वास, ना रंग ’ अशीं “ झेंडूचीं फुलें ” फुलविलीं. १९२५ सालीं त्यांच्या विडंबन–काव्याचा हा संग्रह प्रसिद्ध झाला, तेव्हा मराठी काव्याचे एक नवेंच दालन आपण पहात आहों असें हास्य–रसिकाना वाटलें.

## कविवर्गावर टीका

तो काळ ‘ रवि-किरण-मंडळा ’च्या जयजयकाराचा होता. यशवंत–गिरीशांची जोडी शहरोशहरीं काव्य-गायन करून तरुणांचीं हृदये काबीज

करीत चालली होतीं पंडित–कवि डॉ. माधवराव पटवर्धन हे ‘ माधव ज्यूलियन ’ हें चमत्कृतिजनक नाव धारण करून आपल्या काव्याने दिपवीत होते. त्याचे उच्चारानुसारी लेखन, बोलीप्रमाणें ‘ अन् ’चा उपयोग, फारशी शब्दांचा वापर, निर्यमक पद्य-पंक्ति, निःसंकोच व निर्बंधरहित प्रणयवर्णने इत्यादि नावीन्याने युवकवर्गाला वेड लावले होतें. आणि विडंबन होते तें अशाच लोकप्रिय वाङ्मयाचे. सर्वसामान्य कविवर्गाची निष्क्रियता, व्यवहारशून्यता, अनुकरणप्रियता आणि तरी स्वतःविषयीं अमर्याद आढ्यता - इत्यादि दोष–संभारावर आपल्या कल्पकतेनें अत्रे यानीं विडबनाचा हिरवा प्रकाश फेकला आहे. सुप्रसिद्ध अशा महान व मगल विषयाला क्षुद्र व बीभत्स स्वरूप देण्यात विडबनकाराचे चातुर्य दिसून येतें. तें अत्रे यांनीं विपुल प्रमाणात दाखाविलें आहे.

श्रीसमर्थांचे ‘ मनाचे श्लोक ’ याचें विडंबन अत्रे यानीं केलें आहे. तसेंच केशवसुत, गडकरी, बालकवि, माधव ज्यूलियन, तिवारी, अनंत-तनय इत्यादि कवि–गुरूंना व कवि–बधूंनाहि त्याच्या विडबनाची साडे-साती लागली आहे. ‘ जें आपल्याला प्रिय असते, त्याचेंच आपण विड-बन करतो ’ ( We parody what we love ) या न्यायानें अत्रे यांनीं आपल्याला प्रिय व पूज्य असणाऱ्या गडकरी–केशवमुताच्या काव्याचें विडंबन केले आहे. त्याच्या विडंबक कवितामध्यें कविवर्गाची चेष्टा करणाऱ्या कविताचीच बहुसख्या आहे. विनोदाचार्य कोल्हटकरानीं भलावण करताना म्हटल्याप्रमाणे, “ सुदर मनुष्याने दुसऱ्यास वेडावण्याकरितां स्वतःचे मुख कितीहि विकृत केलें तरी तें सुदरच दिसतें. ” विडबनासाठीं लिहिलेली असूनसुद्धा अत्रे याच्या कवितेची शैली प्रसन्न व रमणीय आहे. सर्कशींतील विदूषकाच्या उड्या वेड्यावाकड्या दिसल्या, तरी इतर खेळाडू-पेक्षां त्याचे कसब काहीं कमी नसतें. ‘ राजहंस माझा निजला ’ या गडकऱ्याच्या अमर विलापिकेचे विडंबन ‘ कादरखां काबुलवाला ’ म्हणून करतांनाहि अत्रे यानीं आपल्या काव्य-–शक्तीचें प्रदर्शन केले आहे. ‘जडजंबाला’ची एकवाक्यी प्रस्तावना म्हणजे एका सस्कृतप्रेमी प्राध्यापका-पुढें धरलेला आरसाच होय. तसेच दुसऱ्या एका विद्वज्जड प्राध्यापकाच्या

क्लिष्ट काव्य–रचनेचें विडंबन ‘ कषाय–पेय–पात्र–पतित मक्षिकेप्रत ’ ( म्हणजे चहाच्या कपांत पडलेल्या माशीस ) या कवितेंत अत्रे यांनीं गंमतीनें केले आहे.

## प्रसिद्ध काव्यांचीं विडंबनें

‘ दंवाचे थेंब ’ ही केशवसुताची करुणरसपूर्ण कविता आहे. तिचें विडंबन करून केशवकुमारानीं ‘ पाहुणे ’ ही कविता लिहिली आहे. ओटीवर पसरलेले पाहुणे पाहून बाळ्याने आईला विचारले, “ हे कोठून आले ? ” तेव्हा आईने दिलेले उत्तर कोणालाहि हंसू आणील असेंच आहे. तें असे—“ कावळे गिधाडे घारी । येतीं हीं जेथुनि सारीं । डोंगळे, डास, धुंगरटीं । बाळा रे जेथुनि येतीं; । खोकला, ताप हीं दुखणीं । आपणास येती जेथुनि, । तेथुनीच आले येथे । हे छळावया आम्हाते ! ” ‘ दंवाचे थेंब ’ मधील आई गहिंवरली याचे कारण तिचीं बाळे दिवगत झालीं होतीं आणि हा एक मुलगा तरी जिवंत राहील कीं नाहीं अशी तिला चिंता पडली होती. पण अत्र्याच्या विडंबनातील आई गहिंवरते ती कां ? तर ‘ जाणार न लौकर सदनीं ! । वदता गहिंवरली जननी, । पाहुणे मागले स्मरले, । डोळ्यातुन पाणी आले. । .......“ देवा रे ” मग ती स्फुंदे । “ एवढा तरी जाऊ दे ! ’

‘ पाखरा, येशि कधीं परतून ? ’ ही रे. टिळकाची कविता वत्सल व करुण या रसांनीं थबथबलेली आहे. तिचे विडंबन अत्रे यांनीं दोन कविता-मध्ये केलें आहे एकात ‘ पारिटा, येशील कधीं परतून ? ’ असा प्रश्न केला आहे, तर दुसऱ्यात इंदूरच्या ‘ होळकरा, येशील कधीं परतून ? ’ असें विचारलें आहे. पहिली कविता अशी आहे—“ कोट रेशमी लग्नामधला मानेवर उसवून । उरल्या सुरल्या गुंड्यांचीहि वासलात लावून । बारिक सारिक हातरुमाला हातोहात उडवून । सदऱ्यांची या इस्तरिनें तव चाळण पार करून । खामिसाची हीं धिरडीं खरपूस भटि-मध्यें परतून । तिच्या भरजरी पैठणिची या मच्छरदाणि करून । ”

माधव ज्यूलियन यांच्या प्रेमगीताचें विडंबनं करतांना, अत्रे यांनीं

रम्य व क्षुद्र उपमाची मुसळधार ओतली आहे. त्याचा नमुना असा:— "आषाढिंचा अंधार मी । तू फाल्गुनी मधुशर्वरी ।। खग्रास चंद्र मलिन मी । तूं कोर ताशिव सिल्व्हरी ।। माजूस मी, तूं याकुती । मी हिंग काबुलि, तूं मिरी । अन् भाग तूं, चडोल मी । गोडेल मी तू मोहरी !"

याचप्रमाणें बालकवि व गडकरी या दोघानीं लिहिलेल्या 'अरुणा'चें विडंबन करितानाहि अत्रे यानीं पन्नास कविता रचून उत्प्रेक्षाचा पाऊस पाडला आहे आणि शेवटीं म्हटले आहे, "थकलो आता ! ! उत्प्रेक्षाची संपत ये कथा । मान लचकली म्हणता म्हणता ही लाब्रट सथा ।।"

क्षुद्र विषयाला मोठी उपमा दिल्याने वाचकांचा अपेक्षाभंग होतो आणि त्यातून विनोद निर्माण होतो. आपल्या सखीची प्रार्थना करताना कवि म्हणतो:—"द्रोणगिरीसह जसा हनुमन्त येई, । बाजार आणिन इथें उचलून तेवी ! ।। कीं आणसी उसनवार सदा म्हणून । शेजारणी तुजवरी पडल्या तुटून ।।"

रामदासानीं मनाला सरळ नीतिबोध केला आहे, तर अत्रे विडंबनाच्या उफराट्या भाषेत आजकालच्या तरुण विद्यार्थ्याला कानमत्र देतात कीं:— "सदा खाद्यपेयावरी हात मारी । बिले देइ सारून मित्रासमोरीं ।। "अरेरे, घरीं राहिले आज पैसे" । खिसे चाचपोनी मना बोल ऐसे ! ।। इथे पायगाडी तिथे वाद्यपेटी । इथे पुस्तकें ना तिथे हातकाठी । अशी सारखी भीक मागीत जावे । स्वतःचे न काहीं जगीं बाळगावें !"

चहाच्या कपातील माशीला उद्देशून निरानिराळ्या कल्पना करताना अत्रे यानीं 'माशा मारणे' या शब्दावर कोटी केली आहे आणि जाता जाता आमदाराच्या आळशीपणावर एका ओळींतच शिंतोडे उडवले आहेत. ती ओळ अशी:—'कौन्सिलात, सभासद आणी । मारतील कवणा तुजवाचुनी ? ।।

## कवींवर कटाक्ष कां ?

कवि हाच अत्र्याच्या विडंबनाचा प्रमुख विषय झालेला आहे. कवित्व-शक्तीचा महिमा गाताना केशवसुतांनीं 'आम्ही कोण ?' या कवितेंत अतिशयोक्ति केली आहे. तींच बिरुदें आपल्या अंगीं लावून कांहीं क्षुद्र

कवि मिरवतात हें पाहून अत्रे यांना चीड आली. आणि म्हणून त्यांनीं ' आम्हीं कोण ? ' या कवितेचें खासे विडंबन केलें आहे. तिचा शेवट त्यानीं पुढील ओळीने केला आहे—"आम्हाला वगळा-गतप्रभ झणीं होतील साप्ताहिकें ! आम्हाला वगळा-खलास सगळीं होतील ना मासिके ! ॥ "

दोन कवि एकत्र आले तर कसें वागतील याचे मजेदार वर्णन अत्रे यांनीं 'साग कसे बसले ?' या कवितेत केलें आहे. 'साग कसें बसलो ?' या गोविंदाग्रजाच्या कवितेचा सागाडा घेऊन त्यात अत्रे यानीं आपल्या विनोदाचा प्राणवायु फुंकला आहे, त्यामुळे ती सारीच कविता किती विनोदपूर्ण झाली आहे, पहा—ओळख होता पहिल्या दिवशीं । पूर्व-जन्मिची मैत्री जशी । मिठ्या मारुनी परस्पराशीं । जवळ जवळ बसले ॥ दुसऱ्या दिवशीं प्रसंग पाहुन । हळुच काढिर्ती बाड खिशांतुन । म्हणता " दावुं जरा का वाचुन ? " दूर-दूर-सरले ! ॥ " हवें काव्य तव भिकार कोणा ? । चोरितोस माझ्याच कल्पना " । असें बोलतां परस्पराना—। साग कसे बसले ? ॥ "

एक चोर एका कवीच्या घरीं चोरी करावयास गेला, तेव्हां कवि त्याला आपला थोरला बंधू म्हणून संबोधतो. त्याचे कारण चोरानें विचारलें असता तो सागतो कीं, " सोनियाचे दागिने चोरसी तूं; । कल्प-नांचे शिणगार मी परतू ! । हिऱ्यामोत्यावर सदा तुझा डोळा, । शब्द-मौक्तिक मी सदा करित गोळा ! । "

' प्रेमाचें अद्वैत ' या काव्यात भाषा व कल्पना या दोन्ही साधनांनीं अत्रे यानीं खुमासदार विनोद निर्मिला आहे सायकलीवरून दिवा न लावता तो व ती चालले असताना पोलिसानें त्याना अडविलें. तेव्हा कवि त्या पोलिसालाच ऐटीनें म्हणतो—" अरे, प्रीतीच्या या प्रकाशापुढें । तुझ्या बिझलिच्या लाख बत्त्या फिक्या ! ॥ कशाचे दिवे घेऊनि बैससी । कुठें नौबती अन् कुठे ढोलक्या ! ॥ जरी आकृती दोन या पाहसी । असूं एक आम्ही तरी अंतरीं ! ॥ न ठावा कसा प्रीतीचा कायदा । कुड्या वेगळ्या एक आत्मा तरी ! ॥ "

**कविमंडळी स्वत:ला अतिमानुष समजत आणि देवादिकांचे अव-**

तार मानीत. त्याचे शब्दचित्र अत्रे यानीं चारच ओळींत काढले आहे, तें असें—" आहें मी तर वाल्मिकी, वसतसे श्रीशारदा मन्मुखीं ! ' बोले एक, तया दुजा वदतसे, ' मी व्यास-प्रत्यक्ष कीं ! ' । हा येथे कवि कालिदास असता बाता नका या करूं ! ' बोले गर्जुनी वीर एक तिसरा वाग्युद्ध झाले सुरू. ॥ " क्षुद्र कवींच्या अशा पोकळ बढाया ऐकून त्याचा दंभस्फोट करण्याचा आवेश अत्रे याच्या लेखणींत संचरतो आणि ते म्हणतात—" मस्त झालीं आहेत बडी धेडें । एकएकाचीं फोडतोंच तोंडे ! " ॥

आपल्या विडबनाचे अंतिम साध्य काय आहे हे सागताना अत्रे एका कवितेंत म्हणतात–" जेव्हा होतिल शब्द घेडगुजरी भाषेंतुनी नाहिसे । बुद्धीचे ' अरबी ' समुद्र सगळे जातील कीं आटुनी ! ॥ स्फूर्तीच्या गिरण्याहि बद सगळ्या होतील काव्यातुनी । शातीचे झरतील निर्झर तदा स्वच्छद पीयूषसे ! ॥ "

अत्रे याच्या विनोदाचेच काय पण त्यांच्या सर्व वाङ्मयाचें, किंबहुना त्याच्या सर्व जीवनाचेंच ध्येय त्यानीं एका कवितेत सागितले आहे, तें असे—" आनंदाची सर्व सुखाची जीवित ही खाण । हंसेल आणि जगेल त्यातें नच कसली वाण ! " ॥

## अभ्यासाच्या वाटा

(१) ' विनोदासाठीं विनोद ' हे श्री अत्रे याच्या विनोदी लेखनाचे ब्रीद-वाक्य आहे या विधानाचें स्पष्टीकरण करा

(२) श्री अत्रे याच्या व्याख्यानातील काही नमुनेदार कोट्या देऊन त्यातील गर्भितार्थ स्पष्ट करा अत्र्याचीं व्याख्याने ऐकलीं म्हणजे सासारिक दु:खाची हकालपट्टी होते असे का म्हणतात ?

(३) श्री. अत्रे याच्या विनोदी गोष्टींपैकी तुम्हाला आवडलेल्या दोन गोष्टींचा साराश देऊन त्यातील विनोदस्थळें निर्दिष्ट करा

(४) ' विडंबन कविता ' या काव्य-प्रकाराचे वैशिष्ट्य कोणते ? श्री अत्रे यानीं केलेल्या एक-दोन विडंबन-कवितांची मध्यवर्ती कल्पना द्या.

(५) विनोदाच्या साहाय्याने श्री. अत्रे हे कोणतीं सामाजिक न्यूनें नाहींशीं करूं पाहतात ?

# प्रा. चिं. वि. जोशी : : ४

'विनोदाचार्य' कोल्हटकर यानीं मराठींत जो हास्य-रसाचा नवाच प्रवाह सुरू केला, त्याची खोली व वेग वाढविण्याचे प्रयत्न गडकरी व अत्रे यानीं केले. पण या तिघांहून निराळा असा आपला स्वतंत्र प्रवाह निर्माण करण्याचे श्रेय प्रा. चिं. वि. जोशी याना आहे. त्याचा प्रवाह सथ असेल, खडकाळ जमिनींतून वहाणारा असेल आणि त्याच्या दोन्ही काठावर रम्य वनश्री फुललेली नसेल; पण तो शीतल आहे, मधुर आहे आणि येणाऱ्याजाणाऱ्या सर्व पाथस्थाना सहज सेवन करता येण्यासारखा आहे. कोणीहि यावें, त्या हास्य-प्रवाहात बुड्या माराव्या, आणि चार घोट प्राशन करून प्रसन्न मनानें निघून जावें असा जोशी याचा विनोद-प्रवाह



आहे. त्यात कोट्या-श्लेषादि शब्दलीलाचे भोवरे फारसे आढळणार नाहींत, काव्य--कल्पनेचा खळखळाट ऐकूं येणार नाहीं आणि सामाजिक क्रांतीचा फसफसाटहि दिसणार नाहीं. साध्यासुध्या ससारातील नेहमींचे प्रसंग व साधीभोळीं पात्रें याचे मनोरंजक अनुभव सुबोध भाषेनें व सरळ माडणीनें सागूनच जोशी यानीं महाराष्ट्राला हसविलें आहे. आपल्या विनोदाचा पिंड कसा आहे हें सांगताना जोशी म्हणतात, "आम्हीं कथा प्रधान

करून सहज जमली तर एखादी कोटी, वाचकाला बोंचक वाटणार नाहीं अशी व्याजोक्ति आणि अशक्य प्रकारात जमा होणार नाहीं अशी अतिशयोक्ति प्रसंगोपात्त वापरू लागलो. कथेत अनपेक्षित प्रसग आणि विचित्र स्वभाव याच्या वर्णनाचा मीठमसाला घालून, ती चटकदार करण्याचा आम्हीं यत्न केला. बहुतकरून प्रत्येक हास्यकथेंत तत्त्व ग्रथित करण्याचा माझा प्रघात आहे." मौज ही कीं, तत्त्वज्ञान हा त्याचा कॉलेजातील विषय, पाली वाङ्मयाचें सशोधन हे त्याचे जीवित–कार्य आणि स्वभाव पाहिला तर गंभीर व विचारी; पण त्यानीं कल्पनेने निर्माण केलेले चिमणराव व गुड्याभाऊ हे उपद्व्यापी पण उपकारी मावसभाऊ मात्र मराठी–भाषकाचे हसरे मित्र बनून राहिलेले आहेत.

## स्वभाव-दोषांचें दर्शन

"मराठ्याच्या वाङ्मयोद्यानातील हास्यनिर्झर ज्याच्या प्रतिभेतून उद्भवला," त्या श्री. कृ. कोल्हटकराना 'गुरुवर्य' मानून जोशी यानीं आपले 'एरंडाचे गुऱ्हाळ' अर्पण केले आहे. पण कोल्हटकराचे विनोद–गुण निराळे व जोशी यांचे वेगळे. कोल्हटकर–गडकऱ्यानीं विनोदी लेख लिहिले आणि समाजातील व्यगावर व रूढींवर विडंबनाचे शस्त्र धरले; पण जोशी यानीं आपल्या विनोदाला गोष्टींचें रूप दिले, आणि त्यांतून हसता हसतां वाचकाला मनुष्यस्वभावातील दोष दाखवून व्यक्ति-सुधारणेचा मार्ग दाखविला. 'एरंडाचें गुऱ्हाळ' या आपल्या पहिल्या विनोद–ग्रंथाला त्यानीं टोपणनाव दिले आहे, ते "प्रोफेसराच्या आणि संपादकांच्या गोष्टी" असेंच आहे. अर्थात् या गोष्टी म्हणजे कांहीं लघु–कथाच्या चौकटींत बसणाऱ्या नाहींत. पण कथानकाचा बारीकसा धागा घेऊन दोनचार पात्राकरवीं त्यातून गोष्ट विणून दाखविण्याची करामत जोशी याची आहे. पाडुतात्या व बंडूनाना हे कोल्हटकराचे बौद्धिक पुत्र जितके सुसंस्कृत मराठी–भक्ताचे लाडके आहेत किंवा बाळकराम व तिंबूनाना हे गडकऱ्यांचे प्रातिभा–पुत्र जितके तरुण मराठी वाचकाना आवडते आहेत, तितकेच चिमणराव व गुंड्याभाऊ हे जोशी यांचे मानस-

पुत्र महाराष्ट्रातील घरादारात आज पंचवीस वर्षें वावरत आहेत, बाल-वृद्ध, ज्ञानी–अज्ञानी स्त्रीपुरुषाना रिझवीत आहेत आणि त्याच्या स्वभावातील दभ, लोभ, अहकार इत्यादि लुप्त दोष मजेमजेनें दाखवून देत आहेत. निरुपद्रवी टीका निर्मल मनानें करून मनुष्याचे कल्याण यथाशक्य साधावयाचे, हें जोशी याच्या लेखनाचे सूत्र आहे. त्यानीं स्वतःच आपले ब्रीद पुढील शब्दानीं निवेदिले आहे, " आपल्या थट्टेच्या योगे जनतेचे कल्याणच करायचे हा नारदाचा बाणा प्रत्येक तत्त्वशील विनोदप्रिय मनुष्याच्या अंगीं बाणला पाहिजे, मग तो लेखक असो कीं वक्ता असो किंवा साधासुधा मनुष्य असो ! "

## विविध साहित्य

चिंतामणरावाचा जन्म पुणे येथें ता. १९ जानेवारी १८९२ रोजीं झाला. नूतन मराठी विद्यालयात शिक्षण घेऊन ते १९०९ सालीं मॅट्रिक झाले. फर्गसन कॉलेजातून १९१३ सालीं ' तत्त्वज्ञान ' विषय घेऊन ते बी. ए. झाले. पुढे दोन वर्षानीं, पाली व इंग्रजी हे विषय घेऊन ते एम्. ए. झाले. पाली भाषेचा व त्या भाषेच्या द्वारा बौद्ध धर्माचा त्याच्या मनावर चागला पगडा बसला. पालीचे आचार्य प्रा० धर्मानंद कोसबी हे त्याचे गुरु. त्याना ते फार मानतात. त्याच्या विचाराची छाप चिंतामणरावाचे चित्तावर खूप पडली. पालीभाषेत त्यांनीं बरेच ग्रंथहि लिहिले असून परदेशातील मासिकांतहि त्याचे लेख मान्यतेनें प्रसिद्ध केले जातात. ' जातकातील निवडक गोष्टी ' किंवा ' मॅन्युअल ऑफ पाली ' अशीं परिचयात्मक पुस्तकें तर त्यानीं लिहिलीं आहेतच, पण त्याशिवाय पालींतील पुराण–ग्रथाचें संशोधन व संकलन करणारे अभ्यासक विद्वान म्हणूनहि त्यांचा लौकिक आहे. ' संशयाचें जाळें ', ' इंग्रजी शिष्टाचार ', ' अडीच हजार वर्षांपूर्वीचा समाज ', बालवाङ्मय, चरित्र, इतिहास इत्यादि विविध विषयावर त्यानीं पुस्तके लिहिलीं असलीं, तरी मराठी वाचक त्याना ओळखतो व चाहतो, तो त्याच्या चिमणराव–गुंड्याभाऊंच्या विनोदी ग्रंथावरूनच. इंग्रजीतील मार्क ट्वेन, लीकॉक व

चेस्टर्टन हे “ हाशाळ लेखक ” त्याचे आवडते ग्रंथकार होत. ‘ सत्याचे प्रयोग ’ ‘ लग्न पहावं करून ’ व ‘ सरकारी पाहुणे ’ हे त्याचे तीन बोलपट हास्यरसपूर्ण आहेत.

## सरस्वतीची उपासना

लेखनाचा नाद चिंतामणरावांना लहानपणापासूनच लागला. पुण्यात कथा-कीर्तनें ऐकावींत व त्यातील अभंग–पदाप्रमाणें आपणहि रचना करावी असा त्याना छद होता. एकदां अभ्यासाच्या वहींत त्यानीं अभग लिहिले होते. ते पाहून वडिलानीं त्याना बक्षीस कोणते दिले ? तर चौदावें रत्न ! शाळेत असताना चिंतामणरावानीं ‘ सुदर्शन ’ नावाची एक पौराणिक कादंबरीहि लिहिली. तिची फलश्रुति म्हणजे वडिलानीं ती पाणी तापविण्याच्या बंबात टाकून दिली ! आपल्या मुलानें खूप अभ्यास करावा, वर नबर पटकवावा आणि जाडा विद्वान म्हणून नावलौकिक कमवावा–अशी त्याची मनीषा. ‘ केवळ अभ्यासवादी ’ अशा त्यांच्या दृष्टीला आपल्या चिरजीवाचे ललित साहित्यातील चाळे अप्रिय वाटत. पुढे पुढे चिंतामणरावानीं इतके लोकप्रिय विनोदी लेखन केले, तरी त्या जुन्या पिढींतील वृद्धाची तशा लेखनाविषयींची अढी काहीं कमी झाली नाहीं. पण चिंतामणरावाना लिहावे व छापून यावे ही मोठी हौस. ते सागतात, “ आनंद मासिकाच्या दुसऱ्या वर्षी, मीं लिहिलेली एक गोष्ट माझ्या सपूर्ण नावासह त्यात छापून आली, तेव्हा माझ्या अभिमानास व आनदास सीमा उरली नाहीं. ” आपल्या दोघा मामाच्या मदतीनें चिंतामणरावानीं ‘ तरवार ’ नावाचे हस्तलिखित वर्तमानपत्र १९०५ सालीं काढलें व तें तीन वर्षे चालविले. त्यात गोष्टी, चुटके वगैरे मनोरंजक विभाग लिहिण्याचे काम चिंतामणरावाकडे असे. ‘ संपादक व न्हावी ’ हा गंमतीदार लेख चिंतामणरावानीं इंग्रजी पांचवींत असतांनाच लिहिला व हरिभाऊ आपटे याच्या ‘ करमणूक ’ पत्राकडे धाडला. त्या लेखाला प्रसिद्धीचा योग आला पाच वर्षानीं–आणि तो कॉलेजच्या त्रैमासिकांत. १९२६ पर्यंत ते गभीर व विनोदी अशा दोन्ही प्रकारचें

लेखन करीत. पण मासिककर्त्यांनीं विनोदी लेखांचीच मागणी सतत केल्यानें चिमणराव–गुंड्याभाऊचे पराक्रम त्यांच्याकडून लिहून झाले. आता वयोमानामुळे मूळची प्रकृति अधिकच गंभीर झाली आहे, तरी सपादकाच्या मागणीमुळे ते 'नातीची करमणूक करण्यासाठीं तिच्यापुढे वेडीवाकडीं तोंडे करावींत त्याप्रमाणे' विनोदी लेखाचा पुरवठा करीत असतात.

## पालीचे प्राध्यापक

उमरावती व रत्नागिरी येथे शिक्षकाचे काम करण्यांत चार वर्षे घालविल्यानंतर चिंतामणराव १९२० सालीं बडोदें येथील कॉलेजात प्राध्यापक म्हणून गेले. तेथें मराठी, इंग्रजी व पाली यापैकीं दोन भाषा ते आलटून-पालटून शिकवीत. १९२८ सालापासून 'राजदप्तरदार' ( Director of Archives ) म्हणून त्याची नेमणूक बडोदे सरकारनें केली. जुनी हस्तलिखितें जमवून त्याचे संशोधन करणे हे त्याचें काम. तें करीत असताहि त्याच्या अंगावरील झगा कायमच होता. १९२९ पर्यंत ते कॉलेजात पूर्ण वेळ शिकवीत होते आणि पुढे फक्त बी. ए., एम्. ए.-च्या विद्यार्थ्यांना पाली हा एकच विषय ते शिकवीत राहिले. १९४२ सालीं ते उज्जयिनी येथील 'मध्यभारत साहित्य समेलना'चे अध्यक्ष होते. १९४९ सालीं सेवा-निवृत्त होऊन ते पुणें येथें आले आणि लघुकथाकार य. गो. जोशी याच्यासन्निध बंगला बाधून राहूं लागले. नातूबागेला या जोशी-द्वयाने साहित्यिक महत्त्व प्राप्त करून दिले आहे. जोशी याच्या या जोडीची लेखनशैली घरगुती, विनोदी व सात्त्विक अशीच आहे.

## मामा-भाच्यांची जोडी

'बडोद्याचे चिंतामणराव' अशीच जोशी यांची ओळख महाराष्ट्रीय वाचकवर्गाला असली, तरी ते जन्माने, शिक्षणानें व वास्तव्यानें 'पुणेकर'-च आहेत. ते नुसत्या पुण्याचेच नव्हे, तर त्यातील 'सदाशिव पेठेचेहि' अभिमानी आहेत. 'सदाशिवपेठी' हा शब्द काहीं विद्वानांच्या कोशात

शिवीसारखा होऊन बसला होता, तर जोशी यानीं आपलें ' गुंड्याभाऊ' हें पुस्तक " आई सदाशिव पेठे " सच अर्पण केले आहे. " मला सदाशिवपेठी बाणाचा अभिमान आहे " असेंहि त्यानीं आपल्या अर्पण-पत्रिकेत नमूद केलें आहे. त्याच्या पांच पिढ्या पुण्यासच होऊन गेल्या. चिंतामणरावाचे वडील विनायकराव यानीं पुण्यातील निरनिराळ्या हायस्कूलामध्ये शिक्षकाचे काम केले. ' केवळ स्वार्थापार्यी ' नावाची कादबरी त्यानीं लिहिली. प्रि. आगरकर याच्या ' सुधारक पत्राचे संपादन चौदा वर्षें करण्याचा मानहि त्याना लाभला होता त्याच्या घरीं वृत्तपत्रें, मासिके व पुस्तके याचा पाऊस पडे आणि वाङ्मय-चर्चाहि चाले. त्याचा फायदा चिंतामणराव मनसोक्त घेत. ' निबंधमाले ' ची गोडी तर त्यांना विलक्षण लागली. त्याचे मामा कॅ. लिमये हे त्याचे सहधर्मी. दोघेहि विनोदी लेखक. दोघानीं एकत्र बसून वाचावे, विचार करावा व लेखनाची चर्चा करावी. त्याच्या मातुल घराण्यावरच सरस्वतीचा वरदहस्त होता. ना. गं. लिमये हे कवि म्हणून प्रसिद्ध आहेत, तर पा. ग. लिमये याच्या ' चतुरगडच्या विनोदी स्त्रिया ' महाराष्ट्राला सुपरिचित आहेत. वडील व मामा यानीं आराधिलेल्या सरस्वतीचा कृपा-प्रसाद चिंतामणराव याना सहजच लाभला.

## बहुविध अनुभव

वास्तवता व विविधता हे चिंतामणरावाच्या विनोदाचे विशेष गुण होत. वास्तव सृष्टींतील हाडामासाचीं माणसें घेऊन खऱ्याखुऱ्या प्रसंगीं तीं काय बोलतील, कशीं वागतील, हें त्यानीं बारीकसारीक तपशिलासह रंगविलें आहे. ' चिमणराव म्हणजे चिंतामणरावच ' असें वाटण्याइतक्या स्वभावांतील बारीकसारीक लकबी व खोंचा जोशी यानीं रेखाटल्या आहेत. ' कलावंत नसलेला कारकून ' तो असून साठ रुपये पगारात आपला बायकामुलाचा संसार नेकीने चालवीत आहे. त्याची भाषा बाळ-बोध, ओबडधोबड असते; पण सत्याचा आभास निर्माण करणारी असते. त्याचा मित्र गुंड्याभाऊ दाडेकर याचें शब्द-चित्र जोशी यांनीं बडोद्याचे

प्रो. ना. का. आपटे यांच्यावरून रंगविले आहे. व्यायामप्रेमी, परोपकारी व निर्भय वृत्तीचा हा पुतळा आहे. बुद्धीनें दोघेहि ढिले असल्यानें व हवी ती उलाढाल करण्याची हिंमत अंगीं असल्यानें या जोडीचे पराक्रम वाचतांना कोणाचेंहि पोट दुखल्याशिवाय रहात नाहीं. या हसऱ्या जोडीच्या अनुभवात गंमतीदार विविधता आहे. लेखकाला नोकरीच्या निमित्ताने खूप अनुभव आले व तेच त्याने या दोन पात्रात ओतून वाचकापुढें ठेवले. ‘ राजदप्तरदार ’ या नात्यानें जोशी याना बडोद्याच्या सुविद्य व संपन्न अशा राजघराण्यात जसे वावरतां आले, तसेच खेड्या-पाड्यातील भोळ्याअडाणी स्त्रीपुरुषातहि मिसळता आले. खैबर घाटा-पासून कन्याकुमारीपर्यंत आणि कलकत्त्यापासून कराचीपर्यंत देशभर त्यानीं पर्यटन केलें. थोर थोर साहित्यिकाशीं व महान महान मुत्सद्यांशीं बोलण्या-चालण्याचे प्रसग त्याना सहजच लाभत. त्या सर्वांचे टिपण त्यानीं आपल्या बारीक नजरेनें आपल्या बुद्धीवर कोरून ठेवले—आणि नंतर तेच कलेचे थोडेफार रग भरून महाराष्ट्राला सादर केले. झोपड्यापासून राज-वाड्यापर्यंतच्या विविध क्षेत्रांतील घटना गमतीदार रीतीनें सागण्यात जोशी कुशल आहेत.

## माफक शब्द-लीला

विनोद पिकविण्यासाठीं शाब्दिक कोट्यांचा पाऊस पाडण्याचा हव्यास जोशी याना नाहीं. ‘ चौकसले,’ दिलगिरला, ‘ दुजोरले ’ ‘ जमीनलो ’ अशीं क्रियापदे घडवून आणि ‘ शेकहण्डी,’ ‘ वीज-दिवटी,’ ‘छत्रुकली,’ इत्यादि काहीं विचित्र शब्द बनवून नव–शब्दाची टांकसाळ पाडणाऱ्यांचें त्यांनीं कोठें कोठें विडंबन केलें आहे. चहा, ( = पेय; वाहवा ), कॉफी ( = पेय, संगीतातील राग ) इत्यादि श्लेष जातां जाता साधले आहेत. दिवे लावणें, हवालदाराच्या नांवाचा हवाला देणें, वगैरे शब्दांवरील कोट्या तुरळक आहेत. दामले ( = आडनांव, पैसे घे ) किंवा ‘ मुलांचें तें मौलिक ’ अथवा रामभाऊ पटवर्धन ( = व्यक्तीचें नांव, राम म्हणजे बलिराम, त्याचा भाऊ श्रीकृष्ण, त्यानें द्रौपदी–वस्त्रहरणाचे वेळीं पटाचें

म्हणजे वस्त्राचें वर्धन केले) अशा हरिदासी कोट्याहि थोड्याच. 'शेंड्याची बायको शेंडी' व 'सराची बायको सरी' अशा कोट्या बालांना हसविण्याजोग्या आहेत. ठोकोस्लाव्हियाचे बादशहा, वादरलाल पोपट, चिवडाखान, डॉ. यमाजी भास्कर, प्रो. रुधिरप्रिय इत्यादि नुसतीं नावेहि खसखस पिकविणारीं आहेत. काहीं कोट्या साधण्यासाठीं लेखक पर-भाषाकडेहि धाव घेतो हे आश्चर्य आहे. 'कार बेकार झाली.' अशीं आग्ल-मराठी-मिश्रित कोटि आढळते, तर Sundry (= सकीर्ण) याचा उच्चार 'सुंद्री' करून तिच्यासाठीं खर्च केला जातो, अशी गैरसमजूत लेखकानें निर्माण केली आहे. सून व soon या शब्दावरहि अॅग्लो-मराठी कोटि त्याने केली आहे. 'वार्ता' याचा अर्थ गुजरातींत 'गोष्टी' आहे, याचा फायदा घेऊन कीर्तनाचे वेळीं बायका दोन्ही अर्थानीं वार्ता वळतात असे सागितले आहे. 'अॅस्ट्रॉय फट्' सारखे सस्कृत शब्दाचे इंग्रजी उच्चारहि हास्यकारक आहेत. 'वेलकम्' हा इग्रजी शब्द म्हशीकडून वदविण्याचा 'चमत्कार' करून ज्ञानेश्वराचे अल्पसें अनुकरण लेखकाने केले आहे. 'आमचा पण गाव' या संशोधनपर ग्रंथात चि. मोरूने हरणगावच्या पहाणीचा वृत्तात दिला आहे. त्यात तो म्हणतो, "म्हशींनीं तारवटलेल्या डोळ्यानीं तिच्याकडे पाहून बॅक ह्या शब्दाने तिला सलामी दिली. मला वाटलें बॅंक हा वेलकम् शब्दाचा अपभ्रंश असावा."

'दिवाणसाहेबाचें घड्याळ' या हास्य-कथेंत मद्रासी लोकांच्या लोचटपणावर टीका करतांना सर शब्दावर जोशी यानीं कोटी केली आहे, ती अशी "सर, सर, करून उदयाला चढणाऱ्या मद्रासी लोकाच्या रेल्वेच्या नावाचीं आद्याक्षरें देखील एस. आय. आर, असावीं ह्या योगायोगाच्या कल्पनेनें रघुवीरसिंहाला हसूं आलें."

## वेचक उपमा

उपमा-दृष्टांतादि अलंकार देऊन जोशी कृत्रिमता आणीत नाहींत. क्वचित् एखादी उपमा ते जेव्हां देतात, तेव्हा ती किती समर्पक असते याचें

उदाहरण ' स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग ' या लेखांत पहावयास मिळते, तें असे, " लग्नाच्या मिरवणुकींत ब्यांडची गर्जना थांबल्यावर जशी वाजंत्र्याची पिरपिर चालू होते, त्याप्रमाणें आईची सरबत्ती बंद पडल्यावर सौ. ची पिरपिर चालू झाली. "

तसेच ' कंपॉझिटरचा सूड ' या हास्यकथेत पुढील गांवरान उपमा आढळते. " वयात आलेला नवा गोऱ्हा जसा म्हाताऱ्या पोळास हुदाडून हुंदाडून शिवेपार घालवितो, त्याप्रमाणें चरक्याने देवगडसमाचाराची अवस्था केली. '

## श्लेषाची चुणूक

' माझा सेकंड क्लासचा प्रवास ' कसा घडला हें सागून चिमणरावांनीं एका शाळेतील स्वागत गीतातील शब्दाची मौज वर्णिली आहे. हैबतखान पठाण याचेऐवजी चिमणराव अध्यक्षस्थानीं बसले असताना मुले पद म्हणत होतीं, " पठाण हैबत–खान पाजी । अहो किति तरि पाजी चा विद्यामृत सगळ्याला आजी मंगलदिन आला ॥ "

पहिला चरण पुनः पुनः घोळून तीं मुले गात होतीं व त्यामुळें 'पाजी'चा दुसराच अर्थ श्रोत्याच्या चित्तावर जास्तजास्त ठसत होता ! तसेच आजीचे दोन अर्थहि हशा पिकवीत होते.

' गुंड्याभाऊचे दुखणें ' दूर करण्यासाठीं थुंकी, रक्त, दांत वगैरेंची तपासणी ' क्ष ' किरणानें करते वेळीं झालेल्या सवादात ' खाणे ' यावर लेखकाने कोटि केली आहे. तो संवाद पुढीलप्रमाणे—

" माझ्या बोलण्याकडे लक्ष न देता प्रोफेसर पुणे म्हणाले, ' पोटात सुई, टाचणी, चवली, पावली मिळाली गेली असली, तरी ती ' क्ष ' किरणाच्या फोटोत ताबडतोब स्पष्ट दिसते. "

' तर मग आमच्या म्युनिसिपालिटीचे जकात–इन्स्पेक्टर खवखवे म्हणून होते. त्याना पैसे खाण्याची फार संवय होती; त्यांनीं खाल्लेले पैसे देखील 'क्ष' किरणानींच उघडकीस आले असतील ? '

' आली ' या साध्या शब्दावर कोटीं करून जोशी यांनीं किती विनोद निर्माण केला आहे, हें ' आमचा पण गाव ' यांत दिसून येतें. त्यांतील

एका शिक्षकाचें सर्व लक्ष शाळेच्या कामात गढलेले असतें. त्याची पत्नी म्हणते, " माझ्या मोठ्या मुलाच्या पाठीवर मुलगी झाली, हें शाळेंतून परत आलें तेव्हां सासूबाईनीं सागितलं नाव घेऊन, मुलगी आली रे बाबा घरात. लगेच हे म्हणतात, ' दे घालवून परत ! आम्ही आपल्या शाळेत मुली घेत नाहीं .."

तसेच, ' स्टेशनस्टाफची मेजवानी ' या लेखांत ' तेल ' वर कोट्या करण्यात आल्या आहेत. प्रत्येक पात्राची विशिष्ट भाषा योजून रचलेला तो संवाद असा--

" रामप्रसाद-अपने रामभाऊला हा तेलाचा मिठाई लई आवडतो.

रामभाऊ ( गुडस क्लार्क ) म्हणूनच मी तैलबुद्धि झालो आहे.

नथोबा-म्हणून नाहीं कांहीं. मागें तूं बर्मा ऑईल कपनीच्या टाकींतलं तेल लाबवलस, तेव्हापासून तैलबुद्धि—"

ठरीव ठशाचे वक्तृत्व करण्याची नाटकी पद्धत काहीं व्याख्यात्याची असते. एकाच अर्थाचे तीन तीन शब्द निरर्थकपणे वापरून ते टाळ्या मिळवितात. या यात्रिक वक्तृत्वाचे विडबन 'माझा सेकड क्लासने प्रवास' या लेखात जोशी यानीं केले आहे, ते असे—

" आणखी या वडगावच्या रणभूमीची आठवण झाली, स्मरण झालें, स्मृति आली कीं प्रत्येक मराठ्याचे अंत:करण, प्रत्येक महाराष्ट्रीयाचे हृदय प्रत्येक दक्षिण्याचे मन थरारून येते, छाती भरून येते, ऊर फुटूं लागतो."

## पोकळ पांडित्याचें विडंबन

तसेच कांहीं विद्वानांना सभेत भाषण करताना उगाचच जाडेजाडे शब्द घालण्याची खोड असते. तिची थट्टा करणारे भाषण वरील लेखांतच हेडमास्तराच्या तोंडीं घातले आहे. संस्कृतप्रचुर शब्दरचना आणि शब्दालंकार व अर्थालंकार यांची योजना यांच्या अकारण व अवास्तव वापरांमुळें तें भाषण किती हास्यास्पद झाले आहे पहा—" हे समस्तमावलप्रांतस्थ कृषीवल–पट्टवान्–सावकार–श्रेष्ठी–आदिकरून सज्जनवृंद हो ! या दीन चातकाच्या आर्तरवानें द्रवून चंद्राप्रमाणे या मंडपांत

उदय पावलेत, या चक्रवाकाच्या आमंत्रणाचा आदर करून भगवान् सहस्र-रश्मीप्रमाणे या शाळेच्या भावी, भव्य, भपकेदार कोनशिला बसविण्याच्या शुभप्रसंगीं विद्यमान राहिलेत, इंद्रायणीथडीच्या या इटाच्या इमारतीचा इमला उठविण्यासाठीं इंद्राप्रमाणे नटून सादर झालेत, हे तुमचे महदुपकार आहेत. ''

उपमाचा अस्थानीं सडा पाडणाऱ्या लेखकाचे विडंबन ' बाप्यान्ला नाहीं ते समजायच ' या लेखात जोशी यानीं केले आहे. ते असे—
" पिवळ्या सोनचाफ्यासारखा मंजुळेचा रंग फिकट होऊन ती आतां पाढऱ्या चाफ्याच्या फुलासारखी दिसूं लागली होती, तिचे चमकणारे डोळे विहिरीच्या पाण्यावर पडलेल्या चंद्राच्या पडछायेगत खोल दिसूं लागले. तिचं गुटगुटीत अंग सुकलेल्या दोडक्यावाणी खोल दिसूं लागलं. ''

तसेच ' पेटींतील गौप्य ' या विनोद-कथेतहि नायकाला नायिकेचें सौंदर्य सर्वत्र कसे भासमान होत असें हें सांगताना सुंदर विडंबन साधले आहे. ते असे —" अब्दुल गवळ्याचा रेडा डुलत डुलत जाई तेव्हा त्यास फतिमेच्या गजगतीची आठवण होई, व जर तो रस्त्याने धावत चालला तर त्यास वाटे, फतिमेने याची गजगति चोरल्यानेच हा अशा द्रुतगतीनें चालला आहे कीं काय ? बाजारातील बटाटे पाहून त्यास फतिमेच्या ठळक डोळ्याची, दुकानात टांगलेलीं गंगावने पाहून तिच्या केसांची, बाबूचे भारे पाहून तिच्या सुंदर व कृश हातापायाची त्यास आठवण होऊन त्याचा कलिजा व्यथित होऊं लागला. ''

## बहुरंगी भाषाशैली

भिन्नभिन्न विभागातील व व्यवसायातील माणसाची भाषा वेगवेगळी असते. तिचा फायदा जोशी यानीं विनोदासाठीं जितका करून घेतला, तितका दुसऱ्या कोणी क्वचित्च घेतला असेल. 'जसा उच्चार, तसे लेखन' केल्याने ' असॉल, ' ' दिखीत ' ' नशीब काहाडलें, ' ' किन्‌न्‌चित ' 'कोण्ण्ण्णाच्या' इत्यादि शब्द विचित्रपणे डोळ्यापुढे वावरतात. निरक्षराचे उच्चार, स्त्रियाचे उच्चार, बालांचे उच्चार हे नुसते जसेच्या तसे लिहिले

तरी इशा उत्पन्न करतात. विशिष्ट धंदेवाल्याची भाषा तर हेंगाडीच असते. 'खेडेगावातील घरगुती धंदे' या लेखात बाळशेट वापरतो ती भाषा अशी:— " नाणीं पाडायचा नि णोटा शापायचा मक्ता सरकारणीं घेतला आहे; टाकसाळींतूण पुरते रुपय टाकत णाहींत म्हणून णोटा शापायचा शेपखाणा घातला णाशकास—" यातील विनोद स्पष्ट करण्यासाठीं लेखकाने पुढें ' शेपखाणा ' वर ' शेतखाना नव्हे ' असें भाष्य जोडले आहे !

जुन्या काळातील जहागिरदाराचा तिरसटपणा एका छोट्याशा उपमेनें जोशी यानीं प्रगट केला आहे, तो असा:—

" 'नो, म्हैसूर स्टेट,' हे तीनच शब्द भिकाऱ्याच्या अंगावर फेकलेल्या तीन दिडक्याप्रमाणे त्यानीं गुड्याभाऊच्या अंगावर फेकले. "

खेड्यातील कारागिराची भाषा कशी असते हें पुढील वाक्यावरून कळून येते. " ' खोटं बोलत असेन तर ह्या वस्तऱ्यानीं माझ्या पोटच्या पोराचा गळा कापीन मालक ! ' वस्तरा उंच करून खेडवळ रीतीची प्रतिज्ञा करीत बापू म्हणाला. त्याला पोरगा नव्हता ही गोष्ट वेगळी." शेवटच्या लहानश्या वाक्यात किती विनोद साठवला आहे !

खेड्यातील अडाणी माणसाची भाषा कशी असते हे ' कंपाझिटरचा सूड ' या हास्यकथेंतील पुढील एका वाक्यावरून कळून येणार आहे:— " म्हातारपणान् चागलं दिसत नाय म्हणून सागतों. भलतीच चूक राहून जायची ! " लिबाजीरावानीं बजाविले."

बायकाची घरगुती बोली कशी असते याचा मासला ' त्याने लग्न का केले नाहीं ? ' या लेखात पुढीलप्रमाणे पहावयास मिळतो:—" थेट इकडचा नमुना ! एकदा आपल्या स्नेह्याला जेवाला म्हणून बोलवाला जाच झालं, त्याच्याशीं दोन तास गोष्टी बोलत बसले नि जेवाला सागाच विसरून आले ! आम्ही वाट पाहा पाहा पाह्यली नि त्यांच्याकडे निरोप पाठविला, तर ते जेवून बसले होते. ' मला कधीं जेवायला बोलावल ? ' असं ते म्हणाले, त्यातलाच हा मासला ! "

' प्रामाणिकपणाविषयीं ' ( किंवा ' नावाविषयीं ' ) ' आजीबाई ' या

लेखांत एका वृद्ध खाणावळबाईचा स्वभाव तिच्या भाषणातून लेखकानें मार्मिकपणें प्रगट केला आहे. जगातील कोणताहि विषय असो, त्यावर आजीबाईंचे मत नाहीं असे नाहीं—आणि जें मत असावयाचें ते अगदीं ठाम व विसंगतीनें गोडाविलेले ! त्याच्या तोंडच्या दोन–तीन वाक्यावरूनहि त्यांच्या मनोवृत्तीची कल्पना कोणासहि येईल. उदाहरणार्थ, " जोशी बुवा, फुटबॉल घ्या,' एक फुगलेली ताजी पोळी पानात टाकून आजीबाई म्हणाल्या, ' आहो, या नाव ठेवायला काहींच ताळतत्र राहिला नाहीं. ......................... ' वाः आज आमटींत भुईमुगाचे दोन दाणे सापडले बुवा ! ' आमटीचा भुरका घेत नाडकर्णी म्हणाले. ......................... म्युनिसिपालिटीच्या एखाद्या मिरासदार अध्यक्षाप्रमाणे पोळपाटावर लाटणें आपटून त्यानीं फर्माविले, ' आरडर आरडर ! "

## अल्पशी अतिशयोक्ति

कोल्हटकर–गडकऱ्याइतकी बेसुमार अतिशयोक्ति चितामणराव टाळात असतात, तरी अतिशयोक्ति हा हास्याचा हुकमी एक्का तो ते केव्हा केव्हा वापरतात. ट्रॅमला वीस वर्षे उशीर झाला असे तेहि कॅ. लिमयेप्रमाणें लिहितात. ' मोटारउड्डाण ' या लेखात ते सागतातः—" एकदा एक अर्धांगवायूने पागळा झालेला रोगी गुड्याभाऊच्या मोटारीपासून आपला बचाव करण्यासाठीं इतक्या जोरानं उडाला, कीं त्यावेळीं शरीरात झालेल्या विद्युत्संचारामुळें त्याचे दुखणे नाहींसें होऊन तो साफ बरा झाला अशी आख्यायिका आहे. "

' तिहेरी पेंच ' मधील शालिमार कवीच्या कवितानीं सचेतन-अचेतन सर्व सृष्टीला वेड लागलें होतें, हें पुढील शब्दानीं लेखकानें वर्णिलें आहे, " कोकिळेचें कूकू, कावळ्यांची कावकाव, चिमण्याची चिवचिव, बेडकांचें डरांव डरांव, मांजरांचें म्यांवम्यांव, सर्वांतून शालिमारचीं प्राणिगीतें उमटत होतीं. मांजरीचीं लहान पिलें अहमहमिकेनें एकावर एक सरसावून मियाव मियांव करूं लागलीं कीं, शालिमारचा करुणरस मूर्तिमंत अवतरला

आहे असें वाटे. जंगली वाघ आपल्या डुरकावण्यात शालिमाराचें ' ऊठ मराठ्या, फेक खराट्या, घे हातीं तलवार !' या वीररसप्रधान पोवाड्याचें चौक गागत असत, तर पहांटच्या वेळीं बडबड बडबड करून लोकाची झोपमोड करणारे बुलबुल शालिमारच्या प्रणयगीतानीं बुलबुलणींस आराधूं लागले. सजीव सृष्टीप्रमाणे निर्जीव सृष्टीहि शालिमारच्या वाङ्मयाच्या जादूने भारली गेली. आगगाडी वेगात चालू असता तिचा तो ठठय् ठमक ठठय् ठमक आवाज बदलून जाऊन ती वेगात असताना शालिमारचीं उत्स.हगाणीं आपल्या चाकातून काढूं लागली. गिरण्याच्या घडम् घडम् आवाजातून शालिमारचीं समतापद्ये उमटूं लागलीं. निदान स्नेहलतेला तरी तसें वाटत होते. ”

त्याच गोष्टींतील आणखी एक अतिशयोक्ति म्हणजे मासिकाच्या लोकप्रियतेची. शालिमारच्या कविता छापणाऱ्या मासिकाचे आकर्षण कोणाला किती असे, हे सागताना चिंतामणरावानीं मार्क ट्वेनला शोभेशी अतिशयोक्ति केली आहे.–“ घरातील माणसात तो अंक वाचण्यासाठीं भाडणे लागत व अंकाच्या खेचाखेचींत श्रीगणेशा शिकणाऱ्या मुलापासून अर्ध्या गोवऱ्या दहनभूमींत गेलेल्या आजीबाईपर्यंत सर्वजण भाग घेत. रात्रीं अंक वाचून उशाशीं ठेवण्याचीसुद्धां सोय राहिली नाहीं. का कीं माजर किंवा उंदीर हळूच येऊन अंक लंबे करूं लागले. ”

## उपहासाचें हत्यार

उपहास हेंहि विनोदाचें एक अमोघ शस्त्र आहे. तें कोल्हटकर—गडकऱ्याइतकें सर्रास जोशी वापरीत नसले तरी क्वचित् तेहि त्याचा उपयोग करतात. ' स्टेशनस्टाफची मेजवानी ' या लेखातील शास्त्रीबुवा म्हणतात– “ अहो मास्तर, हे सुधारक हॉटेलात जाऊन काय खातात–पितात, किती बहकले आहेत हें पहायला मला त्याच्यावर नजर ठेवायला मधून मधून युरोपियन हॉटेलांत जावं लागतं. त्याशिवाय वस्तुस्थितिदर्शक प्रवचनं मला कशीं करतां येतील ? फार तर काय, युरोपियन लोकांचा धिंगाणा अन् त्यांचा सुधारणाचा पिंगा पहायला मी मधून मधून बॉल्सनादेखील जातों

खरा; पण श्रीकृष्णानीं सांगितल्याप्रमाणें माझी आसक्ति मात्र या धर्मावर नाहीं. काय समजला ? शंकराचार्यांनींसुद्धां परकायाप्रवेश करून संसाराचीं सुखं अनुभवलींच्च कीं नाही ? ”

शब्दनिष्ठ विनोदापेक्षा कल्पनानिष्ठ विनोदावर जोशी याचा भर आहे आणि उपहासाच्या शस्त्राने कोणाचे हृदय रक्तबंबाळ करण्याऐवजी संसारात जखमी झालेल्या हृदयावर सहानुभूतीची फुकर घालण्याकडे त्याचा ओढा आहे. तरी लेखकवर्गाला उपहासाचा बारीकसा चिमटा घेताना ते ‘ कंपाझिटरचा सूड ’मध्ये लिहितात—“ मात्रा जुळविता न येणारे कवी, उदाहरणें बरोबर सोडवितां न येणारे अंकगणितकार आणि खोट्या बातम्या देणारे वर्तमानपत्रकार याचा तो केवढा उपकारकर्ता आहे ! स्वत: अपराध करून नामानिराळे होणाऱ्या लेखकाना कपॉझिटरसारखा त्राता नाहीं. ”

प्रत्येकाला आपल्या घराण्याचा अभिमान सहजच असतो. पण जेव्हा काहीं लोक आपल्या वंशाची मुळी सूर्यचंद्रापर्यंत नेऊन पोचवतात तेव्हा तो थट्टेचा विषय होतो. हे तत्त्व सांगण्यासाठीं ‘ आमचा पण गाव ’ यातील सुतार म्हणतो:—“ ‘ भटब्राह्मणाचा पितामह ब्रह्मदेव जलमला न् मग त्याच्या बारशाच्या दिवशीं आम्हीं त्याचे कान टोचले म्हणून आम्ही ब्रह्मदेवाच्याही अगोदरचे अस दैवज्ञ म्हणतात; आम्ही म्हणतो ब्रह्मदेवाला ज्या पाळण्यात घातला तो पाळणा आम्हीं केला होता—’ ”

“ परिटा, येशिल कधिं परतून ? ” हें अत्रे याचें विडंबन-काव्य प्रसिद्धच आहे. तसेंच विडबन जोशी यानीं गद्यात केले आहे. हरणगांवच्या परिटाला पुढील मार्मिक प्रश्न विचारण्यात आले.—

“ ‘ भाऊराव, मला एक शंका आहे. तुम्हीं धुवायला दिलेल्या कपड्यांला भोकं पाडून जाळीदार कोणत्या हत्यारानं बनवता तें हत्यार मला पहायचं आहे,’ मी म्हणालों.

“ ‘ कोटाचीं अन् विजारींचीं बटनं तुम्ही हातोड्यांनीं फोडता कां तीं फोडायचं एखादं यत्र असतं तुमच्याजवळ ? ’ राघूने विचारलें.”

## समाज जीवनावर टीका

सार्वजनिक जीवनातील अप्रामाणिकपणा दाखविणारी 'स्टेशन स्टाफची मेजवानी' ही कथा जितकी विनोदी तितकीच टीकात्मक आहे. रेल्वे-खात्याशीं ज्याचा कोणत्या ना कोणत्या नात्याने संबध आला असेल, त्याना तेथील बारीकसारीक घटनाचेहि जोशी यानीं केलेले स्पष्ट व सत्य चित्रण आल्हाददायक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. चिरीमिरी व चोरा-पोरी हे रेल्वे-राज्यातील महामत्र होत सनातनी शास्त्रीबुवाच्या दाभिकपणाची यथेष्ट चेष्टा लेखकाने केली आहे. हैदराबादच्या लग्नातील मेजवानीमधील जी-उष्टी खरकटी मिठाई भंग्याना मिळाली. तिचा काहीं भाग त्या भंग्यानीं आपल्या सग्यासोयऱ्याना रेल्वेपार्सलने पाठविला. तें पार्सल फोडून खाण्याची चोरी स्टेशनावरील साऱ्या नोकरानीं केली आणि शास्त्रीबुवा-सकट साऱ्या लोकानीं त्या मिठाईवर ताव मारिला अशी ही कथा आहे.

'भक्त-कसोटी' ही सारी गोष्टच उपहासप्रचुर आहे. आजकाल भौतिक सुधारणाची चलती असली, तरी त्या आमच्या अध्यात्मविद्येपुढें फोल ठरतील, असें मत बाळगणाऱ्या सनातनी लोकाचे विचार नारदाच्या मुखाने लेखकाने हास्यास्पद करून माडले आहेत. नारद बेकार गरुडाला आश्वासन देताना म्हणतात, "अखेर पौर्वात्य आध्यात्मिक सस्कृतीचाच विजय होऊन या आधिभौतिक सुधारणा आमच्या वडिलानीं चतुर्मुखानीं वर्णिलेल्या वेदाच्यापुढे लोटागण घालतील ! अरे मूढा ! खनिज तेलें संपल्यावर या फटफट्या ओढायला आज अडगळींत टाकलेले अश्व आणि बलीवर्द याचींच आर्जवे करणे भाग पडेल."

जोशी यानीं आपले कर्तबगारीचे आयुष्य एका मोठ्या संस्थानांत घालविले. त्यामुळे लहानमोठ्या सस्थानातील बऱ्यावाईट गुंतागुती व गमती त्यांना पुऱ्या माहीत आहेत. क्रिकेटपटु गुड्याभाऊ धरमगडच्या ठाकूर-साहेबाकडे नोकरीस गेला. तेव्हा त्याला एक सस्थानी अधिकारी साग-तात:—"आम्हा संस्थानी अंमलदाराना सिनेमातल्या नटापेक्षादेखील वेगळाल्या प्रकारचीं सोंगं करावीं लागतात. दरबारला जाताना नाना

फडणीस बनून जावं लागतं, ऑफिसला जाताना साहेब व्हावं लागतं, क्लबात खेळायला जाताना तरुण खेळाडूसारखा छचोर पोषाक करणं भाग पडतं, तर शिकारीला जाताना फील्ड मार्शलचा आव आणावा लागतो."

## कल्पनानिष्ठ विनोद

विसंगत कल्पनेतून पाझरणारा हास्यरस अधिक मधुर असतो. सरकार नाशिकास बडा छापखाना चालवून व हजारों रुपये दरमहा खर्चून नोटा छापतें; त्यापेक्षा आपण एका पेटाऱ्यात थोड्या खर्चात नोटा व नाणीं छापतो, ही बाळशेटची बढाई किती विनोदी आहे ! मानवी स्वभावातील असा इरसाल मूर्खपणा व आचरट हावरेपणा हे विनोदाचे सर्वकाळींचे व सर्वस्थळींचे विषय होत. कल्पनानिष्ठ विनोद फुलविण्यात जोशी यानी मोठे यश कमावले आहे. त्याचा मानसपुत्र गुड्याभाऊ म्हणजे ' सुदृढ खाद्यावर युक्तिबाज डोके. ' त्याचे परोपकाराचे व तत्त्वनिष्ठेचे पराक्रम वाचून कोणाच्याहि पोटात दुखूं लागेल. कोणत्याहि चागल्या तत्त्वाचा अतिरेक झाला म्हणजे तो कसा हास्यास्पद होतो, याचे हृदयगम चित्रण जोशी यानीं ' स्पष्टवक्ते-पणाचे प्रयोग ' या लेखात केले आहे. काळवेळ न पाहता व सारासार-विचार न करिता सत्य बोलण्याने किती अनर्थ ओढवतात हे त्यात दाख-विले आहे. कु. तरुणीबाईचे व्याख्यान ऐकून चिमणरावाच्या अगात स्पष्टोक्ति सचारली. ही एक कल्पना जोशी यानीं हलके हलके फुलवली आहे. चिमणरावाने आपला भिडस्तपणा टाकला आणि तो ज्याला त्याला सत्य सागत सुटला. त्याचा मेव्हणा किडमिडे हा क्षयाने अंथरुणाला खिळला होता. त्याच्या प्रकृतीबद्दल चिमणरावाने डॉक्टरला खोदूनखोदून विचारले. तेव्हा डॉक्टरानीं त्याची आशा नसल्याचे सागितलें. हें सत्य कानीं पडताच " स्पष्टवक्तृत्वाचे वारें प्यालेला " चिमणराव ताडकन् त्या रोग्याजवळ गेला आणि—

' काकासाहेब ' वीररसप्रधान गद्य नाटकातील नायकाप्रमाणें हेल काढीत मी उद्गारलो, ' आता कसची कादंबरी अन् कसचं नाटक ! ह्या बिचाऱ्या शंकर किडमिड्याचं आयुष्य म्हणजे शोकात कादबरीच होणार

आहे. ह्याला कादंबरी वाचून दाखविण्याऐवजीं गरुडपुराण किंवा महाभारतातले स्वर्गारोहणपर्व वाचून दाखवलं तर बिचाऱ्याला परलोकात तरी त्याचा काहीं उपयोग होईल ! '

आपले मरण ओढवल्याची वार्ता ऐकून रोग्यावर व त्याच्या आप्तेष्टावर काय परिणाम झाले, पहा—" तो ऐकताच शकरने 'अरे बाप रे! " असे उद्गार काढून डोक्यावरून पाघरूण घेतलें. काकासाहेबानीं 'श्रीराम श्रीराम' करीत शेजारच्या खुर्चीवर डोकें टेकिले आणि काकूबाई " अरे माझ्या बाळा ! " असे ओरडत मुलाला मिठी मारून ओक्साबोक्शीं रडूं लागल्या. हा अनपेक्षित प्रकार पाहून मीं तेथून हळूच पाय काढिला. "

## ढोंगीपणावर टीका

' वर–पित्याचा घोटाळा ' ही कथा म्हणजे एका विनोदी कल्पनेचा बहारदार विस्तार होय. प्राप्तीवर कर आकारणारा अधिकारी हा ओक व एका वधूचा पिताहि ओकच. त्याच्या ओळखीची अदलाबदल झाल्यामुळे चिमणरावाचे सोंग अंगाशीं येते. आपला दर्जा आता किती वाढला आहे हें सागताना चिमणराव म्हणतात, " मी आता मिलिटरी हिशेब खात्यात पाऊणशे टिकल्यासाठीं खर्डेघाशी आणि ' यस्सर, एक्सक्यूज सर ' करणारा कारकून राहिलो नसून ' टू फिफ्टी ' मिळविणारा 'व्हेरी–गुड–मिस्टर–आय मीन–मेजर–कुरतुड–सिंघ ' असें बरोबरीच्या नात्यानें अंमलदाराना ठणकावणारा सुपरवायझर ( निरीक्षक ) झालो आहे. " चिमणराव ' आयपतकर अधिकाऱ्याला ' चुकून वधू–पिता समजून आपल्या श्रीमंतीची नसती बढाई सागतो आणि त्यामुळे त्याचेवर इन्कम टॅक्स मात्र बसतो, उलट खऱ्या वधू–पित्याला कर–अधिकारी समजून आपल्या कगालीचा पाढा वाचतांना चिमणराव म्हणतो, " छे हो, लेक्चरर कोण नेमतं आहे त्या शखाला ? डिमॉन्स्ट्रेटर नेमलं आहे दरमहा साठ रुपयावर. त्यातूनच एम्. एस्सी च्या फीचा न् पुस्तकाचा खर्च करावयाचा म्हटला म्हणजे शिल्लक काय राहतं आहे ? " अशी हलाखी ऐकल्यावर कोणता वत्सल पिता आपली पोर त्या घरात लोटील ? त्यानें

नकार दिला. समाजात नेहमीं आढळणाऱ्या दुतोंडीपणावर ही टीका किती मार्मिक आहे!

## मजेशीर विडंबन

'माझे दत्तक वडील' या विनोदी लेखात एका वृद्ध भामट्याच्या लीला वर्णिल्या आहेत. बिचारा चिमणराव साठ रुपयामध्ये ससाराचा गाडा कसाबसा हाकीत होता. त्याची वडिलार्जित तुटपुंजी जिंदगी रत्नागिरीस होती. तिचा वसूल आणण्यासाठीं चिमणराव रत्नागिरीस गेला असताना त्याला एक म्हातारा भेटला. तो दिसण्यात अगदी भोळाभाबडा होता. "चिमण! बाळ चिमण!" असे म्हणून त्याने चिमणरावाला प्रेमाने कडकडून मिठी मारली. आपण फार मोठे श्रीमत आहोंत पण आपलीं सारीं मुले देवाघरीं गेलेलीं आहेत आणि स्वप्नात गुरूने दत्तक घेण्याचा आदेश दिला व त्या दृष्टांतातील दत्तक मुलगा म्हणजेच चिमणराव अशी कहाणी त्या म्हाताऱ्यानें सांगितली. त्याच्या जिनगीमुळें चिमणरावाच्या तोंडाला पाणी सुटले आणि म्हणून तो म्हातारा जेव्हा रत्नागिरीहून चिमणरावाच्या घरीं राहावयास आला तेव्हा त्याची बडदास्त चिमणरावानें एखाद्या सरदारासारखी ठेवली. त्यापायीं चिमणरावाला कर्जेहि झालें. सशय येताच चिमणराव रत्नागिरीस जाऊन चौकशी करून आला. तेव्हा त्या म्हाताऱ्याचा थापेबाजपणा त्याला कळून आला. पण आता कळून काय उपयोग? म्हाताऱ्याने केव्हाच पळ काढला होता. चिमणराव मात्र पैशाच्या टचाईत आला. म्हणून तो शेवटीं म्हणतो, "गेल्या चार महिन्यातील देणीं फेडण्यासाठीं वाचकानीं मला पर्स अर्पण करावी अशी विनंती आहे. नाहीं तर तरुणाचे मूर्खपणाचे प्रकार निस्तरणारा परमेश्वर जो सासरा, तो माझा पाठीराखा आहेच."

गवयांच्या मैफलींचे वर्णन अतिशयोक्तीनें लिहिण्यात काहीं लेखकांची महाराष्ट्रात जणू चढाओढ लागलेली होती. तिचे विडंबन 'ह्याहि कलावंताच्या सान्निध्यांत' या लेखात जोशी यानीं खुमासदारपणें केलें आहे. आचारी—पाणके वगैरे कलावंतांच्या मुलाखती त्यानीं विस्तारानें वर्णिल्या

आहेत. एके ठिकाणीं ते असें वर्णन करतात कीं, " दुधाबरोबर सदोबाचें हृदयहि ढवळले जात होतें. चारपांच वेळा ढवळल्यावर त्यानीं अल्हाद उचलून एक थेंबहि उतू जाऊं न देता नैपुण्यपूर्वक रीतीनें चीज सपताच गायिका ज्याप्रमाणे आपल्या हातातला तंबोरा जणू काय तो नुक्ता तासापूर्वी जन्मलेला मुलगा आहे असे समजून हलक्या हातानें जपून शेजारीं ठेवून देते, त्याप्रमाणें भुईवर ठेवले. "

मालाची जाहिरात आणि गोष्टीचे कथानक या दोहोंची खिचडी किती खमग होऊं शकते हें जोशी ह्यानीं " जाहिरातीसंबधीं १८३२ शब्द " या लेखात दाखविले आहे. पूर्वीं ' करमणूक ' पत्रात ' पिंकपिल्स ' च्या जाहिरातीचा मजकूर गोष्टीरूप असे. तिचे खासें विडबन या जाहिरातमिश्रित गोष्टींत लेखकाने केले आहे.

## मुद्रण-दोषांच्या मौजा

वर्तमानपत्रातील मुद्रण-दोष कोणा वाचकाला बोचत नसतील ? पण त्या दोषाच्या चिखलातून हास्याचे कमळ फुलविण्याचें चातुर्य जोशी यानींच दाखिवले आहे. ' कपॉझिटरचा सूड ' हा त्याचा विनोदी लेख खूपच गाजला. ' महाराजाच्या ' ऐवजीं ' महाराच्या ' किंवा 'विधानाचा' याऐवजी 'निधनाचा' अशा नुसत्या छपाईच्या सत्य चुकाची माळ गुंफली तरी ती हास्य उत्पन्न करते. पण तेवढ्यावरच जोशी थाबले नाहींत. या विसंगतीच्या धाग्यानें त्यानीं एक लहानसे कथानकच विणलें. अशा चुकांची गर्दीं होण्यास कारण चिडलेला कंपॉझिटर दाखविण्याचें त्यानीं ठरविले. आणि तो कंपॉझिटर चिडण्याचें कारण त्यानीं असें कल्पिलें कीं, एक सपादकच दुसऱ्या सपादकाच्या स्पर्धेमुळें कंपॉझिटरचें काम करूं लागला आहे आणि त्या नोकर बनलेल्या संपादकाला तो दुसरा संपादक मालकशाहीच्या गुर्मीने धुडकावून लावीत आहे. अशी दुर्दशा पहिल्या संपादकावर येण्याचे कारण त्याचें अज्ञान हें आहे. अशी सयुक्तिक कारणमालिका आधीं गुंफल्यामुळें पुढील मुद्रणदोष स्वाभाविक वाटतात व त्यामुळें वाचकाना त्यांतील हास्यरसाचा आस्वाद

निर्भेळपणें घेता येतो. एका लग्नपत्रिकेंत ' माजी हुजूर डेप्युटी कलेक्टर'ला जुळाऱ्याने फट्दिशीं 'पाजी मजूर' बनविलें आणि रावसाहेब र. वा. भागवत यांचें नाव 'रासभा खा गवत' असें पडलें. शेवटीं ' लग्न-समारंभा '-ऐवजीं 'नग्नसमारंभ ' व ' गधे ' ऐवजीं ' गध्ये ' अशीं अक्षरें पडल्यामुळें संपादकाच्या डोक्यात सोटे पडण्याची पाळी आली. ' सलगी ' ऐवजीं ' मुलगी ', ' प्रेमाच्या ' ऐवजीं 'प्रेताच्या', 'जोराची' ऐवजीं 'चोराची', ' कविवर्य ' ऐवजीं ' कपिवर्य ', ' माडीवर ' ऐवजीं ' माडीवर ', 'भगिनी' ऐवजीं 'भंगिनी', 'वीरांगना' ऐवजीं 'वारांगना'-अशा मुद्रण-दोषामुळे किती घोटाळा उडाला हें वाचताना कोणाला हसूं येणार नाहीं?

## जीवनांतील भावनेचें महत्त्व

" त्याने लग्न का केले नाहीं ? " ही जोशी यांची एक बहारीची कथा आहे. तींत विनोद आहे, कल्पकता आहे, सहृदयता आहे व सूक्ष्म टीका पण आहे. तिशीच्या आतबाहेर असणारे प्रो. हणमंतराव हे अविवाहित राहून इतिहासाचे संशोधन करण्यात जन्म घालवीत होते. एकदा ते लोणावळें येथें जहागिरदार सराटे याचेकडे रहाण्यास गेले. जहागिरदाराची कन्या प्रभावती हणमंतरावाच्या 'कडकडीत देशाभिमानानें, जाड्या विद्वत्तेने आणि कमावलेल्या शरीर—सौष्ठवाने ' दिपून गेली. त्याचा बोलण्यातील आवेश, रसाळपणा, बहुश्रुतपणा इत्यादि गुणानीं तिच्यावर मोहिनी पाडली. तिचे त्याच्यावर प्रेम बसलें. तिनें त्याच्याशीं लग्न करण्याचे मनात आणिलें. पण हणमंतरावाना त्याचा दाद ना पत्ता ! त्याना तिनें " मला एक प्रश्न विचारायचा आहे, गडे !" असे लाडीकपणानें म्हटले. तरी त्या प्रोफेसराच्या डोक्यात काहीं प्रकाश पडला नाहीं. तेव्हा प्रभावतीनें अधिक स्पष्टपणा पत्करून त्याना विचारलें, " माझ्या मैत्रिणीचें प्रेम एका इतिहासाच्या अभ्यासकावर बसलेलें आहे. पण वडिलानीं एका श्रीमंत अधिकाऱ्याबरोबर तिचें लग्न ठरविलें आहे, तर तिनें काय करावें ? " तेव्हा हा गंभीर पुतळा निर्विकारपणे एखादे पुस्तकी उदाहरण सोडविल्याप्रमाणें म्हणतो-" ठीक आहे. या मनु-

त्याला आपण अ हें नाव देऊं. अ हा बहुगुणसंपन्न आहे, बहुधनसंपन्न आहे, स्वरूपानं गोमटा आहे, ‘ क्षी ’वर त्याचें प्रेम आहे, परंतु क्षीचें त्याच्यावर प्रेम नाहीं,” काचेचा एक पांढरा कागद-दडपणाचा गोळा प्रभावतीपुढें जोरानें आदळून ते म्हणाले, “ हा समजा अ. आणखी, ” निळ्या रंगाचा दुसरा गोळा तिच्यापुढें ठेवून ते म्हणतात, “ हा समजा आ, म्हणजे तुमच्या मैत्रिणीला ज्याच्याविषयीं पेंच पडला आहे असा दुसरा पुरुष. ” तो ‘ आ ’ आपल्या मैत्रिणीचे प्रेम ओळखीत नाहीं अशी तक्रार प्रभावतीने केली, तरी ती आपल्याला उद्देशून आहे हें न कळल्यामुळें प्रोफेसरमहाशय म्हणतात, “ अरे, वा ! तर मग ती मुलगी फारच स्पृहणीय असली पाहिजे यांत शंका नाहीं. आणखी तिच्यासारख्या मुलीचं प्रेम आपल्यावर असून तें न समजणारा हा मनुष्य अगदींच अरसिक, मठ्ठ, करंटा असला पाहिजे ! समर्थांना तो माहीत असता तर करंट्याच्या लक्षणांत त्यांनीं त्याचं वर्णन गोवण्याचं बाकी ठेवलं नसतं ! अगदींच शतमूर्ख दिसतोय ! ” प्रोफेसर त्या व्यक्तीविषयीं तिरस्कारानें पुढें उद्गारले,

“ तर मग ज्या ठोंब्याला एका मुलीच्या प्रेमार्द्र अंतःकरणांतल्या जिवंत भावना उलगडत नाहींत तो मृत इतिहासांतले मोठाले शोध काय लावणार ? तें दिसतच आहे ! असल्या व्यवहारशून्य शंखांशीं तिचें लग्न लावण्यात काहीं अर्थ नाहीं. ”

शेवटीं क्षी व अ याच्या मस्तकांवर आनें अक्षता उधळल्या. ज्ञानाचा गोळा हा केवळ कांचेचा गोळा ठरला. भावनेला पारखे असणाऱ्याचें जीवन नीरस व दुःखमय कसें होतें हेंहि यात सूक्ष्मपणें दाखविलें आहे.

## केवळ विनोदार्थ

कांहीं काहीं गोष्टींत केवळ विनोद निर्माण करण्यासाठीं जोशी यांनीं चुकामूक व गैरसमज यांचा उपयोग केला आहे. केवळ रेल्वेचें रिटर्न तिकिट वायां जाऊं नये म्हणून दुसरें लग्न करणारे शेटजी त्यानीं चित्रित केले आहेत. संपादक बाबूराव हॉटेलांतील ज्या खोलींत राहिला त्याच खोलींत बाबू चष्मेवाला हा दरोडेखोरहि पूर्वीं राहिला होता. या योगायोगामुळें एका

बातमीदारानें दरोडेखोराची म्हणून घेतलेली संपादकाची मुलाखत द्व्यर्थी कशी झाली आणि तिच्यामुळें जो तो दचकून व वचकून कसा पाहूं लागला याचें गमतीदार वर्णन जोशी यांनीं केलें आहे. सर्कशींतील वाघ-सिंह भीमरावाला भितात, तो भीमराव आपल्या बायकोला भितो आणि ती बायको झुरळाला घाबरतें असे विनोदी प्रकार एका कथेंत वर्णन करून चिंतामणरावानीं हंशा पिकविला आहे.

## सुशिक्षितांचीं दोष-स्थळें

" गुंड्याभाऊचे दुखणें " हा लेख जितका हास्यपूर्ण आहे तितकाच टीकागर्भहि आहे. " अख्या मुंबईत तुझ्यासारखा निरोगी माणूस दुसरा कोणीहि नाहीं. " हें डॉक्टरांनीं गुंड्याभाऊस सांगितले पण दोनशे रुपये खर्च झाल्यानंतर. शहरातील सुशिक्षित म्हणविणारे डॉक्टरलोकहि आपल्या ज्ञानाचा काळा बाजार कसा करतात आणि भोळ्याबापड्या जनतेच्या पैशावर दिवसाढवळ्या कसे दरवडे घालतात, हें विनोदी पद्धतीनें चिंतामणरावांनीं या लेखात सांगितलें आहे. एक डॉक्टर गुंड्याभाऊची थुंकी तपासतो तर दुसरा रक्त तपासतो आणि तिसरा क्ष किरणानें फोटो काढतो. चौथ्यानें तर गुड्याभाऊऐवजीं चिमणरावाचेच तीन दात काढून टाकले, इतकी त्याला कामाची धादल ! बलभीमाची मूर्ति असलेल्या गुंड्याभाऊला क्षयाची भावना झालेली आहे असाहि संशय डॉक्टरानें प्रगट केला.

प्रोफेसर पागलगावकर शास्त्रीय ज्ञानाचा काळाबाजार करून खेड्यांतील लोकांना कसें लुबाडतात हें एका कथेंत गंमतीनें दाखविलें आहे. मंगळ, गुरु, शुक्र वगैरे आकाशातील ग्रह मी दुर्बिणींतून दाखवितों, असें म्हणून हे प्रोफेसर कुंभारवाड्यातील गाढवें व गावातील ड्रेनेज, ताबडा कंदील वगैरे दाखवून लोकाना चकवितात, असें विस्तारानें वर्णिलें आहे.

पहिली पत्नी हयात असतांना आपली बौद्धिक भूक भागविण्यासाठीं दुसरी बायको करण्याचा संप्रदाय काहीं प्रोफेसरांनीं सुरू केला. त्या वेळीं त्यांवर तीक्ष्ण टीकेचे मोठे हल्ले झाले. जोशी यांनींहि आपलें विनोदाचें शस्त्र परजलें आणि ' सुमनचें सामाजिक संशोधन ' या नांवाचा लेख

लिहिला. त्यातील प्रा. दिघे याच्या सपत्नीक विवाहाचा बोजवारा त्यांच्या विद्यार्थ्यांनीं कसा उडविला हें सागून जोशी यानीं जणुं कांहीं शाब्दिक निषेधापलीकडील मार्गच आपल्या वाचकांना दाखवून दिला.

## नानाविध पैलू

श्री. चिंतामणराव जोशी याना बडोद्यासारख्या सुविद्य, संपन्न व पुरोगामी संस्थानात मानाची, ऐश्वर्याची व स्वाथ्याची नोकरी लाभली. याचा उपयोग लेखनाकडे करून समाज—हित साधण्य.इतकी उदारबुद्धि त्यांचे ठायीं आहे. बहुश्रुतपणाची व अनुभवाची बैठकहि त्या लेखनाला सहजच लाभली. मुख्य म्हणजे ते निर्भेळ बुद्धिवादी असल्यानें बुद्धीला न पटणाऱ्या विषयावर आपले विनोदाचे हत्यार ते निर्भीडपणें चालवूं शकतात. त्याच्या प्रत्येक लेखात त्याचें बुद्धि—स्वातत्र्य तळपताना दिसतें. बहुश्रुतता, अनुभव, बुद्धिस्वातत्र्य व समाजहिताची कळकळ हे गुण अंगीं असल्यामुळें जोशी यानीं विनोदी लेखन विपुल प्रमाणात केलें. त्यात कांहीं बत्तासे असतील, काहीं पेढे असतील, तर काहीं चुरमुरेहि असतील. काहीं लेख वाच्यार्थानें लिहिलेले आढळतात, तर काहींमध्यें नावाचीं किंवा धंद्याची नुसती जंत्री दिलेली असते. काहीं लेखाना गोष्टींचें कोंदण बसाविलेलें आहे, तर काहीं लेखाना लघुनिबंधाचा मुखवटा आहे. कैक लेखात शुद्ध विनोद खेळत आहे, तर काहींमध्यें तात्त्विक विचार नीरस पाल्हाळानें व गंभीरपणानें सागितलेले आहेत. रस्त्यावरील एका कुत्र्याच्या पिल्लाचें रक्षण गाय—म्हशी करतात, पण माणसाची मोटार त्याचा चुराडा करते, असे सांगून त्यांनीं एका कथेंत " मानवतेचें स्तोम " माजविणाऱ्यांना योग्य इषारा दिला आहे. " आरोग्यमातेचें मंदिर " हा लेख तर चटकदार प्रचाराचा नमुना आहे.

## साधेपणाचें सौंदर्य

' शेंकडा शंभरांतला साधा माणूस ' कसा असतो व त्याचे नित्याच्या व्यवहारांत कोणते दोष दिसतात, हें दाखवून जोशी वाचकांच्या डोळ्यांत नकळत अंजन घालतात. ' स्टेशनस्टाफची मेजवानी, ' ' कंपॉझिटरचा

सूड ' ' त्यानें लग्न कां केलें नाहीं ? ' इत्यादि त्याचे लेख म्हणजे मराठींतील विनोदाचे विजय-ध्वजच होत. गुंड्याभाऊविषयींच्या लेखांत चरित्राचा एक धागा गोवलेला असल्यानें त्याचा उपवास व त्याचे दुखणें, त्याची दरबारी नोकरी व त्याचा संस्थानी पाहुणचार-या सर्वांविषयीं वाचकाचे मनात आधींपासूनच आपोआप सहानुभूति उत्पन्न होते. सर्वसामान्य वाचकाला रुचेल व पचेल असाच चिंतामणरावाचा विनोद असतो. विनोदाची शिकार करण्यासाठीं ते उपहास अतिशयोक्ति यांचीं बंदुका— पिस्तुलें जशीं घेत नाहींत, तशींच श्लेषकोट्यांचीं वाघनखेंहि फारशी घालीत नाहींत. उघड्या अंगानें व मोकळ्या हातानें दाट जंगलात शिरून वाघासिंहाची शिकार करण्याइतकी हिंमत व करामत चिंतामणराव जोशी यांनीं विनोदाच्या क्षेत्रात दाखविली आहे. साधासुधा पण स्वतंत्र असा आपला पंथ काढून मराठी वाचकाना हसतहसत चार सुविचार सांगणारे जोशी यानीं सरस्वतीच्या दरबारातहि ' राजदप्तरदारा'सारखेंच मानाचें स्थान कमावलें आहे.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) श्री. चिं वि. जोशी यांचें चरित्र थोडक्यात द्या. घरातील वातावरण श्री जोशी याच्या बौद्धिक वाढीला कसें अनुकूल होतें तें स्पष्ट करा.

( २ ) ' वास्तवता व विविधता हे दोन गुण श्री जोशी यांच्या विनोदाचे विशेष म्हणून दाखविता येतात.' उदाहरणे देऊन हे विधान स्पष्ट करा.

( ३ ) श्री. कोल्हटकर-गडकरी याच्या विनोदापेक्षा श्री. जोशी याच्या विनोदाचे स्वरूप कोणत्या बाबतींत वेगळें आहे ?

( ४ ) श्री जोशी यानीं लिहिलेल्या विनोदी पुस्तकाची नावें लिहा. त्यातील तुम्हाला आवडलेल्या दोनतीन उत्कृष्ट विनोदी स्थलांचा थोडक्यात गोषवारा द्या.

( ५ ) श्री. जोशी याचे मानसपुत्र चिमणराव व गुंड्याभाऊ याच्या स्वभावातील गुणदोष लिहा.

# कॅ. गो. गं. लिमये : : ५

प्रा. चिं. वि. जोशी यांनीं सुरू केलेला विनोद–प्रवाह वाढविण्याचें काम त्याचे मामा कॅ. लिमये यानीं यशस्वीपणें केलें आहे. गुरु-शिष्य, पिता-पुत्र किंवा बधु-बंधु अशा जोड्या मराठी साहित्यिकांमध्यें मधूनमधून



आढळतात. परंतु मामा–भाच्याची एकाच विषयातली, एकाच चेहऱ्या-मोहऱ्याची साहित्यसेवा फारशी आढळत नाहीं. कोल्हटकर—गडकरी—अत्रे याच्याहून वेगळ्या धर्तीचे लेख लिहून प्रा. जोशी व कॅ. लिमये यानीं महाराष्ट्रात हास्याची लागवड केली. विशेष हें कीं, कॅ. लिमये याचा जीवनातील व्यवसाय साहित्य–सेवेला फारसा पोषक नव्हता; किंबहुना हास्याच्या अगदीं उलट अशा रौद्र–करुण–बीभत्सादि रसाचें तांडवनृत्य पहातच त्याना काहीं काळ काढावा लागला. ‘ हेलकावे ’ या पुस्तकांतील त्याच्या चारहि कथा केवळ कारुण्यपूर्णच आहेत. त्यात मनोविश्लेषणाची कला चागली साधली आहे. पण त्याचे मुख्य ललित लेखन आहे विनोदी.

## शस्त्रधारी साहित्यिक

लेखणी हें एक शस्त्र आहे असे आपण म्हणतों, पण तें लक्षणेनें. जातिवंत लेखक साहित्य लिहितो, तें शाईनें नव्हे तर आपल्या रक्तानें, असें जें

म्हणतात, तें अलंकारिक अर्थानेंच खरें असतें. लाल लाल व कढत कढत रक्त वीररस उचंबळविणाऱ्या वाग्भटानेंहि किती वेळा पाहिलेलें असेल ? पाहिलें असेल तर बहुधा त्याला घेरीच आली असेल ! पण कॅ. लिमये यानीं दुहेरी नात्यानें खरेखुरें शस्त्र वापरलें आहे. डॉक्टर म्हणून तर त्यानीं रोग्यावर शस्त्रक्रिया अनेकवार केलीच, पण पहिल्या महायुद्धात आफ्रिकेतील प्रत्यक्ष रणांगणावर जाऊनहि त्यांनीं आधुनिक शस्त्र-देवतेचें दर्शन घेतलें. क्रिकेटची बॅट व फिडलचा गज हे ते जितक्या सफाईनें चालवितात, तितक्याच कुशलतेनें डॉक्टरचा चाकू व सैनिकाचे पिस्तुलहि वापरूं शकतात—आणि ही चतुरग 'शस्त्र-क्रिया' करता करताच आपली विनोदी लेखणीहि ते चालवूं शकतात. त्यांच्या डोक्यावरून बदुकीच्या गोळ्या सूं सूं करीत चालल्या असतानाहि, त्याच्या डोक्यात हास्यरसाचें कारजें उडत असे. समोर मृत्यु उभा असतांनाहि ते स्मितमुखानें सरस्वतीची पूजा बांधीत होते. क्रीडांगण कलांगण व रणागण—या तिन्ही क्षेत्रांत त्यांनीं प्रशंसनीय यश सपादिलें आहे.

## विविध कलांचा नाद

श्री. गोपाळ गंगाधर लिमये याचा जन्म ता. २ सप्टेंबर १८९१ रोजीं पुणें येथें झाला. त्याचे वडील बेळगांव येथें सबजज्ज होते. त्यामुळें त्याचें प्राथमिक शिक्षण तेथेंच झाले. पुढे वाडिलांची बदली पुण्यास झाल्यामुळें गोपाळरावाचें दुय्यम व उच्च शिक्षण पुणें येथें झालें. वयाच्या सोळावे वर्षी ते मॅट्रिकमध्यें उत्तीर्ण झाले. शाळेंत असताना आपले भाचे श्री. चिंतामणराव जोशी यांच्या सहकार्यानें त्यानीं 'तलवार' नांवाचें हस्तलिखित साप्ताहिक चालविलें. वाङ्मयाचें वाचन, चिंतन व चर्चा करून लेखनापर्यंत हे मामा-भाचे हातांत हात घालून मजल मारीत. दोघांनाहि विनोदाची हौस. गोपाळरावांचा हात साहित्याप्रमाणें चित्रकलेंत व तंतुवाद्यावरहि चालत असे. त्यांचा स्वभाव उमदा व आनंदी. कॉलेज-मध्यें 'त्राटिका' नाटकांत त्यांनीं काम केले होतें. मेडिकल कॉलेजांतील अभ्यासक्रम पूर्ण करून ते एम्. बी. बी. एस् झाले. पहिल्या महायुद्धाचे

वेळीं १९१७ सालीं त्याना कमिशन मिळालें व पूर्व आफ्रिकेंत त्याची नेमणूक झाली. त्या ' लष्करी डॉक्टरी 'च्या नोकरीचा राजीनामा त्यानीं १९२१ सालीं दिला. नंतर त्यांनीं पुणें येथें स्वतंत्र दवाखाना काढला. पण पुढें मुंबई कार्पोरेशनची नोकरी मिळाल्यामुळें ते तिकडे गेले. साहजिकच त्याच्या काहीं लेखात मुंबईतील घटनावर विनोद उभारलेला आहे, तर काहींमध्ये डॉक्टरी व्यवसायातील गमतींतून हास्य-रस पाझरत आहे. लष्करी वातावरणाचेंहि भांडवल त्यानीं विनोदाचा व्यापार करण्यासाठीं वापरलें आहे. त्याच्या विनोदाची भाषा साधी असून प्रसंगात विविधता आहे. विरोधाभास व अतिशयोक्ति या स्फोटक द्रव्यानींच त्यानीं आपले हास्याचे बॉम्बगोळे मुख्यतः भरलेले आहेत.

## विरोधी वाक्यांची गुंफण

विरोधी वाक्याची वीण गुंफण्यात लिमये याची लेखणी चतुर आहे. सर्वांना सहज कळेल असे विरोधाभासाचे नमुने त्यांच्या लेखनात सर्वत्र विखुरलेले आहेत. त्यामुळें साधाच विचार पण गंमतीने मांडल्याचें पाहून वाचकाचें मन उल्हसित होते. सोपी भाषा, हरघडीचे प्रसग व आटोपशीर मांडणी या बाह्यागाचे पोटीं विरोधाभास व अतिशयोक्ति हे दोन बहुमोल अलंकार लिमये जपून ठेवतात. 'आमची (आळदीची) सायकलाट्रिप' व 'छकडा, सिंहगड आणि कुत्रे ' हीं दोन प्रवास-वर्णनें तर वाचकाला हसून हसून हैराण करणारीं आहेत. निर्भेळ विनोदाचे निर्मळ नमुने ते आहेत. आपल्या नातलगाच्या अस्थि टाकण्यासाठीं बाबूराव आळदीस सायकलीवरून गेले. तेव्हा त्याना ज्या अडचणी आल्या व त्यामुळें त्यांची जी धांदल उडाली, ती आपल्या डोळ्यापुढें उभी रहात असतांना कोणाहि वाचकाच्या मुरकुंड्या वळल्याशिवाय रहाणार नाहींत. गुड्याभाऊच्या सायकलीचा अगडबंब थाट चिंतामणराव जोशी यानीं दाखविला आहेच. आतां लिमये बाबूरावाच्या सायकलीचें वर्णन करतात तें असें:—" त्या सायकलला फक्त टायरट्यूज नव्या घालून नवी फ्रेम टाकली असती तर सायकल कोरी करकरीत नाहीं असें म्हणण्याची कोणाची छाती नव्हती.

रिम्स इतक्यांतच बदलावयास नको होत्या व ॲक्सल नुकतेंच नवें बसविलें होतें. ” अशा सायकलीवरून मार्गेपुढें पुढेंमागें करीत, आस्ते आस्ते प्रवास करून जात असतांना, वाटेंत अपघात किती तरी झाले त्यांचा परिणाम काय झाला हे सांगताना लिमये अशी अतिशयोक्ति ठोकून देतात कीं, “ बाब्याची सायकल अशी मजबूत होती कीं एकदा तीच एका मोटार लॉरीवरून गेल्यामुळें लॉरीचे तुकडे तुकडे झाले होते ! ” मोटार लॉरीलाहि तोंड देणारी सायकल बैलगाडीपुढें मात्र दीन झाली. ‘पुलावरून जात असता समोरून येणाऱ्या एका खटाऱ्याचे बैल उधळले. पुलाचा कठडा व खटारगाडी याच्या सापटींत बाबूरावाची सायकल सापडली व अस्थींचें गाठोडें कठड्याला अडकले ! कठड्याच्या फटींतून सायकलसकट बाबूराव पुलाखालीं पडणार अशी स्थिति आली !’ ही स्थिति जो वाचक आपल्या डोळ्यापुढें उभी करील, त्याला हसूं लोटल्याशिवाय कसें राहील ? शेवटीं लेखकाला प्रश्न एवढाच पडला कीं, “ बाबूरावानीं नातलगाच्या अस्थि इंद्रायणीत टाकल्या कीं नातलगाच्या अस्थींनीं बाबूरावाच्या अस्थींना जलसमाधि दिली ? ”

“ हें वर्णन वाचून एकाच्या मनात जरी सायकल–ट्रिपचा बेत फिसकटविण्याची स्फूर्ति झाली, तरी लेखकाला या लेखाचें श्रेय आल्यासारखें वाटेल. ” असा विडंबनपर समारोप लेखकानें केलेला आहे.

## हास्यकारक प्रसंग

आळंदीची सहल सरळ; तरी तिला छपन्न अडचणी आल्या; मग सिंहगडची सफर किती बिकट ! तिला सत्राशें साठ विघ्नें यावयास नकोत काय ? रात्रीं नऊ वाजता पुण्याहून बैलगाडीनें सिंहगडला जाण्याचा व्यूह लेखक, जोशीबुवा वगैरेंनीं ठरविला. वक्तशीरपणा त्यांनीं इतका राखला कीं, बरोबर पहांटे साडेचार वाजतां गाडीचीं चाकें फिरूं लागलीं ! याचें कारण काय ? तर गाडीवाल्यांनीं आपल्या मनाशीं तीच वेळ ठरवून ठेवली होती आणि म्हणून रात्रभर त्यांनीं ताणून दिली होती ! त्यांना उठवून वेळेवर गाडी जोडण्यास लावावें, म्हणून लेखक व जोशीबुवा

त्यांच्या वस्तीकडे गेले. पण जातांना वाटेंत एक कुत्रें आढळलें. त्यामुळें जोशीबुवा भेदरले. कारण " श्वापदांमध्यें रात्रींच्या रस्त्यावरील निजलेल्या कुत्र्याला ते फारच भीत असत. याचें कारण असें कीं, त्यांची आत्या कुत्रा चावून मेली होती. तेंव्हापासून चित्रांतील कुत्र्याकडेही ते साशंक दृष्टीने पाहात व घरांतील मुलांना खेळातील कुत्रा विकत घेण्याचीही मनाई होती. एकदा मुलाच्या मामानें मुलाना एक खेळातील कुत्रा बक्षीस दिला होता. पण जोशीबुवांनीं त्याची शेपटी सरळ करून त्याचें माजर बनविलें होतें. "

सुदैवानें तें कुत्रें मेलेलें आहे असें त्याना आढळलें. " कुत्रे मेलेलें पाहून जोशीबुवाच्या जिवांत जीव आला. त्याची आत्या जिवंत कुत्रा चावल्यामुळें मेली होती. पण त्या आतेचा भाचा आज मेलेलें कुत्रें न चावल्यामुळें मरण्याच्या बेतात आला होता. " असा विरोधाभास लेखकानें सहज साधला आहे.

ते दोघेजण कसेबसे गाडीवाल्यापाशीं जाऊन पोंचले. पण ते डाराढूर झोपलेले ! तें वर्णनहि विरोधाभासाच्या मौजेनें करताना लेखक म्हणतात, " त्या जिवत गाडीवाल्यापेक्षां ती निर्जीव गाडीच अधिक हालचाल करीत होती; कारण वाऱ्यानें तिचा फाटका तट्टया तरी फाडफाड उडत होता. " शेवटीं एकदाच्या गाड्या घरापाशीं आल्या. पण जसे गाडीवान, तशाच घरच्या बायका—अगदीं झोपाळू. या दुहेरी झोपाळूपणामुळें कर्त्या पुरुषांची धांदल कशी उडाली पहा—" बायकाना जाग्या करून व मुलाना कसेबसे उठवून आम्ही सामान गाडींत ठेवण्याकरिता बाहेर घेऊन आलों. पाहातों तों गाडीवाले पुन्हा निद्रिस्त ! त्यांना उठवून आंत गेलों तो पुन्हा बायका निजलेल्या ! याप्रमाणें आलटून-पालटून बायकांना व गाडीवाल्याना उठविण्यातच किती तरी वेळ निघूं लागला. "

अशा बायकांना घेऊन सिंहगड चढणें किती जोखमीचें, हें सागतांना लेखकानें पुनः असा विरोधाभास निर्माण केला आहे कीं, " घोरपडीच्या साहाय्यानें तानाजी वर चढला, तर या घोरपडी आमच्या साहाय्यानें वर चढूं लागल्या. शिवाजीच्या वेळच्या घोरपडींत व आताच्या घोरपडींत

एक मात्र साम्य होतें. घोरपड खेंचली की ती जमिनीला घट्ट बिलगून धरते, तशा आमच्या घोरपडीही आम्ही घाई करूं लागलों कीं—मुळीं जागच्या हलेनाशा होत !”

ठरीव ठशाचीं प्रवास-वर्णने पुरविणारें ‘साहित्य—निर्माण—मंडळ-’ लेखकानें एका लेखांत वर्णिले आहे. त्यांच्या ‘काव्य मॅन्युफॅक्चरिंग कंपनी’ इतकेंच तें मनोरंजक आहे.

## अनिष्ट रूढींवर टीका

‘जुना बाजार’ हा आपला विनोदी लेख—संग्रह लिमये यांनीं कोल्हटकरांचे पाडुतात्या व गडकऱ्यांची ठकी याना विभागून अर्पण केला आहे. ही जी विनोद—बुद्धि अर्पण—पत्रिकेंत, तीच पोकळडोके व चोंबडे यांच्या प्रस्तावना—पुरस्कारात! त्यांतील आरभींचाच लेख ‘पत जेवावयास जातात’ हा इतका प्रसगनिष्ठ विनोदाने थबथबलेला आहे कीं,तो वाचताना न.चिं.केळकर याच्या ‘माझी गाडी कशी चुकली?’ या सुप्रसिद्ध गोष्टीचीच स्मृति व्हावी. लग्न—समारंभाचे वेळीं जेवणास किती बेसुमार उशीर होतो व त्यामुळें पाहुण्याचे प्राण कंठाशीं कसे येतात पण त्याची खंत यजमानास कशी वाटत नाहीं, या सर्वांचें सुंदर चित्र लिमये यानीं रेखाटलें आहे. जेवणाचें निमंत्रण होतें अकरा वाजताचें, पग दोन वाजेपर्यंत जेवणाचा पत्ता नाहीं ! यजमान मात्र सावकाश घरीं येऊन नापिताकडून ‘कारागेरी’ करवून घेतात व त्यांचीं मुलेंबाळें पिठलेंभात खाऊन आंचवावयासाठीं पंतापुढे येतात. पंतांना मात्र फक्त झोपेचीच मेजवानी मिळते.

## मनोहर विरोधाभास

अशाच विरोधाभासाची मौज ‘कवि आणि चोर’ यांच्यांतील साम्य वर्णितांना लेखकानें केली आहे. तो म्हणतो, “चोर रात्रीं काम करतात तर कवीही ‘रात्रीं १२ वाजून १३ मिनिटांनीं’ काव्य लिहीत बसतात. चोर दिवे मालवून अंधार करतात तर कवीही पांढऱ्यावर काळे करतात. चोर श्रीमंत असला तरी गरिबीचीं सोंगें आणतो. कवि श्रीमंत असला तरी फाटकेंतुटकें नेसतो. (कवि गबाळ्या दिसला नाहीं, तर त्याचा

काव्यासक्तीचा व सौंदर्योपासकत्वाचा वेडेपणा कसा जगजाहीर होणार ?) चोर लोकांच्या सह्या करतात तर कविही नेहमीं एखाद्या प्रेमवेड्याची किंवा विधवेची भूमिका घेतात. चोर व कवि दोघेही अलंकार चोरतात. चोर कित्येकदा व कवि नेहमींच वेडाचें पांघरूण घेतात. चोर कोणाच्याही घरांत शिरूं शकतो. कवि वाटेल त्या युवतीच्या अंतःकरणावर दरोडा घालूं पाहातो. 'अर्थांतर–न्यासा' बद्दल दोघांची प्रसिद्धी मह्शूरच आहे. दोघेही बहुतकरून 'छांदिष्ट' असतात. 'पदनिक्षेपा'त दोघांनाही सफाई लढवावी लागते. कवि आणि चोर याच्यात अगदींच फरक नाहीं असें नाहीं. एक दिंडी बनवितो. तर दुसरा ती फोडतो." अलंकार, अर्थ, छंद, पद, दिंडी या शब्दांवरील श्लेष किती मौजेचे आहेत !

## कोटिबाज संवाद

विरोधाभासाची मय–सभा निर्माण करण्यास बुद्धि–चातुर्य अंगीं असावें लागतें. तें लिमये याच्या ठायीं भरपूर आहे. याचें आणखी एक प्रमाण म्हणजे त्याच्या संवादातील कोटिबाजपणा. दोन हुशार वकिला-प्रमाणें, त्याच्या हास्य–कथातील कांहीं कांहीं पात्रें मार्मिक व चतुर संवाद करीत असतात. 'न्यायाधिशाचें चातुर्य' या कथेतील विनायक नुकताच बी. ए. झालेला असतो. त्याचे गळयात आपली गगू गुंतविण्याची अन्नपूर्णाबाईची खटपट असते. एकदा आपल्या सुनेनें घरातील बासुंदी चोरून खाल्ली असा आळ त्यानीं घेतला. त्यावेळीं अन्नपूर्णाबाई व विनायक याच्यामध्यें झालेला संवाद कुशाग्र बुद्धीचा आहे.

विनायकानें खरा चोर शोधून काढण्यासाठीं एक हिकमत केली. त्यानें कासडीभर बासुंदी आणली–आणि आग्रह करकरून ती सर्वांना पाजली. गंगूनें चमचाभर बासुंदी घेतली न घेतली तोंच तिला ओकारी आली–आणि चोरून प्यालेली तीन वाट्या बासुंदी तिच्या पोटांतून बाहेर पडली ! 'कांट्यानें काटा व बासुंदीनें बासुंदी' काढण्याची विनायकाची युक्ति सफळ झाली. लघुकथेला शोभण्याइतकी प्रमाणबद्ध रचना या गोष्टीची साधलेली आहे.

## विनोदावगुंठित टीका

लेखकाचे बुद्धि–कौशल्य त्यानें व्यक्त केलेल्या विचारावरूनहि दिसून येतें. आपल्या विनोदी लेखांतहि, कोणाला न खुपेल अशा बेतानें, मधून-मधून लिमये यांनीं मार्मिक टीका केली आहे. 'पुण्यावर हल्ला' या लेखांत, प्लेगची स्वारी येणार हें कळतांच वकील, डॉक्टर, भटजी वगैरे लोकांनीं बचावाची कडेकोट तयारी कशी केली याचें विनोदी वर्णन केलेलें आहे तें करतां करताच, दोनचार वाक्यांतच लेखकानें स्त्रीवर्गाच्या पारतंत्र्यावर सूक्ष्मशी पण अणकुचीदार टीका केली आहे. स्त्री–जीवनाची सारी कहाणी या चारदोन वाक्यात साठविलेली आहे. तीं वाक्यें अशीं–
"स्वतः ढमळाकाकूंना या हल्ल्याचें काहींच वाटलें नाहीं. लहानपणीं सासूचे, जाणतेपणीं विधवा नणंदेचे व मोठेपणीं शेजारणी–पाजारणींचे किती तरी हल्ले त्यानीं परतविले होते ! मुंग्या, मुंगळे यानीं त्याच्या स्वयं-पाकघराला कितीदा तरी गराडा घातला होता. शिवाय, 'आपल्याला काय ?' त्या म्हणाल्या 'कोणाच्या तरी गुलामगिरींतच राहायच ! हा राजा आला काय आणि त्याचा बाप दुसरा कोणी आला काय, बायकांच्या पाठचें बाळंतपण चुकत नाहीं किंवा हातचा स्वयंपाक टळत नाहीं."

कोर्टांतील पक्षकाराचा नाहक भांडकुदळपणा, वकिलाचें अस्थानीं बुद्धि-चापल्य आणि कंटाळलेल्या सरकारी अधिकाऱ्यांचा गाफिलपणा या सर्वांचें छानदार विडंबन 'पाण्याच्या बादलीचा विलक्षण खटला' या लेखांत लिमये यानीं केलें आहे. "कोर्टांत गडबड झाली. मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं मिटलेले डोळे किलकिले केले व एकदम वटारले. खंडेरावांना डोळा घालून खालीं बसविलें. पट्टेवाले पट्ट सावरीत जागेपणाचीं लक्षणे दाखवूं लागले." असें म्हणून मॅजिस्ट्रेट व पट्टेवाला या दोघाचीहि सुस्ती आपल्या विनोदी चिमट्यानें पकडून लेखकानें जगासमोर कौशल्यानें मांडली आहे. 'पाण्याची बादली' यांत महत्त्व कोणाला ? याचें वकिलसाहेबांनीं केलेलें विवेचन कोणाला हंसूं आणणार नाहीं ? 'वाजाची पेटी' किंवा 'नथेची डबी' यामध्यें मुख्य वस्तु पेटी किंवा डबी नाहीं, तर त्यांतील

बाजा किंवा नथ यांनाच खरें मोल आहे; त्याचप्रमाणें 'पाण्याची बादली' यांत महत्त्वाची वस्तु पाणी आहे, बादली नव्हे असा युक्तिवाद वकिलानीं केला. त्यावेळीं मुंबईत तीन दिवस पाण्याची हाकाहाक झालेली असल्यानें बादलीभर पाणी चोरणें म्हणजे आठ माणसांचा खून करणेंच होय, असा हिशेब करून मॅजिस्ट्रेटसाहेबानीं खटला 'सेशन कमिट' केला. कर्जेदलालीच्या विविध अंगांवर लेखकानें या लेखांत स्वच्छ प्रकाश पाडला आहे.

## अतिशयोक्तिचा कळस

अतिशयोक्ति हा विनोदाच्या खेळांतील सुलभ व हुकमी पत्ता. 'पुण्यावर हल्ला' येणार ही मोघम बातमी ऐकताच खंडेरावाची अवस्था काय झाली हें लिमये पुढील अतिशयोक्तिपर शब्दांनीं सागतात, "ऑफिसांत कांहीं हिशेबी काम करीत असता खंडेरावानीं आपल्या अंगठ्याइतक्याच लांब पेन्सिलींचें टोंक जिभेवर ठेविलें होतें, तोंच ही बातमी त्याच्या कानावर येऊन आदळली; व त्या झटक्यासरशीं ती संबंध पेन्सिल गटदिशीं त्यांच्या घशाखालीं उतरली. आज त्याच्या कामाच्या तपासणीला साहेब येणार असल्यामुळें त्याना दुःखात सुख इतकेंच वाटलें कीं, या लढाईच्या गडबडींत साहेब कसला येतो ? साहेबाऐवजीं फक्त शत्रूचा हल्ला येणार अशा आनंदाच्या एका उमाळ्यासरशीं त्याची पोन्सिल बुकदिशीं पुन्हां बाहेर पडली."

लिमये यानीं आपल्या अतिशयोक्त लेखनाची अतिशयोक्ति 'मुंबईतील उद्योगधंदे' या लेखांत केली आहे. तेथील ट्रॅमची दिरंगाई वार्णिताना ते म्हणतात, "एका मारवाड्यानें पाहिलें कीं, ट्रॅम येईपर्यंत भाड्याची आणेली खिशात लोळत पडण्यापेक्षा व्याजबट्टयात गुंतविलेली बरी ! डोहाळ जेवणाला निघालेली एक बाई चक्क बारसेच जेवून आली ! एका बाईच्या खुपऱ्या ट्रॅमकारितां थाबता थांबताच आपोआप बऱ्या झाल्यामुळें डॉक्टरचा सल्ला घेण्याची तिला जरूर पडली नाहीं. आणखी एक बाई आपली चार वर्षाची लेक व दीड आणा घेऊन अशीच ट्रॅमची वाट पाहात उभी होती. एकदाची आली ट्रॅम; पण पाहाते तों कंडक्टर त्या

मुलीला अर्ध्या आण्याच्या तिकिटावर सोडीना. कारण ट्रॅमची वाट पाहातां पाहातां ती चार वर्षांची लहानगी मुलगी एव्हाना चांगली वयांत आलेली दिसत होती."

## माफक अलंकार

शाब्दिक चमत्कार करून खसखस पिकाविण्याकडे लिमये फारसें लक्ष देत नाहींत. "बैलाऐवजीं आम्हासच पाणी पाजणार काय?" "तोंडाला पाणी सुटलें," "स्वसंरक्षणाची तयारी 'जोरांत' चालली," 'खालीं पहावयास लावलें' अशा श्लेषाची मौज तुरळकपणें आढळते. "पैज हजार मोहराची नव्हे, मोहऱ्याची" अशा शब्द-लीलाहि कोठेंकोठे दिसून येतात. डॉ. रोगभरे M. D. (म्हणजे महादेव दामोदर) अशा कोट्याहि क्वचित् आहेत. चीनमधील राजा च्याव-म्याव, सेनापति शिकेकाई, कवि काऊ चिऊ, शुकशुक बाग इत्यादि साधीं नावेंहि हास्य-तरंग उमटविणारीं आहेत.

असे शब्दांचे खेळ जसे लिमये याच्या लेखनात थोडे, तसेच उपमा-दृष्टांतादि साम्यदर्शक अलंकारहि अल्पच. 'पंत नवा बूट घेतात' या लेखात बूट व पाय याच्यामधील पायमोजा कसा फाटला हें ते पुढील उपमेनें सांगतात, "नवरा-बायकोच्या भांडणात मुलाला मार बसावा, त्याप्रमाणे पायमोजाची बिचाऱ्याची मधल्यामध्यें ओढाताण झाली होती!"

'डॉ. लिमये याचा जगप्रसिद्ध उपाय' म्हणजे वेळ जाण्यासाठीं विनोदी वाङ्मय वाचणे. त्या लेखात लिमये अशा उपमा देतात,—"नावाच्या सार्थकतेकरिता लेखाक वाढविणें, म्हणजे शंकर नावाच्या मनुष्यानें मुद्दाम जटा वाढविण्यासारखे आहे व लेखाची संख्या कमी करणें म्हणजे छापून आलेली पण खोटी निधनवार्ता खरी करण्याकरतां आत्महत्या करण्यासारखें आहे."

'नंबर' या एका शब्दावर लिमये यांनीं 'महाबळेश्वर-दर्शन' या लेखांत किती कोट्या केल्या आहेत पहा. "इकडल्या पोलीसांना जी गाडी जाईल तिचा नंबर टिपून घेण्याचें भयंकर वेड दिसलें. प्रथमच पुढील कोपऱ्या-

वरील पोलीस जो जाईल त्याचे नंबर टिपून घेण्यांत चूर झालेला लांबून दिसला. या नंबर घेण्याच्या नादात तो इतका गढलेला दिसला कीं, त्याच्या अंगाला खेटून एखादा मारेकरी जरी गेला तरी त्याच्या लक्षांत आला नसता व नाग दिसला असता तर त्याच्या फणीवरील १० नंबर उतरून घेण्यापलीकडे त्याने काहींच केलें नसतें ! आमच्या मनांत मात्र धास्ती उत्पन्न झाली. हा आमचेही नांव-नंबर टिपून घेणार कीं काय ? आणि आम्हांस भिण्यास सबळ कारण होतें. कारण, पांडूतात्याच्या आरशीला नंबर नव्हता ! ”

## छांदिष्टपणाचें विडंबन

गर्विष्ठपणा, विसरभोळेपणा, अजागळपणा, एकांतिकपणा इत्यादि मानवी स्वभावात लपून बसलेले दोष लिमये यानीं विनोदाच्या ‘ क्ष-किरणा ’नीं पाहून ते वाचकापुढें माडलेले आहेत. छादिष्टपणा हाहि विनोदाचा असाच एक विषय आहे. एक काळ असा होता कीं, महाराष्ट्रातील रसिकाना बालगधर्वांचें विलक्षण वेड होतें. डोक्यावर गंधर्व कॅप, तोंडात गंधर्वांचीं गाणीं, डोळ्यापुढे गधर्वांचे लाडिक हावभाव—असें ‘ गंधर्वमय ’ जीवन जगणारे तरुण त्यावेळीं थोडथोडके नव्हतें. त्याचें विडंबन करण्यासाठीं लिमये यानीं चंपूताई निवडली व तिचें ‘ बालगंधर्वांचें वेड ’ हास्यरसाने भिजवून काढलें. गंधर्वांचीं पदे चंपूताई घोळीत, पण “ बालगंधर्वांच्या घोळण्यात व चंपूताईच्या घोळण्यात फरक इतकाच होता कीं, पहिल्याचें घोळणे कॅलिऑडोस्कोपसारखें वाटतें व चंपूताईच्या घोळण्यात एकाच स्टॅपानें उठविलेल्या हजार ठशाची विविधता भासते. ”

केवळ गंधर्वांचीं पदें गाणें एवढ्यापुरतेंच चंपूताईचें वेड मर्यादित नव्हतें. त्याचें सारे जीवनच गंधर्वस्वरूप झालें होतें. घरांत सर्वत्र फोटो गंधर्वांचेच. “ चंपूताईच्या तोंडीं सारा दिवस बालगंधर्व बसले होते. पहिले फोटो निघून त्या ठिकाणीं बालगंधर्वांचे फोटो आले, शेवटीं खंडेरावांच्या आईबापावर गदा आली. लवकरच त्यांचे भाऊही बळी पडले. अखेर

खुद्द (लग्नांतील फोटोरूपी) पति-पत्नींचेंहि त्यांच्याच राहत्या घरांतून बालगंधर्वांनीं उच्चाटन केलें! " चंपूताईच्या दृष्टीनें बालगंधर्व हें नांवच किती अर्थपूर्ण होतें ! " बा-ल-गं-ध-र्व या अक्षरातच किती गुण साठले आहेत व दोषांना गच्चाडी मिळाली आहे, पहा. बालगंधर्वांत रम्य तें ' बाल', पण आहे, त्यांत ' बाग ' आहे, ' धवल ' ता आहे. ' बा. गं. ' हीं आद्याक्षरें असलेल्या एका थोर पुरुषाचें नामसादृश्य आहे, पण ' गर्वा ' चा गंधही त्यांच्या ठिकाणीं नाहीं. " चंपूताई गंधर्वांशीं बोलल्याहि होत्या - केव्हां ? तर नाटकात ' वन्स मोअर ' म्हणून !

रेडिओ किंवा टेलिफोन घेतल्यावर शेजाऱ्याचा उपद्रव किती होतो आणि शहरात गडी मिळण्याची मारामार कशी पडते हें त्यानीं कांहीं विनोद—कथांत मार्मिकपणें दाखविलें आहे. कॅ. लिमये याच्या विनोदी लेखनाचे जे गुण ' पुरस्कार—पंडित प्राचार्य आनंदी आनंद ' यानीं मांडले आहेत, ते यथार्थच आहेत. लेखाची लघुता, विषयाची विविधता व वर्णनाची स्वाभाविकता हे त्यांचे ठळक गुण होत. ' चोरीचा नग किंवा खुर्दा चुकूनहि सांपडायचा नाहीं ' ही त्याची प्रतिज्ञा साधार आहे.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) लेखणी हें एक शस्त्र आहे असें का म्हणतात? उत्तर कारणासह लिहा.

( २ ) कॅ. लिमये याचा जीवनाचा व्यवसाय साहित्याला पोषक नव्हता हें खरे का ? कोणते उद्योग साहित्याला पोषक असतात ? कॅ. लिमये याच्या व्यवसायाचे प्रतिबिंब त्याच्या लेखनात पडलेलें दिसतें का ?

( ३ ) " विरोध व अतिशयोक्ति याच दोन द्रव्यांनीं मुख्यत. त्यांनीं आपले हास्याचे बॉबगोळे भरले आहेत." स्पष्ट करा.

( ४ ) कोल्हटकर—गडकरी याचें विनोदी लिखाण व जोशी—लिमये याचें विनोदी लिखाण यात तुम्हांस कोणते फरक दिसतात ?

( ५ ) ' मराठी वाङ्मयातील विनोद ' या विषयावर लहानसा निबंध लिहा.

## या पुस्तकांतील
## लेखकांचीं कांहीं वाचनीय पुस्तकें

**श्री. कृ. कोल्हटकर**

१. सुदाम्याचे पोहे

**रा. ग. गडकरी**

१. संपूर्ण बाळकराम

**आचार्य अत्रे**

१. हशा आणि टाळ्या
२. साखरपुडा
३. झेंडूचीं फुलें

**प्रा. चि. वि. जोशी**

१. एरंडाचे गुऱ्हाळ
२. चिमणरावांचे चऱ्हाट
३. आणखी चिमणराव
४. तिसऱ्यांदा चिमणराव
५. वायफळांचा फळा
६. गुदगुल्या

**कॅ. गो. गं. लिमये**

१. जुना बाजार
२. विनोद—सागर

★

# शिखरे-वाङ्मय

## चरित्रें

म. गांधींचें चरित्र
गांधी-जीवन-कथा
राष्ट्र-पिता गांधीजी
गांधी-रण-गीता
राष्ट्र-जनक टिळक
लोकमान्य टिळक
सुधारकाचार्य आगरकर
डॉ. राधाकृष्णन

## प्रबंध

गांधीजींचें रामराज्य
साम्राज्य व स्वराज्य
सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म
आजकालचे साहित्यिक

## कादंबरी

थोरली आई
आईची कृपा
भावनांचा नाच
जिवलग

## नाटकें

वैष्णवजन
आठ साल

## लघुकथा

क्रांति-किरण
गंगेचे थेंब

आधुनिक कवि–भा. १ ला

# अ नु क्र म

# केशवसुत : : : : १

'युग-प्रवर्तक' ही उच्च पदवी मराठीच्या नव-काव्य-सृष्टींत 'केशवसुता'स यथार्थपणें लावली जाते. मराठीचे 'आद्य कवि' म्हणून ज्ञानदेवांना प्रतिष्ठा लाभलेली आहे, 'आद्य निबंधकार' असा मान मालाकार चिपळूणकराना प्राप्त झालेला आहे, 'आद्य कादंबरीकार' असा गौरव हरिभाऊ आपटे यांचा झाला आहे, 'आद्य विनोदकार' हे स्थान श्री. कृ. कोल्हटकर यांनीं मिळविलें आहे, 'आद्य इतिहास-संशोधक' हें पद राजवाडे याना अर्पण करण्यात येते, 'आद्य कोशकार' हा किताबत डॉ. केतकराना चिकटलेली आहे, 'आद्य नाटककार' या नात्याने आण्णासाहेब किर्लोस्करांनीं कामगिरी बजावली आहे; 'आद्य लघुनिबंधकार' म्हणून प्रा. फडके यांनीं कीर्ति कमावली आहे, त्याचप्रमाणें 'आद्य-नवकवि' ही थोरवी केशवसुताना लाभलेली आहे. आपल्या काव्याचें स्वतंत्र लेणेंच त्यांनीं कोरलें आहे. भाषा, विषय, विचार–या सर्व बाबतींत अगदीं अभिनव असा एक काव्यप्रवाह सुरू करण्याचें श्रेय त्याना आहे. गडकऱ्यासारखे कैक कवि आपण केशवसुतांचे "सच्चे चेले" आहोंत, म्हणून अभिमानाने सांगतात.

## सहा काव्य-खंड

सुमारे सहाशें वर्षांच्या काळात मराठी काव्य–सृष्टीमध्यें स्थूल मानानें सहा युगें निर्माण झालीं, म्हटलें तरी चालेल. ज्ञानदेवादि संत–कवींनीं

---

[ केशवसुतांनीं आपलें छायाचित्र कधींच काढूं दिले नाहीं; म्हणून तें येथें देतां आलें नाहीं. ]

संस्कृतविरुद्ध बंडाचा झेंडा फडकवून मराठी काव्याचें स्वराज्य स्थापन केलें. संत–काव्याचे विषय पारमार्थिक, भाषालंकारादि बाह्यागाकडे काहींसें दुर्लक्ष पण भावनेची तळमळ तीव्र, त्यामुळे जिवंत झऱ्याचा खळखळाट त्या काव्यात ऐकू येतो. ज्ञानेश्वर व तुकाराम याच्या अमृतमधुर काव्याला तर जगाच्या वाङ्मयातहि तोड क्वचित्च सापडेल. दुसरा काल-खंड पंडित-कवींचा. वामन, मोरोपत, रघुनाथ वगैरे पढिक विद्वानानीं पौराणिक आख्यानें सुसस्कृत मराठीमध्यें रंगवून महाराष्ट्र–शारदेला बहुमोल अलंकारानीं नटविलें. त्यानतर आले शाहीर. प्रभाकर- होनाजी–परशराम वगैरे स्वराज्यातील या कवींनीं आपल्या काव्यात एकीकडे वीरश्रीचे रणशिग फुंकलें, तर लावण्यामध्ये अस्सल मराठी शृंगाराचे वारे खेळविले, इग्रजी अमलामध्ये आग्ल व सस्कृत काव्याचे पडसाद मराठीमध्ये उठविण्याचे कार्य चौथ्या कालखंडात कृष्णशास्त्री चिपळूणकर, कुटे, लेमे, मोगरे, इत्यादि कवींनीं केले. पाचवा काव्य–विभाग उघडण्याचे श्रेय केशवसुता-कडे आहे.

निबंधद्वारे आगरकरानीं सामाजिक सुधारणेचा पुरस्कार जसा हिरीरीनें केला, तसाच केशवसुतानी आपल्या काव्याच्या ‘ तुतारीं ’ तून आवेशाने केला. गडकरी, माधव ज्यूलियन, यशवत इत्यादि नवकवींनीं तोच सामाजिक क्रातीचा सदेश आपापल्या काव्यातून दिला. त्याच वेळीं ताबे, बालकवि, टिळक, बोरकर इत्यादि सौदर्यवादी कवींच्या काव्याचा प्रवाहहि समातर वहात होता. या नवकाव्याचे विषय पारमार्थिकाऐवजीं लौकिक असून त्यात देवाऐवजीं मानवाला महत्त्व दिलेले आढळतें. मानवाचें सुखदुःख, त्याचे शृंगार पराक्रम, त्याचे न्याय-अन्याय या सर्वांवर आपल्या काव्याचे मदिर नवकवींनीं उभारले आहे. त्यानंतरचा काल-खंड नुकताच सुरू झालेला दिसत आहे. मर्ढेकर, करंदीकर, भावे, रेगे, मुक्तिबोध इत्यादि ‘ अत्याधुनिक कवीं ’ च्या कृति क्षितिजावर लुकलुकूं लागल्या आहेत. त्यांचे तेज अद्याप पूर्णपणे प्रगट व्हावयाचें आहे, त्यांचा आकार अजून निश्चित व्हावयाचा आहे व त्याची दिशा यापुढें नक्की होणार आहे.

## कीर्तिमान बंधु

केशवसुत हें टोपण नाव धारण करणाऱ्या कवीचें खरे नाव कृष्णाजी केशव दामले. ' कुणी तरी ', ' जगन्मित्र ' अशींहि टोपणनावें कृष्णाजी-पंतानीं आपल्या प्रारंभींच्या कवितांखालीं दिलीं होतीं. पण ' केशवसुत ' हेंच टोपणनाव अखेर तरले. कृष्णाजीपंताचा जन्म कोकणात झाला. रत्नागिरी जिल्ह्यातील मालगुड हें त्याचे जन्म–ग्राम. त्याचाच गौरव त्यानीं 'माल्यकूट' या नावाने आपल्या एका कवितेत केला आहे. त्या गावीं ता. १५ मार्च १८६६ रोजीं कृष्णाजीपंत जन्मले. त्याचे वडील मराठी शाळेंत शिक्षक होते. त्याना बारा मुलें झालीं. त्यात केशवसुत पाचवे. त्याचे तीन बंधु बुद्धीने चलाख व शिक्षणाने अग्रेसर असून नावालौकिकास चढले होते. वडील बंधू श्रीधरपंत यानीं मॅट्रिकच्या परीक्षेंत 'जगन्नाथ शंकरशेट' ही संस्कृतची शिष्यवृत्ति संपादन केली व ते पुढे बडोदें कॉलेजात प्राध्यापक झाले. दुसरे दोघे बंधूहि प्राध्यापकाच्या पदापर्यंत जाऊन पोचले होते, त्यापैकीं मोरोपंतानीं " शास्त्रीय मराठी व्याकरण " हा प्रचंड व महत्त्वपूर्ण ग्रंथ लिहून कीर्ति कमावली; तर सीतारामपंतानीं राजकारणात भाग घेऊन ' सी. के. दामले ' हे आपले नाव मान्यतेस चढविले. ' राष्ट्रमत ' हे दैनिक व ' राजकारण ' हे साप्ताहिक–अशी दोन वृत्तपत्रे त्यानीं चालविलीं, शिवाय काव्य, कादंबरी, विनोद, चरित्र इत्यादि क्षेत्रातहि त्यानीं भर घालून लौकिक संपादिला. पण या तिन्ही भावापेक्षा शिक्षणात मागे, लेखनात कमी व ऐश्वर्यात उणे असूनहि केशवसुतानीं सर्वांच्या आदरास पात्र व स्फूर्तीस कारण व्हावी अशी अलौकिक काव्य–संपदा निर्माण करून आपले नाव चिरंजीव केले.

## निराशेचें मूळ

केशवसुताना आपल्या आयुष्यात शिक्षणाचा, धनाचा वा मानाचाहि लाभ झाला नाहीं. त्याचा कविता–संग्रह त्यांच्या मृत्यूनंतर बारा वर्षांनीं प्रसिद्ध झाला–आणि मग त्याच्यावर स्तुतिस्तोत्रांच्या सहस्रधारा कोसळूं लागल्या. शिक्षणाची मजल पाहिली, तर मॅट्रिकच्या परीक्षेनेच त्यांची

तीन वर्षें खाल्लीं. दोनदा अपयश पदरात पडले, तरी ते तिसऱ्यादा मॅट्रिकला बसले व एकदाचे उत्तीर्ण झाले. शाळेंत त्याचे वर्तन एकलकोंडें व वृत्ति अबोल असे. त्यामुळे संस्कृतचे प्रिं. आपटे यानीं त्याना 'दुर्मुखलेला' असें म्हणून एकदा हिणविलें. त्याबरोबर त्याच्या अंगातील काव्य-शक्ति डिवचली गेली व तिने सिंह-गर्जना केली कीं, " माझ्या दुर्मुखल्या मुखामधुनी या चालावयाचा पुढें । आहे सुंदर तो सदा सरस वाङनिष्यन्द चोहींकडे. ॥"

बडोदे, वर्धा व नागपूर येथे शिक्षणाची त्रिस्थळी यात्रा त्याना घडली! नागपूर येथे रे. टिळकांची मैत्री त्यानीं जोडली. १८८४सालीं केशवसुत पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये विद्यार्थी म्हणून आले. तेथे त्याना टिळक-आगरकरासारखे गुरु लाभले. त्या शाळेतून ते वयाचे २३ वे वर्षी, १८८९ सालीं, मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्या वेळीं त्याचे धाकटे बंधु मोरोपत बी. ए च्या वर्गात होते! नंतरचीं सात वर्षे केशवसुतानीं मुबईस नोकरी करण्यात घालविलीं. आपले लहानमोठे बंधु शारदेच्या दरबारात मानाचे स्थान मिळवीत आहेत, पण आपल्याला मात्र मॅट्रिकच्या प्रवेश-द्वाराशींच टकरा द्याव्या लागत आहेत, यामुळे केशवसुताच्या चित्तांत निराशेचा जो अंधार पसरला, तो घनदाट करण्यासारखाच कटु अनुभव त्याना मुबईस आला.

## नोकरीच्या बेड्या

शिक्षणाचे पंख कापून त्यानीं नोकरीच्या बेड्या पायात अडकाविल्या. पण ती नोकरी तरी एकच रहावी कीं नाहीं? सात वर्षांत ते कधीं मिशनच्या शाळेंत शिक्षक म्हणून काम करीत होते, तर कधीं 'ज्ञानोदय' कचेरींत कारकुनी करीत, तर कधीं कमीसीरएट ऑफिसमध्यें हंगामी नोकरी पार पाडीत. मुबईची महागडी रहाणी. आणि हगामी नोकरीचा पगार पंचवीस-तीस रुपये. त्यामुळे आर्थिक ओढाताणहि या कवीला सोसावी लागली. शिक्षण नाहीं, संपत्ति नाहीं, स्थिर व्यवसाय नाहीं, मान नाहीं — अशा विपरीत परिस्थितीमुळेंच कीं काय त्यांचें मन कधीं कधीं असे खिन्न उद्गार काढी—

" जन्मा येऊनि मीं उगा शिणविलें आई ! तुला हाय गे ।
ताता ! भागविले तुला फुकट मी मत्पोषणीं हाय रे ॥

पुढें मुंबईस प्लेग झाला. त्यामुळें आमच्या कवीला खो बसला. ते खानदेशात गेले. तेथे १९०३ सालपर्यंत त्यानीं नोकरी केली. नंतर धारवाड येथील हायस्कूलात शिक्षक म्हणून ते लागले. कोठें खानदेश व कोठें कर्नाटक ! पण पोटासाठीं त्यानीं तेथे धांव घेतली. तिकडेहि प्लेगनें कहर उडविला. हुबळी येथें गेले असताना केशवसुताना प्लेगनें गाठलें; आणि ता. ७ नोव्हेंबर १९०५ रोजीं, आपले केवळ काव्य-धन मागें ठेवून, ते स्वर्गी निघून गेले. त्यांची पत्नीहि त्याच्या पश्चात् प्लेगनें आठ दिवसानींच दिवगत झाली. आपलें छायाचित्रसुद्धा केशवसुतानीं आपल्या मागें ठेवले नाहीं.

## नवा संप्रदाय

केशवसुताना अवघे ३९ वर्षांचेंच आयुर्मान लाभलें. प्रि. आगरकरा-प्रमाणेच त्यानीं सामाजिक क्रांतीचे निशाण हातीं धरले, तीव्र तळमळीने जीर्ण रूढींवर हल्ले चढविले आणि आवेशाने व आत्मविश्वासाने समाजात नवचैतन्य सचरून दिले. हें सुदैवी साम्य येथेच संपतें तर ? पण दुर्दैव असें कीं, हे दोघेहि श्रेष्ठ वाग्वीर आपल्या वयाच्या अवघ्या ३९ वे वर्षीच मृत्युमुखीं पडले. या आपल्या अल्पायुष्यात केशवसुतानीं एकदर सतरा वर्षें काव्य-लेखन केले. विद्यार्थीदशेत त्यानीं एक नाटक लिहिले होतें पण तें अप्रासिद्ध आहे. त्याची पहिली कविता 'खिडकीकडे मौज पहावयास' ही १८८५ सालीं प्रासिद्ध झाली आणि 'हरपले श्रेय' ही शेवटची कविता १९०५ सालीं, निधनापूर्वी सुमारें सहा महिने, रसिकाच्या हृदयात प्रविष्ट झाली. त्यानीं एकूण १३२ कविता लिहिल्या त्यापैकीं सुमारे वीस सस्कृत व इंग्रजी भाषातरें आहेत. उरलेल्या कवितापैकीं वीस सृष्टिवर्णनपरें असून पस्तीस कवि व काव्य यांना वाहिलेल्या आहेत. केशवसुतांच्या कविताची संख्या थोडी असली तरी त्याचे गुण नावीन्याचे व बहुमोलाचे आहेत. कांहीं प्रासगिक व वैयक्तिक कविता सोडल्यास त्यांच्या इतर कविता

महाराष्ट्र शारदेला चिरकाल भूषणभूत ठरणाऱ्या आहेत. 'सतारीचे बोल' 'तुतारी' 'झपूर्झा,', 'म्हातारी' 'हरपले श्रेय'—अशीं एकाहून एक सरस, अभिनव, आवेशपूर्ण व तत्त्वगर्भ कवनें त्याच्या लेखणींतून निघालीं.

## सुभाषितांच्या सरी

हीं केवळ पाच कवनें पाहिलीं तरी तीं पंचनद्यासारखीं भव्य व गंभीर वाटतात. महाबळेश्वराहून उगम पावणाऱ्या कृष्णा, वेण्या, सावित्री इत्यादि पाच नद्या जशा महाराष्ट्राची जमीन सुपीक बनवून त्याच्या धारण–पोषणास आधारभूत होतात, तशाच केशवसुताच्या या पाच कवितानीं आधुनिक मराठी काव्याचा प्रांत पुष्ट व समृद्ध बनविला आहे. त्याच्या तुतारीचे पडसाद गेलीं साठ वर्षे मराठी काव्य–सृष्टींत उमटत आहेत. गडकऱ्यांचा ' दसरा ' किंवा रे. टिळकाचें ' रणशिंग ' म्हणजे त्या ' तुतारीचीं 'च अपत्यें होत. रे. टिळक, गोविंदाग्रज, बालकवि टोमरे, रेंदाळकर वगैरे आधुनिक कवि केशवसुताना गुरुस्थानींच मानीत. त्यानीं ' तुतारी मंडळ ' नावाची संस्थाच त्याच्या स्मारकार्थ स्थापिली होती. हरिभाऊ आपटे, प्रा. वा. ब. पटवर्धन, किरात, विनायक वगैरे थोर थोर रसिकानीं त्याना वर्डस्वर्थ, कीटस्, शेले या आंग्ल कवींच्या उज्ज्वल मालिकेत बसविलें. ' हजारातुनी एकादा ' असाच हा युग–प्रवर्तक कवि होऊन गेला, अशीच ग्वाही अनेक कवींनीं व रसिकानीं दिली. त्यानीं निर्माण केलेला काव्य–संप्रदाय आपल्या तेजानें अधिकाधिक उज्ज्वलच होत गेला. त्यांच्या काव्याचे कांहीं चरणाना तर सुभाषिताची लोकप्रियता व महति लाभली. त्याचे कांहीं नमुने पुढे देतो.

" प्रौढत्वीं निज शैशवासि जपणें बाणा कवीचा असे । "
" साध्याही विषयात आशय कधीं मोठा किती आढळे । "
" जे रम्य तें बघुनियां मज वेड लागे । "
" आम्ही कोण म्हणूनि काय पुसतां ? आम्ही असूं लाडके– । "
" एक शब्द बोलेन जरी । सकलां कुंठित करिन तरी । "
" त्रिखंड हिंडुनि धुंडितसें । न परि हरपलें तें गवसे । "

" कंटक-शल्ये बोथटलीं । मखमालिची लव वठली ॥ "
" व्यर्थीं अधिकचि अर्थ असे । तो त्यास दिसे । ज्या म्हणति पिसे॥ "
" शारदेने जो मंत्र दिला कानीं । तसे लिहिले मी, काव्य तिचे मानीं ॥"
" द्या उत्तेजन हो कवीस न करा गाणे तयाचे मुके ॥
" गाण्यानें श्रम वाटतात हलके, हेही नसे थोडके ॥ "
" प्रीती नसे बाजारीं । प्रीती नसे शेजारीं ।
प्रीतीचा अशा असे गे सौदा । प्रीतीने प्रीति सपादा ॥ "
" वैर तयाला, जे गरिबी शिकवितात बालास ॥ "
" बडाचा तो झेंडा उभवुनि धामधूम जिकडे तिकडे ।
उडवुनि देउनि जुलमाचे या करू पहा तुकडे तुकडे ॥ "
" पृथ्वीचा सुरलोक कीं बनवुनी टाकीन मी सत्वर । "
" प्रातकाल हा विशाल भूधर । सुंदर लेणीं तयात खोदा ।
निजनामें त्यावरतीं नोदा ॥ "

## लौकिक विषय

केशवसुताच्या काव्यात सर्वसामान्य माणसाचे हृदय हलविणारे विविध विषय गुफलेले आहेत. संत-कवींनीं मराठी कवितेला वारकरीण बनविले असले तर शाहीरानीं तिला नर्तकीचे स्वरूप दिले होते, पण केशवसुता-पासूनच्या आधुनिक कवींनीं तिला खरीखुरी गृहिणी केले आहे. मुख्यत: काव्याचा महिमा, निसर्गाचे प्रेम, प्रणयाची भावना व राष्ट्रमातेची भक्ति या चार विषयानींच त्याची सारी काव्य-सृष्टि व्यापलेली; तरी एकाद्या बारीक फुलापासून व लहानशा खेड्यापासून ज्ञानाच्या कुंपणापलीकडे असलेल्या गूढ शक्तीपर्यंत व दिव्य तेजापर्यंत केशवसुताची प्रतिभा भरारी मारीत असे. त्याच्यापूर्वीं कृष्णशास्त्री चिपळूणकर, मोगरे, लेंभे इत्यादि कवि संस्कृत काव्याचे पाट मराठींत आणून सोडीत; तसेच केशवसुतानींहि रघुवंश, किरातार्जुन वगैरे संस्कृत काव्यांचे अनुवाद कांहीं कांहीं कवितात केलेले आहेत. त्याचप्रमाणें कच-देवयानी, शातनु इत्यादि आख्यानांतील रसपूर्ण प्रसंगावरहि काव्य-रचना केली आहे. अशा बऱ्याच कवितांचा वेषहि

संस्कृतमयच आहे. " विकसित-तरुमाला-केश-पंक्तींत, " ' चेतोनिबद्ध-जनचित्र ' ' तन्मस्तिष्कपिंडावरी ' ' आनंद-निधान-शैल-शिखरीं ' ' चलद्देवझषर्की, ' ' द्युत्याविष्कृति , ' ' विपत्समाकुल ' इत्यादि क्लिष्ट सामासिक शब्दाची चवडच्या चवडहि त्याच्या काव्य-पंक्तींत ठेवून दिलेली आढळते. मात्र त्याची सर्वसामान्य भाषाशैली साधी, सोपी, व आवेशपूर्ण अशीच आहे.

संस्कृतच्या या ओघाप्रमाणेच आंग्ल वाङ्मयाचाहिओघ त्यावेळीं मराठीत प्रवेश करीत होता. कुटे, महाजनि, कीर्तिकर वगैरे कवींनीं इंग्रजी कविताना मराठीचा साज चढविला होता. ती कारागिरीहि केशवसुतानीं बऱ्याच कवितात करून दाखविली आहे. काहीं कवितावर तर त्यानीं आधारभूत इंग्रजी कविताचा स्पष्ट उल्लेखच केला आहे. पण त्याशिवाय इतर कैक कविताना आंग्ल कवीपासून स्फूर्ति मिळाल्याचे उघड दिसतें. वर्डस्वर्थ-शेले इत्यादि थोर थोर आंग्ल कवींच्या काव्यापासून स्फुरलेल्या पण स्वतंत्रपणे रचलेल्या त्याच्या कविता मान्यता पावल्या आहेत.

## वृत्तांची विविधता

जशी विषयाची विविधता; तशीच वृत्ताचीहि. ओवी-अभंगापासून शार्दूलविक्रीडित-भुजंगप्रयातापर्यंतचीं नाना वृत्तें त्यांनीं योजलीं आहेत. त्याचप्रमाणे विविध जातींतहि त्यानीं काव्य-रचना केली आहे. उद्धव, बालानंद, मेघावलि वगैरे जातींतील त्याचीं कवनें पदाप्रमाणे गेय व रम्य आहेत. इंग्रजींतल्याप्रमाणें त्यानीं निर्यमक कविताहि बरींच लिहिली आहे. काहींमध्यें यमक साधले आहे, ते एक-तीन, दोन-चार अशा चरणाचें. चौदा ओळींचें सुनीत हा काव्य-प्रकार तर त्यानींच मराठींत आणला. क्वचित् ओबडधोबड भाषा, क्वचित् यतिभंग तर क्वचित् निरर्थक शब्द-असे काहीं दोष त्याच्या काव्यात आढळतात. पुनः पुनः घासून-पुसून कवितेचा परिष्कार करण्याइतके स्वास्थ्य केशवसुताना, आर्थिक वा मान-सिक या दोन्ही दृष्टींनीं, होतें कोठें ? निराशेनें तापलेलें मन गूढ अध्यात्म-

सुरुवात केली. त्याचे कोकणी उच्चार व सानुनासिक सूर याचा विलक्षणपणाच श्रोत्यांच्या हुल्लडबाजीला पुरेसा होता. पण त्या उसळत्या उत्साहाच्या अनावर लाटा क्षणार्धात थाबल्या. 'दिव्यत्वाची जेथ प्रतीती' इत्यादि उदात्त भाव त्याचे मनात शिरूं लागले. ' गाळुनिया भाळींचे मोती ' यासारख्या मनोहर पद-लालित्यानें नटलेल्या पक्ति श्रोतृवृंदाच्या कानात शिरूं लागल्या, तसतसें त्याच्या हृदयातील वादळ शमत गेले आणि मग ' शांतिशिरीं मन चंवऱ्या ढाळी ' असा भास होत होत, काव्याच्या अखेरीस श्रोत्याच्या भावना पुऱ्या जिंकल्या गेल्या. त्यानीं गुण-ग्राहकतेनें टाळ्याचा एकच कडकडाट केला व ' तेथें कर माझे जुळती ' याचा साक्षात् अनुभव घेतला. नतर ' मुशाफिर ' ही कविताहि सारगीप्रमाणें तेथें रगली. कार्यक्रम पूर्ण झाल्यानंतर, मध्यरात्रहि उलटल्यावर, केवळ कविमंडळामध्यें, माधवराव पटवर्धन यानीं निवडक काव्य-गायनाचा एक खास कार्यक्रम घडवून आणला, त्यात या बुटक्या मूर्तीनें—बोरकरानीं-आपल्या काव्याचा सारा पिसारा उलगडून दाखविला. त्याचें कौतुक सर्व कवींनीं मनोभावें केलें—माधनरावांनीं तर खूप उत्तेजन दिलें. जणू या संमेलनात हें नवें मोलाचे रत्नच आपल्या हातीं आलें अशा भावनेनें ते बोरकराकडे अभिमानानें पहात होते. तेव्हापासून बोरकराच्या काव्याची कीर्ति कलेकलेनें एकसारखी वाढत आहे.

## क्रांतीच्या आंदोलनांत

बाळकृष्ण भगवंत बोरकर याचा जन्म गोमंतकातील कुडचडे या गावीं ता. ३० नोव्हेंबर १९१० रोजीं झाला. गोमंतक म्हणजे सृष्टि-सौंदर्याची खाण. तेथील राया, तेथील समुद्र व तेथील वन-सृष्टि यावर बाळकृष्णाचें कवि-मन ' चरत होतें. ' आपल्या जन्मग्रामीं बोरकर मराठी दोन यत्ता शिकले-तेवढेंच त्याचें मराठीचें शिक्षण ! पुढें पोर्तुगीज व इग्रजी या भाषाचा अभ्यास गोमतकातील परिस्थितीमुळें त्याना करावा लागला. धारवाड येथें इंग्रजीच्या सात यत्ता तीन वर्षांत पुऱ्या करून ते १९२८ सालीं प्रवेश-परीक्षा उत्तीर्ण झाले. नतर एक वर्ष

कर्नाटक कॉलेजांत त्यानीं काढलें. पण शिक्षणाच्या पुढील पायऱ्या चढणें त्यांना गरिबीमुळें शक्य झालें नाहीं. ते सर्वांत वडील चिरंजीव. म्हणून त्यांचेवर संसाराची जबाबदारी. ती पार पाडण्यासाठीं पोर्तुगीज ट्रेनिंग कॉलेजचें प्रमाणपत्र मिळवून त्यानीं १९३९ सालीं प्राध्यापकाचा पेशा पत्करला. खाजगी व सरकारी हायस्कुलात शिक्षक म्हणून त्यानीं सोळा वर्षे काढलीं. पण गोमंतकातील स्वातंत्र्याचें आंदोलन सुरू होताच त्याचें मन अस्वस्थ झालें व त्यानीं १९४६ सालीं राजिनामा दिला. त्यानीं गोमंतकातील राजकीय आंदोलनात भाग घेतला. त्यामुळे तेथील सरकारने त्याना गोमंतकात प्रवेश करण्यास बंदी केली. तरी भारतात राहून ते ‘ आमचा गोमंतक ’ नावाचें वृत्तपत्र चालवून गोमंतकीय आंदोलनास कुमक पुरवीत होते. मुंबईत चाललेल्या गोमंतक-स्वातंत्र्याच्या चळवळीसहि ते हातभार लावीत होते. सध्यां त्यानीं रामायणाच्या धर्तीवर ‘महात्मायन’ नावाचे महाकाव्य ओव्यामध्ये रचण्यास प्रारंभ केला आहे व पुणें येथे वास्तव्य केलें आहे.

## संत-वाङ्मयाचे संस्कार

आतांपर्यंत त्याचे चार काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. त्याशिवाय ‘ मावळता चंद्र,’ ‘ भावीण ’ वगैरे कादंबऱ्या, ‘ कागदी होड्या ’सारखे लघुनिबंध आणि कांहीं अनुवादित पुस्तकेंहि त्यानीं महाराष्ट्रीय रसिकाना सादर केलीं आहेत. लहानपणापासून त्याच्या भावनेवर संत-वाङ्मयाचे संस्कार झाले आहेत. त्यात ज्ञानेश्वरीचा तर विलक्षण प्रभाव पडलेला आहे. स्वामी रामतीर्थ व विवेकानंद, टॉलस्टॉय व टागोर प्रभृति आधुनिक ऋषि-मुनींच्या उदात्त भावाचीं छाप त्याचे मनावर पडली. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत प्रवास करून त्यानीं अनुभवाचें धन विपुल जमविलें. नाना धर्मांचे व नाना पेशाचे मित्र त्याच्या परिवारात आहेत. त्यामुळें त्याचा दृष्टिकोन व्यापक व सहानुभूति सर्वस्पर्शी आहे. त्याच्या काव्यांत निसर्गाचें प्रेम वर्णिलेलें आहे, प्रणयाच्या लीला रंगविलेल्या आहेत, राष्ट्रीय आकांक्षा उमटलेल्या आहेत; त्याप्रमाणें त्यांना लागलेला ‘ चिरंतनाचा ध्यासहि ’ सर्वत्र उमटलेला आहे. त्यांना ‘ शांती ’ची

प्यास लागलेली पुष्कळ काव्यांत दिसते. ' मंत्रमुग्ध माझी वृत्ती, मुकें मन, मुकी वाणी ' ही त्याची भूमिका त्याच्या काव्याकाव्यातून दिसते. ते राष्ट्रीय प्रवृत्तीचे असले तरी आध्यात्मिक वृत्तीचे आहेत–आणि या दोन्ही वृत्ति–प्रवृत्तींना अधिष्ठान आहे गाढ रसवत्तेचे.

## स्वतंत्र प्रतिभा

' बोरकर गुंगत कविता करतात का कविता करतां करता गुंगून जातात ' हे श्री. वि. स. खाडेकराना कोडें आहे. तसें कोडें कोणाहि रसिकास पडावे इतकी काव्यात्म वृत्ति बोरकराची आहे. तांबे व बालकवि याच्याप्रमाणें ते अष्टौप्रहर काव्याच्या विश्वातच रममाण असतात. काव्य जगणाऱ्या थोड्या भाग्यवतापैकीं ते एक आहेत. त्याचें काव्य म्हणजे खरोखर त्याचें जीवन-सगीतच. ते सदैव हें जीवन-संगीत आळवीत असतात आणि आळविता आळविता येणारे दिव्य अनुभव त्याच्या काव्यात शाश्वत रूप पावतात. " ताब्याच्या अभिजात गायकीचा लौकिक व प्रसार वाढला तर हें ' जीवन सगीत ' सार्थकीं लागलें असें मी समजेन " या संगीताच्या सुरातच बोरकर बोलतात. याचा अर्थ त्याची कविता केवळ अनुकरणात्मक आहे असा मात्र नाहीं. त्याचें स्वतत्रत्व त्याच्या काव्याच्या अतरंगात स्पष्ट दिसते. त्याची बुद्धि स्वतत्र व सूक्ष्म आहे आणि ती प्रखर चिकित्सा करणारी आहे. अनुकरणानें आधळी बनणारी ती बुद्धीच नाहीं. त्याच्या स्वर–सुदर व भाव–निर्भर काव्य–गायनाइतकेंच त्याचें विवेचक व समतोल गद्य भाषण ऐकणेंहि आल्हाद-दायक असतें. आणि संभाषणात तर हे सारे गुण एकवटलेले असून त्याचें भावपूर्ण हृदयहि ओतलेलें असतें. आस्था, ममत्व व सहानुभूति हे त्यांच्या स्वभावाचे विशेष गुण होत. 'जीवीं जीव घालून' ते दुसऱ्याच्या दुःखाशीं चटदिशीं समरस होतात. काव्य करण्याचे वेळींच तेवढी त्याची भावना उसळ्या मारीत नाहीं. ती त्यांच्या बोलण्यांत, वागण्यात हरघडीं दिसून येते. त्यामुळेंच त्यांचें काव्य रसिकाच्या हृदयाचा ठाव घेतें. त्यांच्या काव्यात सृष्टि–वर्णनाचें वैभव आहे, प्रणयाचा विलास आहे, राजकीय

ध्येयवादाचा पडसाद आहे आणि तसाच ईश्वरी भक्तीचा जिव्हाळा पण आहे. या चारी गुणावर मृदुल व मंजुल पद-ललित्याचा फुलोरा दरवळत आहे. ' करिं सुंदरि स्वर-शृंगार ' किंवा ' क्षणभंगुर जरि जीवन सखे सुंदर करु आपण ' अशा पंक्ति त्यातील विचार-सौंदर्याच्या आधीं शब्द-माधुर्यानेंच रसिकाचीं मनें जिंकून घेतात.

## संगीत व चित्रकला

काव्य, संगीत व चित्रकला या तिन्ही कोमल कलाची जादू बोरकराच्या लेखणीमध्ये सांठविली आहे. तांबे-बालकवींप्रमाणे रम्य कल्पनेचें नर्तन त्याच्या काव्यांत सर्वत्र आढळतें. त्याचप्रमाणें त्यानीं अभ्यासिलेल्या चित्रकलेची व संगीत कलेची सोनेरी प्रभाहि त्याच्या काव्यावर पडलेली दिसते. दोनचार ओळींतच ते एखादे वैशिष्ट्यपूर्ण शब्दचित्र सुरेख रीतीनें रंगवितात, एवढेच नव्हे तर त्यात निरनिराळे रंग भरण्याचें चित्रकाराचें कसबहि त्याचे अंगीं आहे. स्वतःच्याच संवेदना ते आपल्या काव्यात ओतीत असल्यामुळें त्याचें काव्य स्वतत्र व पृथक् आहे, तथापि ते तांबे यांना गुरु मानतात. १९३६ सालीं त्यानीं आपली गुरुभक्ति प्रगट करणारे ' कविवर भास्करास ' या नांवाचे कवन रचले, त्यात ' भास्कर ' या शब्दावर श्लेष साधून सूर्याच्या कार्याचे वर्णन करता करताच तांब्याच्या काव्याचेंहि वर्णन साधलेलें आहे.

## निसर्गाचें गौरव-गीत

पावसाळ्यामध्यें आकाशांत ढग भरून आले. त्याचें शब्द-चित्र बोरकरानीं अतिशय ललित-पद्धतीनें रेखाटलें आहे. त्याची चालहि आकाशातील ढगांची गर्दी सूचित करणारी आहे. आणि निसर्गाचे चित्र-विचित्र रंगहि त्यानीं मोठ्या कुशलतेनें या काव्यात भरले आहेत, तें असें—
" गडद निळे गडद निळे जलद भरुनि आले । शीतल तनु चपल चरण अनिलगण निघाले ॥ " " धुद सजल हसित दिशा । तृणपर्णी सज्ज तृषा तृप्तीचे धन घनात बघुनि मन निवालें ॥ "

बालकवींनीहि ' श्रावणमास ' चितारला आहे. बोरकरानीं आपल्या

विशिष्ट शैलीनें रसिकाना 'श्रावण-दर्शन' घडविलें आहे. तें असें—
"गिरिदरींतुनि झरे-नव्हे हे हिरे उसळती निळे। ढगाढगांतुनि अन् पाऱ्यापरि ऊन गळे कोवळे ।। हवेत फिरतें कुणी पाखरू घुमत भिंगरी-परी। वर्ण रुपेरी लावुनि झुलती सुमने दर्भांकुरी ।।"

कोणत्याहि कवीच्या वर्णन-शक्तीला आव्हान देण्याइतकें भरघोस व हसरें सृष्टि-सौंदर्य बोरकराच्या गोमतकात फुललेले आहे. त्यातील 'दूध-सागर' धबधब्याचें वर्णन करता करता त्यानीं आनंदाचा व आशेचा सदेश दिला आहे.

## दिव्य भावाची प्रतीती

नुसती नादमधुर शब्द-योजना किंवा वर्णन-शैली अथवा कल्पना-शक्ति एवढीच सामुग्री काव्याला पुरेशी नाहीं. त्याच्या पोटात खोल भावना व उदात्त विचार असावयास हवा तरच ते सत्काव्य! या कसोटीला पूर्णपणें उतर-तील अशीं बोरकराचीं बरींच काव्ये आहेत. त्यातील क्रमानें व गुणानेंहि आद्य असणारें कवन म्हणजे 'तेथे कर माझें जुळती.' गीतेंत सांगितल्या-प्रमाणे जेथें जेथे 'विभूतिमत्, श्रीमत्, ऊर्जित' प्रगट झालेलें असेल, तेथें कोणाहि सहृदय माणसाचें शिर नम्र होतें व कर जोडले जातात. ह्या तत्त्वाला सगुण साकार स्वरूप बोरकरानीं आपल्या कवितेंत दिलें आहे. "दिव्यत्वाची जेथ प्रतीती। तेथें कर माझे जुळती ।।" असा सिद्धात सागून बोरकर त्या दिव्यत्वाचे दाखले देतात. सर्वसामान्य व्यक्तीच्या हरघडीच्या जीवनातहि असें दिव्यत्व दडलेलें असतें हे ते दाखवितात.

अशा त्यक्त-बहिष्कृत समाज-घटकाचे पूजन जो कवि करतो, तो राष्ट्रातील डोळ्यासमोर घडणाऱ्या दिव्य घटनाना बहिरा किंवा पाठमोरा कसा होईल ! गाधीजी किंवा सानेगुरुजी याचें जीवन म्हणजे अखंड यज्ञ होय. त्यातून ज्या त्यागाच्या व सेवेच्या पवित्र ज्वाला निघाल्या, त्या पाहून कविचें हृदय बेभान नाचूं लागलें. १९४७ सालीं पढरीच्या पाडुरंगाचें दर्शन हरिजनाना व्हावें म्हणून साने गुरुजींच्या 'पाडुरंगानें' आमरण उपोषण सुरू केलें. ती वार्ता ऐकतांच बोरकरानीं 'पंढरीस वाजे घंटा'

अशी घोषणा करून त्या घंटानादाचें रहस्य काव्यमय भाषेनें महाराष्ट्राला सांगितलें, तें असें–" पंढरीस वाजे घंटा पांडुरंग झाला जागा । झाडा मागाया उठल्या गोदा–भीमा–चंद्रभागा ॥ " " प्राण झरेला टाकून पांडुरंग रागें उगा । रडा रडा पश्चात्तापें दीना आलिंगाया लागा ॥ " " न्हात न्हात आसवांनीं जोडा तुटलेला धागा । महाराच्या महाराष्ट्रीं लावा ब्रह्मत्वाच्या बागा ॥ "

' माझी पूजा ' या कवितेमध्येंहि अशीच ' दिव्यत्वाची प्रतीती ' देणारीं स्थळें कवीनें दाखविलीं आहेत. स्वतः जळून मातृभूमीचें मुख उज्ज्वल करणाऱ्या क्रांतिकारकांना आरंभीं वंदन करून, वडिलांना उद्देशून कवि म्हणतो, " तुम्हि चंदन, हित, शांति । आश्वासन, विश्रांति । पुण्योदक नयनांतील तुमच्या पाणी अभिषेकाचे ॥ " तसेंच श्रमजीवी लोकांचा गौरव करतांना कवि सांगतो, " भाग्य न माझें अन् श्रमिकांनो ! तुम्हांपरी खपण्याचें । पीक काढुनी ताट भराया षड्रस नैवेद्याचे ॥ " स्वतःकडे नम्र भूमिका घेऊन कवि म्हणतो, " घटा झालो, खवलों स्तोत्रें, यश तुम्हां सर्वांचें । "

## गांधीजींचें विभूतिमत्व

गांधीजीबद्दल बोरकरांना गाढ आदर आहे. ' साबरमतीच्या काठीं ' या कवितेंत त्यांनीं आपला आदरभाव पुढील शब्दांनीं व्यक्त केला आहे, " महात्म्याच्या पावलांनीं । येथें धूळ झाली बुका । हवेमध्यें श्वास त्याचे । धूप यायचा न तुका । तुझी भक्ती, तुझा त्याग । तुझें तप आलें फळा । माझ्या भविष्याचा मार्ग । मला झाला ग मोकळा ॥ महात्म्याच्या संगतीचा । मला लाभला एकान्त । सहा महिन्यात झाला । खरा स्वप्नींचा दृष्टांत ॥ गाऊं त्याच्या ओव्या गाणीं । शेकड्यांनीं, सहस्रांनीं । त्याच्या पावलांच्या खुणा । उमटवू पानोपानीं ॥ चरक्याच्या तालावर । रचूं त्याचें रामायण । जीवनांत पदोपदीं । करूं त्याचें पारायण" । आणि कवि आतां ' महात्मायन ' या नावानें गांधीजींचें रामायण रचीत आहे.

एक साधी घटना ! केवळ एक चुकामूक ! पण तिच्यांतून कवि बोरकरानीं आपल्या प्रतिभेच्या नजरेनें केवढें महान् तत्त्व शोधून काढलें

व किती प्रभावी रीतीनें तें मांडलें ! मुंबई येथें १९४५ सालीं गाधीजी असताना त्याची नेहमींची साय-प्रार्थना होई. त्या प्रार्थनेस हजर राहण्या-साठीं कवि निघाला पण उशीर झाला. समुद्राला साक्षी ठेवून सायकाळची प्रार्थना गाधीजींनीं सपवली होती आणि ते आपल्या निवासस्थानाकडे निघाले होते. तें जाताना त्याचें फक्त ओझरतें दर्शन कवीला झाले. महात्मे व समाज याचीहि चुकामूक जगाच्या इतिहासात अशीच होत आली आहे. थोर विभूतींचें ओझरतेच दर्शन मानवसमाजाला घडलें आहें हें महान् तत्व कवीने या कवितेत मोठ्या कौशल्यानें सूचित केले आहे. यातील 'दधीची, हरिजन,' इत्यादि शब्दन्‌शब्द अर्थपूर्ण आहे. "डोळयात घेउनी प्राण।" कवि दर्शनासाठीं उभा राहिला. "राजमार्ग उघडा झाला। सुखकपानें देह फुचला। प्रभु साकार दिसला." असें वाटून कवि गाधीजींच्या मूर्तीचें वर्णन पुढील वेचक शब्दानीं करतो. "ती मूर्ति साजिरी ज्योति कर्पूरगौर। ऋत-शाति-अहिंसा दलित स्फूर्ति गंभीर। गगेपरि गेली पुढुनी संथ गतीनें। निःशब्द प्रीतिने जीववुनि दोन्ही तीर। यातील 'गगेपरी गेली पुढूनी सथ गतीने' हीं ओळच मुळीं त्या थोर विभूतीच्या गतीचें गार्भार्य मूर्तीमत उभे करते. ज्या रस्त्यावरून महात्माजी चालत गेले, तो 'जनसेवक पथ तो कृतार्थ झाला आज।' असें वाटून कवि म्हणतो —'धजलो न तया मी तुडवाया या चरणीं।" आणि अशी प्रार्थना देवापाशीं करतो. "तें भाग्य पथाचें द्या हो या जीवाला।' आणि योगायोग असा कीं, त्या घटकेपासून बोरकराच्या जीवनात क्राति झाली. त्याच्या आयुष्याचें नवें पान उलटलें गेलें. केवळ काव्यात गुंगत राहणारा त्याचा आत्मा प्रत्यक्ष जीवनात उडी घेऊ लागला आणि महात्म्याचा मार्ग अनुसरूं लागला.

आणि गाधीजींची हत्या ! अतिमानुष जीवाचा तो अमानुष अंत ! त्याचे रहस्य पूर्णपणें उकलणारी कविता अद्याप मराठींत एकहि निर्माण झालेली नाहीं कविवर्गहि स्तिमित-सुन्न झाला. काव्य रचनेला अवश्य ती प्रशात मनःस्थिती त्याना लाभलीच नाहीं. दुःखाचे चीत्कार मात्र काहीं काहीं कवींनीं काढले आहेत. बोरकर 'हसत लावा वज्रटिळा' या कवितेंत

गांधी-हत्येचा परिणाम असा वर्णन करतात, "खिस्त गाळितो मूक आंसवें, दुःखी बुद्ध बुडाला हो । डख कलीचा सात युगांचा जडला वंशवडाला हो ।। "

आणि शेवटीं मरून अमर झालेल्या त्या महात्म्यालाच कळवळून ते विचारतात, " या हत्येचें पातक खडतर किती पिढ्याना जाळिल हो ? । कोण तुम्हांविण निज हृदयानें तात ! तयांना क्षाळिल हो ? ।। "

पं. जवाहरलालावर त्यानीं अलीकडे केलेली एक कविता तर डॉ. टागोराच्या उंच पातळिला स्पर्श करणारी आहे.

रसिकता व विरक्ति या दोन्ही वृत्ति बोरकराच्या काव्यातून वहात आहेत. राष्ट्रप्रेम व सृष्टिप्रेम या दोन्ही प्रकारच्या रस-धारानीं त्याचें काव्य पोसलेलें आहे. पुराण संस्कृति व नवीं ध्येयें याच्या सगमावर त्याच्या काव्याचा ताजमहाल उभा आहे. " मज लोभस हा इहलोक हवा " अशी आपली आकाक्षा नाना दृष्टांतानीं व्यक्त करताना ते म्हणतात, "शास्त्राचा अभ्यास हवा, परि मानव्याचा ध्यास हवा ।। तृप्ति नको मज मुक्ति नको पण येथिल हर्ष नि शोक हवा । शोक हवा परि वाल्मिकीच्यापरि सद्रव अन् सश्लोक हवा । ? मराठीचे वाल्मिकी बनण्याइतकी भावनाची सशुद्धि व समृद्धि बोरकराचे अंगीं बीजरूपानें आहे; तिचा रम्य साक्षात्कार त्याचे ' महात्मायन ' करुन देईल काय ?

## अभ्यासाच्या वाटा

(१) ' बोरकराचे पहिलें काव्यगायन ' या घटनेचे वर्णन करा.

(२) ' बोरकर काव्यमय जीवन जगतात ' हें कसे ध्यानात येतें ? यामुळे त्याच्या काव्याचे स्वरूप कसें झाले आहे ?

(३) बोरकरानी निसर्गवर्णनें कोणत्या कवितातून केलीं आहेत ? त्या वर्णनाबद्दल तुम्हास काय वाटतें ?

(४) ' तेथें कर माझे जुळती ' ही कविता अभ्यासा, त्या कवितेंतील तत्त्व आपल्या शब्दात लिहा.

(५) ' म. गांधींजींच्या दर्शनानें बोरकरांच्या जविनांत क्रांति झाली, ' या घटनेची माहिती देऊन क्रांतीचे स्वरूप कोणतें तें स्पष्ट करा.

## या पुस्तकांतील
## लेखकांचीं कांहीं वाचनीय पुस्तकें

केशवसुत

१. केशवसुतांची कविता

गोविंदाग्रज

१. वाग्वैजयंती

भा. रा. तांबे

१. तांबे यांची कविता

बालकवि

१. बालकवींची समग्र कविता

बा. भ. बोरकर

१. जीवन-संगीत
२. दूध-सागर
३. आनंद-भैरवी

★

# शिखरे-वाङ्मय

## चरित्रें

म. गांधींचें चरित्र
गांधी–जीवन–कथा
राष्ट्र–पिता गांधीजी
गांधी–रण–गीता
राष्ट्र–जनक टिळक
लोकमान्य टिळक
सुधारकाचार्य आगरकर
डॉ. राधाकृष्णन

## प्रबंध

गांधीजींचें रामराज्य
साम्राज्य व स्वराज्य
सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म
आजकालचे साहित्यिक

## कादंबरी

थोरली आई
आईची कृपा
भावनाचा नाच
जिवलग

## नाटकें

वैष्णवजन
आठ साल

## लघुकथा

क्रांति–किरण
गंगेचे थेंब

आधुनिक कवि–भा. २ रा

# अ नु क्र म

## रे. टिळक : : : : १

देश सोडला तरी ज्यानीं भाषा सोडली नाहीं, असे मराठीचे अनन्य भक्त अनेक आहेत. त्याचप्रमाणें, धर्म टाकला तरी भाषा टाकली नाहीं असें अतूट नातेंहि मराठीशीं ठेवणारे कांहीं शारदा-भक्त आहेत. त्यांत रेव्हरंड



टिळक याना आद्य स्थान द्यावें लागेल. मायभाषेचा लळा त्याना आमरण होता. हिंदुधर्मांतून ख्रिस्ती धर्मात ते गेले, तरी त्याचें मराठी भाषेवरील प्रेम कायम राहिलें. त्यांनीं स्वत: तर मायभाषेची सेवा आजन्म अखंड केलीच; पण आपल्या ख्रिस्ती बांधवांचेंहि तोंड इंग्रजीकडून मराठीकडे वळविलें, किंबहुना ख्रिस्ती समाजाच्या बायबलाची व भजनाची भाषा हेंगाडी, बेंगरूळ व अशुद्ध असे, तिचें यथार्थ विडंबन श्री. वरेरकर यानीं 'सन्याशाचा ससार' या नाटकात मार्मिकपणें केलें आहे. ते मराठी भाषेचे हाल वाचवून व तिचें धेडगुजरी स्वरूप घालवून शुद्ध-सरस मराठी भाषा ख्रिस्त्याच्याहि तोंडीं खेळविण्याचें श्रेय रे. टिळक यानाच. मायभाषेचें आकर्षण जितकें अभेद्य, तितकेंच तिचें आवरण विशाल असतें; हें रे. टिळकानीं आपल्या कृतीनें सिद्ध केलें. "तुझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी" असा अभिमान ते वहात असत.

## निसर्गाशीं समरसता

टिळक सृष्टिसौंदर्याचे मोठे भोक्ते होते. ‘ जें रम्य तें बघुनिया मज वेड लागे ’ अशा काव्य–वृत्तींत ते रंगलेले असत. त्यातहि ‘ पात्र सोन्याचें असो मृत्तिकेचें । वेड मजला आतल्या अमृताचें ’ अशी तत्त्वग्राही दृष्टि त्याची होती. ‘ शुक्ति न लगे मज हवें खरें मोतीं ’ अशी रहस्य–स्पर्शी त्याची बुद्धि होती. निसर्गातील सौंदर्याचे ते शोधक व पूजक होते. निसर्गात त्याना आपला मित्र, गुरु, ईश्वरहि दिसे. काव्य-वृत्तीप्रमाणेंच धर्म-प्रवृत्तीहि त्याच्याठायीं लहानपणापासून अखेरपर्यंत अबाधित होती. आणि तशीच देशभक्ति पण. या तीनहि निष्ठा त्याच्या काव्यांत प्रतिबिंबित झाल्या आहेत. त्याच्या काव्याचा दर्शनीं दिसणारा गुण म्हणजे सहजता. त्याच्याइतकी प्रसादपूर्ण काव्य–रचना आधुनिक कवींत दुसऱ्या कोणाचीच नसेल. तांबे किंवा बाल–कवि याच्याइतकें सुकुमार व मजुल शब्दाचें साहित्य त्याच्या भाषेमध्यें नसूनहि ती सहज-रम्यतेमुळें वाचकाचीं मने जिंकीत जाते. गडकऱ्याची उत्तुंग व चमत्कृति-जनक प्रतिभा त्याच्या काव्यात तळपत नाहीं, उलट त्याची कल्पकता मर्यादित व उपमा–रूपकादि अलंकार जुनेपुराणेच असतात; तरी त्याच्या प्रसन्न आत्म्याचें स्वच्छ प्रतिबिंब त्याच्या काव्यात पडलेले असते व त्यामुळें तें रसिकाच्या आत्म्यापर्यंत जाऊन पोचतें. जितक्या उंचीवरून पाणी सोडावें, तितकें वर कारंजाचें पाणी चढतें ना ? तसेंच कवीचा उद्गार अंतःकरणाच्या जितक्या खोल गाभाऱ्यातून निघेल, तितका खोल तो रसिकाच्या हृदयात ठाव घेतो. सुबोध व प्रसादपूर्ण अशा भाषाशैलीनें नटलेलें आणि जीवत व प्रामाणिक भावनानीं थबथबलेलें टिळकाचें काव्य म्हणजे मराठी भाषेचें मोलाचें लेणें होय. प्राचीन सत–कवींप्रमाणें त्यानीं सोप्या भाषेंत, अंतरींच्या तळमळीनें, आपलीं आध्यात्मिक आदोलनें आपल्या काव्यात रंगविलीं आहेत.

## संस्कृतचें अध्ययन

रे. टिळकांचा जन्म एका धर्मनिष्ठ घराण्यात झाला. त्यांचे आजोबा

विरक्त वृत्तीचे होते. नारायणाला घेऊन ते रानावनांत जात व नाचत-नाचत भजन करीत. नारायण वामन टिळक १८६२ साली रत्नागिरी जिल्ह्यातील करझगांव येथें जन्मले. महाबळेश्वराच्या पायथ्याशीं हें गांव असल्यानें सृष्टिदेवीशीं त्याचें नातें बालपणापासूनच जडलें. त्याचीं पहिलीं सात वर्षें त्या निसर्गाच्या सहवासातच गेलीं. त्यांच्या आईला काव्य वाचनाची गोडी होती व काव्य–रचनेचीहि सवय होती. ती त्याच्या वयाचे अकरावे वर्षीं दिवंगत झाली. तरी घराण्यातील धर्म–प्रवृत्तीचे व काव्य–वृत्तीचे संस्कार नारायणावर बालपणापासून होतच गेले. वडील व्यवसायानें तलाठी व वृत्तीनें कर्मठ होते. नोकरीनिमित्त वाडिलाची बदली होई आणि त्यामुळें नारायणाच्या शिक्षणाचीं क्षेत्रेंहि बदलत. कल्याण येथें मराठी शिक्षण १८६९ ते १८७३ या चार वर्षांत नारायणानें घेतलें. त्यानंतर चार वर्षें त्यानीं नाशिकास जाऊन स्वतंत्रपणें राहून संस्कृतचें अध्ययन केलें. १८७७ मध्यें त्यानीं इंग्रजी शिकण्यास सुरवात केली. दोन वर्षांत पाच इयत्ता त्यानीं पुऱ्या केल्या, इतकी त्याची धारणाशक्ति अलौकिक होती. पण १८८० मध्यें त्याना नोकरी धरावी लागली. तशीच दुसरी शृंखला लग्नाची तीहि त्याच वर्षीं त्याना अडकवून घ्यावी लागली. त्याच्या पत्नी लक्ष्मीबाई याना शिक्षणाचे सस्कार नव्हते, तरी नारायणरावाच्या परिस–स्पर्शानें त्याहि काव्य–रचना करूं लागल्या. त्यांनीं लिहिलेलीं ‘ स्मृति–चित्रें ’ तर अव्याज–मनोहरत्वामुळें अतुल्य ठरलेलीं आहेत. त्याना शिकविण्यासाठीं नारायणरावानीं, न्या. रानडे याच्याप्रमाणेंच, अपार कष्ट केले.

## धार्मिक प्रवृत्ति

नारायणरावानीं कधीं शिक्षकाची नोकरी केली, तर कधीं पुराणिकाचा पेशा पत्करला कधीं ते कीर्तनकार बनले, तर कधीं कंपाझिटर होण्य।तहि त्यानीं कमीपणा मानला नाहीं. सतरा वर्षें ते निरनिराळ्या गावीं वेगवेगळे व्यवसाय करीत भटकत होते. १८९१ मध्यें ते नागपुरास संस्कृत ग्रंथांचें भाषांतर व संशोधन करण्याच्या नोकरीस लागले. त्याना चाळीस रुपये पगार

मिळत होता. पण नारायणरावांना खरा आनंद तें संस्कृत-साहित्याचें रत्न-भांडार लुटताना होई. संस्कृतमध्यें काव्य-रचनाहि त्यांनीं त्यावेळीं केली. 'ऋषि' नावाचें एक मासिक त्यांनीं धर्म-चर्चा करण्यासाठीं कांहीं दिवस चालविलें. धार्मिक जिज्ञासेचें वादळ त्यांच्या हृदयांत माजलें होतें. योगाभ्यासहि ते करीत. नवधर्मांची स्थापना करण्याची ऊर्मिहि त्यांच्या चित्तांत उसळ्या मारीत असे. अशा स्थितींत—

## ख्रिस्ती धर्मांत प्रवेश

नव्या नोकरीच्या शोधार्थ नागपुराहून नारायणराव आगगाडींतून चालले होते गाडींत एक उतारू त्यांचेशीं प्रेमळपणे बोलूं लागला. त्याचे सफेत कपडे व लांबलचक दाढी हीं पाहून नारायणरावांच्या मुमुक्षु मनांत आदर उत्पन्न झाला. तो ख्रिस्ती धर्मगुरु होता. त्याने आपल्या धर्माचा महिमा मुक्तकंठानें गाइला. हिंदुधर्मांतील कर्मकांडाला व उच्चनीचभावाला विटलेल्या नारायणरावांना ख्रिस्ती धर्माची ओढ लागली. त्या पाद्र्यानें नारायणरावांचे हातावर बायबल ठेवलें आणि कानांत भविष्य सांगितलें कीं, 'दोन वर्षांत तुम्ही प्रभूचे कृपा-छत्राखालीं याल' आणि ते भविष्य खरें ठरले ! १८९५ च्या फेब्रुवारींत टिळकांनीं हिंदुधर्म सोडला व ख्रिस्ती धर्माचा बाप्तिस्मा घेतला. आपली धर्म-जिज्ञासा शमविणें हा त्यांच्या धर्मांतराचा प्रधान हेतु होताच, पण त्याशिवाय त्यांचा असाहि ग्रह झाला होता कीं, ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाल्यानेंच हिंदुस्थानाचा तरणोपाय आहे ! रामायणाच्या धर्तीवर त्यांनीं 'ख्रिस्तायन' नावाचें महाकाव्य लिहावयास घेतले. १९०९ सालीं सुरु झालेलें हें महाकाव्य त्यांना पुढील दहा वर्षांच्या आयुष्यांतहि पुरें करतां आलें नाहीं. त्याची पूर्तता लक्ष्मी-बाईनीं पुढें केली. धर्मांतर केल्यानंतर २२ वर्षें ते नगर येथें राहिले व शांतचित्तानें विपुल काव्य रचत गेले. १९१७ सालीं ते सातारा येथे गेले व १९१९ मध्यें ख्रिस्तवासी झाले. याच वर्षानें गोविंदाग्रज व हरिभाऊ आपटे या प्रतिभा-पुत्रांना काळाच्या पडद्याआड नेलें. टिळक हे 'केशव-सुती' संप्रदायातले ज्येष्ठ कवि होत. पण वर्डस्वर्थ व टेनिसन यांच्या काव्याची छाप त्यांच्या बऱ्याच कवितांवर पडलेली आहे.

## प्रवृत्ति-निवृत्ति यांचा वाद

' फुलामुलाचे कवि ' ही पदवी टिळकाना मिळवून देणारीं अनेक काव्ये त्यानीं रचलीं आहेत. त्या सर्वांत आकाराने व गुणानेहि श्रेष्ठ असें काव्य म्हणजे ' वनवासी फूल '. त्यात निसर्गाची थोरवी तर सहजच गाइलेली आहे, पण त्याबरोबरच कवीचा महिमाहि सुदर रीतीनें स्तविला आहे. साधी, सफाईदार व भावती भाषाशैली असून त्याच्यामध्यें मधून-मधून रमणीय कल्पना सहजतेनें गुफलेल्या आहेत. या काव्य-सौदर्याला बाध न आणणारे तात्त्विक विचारहि या सुमार चारशें ओळींच्या काव्यात साठविलेले आहेत. हिंदुसमाजातील नकली निवृत्तिवाद व त्यातून बळावणारें नैराश्य व निष्क्रियता याचें दृश्य टिळकाना एकीकडे दिसत होतें, तर खिस्ती मिशनऱ्याची सेवाशील प्रवृत्ति व निष्काम भूतदया याचीं चित्रें त्याच्या डोळ्यापुढे खेळत होतीं. हे दोन चित्रपट त्यानीं १९०४ सालीं लिहिलेल्या 'वनवासी फूल ' या कवितेत रंगविले आहेत. जगातील स्वार्थीपणाला, कृतघ्नपणाला व नीचपणाला विटून एक फूल, हिंदु सन्याश्याप्रमाणे, रानात जाऊन बसतें व सूर्य, वायु, पाऊस इत्यादि निसर्ग–देवतेच्या लाडक्याशीं खेळत असते. पण कवि त्या फुलाला भेटतो व जगाची उजळ बाजू त्याचेपुढे माडतो आणि जगात राहून आपला उपयोग इतरास करून देण्यास उपदेशितो. निवृत्ति व प्रवृत्ति या दोन तत्त्वाचा वाद फूल व कवि याच्या मुखाने टिळकानीं काव्यमय पद्धतीनें रगविला आहे.

## कवीचें माहात्म्य

त्या कवीची योग्यता किती होती हें सागताना ते म्हणतात, " शास्त्रज्ञाच्या, तत्त्वज्ञाच्या पलीकडे सचार । दिक्कालाने अप्रतिहत तो ज्याचा स्वैरविहार ॥ " या काव्यातील कवीचें वर्णन कोणत्याहि सत्कवीला लागू पडण्यासारखें आहे. कवीला शब्दामागून शब्द कसे सुचतात ? तर वसतऋतूकडे पक्षी जसे धाव घेतात तसें तें सहज, नैसर्गिक आहे. हें पुढील दोन ओळींत कवि सागतो, " जसे वसन्ता नवे नवे द्विज तैसे नित्य जयाला । वाग्देवीचे दूत शब्द हो आतुर सेवायाला । "

नुसतें शब्द–भांडारच कवीजवळ असून भागत नाहीं. दुसऱ्याच्या मनाचें यथार्थ आकलन करण्याची शक्तिहि त्याचे ठायीं असावी लागते. फुलांचेंहि मनोगत तो ओळखूं शकतो. " मानसशास्त्रीं पूर्णविशारद सहज कवीची जाति । कुसुमावरती तशात त्याची अमोघ, विमल प्रीति ॥

अशा कवीला जगात मान केवढा असतो ? याचें उत्तर टिळक देतात, " कोण असा जो दर्शन कविचे घडता हासत नाहीं ? । बोलत नाहीं ! डोलत नाहीं ? प्रेमे नाचत नाहीं ? " त्यात हा कवि तर अगदीं फूल–वेडा. " आकाशात फुलें, धरेवरि फुलें, मद्देहिं सारीं फुलें । " असें सर्वत्र फुलें पहाणाऱ्या टिळकाच्या कल्पनेंतील कवि म्हणतो, " जनात किंवा वनात किंवा नभात सुमनें सारीं. । पायाखालीं फुलेच सारीं, कमलें हृत्कासारीं॥"

## वनवासी फुलाचें मनोगत

आपल्यावर प्रेम करणारा कवि–राज आपल्याजवळ आला आहे, याची जाणीव त्या फुलाला झाली व तें कवीला म्हणालें, " कवीश आपण, ओळखिलें कीं भक्तिरसाचे सिन्धु । वनवासी मी, द्या मज दीना दोनचार तरि बिन्दु ॥ "

त्या फुलानें आपलें ' दो दिवसाचे जीवित ' परमेशाला अर्पण केलें आहे. त्याला मानव-समाजात जाऊन उद्यानात डौलात फुलावें अशी वासना नाहीं. म्हणून ' उद्यानीं मम नाश निश्चयें ! ' म्हणे कवीला फूल !' तेव्हां कवि त्याला उत्तर देतो ' ' वयें तरुण तू परी अनुभवे दिसशी अजाण मूल ! ' पण दुसऱ्या दृष्टीने त्या फुलाचा गौरव करण्यासहि कवि चुकत नाहीं. " वैराग्याचें निधान दिसशी मजला भक्तिरसाचे " असे त्याचें स्तवन कवि करतो. त्याला मोठेपणा देऊन, त्याची समजूत घालून, त्याला परोपकाराच्या कर्मयोगाची दीक्षा कवि देऊं पहातो. कवि त्याला जगात चलण्याचा परोपरीनें आग्रह करतो. तेव्हा एकाद्या विरक्त साधूप्रमाणें, तें फूल जगात आपण न जाण्याचें कारण निवेदन करते, " पुन्हा ह्मणे सुम सारा स्वार्थी मर्त्यलोक हा आहे । दर्शन राहो दूरच ! याचें नांव न मजला साहे ॥ "

## मानवी समाजावर टीका

मानव स्वार्थी आहे याचा अनुभव फुलाला काय येणार ? तर भुंगा त्याच्या हृदयातील मध चोखून घेऊन जातो व त्या फुलाला पूर्ण विसरतो. हा स्वार्थीपणा सांगताना फूल म्हणतें, " नित्य करावें पुढे पुढें मधु गाणें गावें । न्यावें लुटून सुरसा, परी शेवटीं ओळख विसरुन जावें ॥ " आणखीहि अनेक पुरावे देऊन फूल जगावर नाना दोषांचे आरोप लादतें; ते असे—" फळें तोंवरी द्विजरायाचे गायन चाले वृक्षीं । सरता तीं परि परके होती वृक्ष आणखी पक्षी ॥ कार्य साधितो तोंवर मिळती आशीर्वाद घनाला । थोडा चुकता शिव्याशाप मग नको नकोसें त्याला । " शिर्ते तोंवरी भुतें भोंवतीं " म्हण ही साधी भारी । परि अनुभूती सकल बुधाची हींत ओतिली सारी ॥ जगीं चहुकडे स्वार्थ, नीचता, मूर्खपणा, अभिमान । हार म्हणोनी सापासाठीं कोण पुढे करि मान ? ॥ "

याच्या उलट, रानात राहिलें म्हणजे उषेचे स्मित, सूर्याचा स्पर्श, सुगंध वाहून नेऊन फुलाची कीर्ति दिशादिशाना पसरणारा वारा आणि दंवबिंदूचे मौक्तिकहार घालणारी सृष्टि—याचा निःस्वार्थी सहवास लाभतो— " सृष्टीही हिमांमधें मनोहर नव मोत्याची जाळी । घाली मजवर सजवी मजला माय तशी प्रतिपाळी ॥ " म्हणून फूल विचारतें, " सोडुन असले मित्र निधी हे निष्काम प्रेमाचे । धूळ जगाची माथा घेणें कोण म्हणे कामाचें ? ॥ "

शेवटीं स्वार्थी, कपटी व नीच अशा जगावर जणु शापवाणीच उच्चारीत तें फूल म्हणतें, " विचार तैसा उच्चाराचा प्रवाह कोठें वाहे ? । उच्चारासम आचाराची श्रेणी कोठें आहे ? ॥ मनात भलतें, जनात भलतें, तुमचा व्यवहार । कापट्याचा सागर म्हणजे हा तुमचा संसार । " श्रीशंकराचार्यांसारख्यानींहि जगातील वैषम्य–नैर्घृण्यादि दोष जाणले होतेच; पण तरीहि जगाच्या उद्धारार्थ त्यानीं सर्व देशभर संचार, जागृति व संघटना केली. त्याच विचारानें कवि जगाला विटलेल्या व दुरावलेल्या या फुलाला आजारुन–गोंजारून, त्याला महत्त्व देऊन, समाजाच्या

उपयोगीं पडण्याची प्रेरणा देत आहे. ‘ कला व जीवन ’ या वादाचाहि योग्य निर्णय सुंदर रीतीने टिळकांनीं येथे दिला आहे. त्या फुलाला मोठेपणा देताना कवि म्हणतो, “ तू शोकाचें भंजन कुसुमा रंजन मूर्त मनाचें । तू मोहाचें अंजन सुमना व्यंजन आनंदाचे ॥ ” अशा आनंद-दायक फुलानें आनंद देण्याचे आपले जीवितकार्य टाकून रानांत काळ कंठावा हें दुर्दैवाचे नव्हे काय ?

## परोपकाराचा उपदेश

परमेश्वरानें दिलेला सुगंध फुलाच्या हृदयात जसाच्या तसा वाळून जावा ही जगाची हानि नव्हे काय ? असा प्रश्न विचारून कवि त्याला ‘ चल मजसंगे, दे, दे सोडून आग्रह हें अज्ञान ’ असे विनवितो आणि जगातील दुसरे दाखले असे देतो, “ प्रकाशसृष्टी, चंद्रकुमुदिनी, मेघधरा, तरुवेली । शोभतील का ? नादतील का जरी निराळीं झालीं ? ॥ ” सूर्यानें सृष्टीवर प्रकाश पाडला नाहीं, चंद्रानें कमळे फुलविलीं नाहीत, ढगानीं आपल्या धारानीं पृथ्वी भिजविली नाहीं, तर सृष्टींत शोभा ती काय राहिली ? आपल्या नैसर्गिक गुण-संपदेचा उपयोग तो काय झाला ? फुलाचा उपयोग तर मानवाला किती तरी प्रकारानीं होण्यासारखा आहे. तरुण–तरुणींच्या प्रेम–प्रसंगात फुलाची कामगिरी किती गोड व मोठी आहे, हें काव्यमय वाणीनें वर्णिताना कवि म्हणतो, ‘ तुला पाहुनी—स्मरुनी विरही विरहिणिच्या गालाला । तुझेच सुमना घेइल चुम्बन ! नको निवारूं त्याला । ऐकुनिया तें सखी तयाची होइल वश कोपातें, । ताडिल तुजला, वाहिल वेणी–काल–सर्पिणीला ते । भिऊं नको ! ती नागिणही तुज सुमना ! वश होईल । भूषणसम तुज नित्य आपुल्या फणे-वरी वाहील । तू न जाणशिल तुझ्यामुळे तिज नवीन आली शोभा । जपेल ती तुज परंतु लोभी जैसा अलभ्य लाभा । तुझ्याभोंवतीं नर्तन करुनी स्तावितिल तुज अलि, कुसुमा । परिवर्धित ते करितिल तव ही अनुपम अभिनव सुषमा ॥ ”

तसेंच दुःखिताचे सांत्वन, वीराचा सत्कार, साधूंची पूजा इत्यादि

कार्येहि फूल करूं शकतें. आणि जातिवंत कवीला तर काय? फुलात काव्याचें ब्रह्माड साठविलेलें दिसते. कवि आपली भूमिका निवेदन करतो, " फुला! तुझ्यासम काव्यस्फूर्ती कविना देइ न कोणी। न मीं गायिलीं इतरा कवणा जितकीं फुलास गाणीं॥ " अशा फुलाला जगातील सत-साधुसज्जनाची संगति मिळणे हें त्या फुलालाहि हितकर नाहीं काय? सत्संगतीचें माहात्म्य वर्णिताना कवि म्हणतो, " चिन्तामणिची, कल्प-तरूची, कामदुधेची महती। नाहीं नाहीं साधुसंगतीपुढे महात्मे वदती॥ " आणि अशी साधुसंगति जगात गेल्यानेच मिळणार. वनात राहून कशी लाभणार? परस्पराना आपापला लाभ देण्याचा हा एक यज्ञच विश्वात चाललेला आहे. वृक्ष, नद्या, ढग, पाऊस, ऊस, चदन इत्यादि दाखले कवि देतो. जगातील दुःख हरण करणे हे केवढे उदात्त कार्य! तें तूं करूं शकशील' अशी जाणीव फुलाला कवि करून देत आहे. सूर्याचीं किरणे पसरताच अधाराचीं पुटे नाहींशी होतात, त्याप्रमाणे प्रफुल्ल व सुगधी फूल पहाताच मानवाचीं दुःखे विसरलीं जातील, हे पटवितांना कवि म्हणतो, " अश्रु म्हणजे शोकतरूचीं फुले फुला! तुज बघता। लाजुन, जागीं थबकतील रे वेगें पडता पडता! "

## सुखदुःखाची मीमांसा

जगांत असे सत्कार्य करण्यास आपण गेलो, तर जगातील स्वार्थाचा व दुष्टपणाचा त्रास आपल्याला होईल, ही फुलाची भीति ओळखून कवि त्याला समजावितो, " सुख येथे नच, सुख तेथे नच, सुखदुःखाचे कर्ते। आपण! सुमना! परमेशाच्या पूर्ण कृपेचे भोक्ते! "

जग हें सुखदुःखमिश्रित आहे, हे तत्त्वज्ञान पटविण्यासाठीं कवि दाखले देतो, " तृषेवाचुनी पाणी नाहीं क्षुधेवाचुनी अन्न। उष्म्यावाचुन चदन नाहीं उपभोगार्ह। कदा न ध्वान्तावाचुन सूर्याचाही प्रकाश विश्वीं नाहीं। दुःखावाचुन नको सुखाची, व्यर्थ कल्पना पाहीं॥ "

अशा सुखदुःमिश्रित जगात केवळ सुख मिळविण्याचा मार्ग म्हणजे प्रेमाचा. आपले जीवन प्रेममय करणें हाच सुखी होण्याचा मार्ग. प्रेमशून्य

जीवन म्हणजे केवळ मरण. हा उदात्त विचार विरोधाभास साधून कवि पुढील शब्दानीं सागतो, " पुन्हा सागतों, जीवन आणि प्रेम भिन्न नच। एक प्रेमहीनता मृति, केवळ तो स्वार्थाचा अतिरेक ॥ प्रेमासाठीं सुखा विसरणें हीच सुखाची पूर्ति। प्रेमासाठीं देहविसर्जन हीच खरोखर मुक्ति ॥ " कवीचें हें थोर तत्त्वज्ञान ऐकूनहि फुलाच्या मनातील निवृत्ति गेली नाहीं. तें त्याला म्हणते, ' तुझीं गायनें दिव्य ऐकुं दे इथेच मजला रानीं. ' तेव्हा कवि ' आपण आपलें कर्तव्य केलें ' असें समाधान मानून तेथून जातो. ' तो प्रेमरसाचा ठेवा ' असल्यानें त्या फुलापासून दूर होताना त्याच्या डोळयातून अश्रु गळाले. ते अश्रु त्या फुलाच्या वेलीनें शोषून घेतले. त्यामुळें त्या फुलाच्या अंगीं कवीची वृत्ति भिनली. " कविमय झालें चित्त सर्वथा विरक्त, वन्य फुलाचें। मागें, पुढतीं, वरीं, खालतीं कवीच अवघा नाचे। " शेवटीं तें फूल त्या वेलीवरून तुटून कवीच्या हृदयात शिरलें व तेथेंच रमलें. या काव्याचा प्रारंभ, मध्य व अंत सर्वच काहीं काव्यरसानें थबथबलेलें आणि तत्त्वज्ञानानें भरलेलें आहे.

## एक बोधपर प्रेमकथा

अशीच दुसरी दीर्घ काव्य-कथा ' सुशीला ' ही आहे. सुमारें तीनशे ओळींच्या या कथेचे कथानक इतकेंच आहे कीं, सहा महिने शाळेंत राहिलेली सुशीला सुटी झाली म्हणून घरीं आली. त्यावेळीं तिला घरातील माणसाना भेटण्याची ओढ विलक्षण लागली होती. कारण, " सर्व माझेंपण एकवटें जेथे। जिथे प्रेमाचें राज्य सदाचें ते। स्वार्थकपटाचा लेश नसे जेथे। जगीं उपमा कोणती त्या गृहातें। " अशा त्या निरुपम घरामध्यें सुशीला आली, तेव्हा " बापभावाना हर्ष फार झाला, । मायबहिणींना प्रेमपूर आला। सहा महिन्यांनीं लाडकी सुशीला। परत आलेली पाहुनी गृहाला ॥ सारीं प्रेमळ माणसें. आपल्या शिकलेल्या सुशीलेला कुठें ठेवू आणि कुठे न ठेवूं असें त्याना झालें. रात्रभर गप्पा रंगल्या, दिवसा नवीन नवीन खेळ आनंदाचेंच भोजन सुशीला सारखी करीत होती. " तोंडिं लावाया प्रेमहर्षित वाचा, । विनोदाचें रायतें पात्रिं

ज्याच्या । मीठ भाकर कोरडी, सुधा त्याला । महाभाग्याच्या धन्य साग-राला " प्रेमानें प्रत्येक गोष्ट गोडावलेली. एकाद्या वेलीभोवतीं आळें असतें. त्या आळ्यात पाणी घातलें व त्यात वरून ऊन पडलें म्हणजे ती वेल कशी फोफावते ? तशी सुशीला आनंदानें फुगत चालली. हें वेलीचें रूपक कवीनें कसें बसविलें आहे पहा—" ममत्वाचे खालती आलवाल । वरुन विरहाचें ऊनहीं विलोल, । आसवाचें जल सदा मिळत राहे, । प्रीतिलतिका जगतात वाढताहे ! "

बाल्य व तारुण्य याच्या सीमेवर सुशीला उभी होती. या संक्रमणा-वस्थेचें वर्णन टिळकांनीं अत्यंत सूक्ष्मतेनें व नाजूकपणानें केलें आहे. " किती किल्ले ती नवे नवे बाधी । किती कार्यें कल्पनाबळे साधी । कधिं बाल्याच्या ठेवुनिया हात । फिरे रमणी तारुण्य–काननात । " तरीहि ती बाल्याशींच अधिक बिलगलेली होती—' बाल्यासीमेवर हसत–डुलत ' रहाणारी ती अर्धस्फुट कळी होती. तिच्या घरीं सर्वात जास्त शिकलेली तीच. त्यामुळे त्या वयात तिला साहजिकच गर्वाची बाधा झाली.

## अहंकाराचा निषेध

घरातील सर्व मंडळींनीं सुशीलेसाठीं चारुदत्त नावाचा तरुण वर म्हणून योजला. तो ' अत्युच्च शीलाचा ' असून सुशीलेला सर्वथा अनुरूप होता. विद्येला विनय, मनोवृत्तीला धर्म, प्रीतीला उपकार किंवा शातीला न्याय भेटावा, तसा सुशीलेला चारुदत्त होता. " जिथे विनयाने परिणिली सुविद्या, । तशी धर्मानें मनोवृत्ति वद्या । जिथें उपकारा प्रीति माळ घाली । जिथे न्यायाची शाति सखी झाली ॥ पण गर्वांध सुशीलेनें चारुदत्ताला झिडकारलें आणि ती आपल्या भावी पतीचीं काल्पनिक चित्रें काढूं लागली. तथापि चारुदत्ताचें प्रेम एकनिष्ठ होतें तो तिच्या गर्वाकडे कानाडोळा करी व इतर गुणाचे कौतुक करी. तो " म्हणे ' चंद्राला लागला कलंक । पद्मजन्माचे स्थान नीच पंक; । रम्य रत्नीं काठिन्य भरुन राहे । सदा अस्तोदय तारकास आहे ॥ " या जगांतील कोणतीहि वस्तु घेतली तरी तिला कोणता ना कोणता दोष

जडलेला दिसतोच. चंद्र किती रम्य पण त्यावर कलंक आहे, कमळ किती कमनीय पण त्याचा जन्म चिखलात, रत्नाचें तेज डोळे दिपविणारें पण तें फुलासारखें कोमल थोडेच आहे ? दगडाप्रमाणें कठीण ते असतें. नक्षत्राची प्रभा किती दिव्य पण त्या सदैव प्रकाशतात कोठे ? दिवसा त्या दिसतहि नाहींत. चद्र, कमळ, रत्न, तारका—या सर्वांना जसा कांहीं ना कांहीं दोष आहेच, तसा सुशीलेला अभिमानाचा. तो विसरून जाण्याचा निश्चय चारुदत्ताने केला. कारण तो खिस्ताचा खरा भक्त होता असें कवि सांगतो. सुशीलाहि खिस्तभक्तच होती. ती दोन वर्षांनीं घरीं आली. तिच्या गर्वाची कमान चढतीच होती. " स्त्रियामधला स्त्रीपणा जे हरीते । असो ऐशा धिक्कार शिक्षणाते । " असे म्हणण्याची पाळी तिनें आपल्या वर्तनानें आणली. पहिल्या भेटीच्या वेळचें घरातील प्रेम, आनंद, गप्पा, खेळ— हें सर्व मावळलें होते. कारण सुशीलेला आपल्या विद्वत्तेचा गर्व झाला होता. म्हणून कवि विचारतो, " विनय, शाती, धृति, सहिष्णुता, प्रीति,। सदा परमेशीं एकनिष्ठ भक्ति । स्त्रियाचे हें सौभाग्य अहंकारें । हरुन न्यावें विद्वत्त्व हे कसे रे । ? " पण लवकरच सुशीलेच्या गर्वावर उतारा मिळाला. ती परीक्षेत अपयश पावली व महिनाभर आजारी पडली. त्या आजारात 'तिचे सारे सौंदर्य लया गेले.' उलट चारुदत्त परीक्षेत उत्तीर्ण झाला, सुशीलेवरील प्रेमात अढळ राहिला. सुशीला मात्र हताश झाली. तिनें आई–बापाला दुखविले होतें, चारुदत्ताला झिडकारले होतें. ती रानात गेली व शोक करू लागली, "वपू, विद्या, वक्तृत्व, वस्त्र, वित्त । वकाराना या लुब्ध मनुजचित्त । चित्त देवा पाहिजे, नको काहीं ! । मला देवाविण कुणी जगीं नाहीं ॥ "

ती असा देवाचा धावा करीत असताच चारुदत्त तेथे गेला व तिला म्हणाला, " शुक्ति नलगे मज हवे खरे मोतीं । रूप नलगे तव हवी तुझी प्रीती ॥ पात्र सोन्याचे असो मृत्तिकेचे । वेड मजला आतल्या अमृताचें ॥" बाह्यांगापेक्षा अंतरंगाकडे लक्ष देणाऱ्या चारुदत्ताचे मुखांतून टिळकांनीं आपल्या अढळ प्रेमाचे उदात्त तत्त्वज्ञानच रम्य भाषेनें वर्णिलें आहे. ही कथा जितकी प्रेमपूर्ण आहे तितकी बोधपूर्णहि आहे.

## स्त्रीजातीविषयीं आदरभाव

अशा बोधाचे हिरे काव्याच्या कोंदणात बसवून ते महाराष्ट्र–शारदेला अर्पण करण्यात टिळकाचा हातखंडा होता. ‘ माझी भार्या ’ या काव्यांत त्यांनीं आपली स्त्रीविषयींची थोर भावना प्रगट केली आहे, ती अशी—“ नमीतो मातेला–जगत गणिते दैवत तिला, । नमीतों कातेला–नृपपद उणें जीस तिजला; । नमीतों मैत्रीला–परगृहगताही भगिनिला । नमीतों कन्येला–सतनु ममता तीच विमला ॥ ”

आपली भार्या आपल्याला सन्मार्गावर कशी नेते हे टिळकानीं नाजूक शब्दानीं सांगितले आहे, ते असें.—“ तिचे थोडे थोडे नकळत मला बोध करणें, । मला थोडे थोडे परि दृढ सुमार्गात धरणें, । तिचें थोडें थोडे अमृतकण सारें चरित ते ! अनन्या रत्नाची खानि मज वृथा ती न दिसते ! ”

शेवटीं, भार्येच्या ठायीं मित्र, गुरु, शिष्या इत्यादि सर्व नात्यांचा संगम पाहून कवि कृतज्ञतेनें तिच्या पायावर प्रेमाचे अश्रु गाळतो. कालिदासानें ‘ गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या । ’ असें कातेचें वर्णन अजाच्या मुखाने केले. टिळकहि त्याच भूमिकेवरून म्हणतात, “ अरे माझ्या मित्रा, चतुर सचिवा, हे गुरुवरा, । प्रिये शिष्ये, भार्ये, मम सकल रे पुण्यनिकरा ॥ पहा हे प्रेमाश्रु तव चरणयुग्मीं वितरती । मनोवृत्ती माझ्या मधुसुमनवृष्टीच करिती ! ”

‘ बापाचे अश्रु ’ ही शोकपूर्ण काव्य–कथा सुमारे दोनशें ओळींची आहे. चित्रकार वामन विनायक साठे याच्या मृत्यूवर लिहिलेली ही एक हृदयस्पर्शी विलापिका आहे. वामनाच्या बाल–लीलाचा चित्रपटच जणु त्याच्या बापाच्या उद्गारातून कवीने दाखविला आहे. ऐन तारुण्यांत मृत्यूचा घाला या कलावतावर पडला. या अनर्थाचें वर्णन कवीने करुण शब्दानीं केलें आहे.

## निसर्गातील आनंद

टिळक स्वतःला ‘ फुलांतले भ्रमर ’ म्हणत. ‘ माझें जन्माचि हें फुला

निरविलें ' असें ते सांगत. फुलेंच काय, पण सारें सृष्टि-सौंदर्यच त्यांना ओढ लावी, तन्मय करी, वेडे बनवी. निसर्गातील लहानलहान सौंदर्ये व माधुर्ये मानवी मनाला किती समाधान देतात; हें सांगताना ते म्हणतात, " परंतु जेव्हा हृदयाचे । तुकडे होती मनुजाचे, । तेव्हा हीं अल्पेच तया । सावरिती दावून दया ॥ " हीं ' अल्पे ' कोणतीं ? मानवी मनाची दारुण निराशा नाहींशीं करणारीं हीं अल्प औषधें म्हणजे " उड्या मारिते नदी दुरी । खळ खळ खळ खळ शब्द करी ॥ रम्य डहाळीवर उडुनी । राघू बसता होय ध्वनि, । वनस्पती भिजवीत झणी । झरा निघाला गिरि-वरुनि । टप टप टप टप शब्द निघे । आनंदे तों जै वळघे : " नाद व अर्थ हातात हात घालून चालण्याचा भास या पंक्ति वाचताना होतो, नाहीं ? पाखराची चिवचिव, नदीची झुळझुळ, कोकिळेचे कुऊकुऊ—हे सारे ध्वनि म्हणजे—" परंतु जेव्हा चित्ताला । नको जीव आता झाला । जेव्हा न चले मनुजाचें । तेव्हा भेषज हें साचें ! " हे सृष्टीचें ' गानवादन ' मनुष्याच्या मनाला अपार शांति देतें.

निसर्गाचें मूर्तिमंत चित्र उभें करण्याइतकें सांगोपांग व सुरस वर्णन टिळकांनीं ' पर्वतारोहण ' या कवितेंत केलें आहे. वाईपासून पांचगणी-पर्यंत जाताना एकीकडे एकाहून एक उच्च डोंगर दिसतात तर दुसरीकडे खोल खोल दऱ्या दिसतात. त्याचें वर्णन रूपकादि अलंकाराच्या साहाय्यानें टिळकांनीं किती मनोरम केलें आहे, पहा—" हा वैभवनाशें खिन्न दिसेना जरा ! हा गांभीर्याचा पुंज उभा साजरा । घे यातुनि थोडें अगा मना पाभरा, पृथ्वीवर हा वसे परंतु सारी दृष्टी वरी । इकडे पर्वत इकडे दरी ! । " तसेच " घाट पाट जणुं शोभेचा वहात आला दिसे, । कांची वनदेवीची वसे, । शूर शिपायी अपुला म्हणुनी सृष्टी ज्या देतसे, । असा हा पट्टा गिरिचा असे; । कीं भाग सृष्टिच्या विचलित वेणींतला । कीं अंतःपट हा गिरि–दरि–युग्मातला । हा कुंकुम पडुनी ईषदरुण जाहला । वरखालीं वा जाण्या पथ हा नरजन्माचे परी । इकडे पर्वत इकडे दरी. ॥ " डोंगरातील घाट म्हणजे वनदेवतेचा कमरपट्टा आहे ? कीं सृष्टि-देवतेचा केसातील भांग आहे ? किंवा शिपायाच्या तरवारीचा पट्टा

आहे ? अथवा डोंगर व दरी या जोडप्याच्या लग्नांतील अंतरपाट आहे ? अगर स्वर्ग-मृत्यूचा जिना आहे ' अशा एकाहून एक सुंदर उत्प्रेक्षाची माला कवीनें सुगम शब्दांनीं व ललित शैलीनें गुफली आहे.

## साहित्याची जादू

सृष्टिदेवीच्या अंतरंगात शिरताच रसिकाची सारी दृष्टि, सारी वृत्तिच कशी फिरून जाते आणि त्याला नव्या सौख्याचा अनुभव कसा येतो, नवींच दृश्ये त्याला कशीं दिसूं लागतात, याचे भव्य-रम्य वर्णन टिळकांनीं एका कवितेत केलें आहे. ' अता कोण्या वसंताचे म्हणू सागा मला गाणें ? ' असें ऐटदार नाव त्या कवितेचे आहे. तिची अखेर 'तरी आताहि गाईन तया रागामधें सज्ञा जया देता तुम्ही मौन' अशी सूचक केली आहे. प्रसाद तर आरंभापासून अतापर्यंत सर्व काव्यात भरलेला आहे. चालहि लयबद्ध असून लाटानुप्रासाचे घुंगुर तिच्या पायात बाधले आहेत. कवि सागतो, " वनीं एका दिनीं गेलों पहायाला वसंताला। विचारीता कुणालाहि नसे ठावें कुठे गेला ।। मनीं नाहीं, जनीं नाहीं, वनीं भेटेल आशा ही । मला होती, परी आशा दुजी स्वप्राहुनी नाहीं ।।" रानात वसत भेटला नाहीं म्हणून निराश झालेला कवि घरीं यावयास निघाला. तों त्याला हाक ऐकूं आली. एका देवतेनें कवीचा हात आपल्या हातात घेतला, तेव्हाचा कवीचा अनुभव असा—" अहो ! दिव्याहुनी दिव्य स्वरुपाची जणूं खाणी । ब्रह्माड गोलाची उभी तेजस्विनी राणी ।। तिला पाहून स्वत्वाचें त्यजी सारें मला भान । कुणा ठावें कुठें होती वपू होते कुठें प्राण ।। " ती तेजस्वी देवता पाहताच कवीचें भान हरपले, आपलें शरीर कोठें आहे ? जीव कोठें आहे ? याची कशाचीच शुद्ध त्याला राहिली नाहीं. पण त्या देवतेनें कवीला प्रेमानें गोंजारलें. तेव्हा ' क्षणार्धीं मी बने मूल.' त्याला त्या देवतेनें माडीवर घेतलें, त्याच्याकडे प्रेमानें, हंसत पाहिलें. कवीला असा चमत्कार दिसूं लागला, " फुलें सारींच नक्षत्रें; खडे सारे हिरे मोतीं । भरे सौंदर्य हें विश्वीं, भरे नेत्रीं भरे चित्तीं । " निसर्गाचा प्रभाव तो हा ! आणि सरस्वतीचें, साहित्याचें

कार्यहि हेंच ! प्रतिभाशाली कवि फुलानी नक्षत्रें, खड्याना हिरे आणि मानवाना देव बनवितात, हेंहि या कवितेंत सूचित केले आहे, नाहीं कां ?

## विश्वव्यापी प्रेम

' सृष्टीची भाऊबीज ' ही कविता टिळकांच्या साऱ्या निसर्ग-काव्याचा कळस आहे. त्यात त्याचें प्रेम, प्रसाद व प्रतिभा हे तीनहि काव्यगुणाचे 'प्र'कार प्रकर्षानें प्रगट झाले आहेत. ' चंद्रकात राजाची कन्या ' ही साधी पण धावती चाल आणि सोपेसोपे शब्द व साधेसाधे अलंकार—असा बाह्यवेष असूनहि या कवितेंतील सौंदर्य—दृष्टि व भाव-वैभव अलाकिक आहे. पृथ्वी व ढग ही बहिण-भावाची जोडी भाऊबीज साजरी करते, हें सागताना कवि म्हणतो, " भाउबिजेची करी तयारी चार मास धरणी । ' हसुनी हसुनी घेइ हवे तें जलदापासोनी ॥ " जिकडे दृष्टि फेकावी, तिकडे सृष्टीमध्ये बहीण-भावाचे शुद्ध प्रेम क्रीडा करीत असल्याचे कवीला आढळतें. नदी ही बहीण व झाडें हे भाऊ. लाटाचीं तबकें हातात घेऊन नदी भावाना ओवाळते आणि झाडें आपल्या बहिणींना फुलाची ओवाळणी घालतात. ज्याच्याजवळ फुलें नाहींत, ते नुसती मान डोलावून आपले प्रेम दाखवितात—आणि त्यानेंही नदी प्रसन्न होते. ही कल्पना कवीनें किती नाजूकपणें माडली आहे, पहा—" निजलहरींच्या मिषें नदी ही तरूंना ओवाळी । कुणी एक, कुणि अनेक, सुमने ओवाळणि घाली ॥ ज्याच्या जवळीं काहि न द्याया तरु ते डोलोनी । प्रेम दाविती; स्वीकारीं तें सरिता हासोनी ॥ " जल-लहरी या बाहिणी; त्याचा भाऊ कोण ? तर फेस. म्हणून " लहरी अपुल्या शिरीं घेउनी कोमल फेनाला । कशा नाचती खेळविती लघु, रम्य भाउबाळा ॥ " कवि लाडिकपणानें एका फुलवेलीला विचारतो, "फुलवेली, मम कानामध्यें साग गडे ! पाहूं । भावामध्ये कोण तुझा गे आवडता भाऊ ? ॥ " आणि कवि आपणच सुचवितो कीं, वृक्ष हा तुझा भाऊ असेल. तेव्हा ती वेल त्याला झिडकारून उपरोधिकपणें व श्लेष साधून म्हणते, "पुरे पुरें झालें, ज्ञान तुझें बा कविकुळटिळका. " वृक्ष हा तर वेलीचा पति, बंधु नव्हे; असें ती वेल कवीला समजावते.

तेव्हां भुंगा हा तुझा भाऊ का ? असे कवि विनोदाने विचारतो. त्यावर वेल फणकाऱ्यानें उत्तर देते, " भुंगा म्हणजे भिक्षुक नि भाट ! ' तसेंच, ' वारा, सूर्य, ढग हेहि माझे भाऊ नाहीत ' असें वेलीनें सागून टाकलें; आणि ती–"म्हणे ' वेलिंना ओव्या गाई कोण साग पाहू ? भाउबिजेला तोच भेटला आज सखा भाऊ । ' संपलें ! वेलीचे व कवीचे संभाषण येथे संपले : आणि त्यातच सूचित झालें कीं, टिळकासारखा फुलवेडा कवि हाच वेलीला आपला भाऊ वाटतो. तो आपल्या बहिणीच्या घरीं आला आहे आणि प्रेमाच्या नजरेनें इकडेतिकडे पहात आहे. त्यामुळें त्याला बारीकबारीक, साधींसाधीं फुलेंहि हिऱ्यासारखीं वाटतात. " हे पाचूचे खडे, हिरकण्या सुंदरशा इकडे । नीलमणी हे, कण सोन्याचे, चित्रमणी तिकडे ॥ हीं गवताचीं, भूमिलताचीं फुले जना दिसती । दिसोत; याची कविच्या नयना ओळख परि पुरती । "

## मानसिक वैभव

आपल्या कल्पनाशक्तीचे विशाल पंख पसरून कवीने भावाबहिणीची आणखी एक भव्य जोडी शोधून काढली. ती म्हणजे " हीं कालाचीं दोन लेंकरे सुदर दिनरजनी । व्यवसायी बहु भाउराय परि शात पुरी भगिनी ॥ दिवस हा भाऊ व रात्र ही बहीण. भाऊ सदैव उद्योगी व बहीण स्वभावाने शात. असे प्रेमाचे खेळ बाह्य सृष्टीमध्यें अनंत चालू आहेत; आणि तसेच अंतःसृष्टीमध्ये–मानससृष्टीमध्येहि सुरू आहेत. ते पहाण्याची दृष्टि मात्र पाहिजे. ती टिळकाजवळ होती, म्हणून ते म्हणतात, " अन्तःसृष्टीमधें पहा हो चला काय चाले, बधुभगिनीच्या प्रेमरसाला किति भरतें आलें. ॥ " अहंवृत्ति ही बहीण व हर्ष हा भाऊ, भक्ति ही बहीण व विश्वास हा भाऊ, आणि शेवटीं दिवाळी ही बहीण व व्यवसाय हा भाऊ–अशा भावाबहिणींच्या जोड्यांचे प्रेम चराचरामध्ये पहावयास टिळकानीं रसिकाना शिकविलें. त्याच्या मनात सृष्टि सदैव खेळे–जशी मानससरोवरात हंसी. त्यामुळे ' अधळा झालों तर ' आपलें काहीं नुकसान होणार नाहीं असे टिळक म्हणतात. " सृष्टीचे मधु बाह्य रूप न

दिसो डोळ्यास चिता न ते। ती हसीसम मानसीं मम सदा सानंद हो खेळते ! " असें सागून त्यानीं मानवाच्या जीवन-मूल्यांचें जे दर्शन घडविलें आहे, ते महत्त्वाचे आहे. ते विचारतात, " जरी नेत्रे गेलीं तरि अनुरती काय सरली ?। जरी नेत्रे गेलीं तरि मति मला का विसरली ?। जरी नेत्रे गेलीं तरि हृदय का हरपले ?। जरी नेत्रे गेलीं तरि अशुभ ते काय घडले ? ॥ " मनुष्याचे मनुष्यपण त्याच्या प्रीतीमध्ये, बुद्धीमध्ये, भावनामध्ये साठविलेले आहे. ते सारें अधळ्याच्या ठायींहि शाबूतच असते. मग डोळे तेवढे गेले म्हणून काय अनर्थ ओढवला ? असा प्रश्न कवि करतो. अशी समतेची, अद्वैताची, प्रेमभावाची सारगीं कवीच्या अतरगीं सदैव वाजत असते. तो म्हणतो, " अन्तर्यामीं गडबड जंगी । तियेहि वाजे परि सारंगी ॥ नक्का कोणती पुसू मला, । ठाऊक ती माझी मजला. ॥ "

## समतेचा संदेश

या उच्च व उदात्त भूमिकेवर उभा असलेल्या कवीला हा थोर, हा लहान असला भेदभाव कसा जाणवणार ? ' कारण मी वेडा नुसता ' या कवितेत कवि आपला समभाव पुढील शब्दानीं वर्णन करतो, " सोडा अवघा राग अता । ओळखून घ्या मज पुरता । गिरिशिखरावर उभा असो, । दरींत किंवा कुणी वसो, । समान दोघेहि मजला; । कारण, मी पुरताच खुळा । ' वरी खालती ' । जगात म्हणती, । परतु दिसती । एकच मज अवघी सत्ता ! । कारण मी वेडा नुसता ! "

देव देवळात किंवा देव्हाऱ्यात नसतो, तो सर्व विश्वात विस्तारला आहे. मानव तेवढे देव व त्याची सेवा म्हणजे देव-पूजा, असा नवा मानवधर्म टिळकाना मान्य आहे. ते 'लोक-मित्र' या कवितेंत म्हणतात, "जनसेवा । ही ईश्वरसेवा । याविण दुसरा हेतु न ठावा, । प्रेम आणखी देव दिसावा । एक सदा ज्यातें । "

## मानवी कर्तृत्वाचा हुंकार

मानवी कर्तृत्वाचें बल व महत्त्वाकांक्षेचें क्षेत्र यांचें वर्णन टिळकानीं अत्यंत आवेशपूर्ण भाषेनें व विशाल मनोवृत्तीनें केलें आहे. ' पुरें जाणतों

मीच माझें बल' या स्वाभिमानपूर्ण नावाच्या कवितेंत ते गरजतात, " हा एक कक्षेंत छावा गजाचा, दुजीमाजि हा सिंह केकावतो। हा जाऊला अर्धमेला भयाने। लपोनी महाव्याघ्र डोकावतो; । हे पर्वताचे उभे क्षुद्र धोंडे महासागराचे पुढे पल्लव । बोला हवें ते, मला काय त्याचें ? पुरे जाणतो मीच माझें बल॥' एका बगलेत हत्ती तर दुसरींत सिंह, असे धरून हा 'भरत' वाघांना व पर्वताना व समुद्राना क्षुद्र लेखतो. मनुष्याला आत्मसामर्थ्याची जाणीव देऊन त्याला परिस्थितीवर स्वामित्व गाजविण्यास प्रेरणा देणारी अशी कविता मराठींत दुसरी क्वचितच असेल. कवि शेवटीं म्हणतो, " मी ओळखीले मला पूर्ण, आता कशाला मला पाहणें आरसे ?। माझ्यापुढें नित्य आत्मानुभूती, पहावे दुजे तर्क आता कसे ? "

अशाच स्फूर्तीने रसरसलेले टिळकाचे दुसरे काव्य म्हणजे ' रणशिंग '. केशवसुताची ' तुतारी ' पुढे ठेवून ते लिहिलेले उघड दिसते. अनुकरण असलें, तरी त्यात टिळकानीं आपले स्वत्व प्रगट केलेले आहे. 'बोंबाबोंब' या कवितेंत अशीच शिकवण आहे. केशवसुताच्या ' नवा शिपाई ' प्रमाणें टिळकानीं 'ब्राह्मण किंवा महार' ही कविता रचली. तींत ते म्हणतात, " मी ब्राह्मण वा महार मी,। गणीं न कवणालाच कमी ।" ही समतापूर्ण दृष्टि ठेवून मनुष्यत्वाला मोठेपण ते देतात—" या सृष्टींतिल दिव्यपण । तेच तेंच हें मनुजपण । मागल्याची ही ठेव । हीस्तव देइन मी जीव ॥ "

## अढळ देशभक्ति

मानवधर्माची ही पताका खांद्यावर असली, तरी देशभक्तीची पाऊलवाट टिळक विसरले नव्हते. ते खिस्ती झाले तरी गर्वाने गर्जून सांगतात, " हिंदभूमि माझी जननी । आले हीच्या कुशींतुनी-। हिरेच अवघे माझे ते । मन्मन त्या मोहुन जाते। मलात पडले। खनींत दडले। मुकुटीं जडले। अवघे उचलुन घेइन मी । जन्मभूमिसेवाधर्मी ॥ पाच कशाचे, हे जितुके। हिंदभूमिबालक तितुके । मम देहाचे प्राण खरे । कसेहि असले तरि सारे ॥" जेवढे म्हणून हिंदमातेचे पुत्र, तेवढे सारे माझे प्राण-ही भूमिका धर्मांतरित होऊनहि टिळकानीं आमरण ठेवली. ' तू खिस्तरूप हो ' असें

जें ध्येय आपल्याला पटलें, ते त्यानीं कोठे कोठें माडलें आहे. पण स्वदेश व स्वभाषा यांचा विसर त्याना कधींच पडला नाहीं–त्यांचा अभिमान त्यानीं कधींच सोडला नाहीं. ‘ माझ्या जन्मभूमीचें नाव ’ या डौलदार कवितेत तो देशभाषेचा अभिमान, हत्तीच्या सोंडेतून उडणाऱ्या जलधाराप्रमाणे, नाचत आहे. “तुझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी । झालो तरी गे तृषा मन्मनाची कधींही कधींही न होणें कमी । आई ! गुरुस्थान अंतीं जगाचे तुझे ! यात शंका न काहीं जरी । सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मीं न कोठें तरी ! ॥ ”

भारतमातेचे वाङ्मय समुद्रासारखे अपरपार, त्यातील मी एक मासा आहें, समुद्रांत राहिलों तरी माझी तहान भागलेली नाहीं अशी आपली भूमिका निवेदून कवि राष्ट्रमातेला उद्देशून म्हणतो, “ तूं साऱ्या जगाची गुरु आहेस. तुझ्याइतकें सामर्थ्य साऱ्या जगात दुसऱ्या कोणापाशीं नाहीं. ” या माझ्या देशातील अन्नपाणी म्हणजे अमृत होय, या भावनेने उचंबळून येऊन कवीचे मन म्हणते,“ वारा तुझ्या स्पर्शने शुद्ध झाला मला लाधला ! भाग्य हें केवढे । माते ! स्वयें देशि जे अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढे । तूं बाळगीशी मला स्कंधिं–अकीं ! सुखाची खरी हीच सीमा पुरी! सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मीं न कोठें तरी ! ”

‘ जो जननीचा, जो जनकाचा गे तोच तुझाही मान ’ असा गौरव करून कवि ‘ प्रियकर हिंदीस्तान ’ मध्ये देशप्रेमाचे गीत गातो, ते असें– “ प्रियकर हिंदीस्तान । अमुचा प्रियकर हिंदीस्तान । हा अलकार हो भूगोलाचा । यास नसे उपमान । सर्व सुखाची खाण । अमुच्या सर्व सुखाची खाण ॥ हें अभिमानाचें, सौभाग्याचें अमुच्या रम्य निधान ॥ ”

## बालमनाचें स्वरूप

फुलाइतक्या मुलावर कविता टिळकानीं केलेल्या नसल्या, तरी दोहोंची रम्यता व मृदुता समानच आहे. ‘ लेकराची जिज्ञासा ’ या कवितेंत मुलाच्या चौकस स्वभावाचे शब्दचित्र त्यानीं रेखाटलें आहे व शिक्षकाचें महत्व वार्णिलें आहे. ते म्हणतात, “ हा बाळ पाहून अनेकविधा पदार्थां ।

नाचे हसे पुसतसे वडिलास अर्था । जिज्ञासु हा सकल विश्व शिकावयाला । तो धन्य ! तो सुकृति ! जो शिकवील याला ॥ " बालकाचे मन विकासशील असतें हा विचार टिळक निरनिराळ्या रूपकानीं खुलवून कसा सागतात, पहा—" हे फूल पाहत असे उमलावयाला । हे चंद्रबिंब चढतें उदयाचलाला । बाहेर अकुर निघो बघतो द्रुमाचा । होतो विकास शिशुच्या मृदु मानसाचा ॥ " याच रूपकाचा विस्तार करण्याचेंहि चातुर्य टिळकानीं दाखविलें आहे, ते असे—" जो होउनी अनिल हें फुलवील फूल । सारील दूर शशिचें घनमेघजाल । कीं अंकुरास जल जो पुरवील माळी । तो धन्य यत्करगता शिशुबुद्धि झाली ॥ " शिक्षकाचे कर्तव्य कोणतें व त्याचें महत्त्व काय ? याचे यथार्थ स्वरूप सागणाऱ्या या चार ओळी कोणत्याहि विद्यालयाचे शिरोभागीं पिंपळपानाप्रमाणे ब्रीदवाक्य म्हणून शोभणाऱ्या नाहींत काय ?

' एक अमेरिकन मुलगी ' कशी दिसत होती, याचें मनोहर शब्द-चित्र टिळकानीं रेखाटले आहे, ते असे—" वाटे उषाच हसते फिरते जगात । कीं स्फूर्ति हीच कविची मधुरूप घेत । अव्याजता रसिकता जणुं मूल झाली । स्वर्गांतुनी सहज भूवर आज आली ॥ " वात्सल्यानें ओसंडणाऱ्या टिळकाच्या हृदयांतून निघालेले बोल ' माझी ताई ' या काव्यात ऐकावयास मिळतात. लडिवाळपणाने कवि म्हणतो, " ताइ, तूं फूल गडे माझें । ताइ, तू नक्षत्रचि माझें । ताइ, तूं रत्न गडे माझें । ताइ, तूं पांखरूं गे माझे । या सर्वांहुन गोड गोड गे शील—रूप तूझें । यांची उपमा नच साजे ॥ फूल हें हसते, तूं हससी । परी तव अर्थ किती हास्यीं । काय फुलाच्या मला पाकळ्या दावितील मौजे । जसें हे ओठ गडे तुझे ॥ "

केशवसुत हे टिळकाचे जसे गुरु, तसे बाल-कवि हे त्यांचे शिष्य. त्यांचेवर त्यांनीं पुत्राप्रमाणें प्रेम केलें. टिळकाच्या घरींच बालकवि रहात. त्याचें कवि-मन टिळकांच्या व त्याच्या पत्नींच्या वत्सल रसावर सारखें पोसत गेलें. एकदां बालकवि नगरहून पुण्यास गेले असता टिळकानीं एक भावनापूर्ण कवन रचलें. त्यांत ते आर्तस्वरानें कळवळून विचारतात—

" पांखरा ! येशिल का परतुन ? । मत्प्रेमानें दिल्या खुणातुन । एक तरी अठवून ? । हवेसवें मिसळल्या माझिया । निःश्वासा वळखून ? । वाऱ्यावरचा तरंग चचल ! जाशिल तूं भडकून ! थाब, घेउं दे रूप तुझें हे । हृदयीं पूर्ण भरून । जन्मवरी मजसवे पहा ही । तव चचूची खूण ! विसर मला, परि अमर्याद जग । राही नित्य जपून । ये आता घे शेवटचे हे । अश्रू दोन पिऊन ॥" या लहानसर काव्यातील शब्दाचें नाजूकपण वर्णावें, कीं भावनेचे हळुवारपण स्तवावे ? हेंच कळेनासे होते.

## कवीची भूमिका

स्वतःच्या काव्याला टिळक किती कोमल मानीत, जिवापाड जपत, याचें सुंदर चित्र 'कवीची विनवणी' या कवितेत पहावयास सापडते. ताम्बे यानीं 'कुस्करूं नका हीं सुमने' अशी रसिकाना प्रार्थना केली आहे. तीच भावना टिळकानीं निराळ्या भाषेने व्यक्त केली आहे, ती अशी—" पहा ! उघडिलें हृदयाला, । यात सुखे घाला भाला ! कोमल, कौशल्ये नटला । कर तुमचा जरि किति असला । तरी तयाने । माझीं कवने । जरा स्पर्शणें सहन न होणे कधि मजला ! । याहुन जीव बरा गेला ! ॥ कारण, कवने नच माझीं । नच तुमचीं,—मी गातो जीं । हीं निःश्वसिते । कोण सोडिते । मम हृदयीं ते—। विचारुनी, भिउनी त्याला । पुढे करा मग कर पुला ॥" आपलीं कवने म्हणजे आपल्या हृदयाचीं स्पदने. म्हणून त्याना स्पर्श करूं नका, त्यापेक्षा माझ्या छातींत भाला खुपसून मला ठार करा, असें कवीचें सागणे आहे. याचा अर्थ त्याला रसिक नको आहेत असा मात्र नव्हे. उलट 'कवि आणि रसज्ञ' याचे नातें किती जवळचे असतें हे सागताना तो म्हणतो, " कमला रवि चंद्र चंद्रकाता, । जल मीनाप्रति, वाक्प्रवाह अर्था, । कवितेस रसज्ञता, न झाली । क्षणही हीं कधि युग्मकें निराळीं ! ॥" कमल व सूर्य, चंद्रकात व चंद्र, मासा व नदी, वाणी व अर्थ याप्रमाणें कविता व रसिक याचे नातें अतूट आहे.

कवीला स्फूर्ति कोठून येते ? त्याला प्रतिभा कशी वश होते ? त्याच्या हातून कविता कशा निर्माण होतात ? या नेहमींच्या प्रश्नांचीं उत्तरें प्रश्ना-

च्याच स्वरूपात देणारी ' कवि' ही टिळकाची कविता अतिशय प्रसन्न आहे. तींत ते विचारतात, " न कळे कोठुन होते लतिकेच्या ठायिं पुष्प-परिपूर्ति । न कळे केव्हा कैशी होते कवीच्या मनाप्रति स्फूर्ति । न कळे कोठुन येती द्विजराज नवे वसतकालीं ते । न कळे कोठुन येती धावत तव शब्द भेटण्या कविते । न कळे कोठुन येते शोभा द्यायास हास्य अधराला । न कळे कोठुन येतो प्रसाद कविच्या नवीन काव्याला ॥ "

## भक्तिरसाचे कल्लोळ

जाति–धर्म–देशाच्या वर आकाशाप्रमाणें साहित्य पसरलेले असतें, याची प्रचीती टिळकाची कविता वाचताना येते. फादर स्टीफन्स या ख्रिश्चन कवीनें पूर्वी ' जैसी पुष्पामाजी पुष्प मोगरी । कीं परिमळामाजीं मोगरी । तैसी भाषामाजी साजिरी । मराठिया ' अशा अलकारिक भाषेने मराठीचा महिमा गाइला होता. पण स्वतत्र व सरस अशी काव्यरचना करून मराठी भाषेला सपन्न व समर्थ करणारे रे. टिळक हेच पहिले खिस्ती कवि. त्यानीं तीस वर्षे सतत विपुल काव्य–रचना केली. त्यात सृष्टिप्रेमाने ओथब-लेलीं कवने प्रमुख आहेत. इतर कवनामध्ये शृगार, करुण व वत्सल हे रस खेळत आहेत. भक्तिरसाचे कल्लोळ असे अभगहि त्यानीं रचले आहेत. प्रसन्न भाषा व प्रेमळ भावना या दोन गुणामुळे त्याचा ' अभगाजलि ' हृदयगम झाला आहे. " तुझ्या पडोनिया गळा । कठ करोनी मोकळा ॥ रडावेसें मला वाटे । ऊर वारवार दाटे ॥ येई प्रभुराया येई । धरी मला ये हृदयीं । " अशी तळमळीची वाणी या अभगातून ऐकू येते. खिस्त असो वा कृष्ण असो,—भक्ताचा आर्त धावा रसिकाच्या अंतःकरणाचा ठाव घेतो.

टिळकाच्या कल्पनेंत उत्तुगता किंवा नावीन्य नसते, पण सहजता व रम्यत्व असते. 'अनल जसा अनिलाने' 'नक्षत्रा घन जैसे', 'दुग्धि तक्राच्या बिंदुसे जहालें' अशा जुन्या कल्पनाच त्यानीं अनेक ठिकाणीं माडल्या आहेत गोविंदाग्रजाच्या कल्पकतेमधील नावीन्याचे यौवनसुलभ तेज टिळकांच्या लेखणींत जसें नाहीं, तसेंच केशवसुताची क्रातिकारक तडफाहि

नाहीं. पुनरुक्ति करून पाल्हाळ करण्याचे व कवितेला 'तात्पर्याची' जोड देण्याचे दोष त्याच्या काव्यात आहेत. क्वचित् संस्कृतप्रचुर किंवा क्लिष्टहि शब्द-रचना किवा वाक्यरचना ते करतात, पण सामग्र्यानें पहाता प्रसादपूर्ण शब्द-रचना व प्रेमळ भावना यांचा संगम घडविणारा टिळकाइतका यशस्वी कवि आधुनिक मराठी कवींमध्ये दुसरा कोणीच झाला नाहीं हें निर्विवाद.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) रे टिळक याचे जीवनचरित्र थोडक्यात लिहा.

( २ ) 'वनवासी फूल' 'सुशीला' 'माझी भार्या' या काव्यातील विषयाचा साराश लिहा

( ३ ) रे. टिळक याना 'मुलाफुलाचे कवि' असे का म्हणतात ?

( ४ ) काव्यातील प्रसादगुण म्हणजे काय ? टिळकाची कविता प्रसादपूर्ण आहे हे उदाहरणे देऊन सिद्ध करा

( ५ ) टिळकाच्या 'अभंगाजली' बद्दल माहिती लिहा.

( ६ ) 'पर्वतारोहण', 'सृष्टीची भाऊबीज', 'पुरे जाणतो मीच माझें बल', 'माझ्या जन्मभूमीचे नाव' या कविताचे रसग्रहणात्मक विवेचन करा.

# बॅ. सावरकर : : : : २

एकाद्या जागृत ज्वालामुखीच्या पोटात रटरटा शिजणारा जो जळजळीत अग्नि-रस असतो, त्यानेंच जणु काहीं आपले काव्य बॅ. सावरकर लिहीत असतात. ' विनायक ' या नावाने त्यानीं दहा हजार ओळींहून



अधिक भरेल, इतकी विपुल काव्य-रचना केली आहे व " वैनायक " नावाचें नवे वृत्तहि घडविले आहे. विनायकाचे–म्हणजे गरुडाचे–इतर गुणहि त्याच्या काव्यात ओतप्रोत भरलेले आहेत. गरुडाची भरारी जितकी उंच, तितकीच सावरकराची कल्पकता, गरुडाची झेप जितकी जोरदार, तितकीच सावकराची भावना विशाल, आणि पंखाची फडफड करीत अंतराळांतून धावणाऱ्या गरुडाचा जसा विलक्षण वेग, तशीच सावरकराचीं ओघवती व ओजस्वी भाषाशैली. गरुडाचें उड्डाण अमृत-कुंभाच्या प्राप्तीसाठीं, तसेंच सावरकराचें काव्य–लेखन स्वातंत्र्य-लाभार्थ. अशा अलौकिक गुण-संपदेमुळे या विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात तरी बॅ. सावरकराइतका प्रतिभाशाली कवि मराठींत दुसरा कोणीच ठरत नाहीं. सरस्वतीच्या उद्यानांत कोणी कवि कोकिल असेल, तर कोणी मयूर असेल, कोणी चडोल असेल तर कोणी भारद्वाज असेल; कोणी शुक असेल–काकहि असेल; पण पक्षिराज गरुडाचें स्थान विनायकराव सावरकर याचेंच.

## कवित्त्वाचे अंकुर

श्री. विनायक दामोदर सावरकर याचा जन्म भगूर या गावीं ता. २८ मे १८८३ रोजीं झाला. ' माला ' कार चिपळूणकर याना दिवंगत होऊन यावेळीं नुकते एक वर्ष झाले होतें; त्याच्या ' निबंधमालेचे ' पडसाद अद्याप मराठी हृदयात जोराने उमटत होते. सावरकरानीं ' निबंधमाले 'चीं पारायणे लहानपणींच कित्येक वेळा केलीं होतीं. मराठ्याच्या बखरी अनेकवार वाचून ऐतिहासिक पुरुषापासून त्यानीं स्फूर्ति मिळविली. प्राचीन काव्याचा सुरस ' मेला ' असलेले ' नवनीत ' तर त्यानीं बहुतेक तोंडपाठच केले. वक्तृत्वकला त्याच्या जिव्हेवर नर्तन करीत असे ! काव्यशक्तीहि त्याच्या ठायीं बालपणापासूनच अंकुरित झाली होती. दहाव्या वर्षीं त्यानीं एक पोथी रचिली आणि बाराव्या वर्षीं त्याचा स्वदेशाचा फटका ' जगद्धितेच्छु ' त प्रसिद्ध झाला. ' सर्व पेशव्यात थोर पेशवे कोण व का ? ' हा निबंध सतरावे वर्षी त्यानीं लिहिला. ' करमणूक ' पत्राने लावलेल्या चढाओढींत तो सर्वश्रेष्ठ ठरून त्याला बक्षीसहि मिळालें.

वयाच्या पंधराव्या वर्षीं ! समोर अष्टभुजा भवानीची मूर्ति आहे, नीराजनाचा प्रकाश पडलेला आहे, रात्रीची गंभीर शांतता पसरलेली आहे, रोहिडेश्वरापुढे स्वराज्याची शपथ घेणाऱ्या बाल–शिवाजीची मूर्ति चित्तात खेळत आहे, अशा वेळीं विनायकानें देवीच्या चरणावर हात ठेवून प्रतिज्ञा केली कीं, ' देशाचे स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठीं सशस्त्र क्रांतीचा केतु उभारून मी मारता मारता मरेतो झुंजेन. "

## लेखनकला व वक्तृत्वकला

पंधरावे वर्षीं सावरकरानीं गणेश–उत्सवात प्रकट व्याख्यान दिलें व वक्तृत्त्व–स्पर्धेत पहिल्या क्रमांकाचें बक्षिस मिळविले. आणि याच सुमारास " नाशिकवैभव " या पत्रात त्यानीं अग्रलेख लिहिला. वक्तृत्वस्पर्धेत सावरकराना बक्षिस काय मिळाले ? तर प्रा. शिवरामपंत परांजपे यांचें ' काळ ' पत्र. त्यातील काव्य–स्फूर्ति व स्वातंत्र्य–भक्ति पाहून सावरकराचें त्याच द्रव्यानें घडविलेलें हृदय उचंबळू लागलें. सावरकर हें मान्य करतात

कीं, "जर मला माझ्या क्रांतिकारक जीवनाच्या स्फूर्तीचे गुरुपद कोणास तरी देणेंच पडेल, तर तें मी 'काळा'सच देऊ शकेन." ता. १ जानेवारी १९०० रोजीं त्यानीं 'मित्र-मेळा' काढला. त्यामार्फत शिवाजी-उत्सव व गणेशोत्सव हे कार्यक्रम प्रकटपणे करीत, पण बंदुक-तलवारींचे शिक्षण गुप्तपणे घेत.

## क्रांतीची उपासना

बाल सावरकरावर कांहीं कौटुंबिक आपत्ति कोसळल्या. प्लेगनें कहर केला. वडील, चुलते व दोन्ही भाऊ-या सर्वांना या 'गाठ्या तापानें' गाठलें. त्यापैकीं वडील १८९९ मध्यें प्लेगने निधन पावले. आई महामारीने १८९२ सालींच मृत्यु पावली होती. चुलतेहि प्लेगनेंच गिळले. बाबा (गणेश) व बाळ (नारायण) हे दोघे भाऊ मात्र वाचले. अशा धामधुमींतहि सावरकर १९०१ सालीं मॅट्रिक झाले. त्याच वर्षीं त्याचा विवाह झाला. १९०२ ते १९०५ हीं चार वर्षे त्यानीं पुणे येथे फर्गसन कॉलेजमध्यें काढलीं. पण त्याचे सारे लक्ष असे कॉलेजबाहेरील लो. टिळक व प्रो. परांजपे याच्या भाषणाकडे व चळवळींकडे. त्यावेळीं बंगालची फाळणी सरकारनें केल्यामुळें साऱ्या राष्ट्रात क्रोधाची आग पेटली होती. तिची खूण म्हणून पुणें येथें लकडी-पुलाच्या (आता संभाजी-पुलाच्या) खालीं विदेशी कपड्याची प्रचंड होळी करण्यात आली. तिचा पुढाकार घेतला होता सावरकरानीं अध्यक्ष होते लो. टिळक व वक्ते होते स्वातंत्र्यकवि प्रो. परांजपे! मग सभेचा थाट काय विचारावा!

१९०५ च्या डिसेंबरात सावरकर बी. ए. झाले व १९०६ च्या जूनमध्यें ते इंग्लंडला रवाना झाले. त्यासाठीं त्याच्या सासऱ्यानें त्यांना द्रव्य साहाय्य केलें. शिवाय शामजी कृष्णवर्मा याचीहि मदत होती. शामजींकडे सावरकराना शिफारस-पत्र दिलें लो. टिळकानीं. इंग्लंडमध्यें 'अभिनव-भारत' या नावाची संस्था सावरकरानीं स्थापन केली. तेथून हिंदुस्थानात पिस्तुलें पाठविण्याचा उपक्रम सुरू झाला. १९०९ सालीं, जुलै महिन्यात, इंग्लंडात मदनलाल धिंग्रा यानीं कर्झन वायलीचा खून

केला आणि त्याच वर्षी डिसेंबर महिन्यांत नाशिक येथें अनंत कान्हेरे यानीं जॅकसनला ठार केलें. याचा एक परिणाम म्हणजे ता. १३ मार्च १९१० रोजी सावरकराना इंग्लंडात अटक झाली. तेथून त्याना ता. १ जुलै रोजीं हिंदुस्थानला आगबोटींतून चौकशीसाठीं पाठविण्यात आले. आपल्यापुढें मृत्यु उभा आहे हें सावरकराना दिसलें.

## जन्मठेपीच्या यातना

अशा वेळीं निर्वाणीचे धैर्य सावकाराच्या हृदयात स्फुरले. त्याना घेऊन जाणारी आगबोट फ्रान्सच्या किनाऱ्यावर मार्सेलिस बदरात उभी होती. तेव्हा आग्ऱ्याहून सुटणाऱ्या शिवाजीमहाराजाचे स्मरण करीत त्यानीं त्या आगबोटींतून पळून जाण्याचें ठरविले. ता. ८ जुलै रोजीं पहाटेच्या वेळीं एक फूट रुदीच्या भोकातून त्यानीं आपले शरीर समुद्रात झोकून दिले. कातडी सोलली गेली, तरी ते दीडशे फूट समुद्र पोहून गेले. शिपायाचा पाठलाग सुरू झाला. त्याचीं पिस्तुले उडूं लागलीं. किनाऱ्याला पाय लागताच सावरकर तीनशे यार्ड तसेच धावत–पळत सुटले. पण फ्रेंच शिपायानें लाच खाल्ली, नागरिक स्वातत्र्याची पायमल्ली केली आणि आपल्या देशाचा कायदा मोडून सावरकराना इग्रज शिपायाच्या स्वाधीन केलें. शिपायाच्या कसले ? यमदूताच्याच ! कारण, ता. २३ जुलै १९१० रोजीं हिंदुस्थानात परत आल्यावर सावरकराना दोन जन्मठेपींची शिक्षा झाली.

दोन जन्मठेपीची शिक्षा ! ती भोगण्यासाठीं सावरकराना अदमानला जाणाऱ्या बोटीवर ता. ४ जुलै १९११ रोजीं चढविण्यात आलें ! तेथें मृत्युहूनहि भयंकर अशा आपत्ती भोगून, सुमारे तेरा वर्षांनीं, ता. ६ जानेवारी १९२४ रोजीं त्याना हिंदुस्थानात आणण्यात आले. रत्नागिरी येथे सुमारे तेरा वर्षे स्थानबद्ध अवस्थेंत त्यानीं काढल्यानंतर ता. १० मे १९३७ रोजीं ते पूर्ण मुक्त झाले. या अवधींत त्यानीं हिंदुसभेचे कार्य केले. त्या सभेचे ते सतत पाच वर्षे अध्यक्ष होते. यानंतर त्यांच्यावर सन्मान व सत्कार याची वृष्टि होत गेली. १९३८ सालीं मुंबई येथें भरलेल्या ‘मराठी साहित्य समेलना’चे ते अध्यक्ष होते. १९४३ सालीं

ता. २८ मे रोजीं, त्यांच्या साठी–समारंभानिमित्त त्याना एक लाख वीस हजार रुपयाची थैली पुणें येथे अर्पण करण्यात आली.

१९४८ च्या मेपासून १९४९ च्या फेब्रुवारीपर्यंत गांधी–खून–खटल्यात ते गुरफटले गेले. आपल्या बावन्नपानी जबानींत त्यांनीं जेव्हा गहिंवरलेल्या कंठानें, " माझी मातृभूमी स्वतंत्र झालेली पहाण्यास मी जिवत आहें म्हणून मी स्वतःला धन्य समजतो. " असे आनंदाचे उद्गार काढले, तेव्हा त्याच्या—व इतराच्याहि—डोळ्यातून अश्रु ओघळले. न्यायमूर्तींनीं त्याना निर्दोषी म्हणून सोडून दिले.

## प्रतिभेचे नाना विलास

सावरकरानीं आपला सारा जन्म अन्यायाशीं प्रत्यक्ष झुज खेळण्यात घालविला असल्याने त्याच्या काव्यात निराशा, विफलता, दीनता, पलायनवाद याचें धुके पसरलेलें नाहीं, तर वीरता, भव्यता, ओजास्विता व भीवष्यसूचकता याचीं तेजस्वी किरणे लकाकत आहेत. ' जगन्नाथाचा रथोत्सव ' किंवा ' अनंताची आरती ' यासारख्या चिमुकल्या कवनात कल्पकतेची केवढी भव्यता आहे! ' सागरास, ' ' सात्वन ' वा ' मृत्युपत्र '—अशा कविता म्हणजे उदात्त करुणरसाच्या गंगायमुनासरस्वतीच. ' तारकास पाहून ' अथवा ' प्रभाकरास ' यामध्ये शुद्ध काव्य-कल्पनेचा रम्य विलास आढळतो. आणि त्याचे ते कमलासारखे कोमल ' कमला ' काव्य, ते नाना रसानीं ओथंबलेलें ' गोमंतक ' खंडकाव्य, ते वीररसाला उधाण आणणारे बाजी-तानाजीप्रभृतींचे पोवाडे—तोडच नाही याना अवघ्या मराठी वाङ्मयात.

## चरित्राची पार्श्वभूमि

सावरकराचें काव्य म्हणजे कवित्व व क्रातिकारकत्त्व याचा सगम. ' विद्युत्तंतूंनीं विणलेलें ' त्याचें क्रातिकारक जीवन आणि त्यातून स्फुरलेले तेजाळ काव्य! त्या जीवनाच्या आकाशात त्याचीं काव्यें नक्षत्राप्रमाणे तळपत आहेत. नाहीं तर नुसती ' झोप ' ही त्याची कविता एरवीं

वर्णनपर म्हणून बरी वाटली असती, पण अंदमानातील दिवसभरच्या यमयातनानंतर येणाऱ्या झोपेचें वर्णन सावरकरानीं केले आहे, ही पार्श्व-भूमि समजली, म्हणजेच त्या कवितेचे खरे मर्म व महत्त्व ध्यानीं येते. त्यानीं आपली जशी सारी गुणसंपदा, तशीच आपली प्रतिभाहि मातृ-भूमीच्या सेवेलाच वाहिली होती. १९१० सालीं इंग्लंडमध्ये अटक झाल्यावर सावरकरानीं लंडनच्या तुरुंगातून 'माझे मृत्युपत्र' हे करुणोदात्त काव्य आपल्या वहिनीस पाठविले. त्यात ते म्हणतात, 'हे मातृ-भूमि। तुजला मन वाहियेले। वक्तृत्व—वाग्विभवही तुज अर्पियेले। तूंतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला। लेखाप्रति विषय तूंचि अनन्य झाला ॥" स्वातंत्र्य हाच त्यांचा एकमेव विषय. त्या यज्ञाच्या भूमीवर त्यानीं स्वतःचा देह वाहिला—आपले लहानथोर बंधुहि त्याच स्वातंत्र्य यज्ञातील आहुति ठरल्या. ही आपली उच्च भूमिका कवि किती स्वाभिमानाने सांगतो पहा—"त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाळ झाला। त्वत्स्थंडिलीं बघ अतां मम देह ठेला। हे काय, बंधु असतो जरि सात आम्ही। त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मीं ॥"

स्वातंत्र्य—लक्ष्मीची पूजा बांधण्यात आपण गुंतल्यामुळे काव्य—लक्ष्मीची षोडशोपचारे पूजा आपल्या हातून होत नाहीं अशी रुखरुख सावरकरांना सदैव होती. १९१३ सालीं डॉ. रवींद्रनाथ टागोर यांना नोबेल पारितोषिक मिळाल्यावर त्यांच्या अभिनंदनपर कविता सावरकरानीं केली. तींत स्वतः-ची काव्य-विषयक भूमिका ते पुढील काव्यमय शब्दानीं वर्णितात—"देवळात जगदंबेचा। हरू ताप पुजारी तीचा। लघु खंड उगाळी साचा चंदनी ॥ झिजझिजत सहाणेवरती। लघुखंड तो तुला देती। घे ख्यात तोरणा प्रणती। मानुनी ॥" श्रीशारदेच्या मंदिराला तोरणाप्रमाणे शोभा-दायक काव्य आपण रचले असते, पण ते कार्य सोडून आपण मातृभूमीच्या अंगाचा दाह शांत करण्यासाठीं सहाणेवर चंदन घाशीत बसलों आहें व व त्याचा लेप तिला लावीत आहों,' असे आपल्या काव्याचे स्वरूप सावर-कर वर्णितात. राष्ट्राच्या पारतंत्र्याच्या नरक-यातना संपाव्यात, म्हणून ते अंदमानच्या नरक-यातनांत जाऊन पडले. कष्ट, छळ, अपमान, हालअपेष्टा

इत्यादींच्या अग्निशय्येवर पावलें टाकताच ते काव्याचीं कमलें फुलवीत. "पोळयातुनि त्या मधमाशा । लघु लघु नीडीं निज जैशा । गोड कल्पना तशा तदा । " त्याच्या डोक्यातून निघत. काव्यानदाचा मध ते चाखीत आणि त्यामुळे भोवतालीं यातनाची आग धगधगत असतानाहि "मम मस्तिष्कीं शत गाणीं । गुणगुणती मंजुळ वाणी । शत सनयातुनि परि त्याही । शकू सामावत ते नाहीं ॥ "

## सृष्टि-सौंदर्याशीं समरसता

डोळयासमोर मृत्यु उभा ठाकला, तरी त्याच्या हृदयात नवीन काव्याचा जन्म होत असे. साता पहाऱ्यात त्याना डाबून ठेवले असताना चुकून केव्हा तरी चद्राची कोर दिसताच त्याच्यातील 'बाल-कवि' जागा होतो व आनंदानें नाचत-बागडत गातो, "कोर कोवळ्या चंद्राची !-ती पोर पोवळया ओठाची ! ॥ " भीषण परिस्थितीवरहि मात करण्याचें काव्य-शक्तीचे हें केवढे सामर्थ्य! चोहोबाजूला निखारे पेटलेले असतानाहि हृदयात ' आनंदाचा पूर ' वाहूं लागावा, 'हसू निके लोटावे, 'चुटचुटक्या आणि मिटमिटक्या ' असे स्वच्छदी शब्द सुचावे ही प्रतिभेची केवढी विलक्षण जादू !

## दुर्दम आशावाद

याच दुर्दम्य मनःसामर्थ्यावर सावरकर संकटाचे सागर तरून गेले. ते इंग्लंडला गेले व क्राति-कार्य करूं लागले, तेव्हापासून त्याचे जीवित तरवारीच्या धारेवर टांगले गेले. आपल्याला आता अटक होणार व आपण इंग्लडातील तुरुगात झिजून झिजून मरणार असें भाविष्य त्याना दिसूं लागले ! ते हिंदुस्थानातून तेथें गेले होते कोणत्या आशेने आणि भवितव्य काय ठरूं लागलें ! राष्ट्राला नसलेले स्वातंत्र्य मिळविणें दूरच, पण आपले असलेले वैयक्तिक स्वातंत्र्यहि नष्ट होणार-हें भविष्य त्याना दिसू लागलें. अशा निराशामय अंधारातूनहि जी वीज चमकून गेली ती म्हणजे 'सागरास ' ही कविता. तींत त्याची महत्त्वाकाक्षा, त्याची निराशा, त्याची मायभूमीवरील भक्ति, त्याची विरह-व्याकुलता, त्याची भेटीची

तळमळ—हे सारे गुण प्रतिबिंबित झाले आहेत. समुद्रकांठीं बसून सागरास उद्देशून ते म्हणतात, "ने मजसी ने परत मातृभूमीला। सागरा, प्राण तळमळला। भूमातेच्या चरण—तला तुज धूतां। मीं नित्य पाहिला होता। मज वदलासी अन्य देशीं चल जाऊ। सृष्टिची विविधता पाहूं। तइं जननी—हृद्—विरहशंकितहि झाले। परि तुवा वचन तिज दिधलें। मार्गज्ञ स्वयें मीच पृष्ठि वाहीन। त्वरित या परत आणीन।"

समुद्र, मातृभू व स्वतः याना व्यक्तिस्वरूपें देऊन त्यांचा संवाद या काव्यात वर्णिला आहे. प्रथम सागर सावरकराना म्हणतो, 'जगाची मौज पहाण्यासाठीं परदेशाला जाऊं या, चल' हें ऐकताच राष्ट्र—मातेच्या हृदयात भीति उत्पन्न झाली कीं, आपला हा लहानगा मुलगा दूर जाणार कीं काय? विरहाच्या शकेने तिचे हृदय भरून गेले. पण स्वार्थी वाटाड्याप्रमाणे सागराने भारतमातेला आश्वासन दिले कीं, 'मी माझ्या पाठीवरून वाहून याला नेईन व परत लवकर आणीन.' यावर विश्वास ठेवून व मातृभूमीच्या उद्धारासाठीं अधिक सामर्थ्यशाली बनण्यासाठीं सावरकर समुद्रमार्गाने हिंदुस्थानातून इंग्लंडला गेले. पण त्याना तेथे अनुभव काय आला? "शुक पंजरिं वा हरिण शिरावा पाशीं। ही फसगत झाली तैशी। भूविरह कसा सतत साहुं यापुढती। दशदिशा तमोमय होती। गुण—सुमने मीं वेचियलीं या भावे। कीं तिनें सुगंधा घ्यावे। जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा। हा व्यर्थ भार विद्येचा। ती आम्रवृक्ष वत्सलता। रे। नवकुसुमयुता त्या सुलता। रे। तो बाल गुलाबहि आता। रे। फुलबाग मला हाय पारखा झाला। सागरा, प्राण तळमळला॥" पोपट पिंजऱ्यात अडकावा किंवा हरिण जाळ्यात सापडावा, त्याप्रमाणे सावरकराची फसगत झाली. मातृभूमीची भेटच अंतरली. सर्वत्र अंधार दिसूं लागला. तिच्या सेवेसाठीं वेचलेलीं फुलें सुकून जाऊं लागलीं. तिच्या उद्धारासाठीं संपादिलेली बॅरिस्टरीची विद्या फोल ठरूं लागली. स्वदेशातील आप्त-मित्रहि दुरावले.

## उज्ज्वल राष्ट्र—प्रेम

सावरकराची मातृभूमीवर इतकी अपार निष्ठा कीं, तिच्यापुढें त्यांना

इतर सारे देश तुच्छ वाटत ! स्वदेशातील झोपडीसुद्धा परदेशांतील राजवाड्यापेक्षा अधिक सुखाची, ही आपली भावना प्रगट करतांना ते म्हणतात—" नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा । मज भरतभूमिचा तारा । प्रासाद इथे भव्य परी मज भारी । आइची झोपडी प्यारी । तिजविण नको राज्य, मज प्रिय साचा । वनवास तिच्या जरि वनिंचा ॥" अशा आपल्या प्रिय राष्ट्र-मातेपासून आपल्याला दूर ठेवणाऱ्या त्या विश्वासघातकी समुद्रावर शेवटीं रागावून सावरकर विचारतात, " या फेन-मिषें हंससि निर्दया कैसा । का वचन भंगिसी ऐसा ? ' समुद्रानें वचनभंग करून आपल्याला असें का फसविलें असावें ? याचें काव्यमय कारण कवीला सुचतें. ते म्हणजे इंग्लंड ही समुद्र-स्वामिनी आहे आणि हिंदुस्थान परतंत्र व दुर्बल आहे. पण पुराणाचा आधार घेऊन सावरकर समुद्राला असा धाक घालतात कीं, पूर्वी ज्या अगस्ति-ऋषीनें तुला एका आचमनात गिळून टाकले होते, त्याला माझी आई तुला शासन करण्यास सांगेल, " त्वत्स्वामित्वा सांप्रत जी मिरवीते । भिउनि का आंग्लभूमीतें ? । मन्मातेला अबल म्हणून फसवीसी । मज विवासनाते देशीं । तरि आंग्लभूमि-भयभीता । रे । अबला न माझिही माता रे । कथिल हें अगस्तिस आतां । रे । जो आचमनीं एक क्षणिं तुज प्याला । सागरा प्राण तळमळला ॥ " आपण स्वतः कोंडलें जाणार, आपला देश दाण्यात अडकलेला, अशा अवश, अगतिक, असहाय्य अवस्थेंतहि सावरकराची धैर्यशाली प्रतिभा अदम्य आशेनें व अकुंठित गतीनें उड्डाण करते हे पाहून कोण आश्चर्यचकित होणार नाहीं ?

## कारुण्यांतील उदात्तता

संकटाचा अग्नि-वर्षाव चौफेर होत असतानाहि सावरकर स्वतःचा धीर टिकवीत होते, एवढेच नव्हे तर आप्त, अनुयायी, मित्र, चहाते यानाहि धीर देत होते. इग्लंडमध्ये त्याच्याभोंवतीं पोलिसी पाश पसरले जात असतांनाच हिंदुस्थानात त्याचे वडील बंधूस काळेपाण्याची शिक्षा झाली व धाकट्या बंधूस अटक झाली. वडील बंधूंची पत्नी निराधार झाली ! या वहिनीवर

सावरकराचे बालपणापासून अतिशय प्रेम. तिचे " सात्वन " करण्यासाठीं एक ओवीबद्ध पत्र सावरकरानीं पाठविले. त्यात त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञानहि सहज येऊन गेले आहे. आपत्तींतहि आनद मानून ते गरजतात, " धन्य धन्य आपुला वश । सुनिश्चये ईश्वरी अश । की रामसेवा-पुण्य-लेश । आपुल्या भाग्यीं लाधला ॥ " देश-सेवा हीच देव-सेवा. ' सुटली रघुवीराची प्रथम रणाज्ञा । ' म्हणून ते स्वातत्र्य-सग्रामात पडले. त्यात आत्माहुति देण्याची पाळी आली हे आपले भाग्य ! ते कसे, हे समजावून सागताना फुलाचा दाखला देऊन सावरकर लिहितात, " अनेक फुले फुलती । फुलोनिया सुकोन जाती । कोणी त्याची महती गणती । ठेविली असे ? ॥ परी जे गजेद्रशुडेने उपटिले । श्रीहरीसाठीं मेले । कमलफूल ते अमर ठेले । मोक्षदाते पावन ॥ " आपले राष्ट्र म्हणजे गजेद्र. त्याला पर-तत्रतेच्या मगरीने गिळले आहे. त्या गजेद्राने विष्णूला वहाण्यासाठीं आपल्या सोंडेत धरलेले फूल म्हणजे आपले जीवन. राष्ट्रासाठी खर्ची पड-लेले जीवन म्हणजे देवाला वाहिलेले फूल. दोघाचेहि सार्थक झाले. यात कमल, गजेद्र इत्यादींमुळे केवढे पवित्र वातावरण निर्माण झाले आहे !

कवि असा सिद्धात निवेदन करतो, "अमर होय ती वशलता । निवश जीचा देवाकरिता । दिगतीं पसरे सुगंधता । लोकहितपरिमलाची ॥ " देवासाठीं, देशासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम करण्याची आपली प्रतिज्ञा आहे. मोठे कार्य आपण हातीं घेतले आहे. तेव्हा मोठेपणाला साजेसे आपण वागले पाहिजे, हें वहिनीच्या चित्तावर ठसविताना सावरकर म्हणतात, " महत्कार्याचे ककण धरिले । आता महत्तमत्व पाहिजे बाणले । ऐसे वर्तन पाहिजे केलें । कीं जे पसत पडले सताना ॥ अनेक पूर्वज ऋषी-श्वर । अज्ञात वशजाचे सभार । साधु साधु गर्जतील । ऐसे वर्तणे या काला ॥ " साध्या शब्दात किती कारुण्य, किती उदात्तत्व साठविलेलें आहे !

## मनोवृत्तींचीं शब्दचित्रें

इग्लंडच्या तुरुगात १९१० सालीं कोडले गेले असताना सावरकरानीं आपल्या वहिनीला जो अखेरचा ठरू पहाणारा निरोप पाठविला, तो

' माझे मृत्युपत्र ' या कवितेंत शाश्वत स्वरूप पावला आहे. बाल्यापासूनच्या आठवणी त्यात आलेल्या आहेत. " वैशाखिचा कुमुदनाथ नभात हासे । " अशी मधुर सुरुवात करून सावरकर आठवण करून देतात, " सैपाक त्वा निजकरे कुशले करावा । प्रेमे तुझ्या अधिकच सु–रसाळ व्हावा । सवाद सर्व मिळुनी करिता निवांत । जेवावयासि बसलो जणुं चांदण्यात ॥" घरातील सारीं माणसे चांदण्यात बसून गोड पदार्थ मुखात घालीत असले, तरो त्यांच्या मुखातून कोणत्या गोष्टी बाहेर पडत होत्या ? " श्री रामचंद्र–वनवास–कथा रसाळा । कीं केवि देश इटली रिपुमुक्त झाला । तानाजिचा समरधीर तसा पवाडा । गावा चितोडगड वा शनिवारवाडा ॥ " प्रभु रामचंद्राच्या, श्रीशिवरायाच्या, राणा प्रतापाच्या, थोरल्या माधवरावाच्या–अशा प्रतापी व स्वातंत्र्यदात्या विभूतींच्याच कथा त्या तरुणाच्या गप्पागोष्टींत निघत. पण जेवण संपताच त्या संपत नसत. त्यातून स्फूर्ति घेऊन सावरकराचे कुटुंबीय स्वातंत्र्य–सेवेच्या शपथा घेत. तरुण म्हणत, ' आम्ही बाजी प्रभु होऊ ', तर तरुणी प्रतिज्ञा करीत ' आम्ही रजपूत रमणी ठरू ' " झाल्या तदा प्रियकरासह आणभाका । त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हा का ? । ' बाजी प्रभू ठरू ' वदे युवसंघ सर्व । ' आम्ही चितोर युवती ' युवती सगर्व ॥ " तारुण्यातील आंधळ्या भावनेच्या भरात आम्ही स्वातंत्र्य-संगरात उडी घेतली, असे मात्र नव्हे; तर इतिहासाच्या प्रकाशात, डोळे उघडे ठेवूनच, आम्ही आमचा मार्ग चालू लागलो, ही ग्वाही देताना सावरकर सांगतात, " कीं घेतले व्रत न हें अम्हि अंधतेने । लब्धप्रकाश इतिहास–निसर्ग-माने । जे दिव्य, दाहक म्हणूनि असावयाचे । बुध्याचि वाण धरिले करिं हे सतीचे ॥ "

वज्रासारखा निर्धार ज्या हृदयात होता, त्याच हृदयात प्रेमाच्या कोमल भावना फुलत होत्या. शेवटीं गहिंवरून सावरकर वहिनीच्या पायावर डोके ठेवून म्हणतात, " माझा निरोप तुज येथुनि हाच देवी । हा वत्स वत्सल तुझ्या पदिं शीर्ष ठेवी । सप्रेम अर्पण असो प्रणती तुम्हाते । आलिंगन प्रियकरा मम अंगनेतें ॥ " एकादा कवि एकाद्या यक्षाचा निरोप त्याच्या पत्नीला मेघामार्फत पोंचवीत असेल, तर दुसरा एकादा कवि एका

राजकन्येचा संदेश तिच्या प्रियकराला राजहंसाच्या मुखानें कळवीत असेल; पण जन्म–मृत्यूच्या सीमेवर उभे राहून सावरकरानीं आपल्या 'देवी' वहिनीस पाठविलेल्या या रसपूर्ण व धृतिपूर्ण पत्रास तोड जगाच्या वाङमयातहि क्वचितच सापडेल !

## स्वतंत्रतेचें स्तोत्र

स्वातंत्र्याचे पोवाडे गाणारे एक श्रेष्ठ शाहीर एवढीच सावरकराची भूमिका नाहीं. त्या स्वातंत्र्यासाठीं सर्वस्वाची होळी करण्यास ते तयार होते. म्हणून ' प्रियकर हिंदुस्थान ' या कवितेत ते ग्वाही देतात, " जननि तुझ्या सन्मान–रक्षणीं अर्पुं रणीं हे प्राण। शत्रुकंठ भंगोनि घालुं तुज दारुण रक्तस्नान॥" अशा क्रियाशील भूमिकेवरून 'स्वतत्रतेचें स्तोत्र' सावरकरांनीं जें रचिलें आहे, त्यात विलक्षण जिवतपणा व परिणामकारकता आली आहे. ' बोले तैसा चाले ' हे त्याचें ब्रीद. ' आधीं केलें मग सागितलें । " हा त्यांचा बाणा. देवी स्वतंत्रतेसाठीं तळहातावर शीर घेऊन तिचा जयजयकार करताना ते म्हणतात—" परवशतेच्या नभात तूची आकाशीं होशी । स्वतंत्रते भगवती ! चादणी चमचम लखलखशी ॥ "

हा सर्व त्याग, हें सारें शौर्य, हे सारे हाल कशासाठीं ? आपलें ध्येय कोणतें ? हें सावरकर पुढील शब्दांनीं सागतात, " आमुच्चिया वशाच्या गौरवाचिया—। भारतीय केवल ना, मानवीयही । वंशाच्या गौरवार्थ ! अखिल मानवी यौवनात अनुभवीन यौवनास मी ॥ " अखिल मानवतेची सेवा हेंच ध्येय.

## वीरवृत्तीचें दर्शन

इंग्लंडमध्यें अटक झाली, फ्रान्समध्यें उडी ठोकली आणि सावरकरांची स्वारी मुंबईस आली. टिळक–आगरकरांनीं पावन केलेल्या डोंगरीच्या तुरुंगात त्याना डाबण्यात आलें. 'भयंकर कैदी' म्हणून त्याचा बंदोबस्त जादा होता. छातीवर बिल्ला व पायात तीन शेर वजनाची काटेरी बेडी !

आणि मुंबईहून दोन जन्मठेपेची शिक्षा देऊन सरकारनें सावरकरांना

अंदमानास पाठविलें. ‘ तुरुंग दगडी राक्षस हा ’ त्याचे अस्थि—आस्थिचें मास—मास करपून—करपून टाकीत होता. त्या भीषण अवस्थेतहि रम्यतेचें दर्शन त्याना एकदा झाले. तें म्हणजे चंद्राचे. त्याचें वर्णन करताना सावरकर म्हणतात, “ लोहगजाची जी जाळी । कोठडीस मम ती खालीं । टाकुनि काबाळि मी अपुली । टाक्ति अंगा तों दिसली ॥ समोरची नभिं मज देखा । चमकत चिमुकलि शशिलेखा । ‘ शशिलेखा रे शशिलेखा ! ’ । मावबु शकुनि न त्या हरिखा ॥ ”

चंद्रकोर दिसताच पोटात मावेना इतका आनंद या कविरायाला झाला व “ टाळि वाजवुनी मीच मशीं । कथिली वार्ता अद्‌भुतशी । सहा सहा महिन्यांत कधीं । चंद्र दिसेना बंदिमधीं ॥ वर्षहि न जिथे तिथी तिथें । कळणे कैशी तरिही ते । असेल पंचमि—चतुर्थिची । कोर कोवळ्या चंद्राची ॥ प्रथमचि दिसला चद्र जना । नसेल गमला तैंहि मना । हर्ष तसा तै मज गमला । आनंदाला भर आला ॥ ”

चंद्र—दर्शनाप्रमाणेच दुसरी सुखद गोष्ट म्हणजे निद्रा. सर्व दिवसभर पाशवी श्रमानें व पिशाच्च-छळानें शरीराचा भुगा झाल्यावर भुईला शरीर टेकताच निद्रादेवीचा संजीवक हात त्यावरून फिरूं लागे, तेव्हाचा आनंद त्यानाच माहीत ! दिवसभराचे श्रम कसे ? त्याचे वर्णन सावरकर करतात, “ घाण्याच्या भंवति भंवति सर्व दिनभरी । तुटु पाहति पाय तरी धाव-धावता । घामानें गळल्या जे चिंब जाहलें । भू—वर्तुल आताची सुकत तें जरा ॥ ” तरीसुद्धां मन ताजेतवानें राहिलें, हृदयातील काव्य—ज्योत तेवत राहिली; कारण सावरकराची राष्ट्र—भक्ति अशी अढळ कीं, “कवण जगे ? अहह जरी हिंदची मरे ? कवण मरे ? हृष्ट जरी हिंद जगे रे ! ॥ ” त्या हिंदभूसाठीं आपण छळ सोसतो, हें एक महान तपच आहे, या भावनेनें ते उत्साह धरून काळ कंठीत होते. त्या सर्व कष्टाचा शीण नाहींसा करणाऱ्या निद्रेला आवाहन करून ते म्हणतात, “ म्या अपुल्या हस्तेंची रचुनि मम चिता । ठेवियलें तीवरतीं,—चांडिके तया । करुं सुतृप्त !— अग्निकुंडिं तूंहि त्या तंईं । हे निद्रे, सहगमना अंगने-समा । करुनी या यमपुरींत येशि मजसवें ! मम शय्या बंदीगृहिं सगतीं तुझ्या । प्रेममृदुल,

मोहक, जणु शेज फुलाची। देवा, या निद्रेसी तरि निदान तूं। नेउं नको मजपासुनि–सर्व यद्यपी। नेलेसी। काय नसे मजसि ती इथे ? ॥

## शारदेच्या दोन मूर्ति

आपली कविता ही मुरली नसून रणभेरी आहे असे "मूर्ति दुजी ती !" या कवितेंत सावरकर सागतात. लडनच्या पोलीस चौकींत—कडाक्याच्या थंडींत डाबले गेले असताना सावरकरानीं ही भव्य कल्पना रंगविली आहे. या कवितेचे वृत्त त्यानीं स्वतः बनविलेले आहे. त्या 'वैनायक' वृत्तात कवि आपल्या काव्याची सुकुमार मूर्ति कशी आहे तें सागतोः— "एक मूर्ति ती : नाचत हृदयमचकीं। रसिकमनाची वीणा घेउनी करीं। ततुततुनि कुशल–स्पर्श–पुलकिता। प्रेमाची वीज थरारूनि देत जे,। भावनासि मोहन घालूनि ती करी। लोण्याहुनि कोमलशा कोमल अशा। कीं जाव्या चादण्यामधेहि वितळुनी !" "आणि दुजी ती : मूर्ति प्रखर जी तुझी। कविते घेऊनि शिरे वाण सतीचे। अहह ! हास्य करित प्रज्वलित चिताग्नी ॥" 'परतु भिल्लीणीचा वेष घेऊन शकरापुढे मोहक नृत्य करणारी पार्वतीच जगाच्या सहाराचे भीषण नृत्यहि करते. त्याप्रमाणे लोण्याहून मऊ अशा काव्य–मूर्तिऐवजी ते दुसरी विक्राल मर्तीच कल्पितात. कारण—" लोखडी जबडा वासूनि आपला। कर्तव्य प्रकट आज ! मम चिरावया। दाताच्या कवळ्याच्या करवतीत दो !" अशा तुरुगामध्ये ते सापडले आहेत. तेथे "मजुल रुणुझुणु रुणुझुणु" असे काव्य कसे निर्माण व्हावे ? आणि ते कसें आवडावे ? आपल्या काव्य–देवतेला काली मातेचे स्वरूप देऊन सावरकर तिचे रूप पुढीलप्रमाणे रेखाटतात—" लाल लाल चिकट विकट त्या गळ्यांतुनी। धार तीच घट घट त्या क्रुद्ध मुखे पी। पेल्यातुनि लाल मद्य पी जसे कुणी ! पिउनि रक्त आपुलोचे आपली तृषा। शातविल्या त्या प्रचंड रौद्रभीषणा। रुडधरा छिन्न–मुड मूर्तिसी नमो ॥"

## भावनेची कोवळीक

सावरकराची मूर्ति पाहिली तर ती एखाद्या 'भाव-कोवळ्या'

कवीला साजणारी आहे—सशस्त्र क्रातिकारकाच्या नेत्याला नव्हे. आणि त्याची मूळची मनोवृत्ति ? तीहि कवीलाच शोभणारी आहे. शकुतला स्नेहभावामुळे वेलिंचीं फुले तोडित नसे.—सावरकराना आत्मौपम्य–बुद्धि–मुळे–सर्वत्र ईश्वर वसत असल्यामुळे–गवतावरसुद्धा पाय देववत नाहीं, "तृणातेहि नोलाडवे ।" ही ज्ञानदेवानीं वर्णिलेली मनाची कोवळीक सावरकराच्याहि अगीं आहे हे त्याच्या पुढील उताऱ्यावरून सिद्ध होते.— "आत्मौपम्यात मुरत चित्त थिजोनी । कितिदा तरि चरण अकस्मात चालता । स्तभित होऊनि रहावेत घटि घटी । काहीं केल्याहि तया तरुण कोवळ्या । गवताचे अकुर दुखतील या भये । पाय त्यावरी नये पडाचि कीं पुढें ॥" शरिराने नाजूक व मनाने कोवळे असे सावरकर धैर्याचे व निश्चयाचे महामेरू आहेत. कोणतेहि सकट त्याना भिववू शकत नाही—कोणतेहि हाल त्याना दबवू शकत नाहींत. शीखाच्या इतिहासातील "बदा वीर" वगैरे विभूतींचे अजिक्य धैर्य त्याच्या ठायीं आहे. आपली मातृभूमि पुनः स्वतंत्र व समर्थ करण्यासाठीं ते कोणत्याहि हाला–जुलुमाला तोंड देण्यास सिद्ध आहेत. "श्रीबदा वीर" या कवितेत ते अशी प्रतिज्ञा करतात कीं,- -"तो शकला श्रीबदा हिंदु हुतात्मा । सहण्यासी जरि असह्य छळ तसे तरी । का शकेन मीहि न हे छळ सहू अहा । मीहि हिंदुची असता ? हे सहेनची–। याहुनिही भयद असे छळ सहेनची ! परि झटेन, जीवनातिही झटेनची । करण्यासी ही विमुक्त मातृभू पुन्हा । मुक्त पुन्हा ! शक्त पुन्हा, मनुज–मगला । पुण्यभूमि पुनरुत्थित पतित–पावना !"

## पोवाड्यांतील स्फूर्ति

चालू स्वातत्र्य–सग्रामाला स्फूर्ति मिळावी म्हणून इतिहासातील अनेक स्वातत्र्य–युद्धाचे पोवाडे सावरकरानीं रचलेले आहेत. "विनायकाने रचिले पवाडे । स्वदेश–सत्प्रेम तयात गाढे ॥" अशी त्याची प्रशसा कवि असून क्रातिकार्य करणाऱ्या त्याच्या एका सहकाऱ्याने केली आहे. त्याचे नाव सेनापति बापट. शिवाजीच्या स्वातत्र्य–युद्धावर सावरकरानीं गोंधळाचें

रूपक कसें बसविलें पहा—"स्वातंत्र्यदेवाचा गोंधळ केला। यजमान स्वामी श्रीशिवराय झाला। सावळ्या रंगाचे शूर मावळे। प्रेमानें अभिमानें गोंधळी झाले। पारतंत्र्याचा मग बोकड चिरिला। प्रभुवर भूवर शिववीर आला ॥

सिंहगडचा पोवाडा, बाजी प्रभूचा पोवाडा व चाफेकरांचा पोवाडा—हे सावरकरांचे तीन पोवाडे अवघ्या महाराष्ट्रात दुमदुमले. याचें नैमित्तिक कारण म्हणजे प्रासंगिक परिस्थिति हें जसें खरें; तसेंच त्यातील वीररसाचा उत्कर्ष हेहि आहे. चाफेकराचा पोवाडा सावरकरांनीं आपल्या वयाच्या पंधरावे वर्षीं रचला. आणि १९०५ सालच्या त्या स्वातंत्र्य—लालसेच्या काळात, 'मित्रमेळ्या' साठीं सावरकरानीं बाजी—तानाजींचे चैतन्यदायक पोवाडे रचले. ते ब्रिटिश सरकाराने १९०९ मध्ये जप्त केले होते; पण कॉंग्रेस सरकाराने १९४५ सालीं त्यावरील जप्ती उठविली. तानाजी किंवा बाजी याच्या पराक्रमाचे वर्णन सावरकरानीं इतक्या वीर्यशाली वाणीनें केलें आहे कीं, त्यामुळे ते ते घनघोर प्रसंग वाचकाच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभे रहातात. हे पोवाडे रचताना सावरकर इतके तल्लीन झालेले दिसतात कीं, जणु कांहीं आपणच तानाजी आहोत, बाजी आहोत अशा आविर्भावानें ते बोलत आहेत असे वाटतें. बाजीच्या पोवाड्याचा प्रारंभच किती रोमांचकारक आहे पहा—" चितोडगडिंच्या बुरुजानो त्या जोहारासह या। प्रतापसिंहा प्रथित—विक्रमा, या हो, या समया ॥ तानाजीच्या पराक्रमासह सिंहगडा येई। निगा रखो महाराज रायगड की दौलत आई॥ जरिपटका तोलीत धनाजी—संताजी या या। दिल्लीच्या तक्ताची छकलें उधळित भाऊ या ॥ स्वतंत्रतेच्या रणात मरुनी चिरजीव झाले। या ते तुम्ही राष्ट्रवीरवर, या हो या सारे ॥ घनदाट सभा थाटली। गर्जना उठली। घोर त्या कालीं। जय स्वतंत्रेचा बोला। जय राष्ट्रदेविचा बोला। जय भवानि कीं जय बोला। तुम्ही मावळे हरहर महादेव बोला। चला घालुं स्वातंत्र्य—संगरीं रिपूवरी घाला ॥ "

## ध्वनि—काव्याचा गुण

अशा आवाहनामुळे स्वातंत्र्याला पोषक असें वातावरण श्रोत्यांच्या

चित्तांत निश्चयानें निर्माण होतें. यांतील प्रत्येक ओळ म्हणजे वीररसाचा ओघ आहे. त्यातील भावार्थ द्वयर्थी आहे. शिव-कालाप्रमाणेंच सद्यःकालालाहि तो लागू असल्याचें पाहून श्रोत्याचे हृदय उचंबळून येते. उदाहरणार्थ, "हाय ! हाय ! तो म्लेच्छासगें घडित बैमलाची । स्वदेश-भूच्या पायासाठीं बेडी दास्याची । " हें आरंभींचे बाजीचे वर्णन घ्या. प्रारभीं मुसलमानाची सेवा करणाऱ्या बाजींचें हें वर्णन इंग्रजाची ताबेदारी करणाऱ्या कैक रावसाहेब-रावबहादुराना बरोबर लागू पडे. तसेच "देशद्रोही चाडाळाचा भरला बाजार । गुलामगिरि जे देती त्याना निष्ठा विकणार ॥ तुम्हीच ना स्वातत्र्य चिरियले या पोटासाठीं ? । तुम्हीच ना रे भूमातेच्या नख दिधलें कठीं ? ॥ " असे प्रश्न मेळ्यात जे जे ऐकत, त्याच्या डोळ्यापुढें आग्लकालच अधिक उभा राही. भावनेची तीव्रता व भाषेची सालंकृतता आणि सद्यःकालीन परिस्थितीचे पडसाद यामुळें हें काव्य लोकप्रिय झाले. "स्वराज्य नाहीं स्वदेश नाहीं धिक् त्या देहाला ॥ हा चरण तर अर्थातरन्यासामुळे सर्वांच्या तोंडीं स्वराज्याचा मत्र म्हणून खेळत असे.

## सूक्ष्म वर्णन

शिद्दीने पन्हाळगडाला वेढा दिला व शिवाजीला त्यात कोंडले. या प्रसगाचे वर्णन काव्यमय भाषेंत सावरकर असे करतात—,"लक्ष्मीचे मृदु कमल, शारदासुदरिचा वीणा । स्वतत्रतेचा कलिजा अडके गडात शिवराणा ॥ " पण शिवाजीला पकडणे म्हणजे ' जीवत पवन ' धरणें होय, हा अनुभव सिद्दी जोहारला आला. शिवाजीने यवनाना गुंगारा दिला आणि किल्ला सोडला. त्याचे नाट्यमय वर्णन कवीने सूचकतेने केलें आहे—" कृष्णपक्षिच्या काळ्या त्या रात्री दडल्या । गर्द झाडिला भिउनि चादण्या बाहेर न पडल्या ॥ अशा तर्मी किलकिले दार का तटावरि झाले ? । बाजि निघाले श्रीशिव आले आले शत भाले ॥ भाला खाद्यावरी मराठा घोड्यावरि स्वारी । भरिता, घोडा थै थै नाचे—तोंच शीळ आली । वीर हो टांच घोड्याला । बाण हा सुटला । अडविणें त्याला ॥ "

जीवाचे कान करून व प्राण कंठात आणून बाजीप्रभू शिवाजीच्या तोफाचे आवाज ऐकत होते. त्याची उत्सुकता किती होती हें सांगताना कवि म्हणतो, " काय वाजले बाजीराया बार न गडि झाला। शिळा कोसळे, पान सळसळे, पक्षी ओरडला ॥ " पुनः बाजी उसळला, निर्वाणीचा निर्धार करून तो म्हणाला, " लढा तरी मग चला वीर हो रणात घुसलो मी। रक्तें मढवूं लढवूं खिंडीची तसू तसू भूमी। शपथ तुम्हाला वृक्ष-पक्षि-जल-शिला-तेज वारे। आम्ही पडता तोफेपूर्वी लढा तुम्ही सारे।" शिवाजीराजे सुरक्षित पोचले, तोफाचे बार झाले—" तो बार धडाधड झाले। प्राण परतले। हास्यमुख केले। हा पहिला बार शिवाचा। हा दुसरा निजधर्माचा। हा तिसरा निजदेशाचा। हा चवथा कर्तव्याचा। बार पाचवा धडाडला हर बोला जय झाला। चला घालूं स्वातंत्र्यसमरीं रिपूवरी घाला॥ "

## त्रिपुटीचें ऐक्य

झिरझिरित पडद्याआडून जडजवाहिर दिसावे, त्याप्रमाणे बाजीप्रभूच्या पोवाड्यातून शिवरायाच्या स्वातंत्र्य—युद्धाप्रयाणेच इंग्रजाशीं चाललेल्या स्वातंत्र्य-संग्रामाचे दर्शन ओझरते होतच आहे. पण सावरकराच्या अंगीं असलेल्या प्रचारकी वृत्तीनें काव्य-वृत्तीवर मात केली आणि पोवाड्याचे शेवटीं तो अन्योक्तीचा पडदाहि टाकून, ते विचारू लागले, " अहो बंधुनो ! पूर्वज ऐसे स्वतंत्र रणगाजी। स्वतंत्र त्या पूर्वजा शोभता वंशज का आजी ? " गोष्टीला ' तात्पर्य ' जोडावे, त्याप्रमाणे, " विनवि विनायक यातिल घ्यावे समजुनि अर्थाला॥ " अशी उघड प्रार्थनाहि कवीनें केली आहे. या पोवाड्याची चाल किंवा भाषा जुन्या पोवाड्या-इतकी अस्सल नाहीं, तर संस्कृतप्रचुर पद्यासारखीच ती आहे, हें खरे, पण त्यातील भाषेचा वेग, कल्पनेचे नर्तन व मुख्य म्हणजे स्वातंत्र्य—भावनेचे कल्लोळ इतके जोरदार आहेत कीं, त्या धबधब्याच्या धारेत सापडलेला वाचक अखेरपर्यंत वेगाने वाहत जातो. वाचक, कवि व नायक या तिघांहि व्यक्तींचे एकरूपत्व जसें सावरकराच्या पोवाड्यात होते, तसें

अन्यत्र क्वचित्‌च होत असल्याचे आढळते. सिंहगडाच्या पोवाड्यातहि ‘ तानाजि चढू लागले । स्वातंत्र्य चढू लागले ।’ इत्यादि वर्णने वाचताना वाटते, हा तानाजी सिंहगड चढत नसून, सावरकर चढत आहेत–किंबहुना आपण वाचकच तो चढत आहोत.

श्रीशिवाजीप्रमाणेच लो. टिळकहि स्वातंत्र्याचे सेनानी. म्हणून १९०० साली ते नाशिक येथे गेले असताना त्यांच्या स्तवनार्थ नऊ आर्या “ श्री–मयुरेशस्फूर्तीने ” कवि विनायकानें रचल्या व त्यात टिळकांचा गौरव असा गाइला कीं, ‘ लाजविलेसि निज यश धवले त्वा सत्य हिमनगा तिलका । सतत जनपदसेवार्पित तू तुज कवि न गान गातिल का ? ।। ” उत्तरेस उच्च व शुभ्र हिमालय खडा आहे, पण त्यालाहि टिळकांनी आपल्या धवल यशाने व उच्च विचारांनीं लाजविले !

## काव्य-कल्पनेचा विलास

देशाच्या राजकारणाचा वाराहि आपल्या अंगावर न घेणारा व केवळ काव्य–कल्पनेत विहार करणारा एकादा प्रतिभाशाली कवि जशीं रसमय कवने रचतो, तशींहि काही काव्ये सावरकरांच्या लेखणींतुन मधूनमधून बाहेर पडलीं आहेत. ‘तारकांस पाहून’ हा एक त्याचा नमुना आहे. १९०६ सालीं बॅरिस्टर होण्यासाठीं इंग्लंडास जाताना जहाजाच्या डेकवरून समुद्राचें जे स्वरूप दिसले, त्याचे वर्णन आरंभीं कवीने केले आहे, ते असे– “ नुमजे लागे कुठे नभ कुठे जलसीमा होई ! नभात जल ते, जलात नभ ते संगमुनी जाई । आकाशींचे तारे सागरि प्रतिबिंबित होती । किंवा आकाशीं हे बिंबति सागरिचे मोती ।। ”

## फुलांचा चित्रपट

‘ कमला ’ काव्याच्या प्रारंभीं जें फुलबागेचें वर्णन आले आहे, तें तर अत्यंत कल्पना–सुंदर आहे. ‘ ज्या विवासनात हृदयाचे स्पंदनहि बंद पडावे ’ त्या अंदमानात अशी सरस काव्य-निर्मिति कशी झाली याचे आश्चर्य कोणास वाटणार नाहीं ! शंभरावर ओळीमध्ये फुलबागेचे वर्णन

सावरकर किती डौलानें व ऐटीनें करतात पहा—" फुलबाग किती शोभे लहान, नटवी, करी । नटुनी थटुनी नाना नखरे वरचेवरी ॥ "

चादण्यामध्यें ती बाग एकाद्या नदींतील नावेप्रमाणें मनोहर दिसे. " नौकेत कौमुदीच्या ही नटली कितिदा तरी । बाग योजनगंधा त्या वन-देव–पराशरीं ॥ " त्या बागेतील निरानिराळ्या रंगांचीं व आकाराचीं फुले पाहून त्यावर एकाहून एक रमणीय उत्प्रेक्षाचा साज सावरकर चढ-वीत आहेत. हिरवीं, पाढरी, पिवळी फुले पाहून ते म्हणतात, " हिरवाचि कधीं शालू, सित मलमालिचा कधीं । रेशमी जरतारी वा जयाच्या पदरामधीं ॥ "

जाई, कर्दळी, केळ, शेवती, सोनचाफा, केतकी, सूर्यफूल, निशिगंध, गुलाब व धोतरादि–अशा विविधवर्णी फुलाचे हृदयंगम चित्रण आपल्या कल्पनेच्या कुचल्यानें सावरकरानीं केले आहे. सोनचाफा हा मातीचेहि सोने करतो, ही त्याची किमया वर्णिताना सावरकर म्हणतात, " आणि हे सोनचाफ्या, तू शिकलासि तरी कुठे । ही दिव्य किमया ? आम्हा स्वयंमन्य नरा जिथे ॥ रुप्याचेही करायासी जड स्वर्ण न साधतें, । ओल्या मातींत सूर्याचीं किरणे पिळुनी तिथें ॥ मृदुचेतन सोन्याचीं, स्वर्णचपक, हीं फुले । सुगधी तुज पाहोनी निर्मिता मन हें भुले । ॥ " या सोन-चाफ्याची प्रिया म्हणजे चमेली. " प्रियाची सोनचाफ्याची, चमेली किति ही खुले । तो तिच्यावरि ती त्याच्यावरतीं उधळी फुलें ॥ "

आणि निशिगंधाचे ते उंच, शुभ्र व सुगधी फूल ! जणु प्रेमाच्या सैन्यातील रुप्याचे शिंगच ! " फूल ह्या निशिगंधाचें हें अधीरविते हृदें । कामसेनापुरोगामी रौप्यशृंगाचि काय तें ! ॥ " बागेमध्ये शतधाराचें कारजें आहे. त्यातुन पाण्याचे थेंब उडत आहेत. त्यावर सूर्याचे किरण पडले कीं इद्रधनुष्ये दिसूं लागतात. या दृश्याची शोभा सावरकर शब्दानीं डोळ्यापुढे उभी करतात, " कारजे शतधाराचे कासारात तया उडे । नृत्यबिंदुवरी त्याच्या तेजोबिंब यदा पडे ॥ तदा गमे असा लीलासरा उडत ये तया । थवा इद्रधनुष्याच्या पिलाचा विहरावया ॥ " कमळाचे देठ पाण्यांत अर्धवट बुडालेले पाहून सावरकराच्या कवि-मनाला गोपी-

वस्त्र-हरणाचें स्मरण होतें व ते म्हणतात, " जलार्धमग्ननाला ह्या शोभती नलिनी तशा । शोभती लाजत्या गोपी यमुनेंत तई जशा ॥ " रम्य कल्पनार्नी विणलेलें हें वातावरण पुढील शृंगारिक कथानकाला उठाव आणणारेंच आहे.

## क्लिष्टतेची कारण-मीमांसा

मात्र या काव्यावर रम्यतेबरोबर क्लिष्टतेची सावलीहि बरीच पडलेली आहे. संस्कृतप्रचुर शब्द–योजना व दूरान्वित वाक्य-रचना यामुळे पुष्कळ ठिकाणीं अर्थ दुर्बोध झाला आहे. याशिवाय कल्पनाची व विचाराची गर्दी सावरकराच्या डोक्यात इतकी झालेली असते कीं, त्यामुळे त्याचा स्पष्ट व सुबोध आविष्कार नेहमीं नीट होऊ शकत नाहीं. सूक्ष्मता साधण्यासाठीं विचाराचे व कल्पनाचे पापुद्रेहि ते काढतात. या सर्वांमुळे त्याची काहीं काहीं काव्यें दुर्बोध झालीं आहेत. पण ते काटे बाजूस सारले म्हणजे मग मात्र सुरगी व सुगंधी गुलाब हातीं येतात हें खचित.

## वात्सल्यमिश्रित कारुण्य

' प्रभाकरास ' हें चिमुकलें काव्य करुण व वत्सल या दोन रसार्नी ओथंबलेलें आहे. सावरकराचा पहिला मुलगा प्रभाकर चार वर्षांचा होऊन मृत्यु पावला. त्यावेळीं सावरकर इंग्लंडात होते. आपल्या प्रथम अपत्याचा निरोप घेऊन सावरकर दूरदेशीं आले होते. त्याच्या कवि-हृदयाला या अपत्य–निधनानें शोकाचे धक्के बसले. त्याबरोबरच मनाचा तोल संभाळण्याइतकी विवेकशीलताहि त्याच्या अगीं होती, हें या काव्यातील विचारावरून दिसते. आपल्या मुलाची स्मृति चिरकाल रहावी म्हणून या प्रेमळ पित्यानें शीखाच्या इतिहासाचा आपला मराठी ग्रंथ त्याला अर्पण केला. पण दुर्दैव असें कीं, त्या बालकाप्रमाणें या ग्रथाचाहि अकालींच अंत झाला. ब्रिटिश सरकाराने तो इतिहास जप्त केला— प्रसिद्धीपूर्वींच त्याचे हस्तलिखित सरकारानें आपल्या ताब्यात घेतलें. बालक गेलें आणि त्याच्या स्मृतीचें साधनहि गेलें. ही सारी हळहळ

या कवितेत ओतप्रोत भरलेली आहे. कवीने आपल्या हृदयींची तळमळ या काव्यात ओतली आहे.

याहून अधिक उत्कट वात्सल्य व कारुण्य ' श्री बदावीर ' या काव्यात काठोकाठ भरलेले आहे. बादशहाने त्याचे दोनशे शिष्य ठार केले—कारण ते मुसलमान होईनात. मग बदाच्या एकुलत्या एक बालकाला कापण्यात आले. त्याला वध-स्थानीं नेण्याचा प्रसग वज्रालाहि विरघळविणारा ! त्या प्रसगाशीं समरस होऊन कवि त्या बादशहाच्या नोकराना विनवितो, " हळु न्यारे, हळु । संभाळूनि लेकरू । हे लहान इतुके कीं साचल्या तया । काच्या डबक्यातचि सहज बुडुनिया । जावे कीं जाता त्या वधशिलेकडे " सारा प्रसगच चित्त थरारविणारा आहे ! ' वीर करी गर्ज आणि शोक करी पिता ' अशा भिन्नरसाचा सगम तेथे झाला. कवीला जितकी हळहळ वाटते, तितकीच त्या वीराचे अतुल धैर्य व अढळ धर्मनिष्ठा पाहून धन्यता वाटते. या दोन्ही भावनाचे संमिश्र उद्गार पुढील ओळींत उमटले आहेत—" हाय हाय—धन्य धन्य—हाय हाय हा । धन्य धन्य धन्य ! तरिहि धैर्य ना चळे । "

## भक्तीची तार

विश्व हाच ईश्वर असा भाव सावरकरानीं ' जगन्नाथाचा रथोत्सव ' या कवितेत व्यक्त केला आहे. या काव्यातील कल्पनेची भव्यता इतकी प्रचंड आहे कीं, ती पाहून ' महदाश्चर्ये हृदय सुखभरे थरकापे ' असे त्याच्याच शब्दात म्हणावेसे वाचकाला वाटते. " ऐश्वर्ये भारी । या अशा । ऐश्वर्ये भारी । महाराज आपुली कथा ना कुठे निघे स्वारी ? ॥ " अशी पृच्छा जगदीश्वराला कवि करतो. मात्र प्रौढ सावरकराच्या लेखीं, जगदीश्वर म्हणजे जगताचा ईश्वर नाहीं, तर जगत् हाच ईश्वर आहे. या जगदीश्वराचे ऐश्वर्य म्हणजे विश्वरूपदर्शनच होय. " दिक्क्षितिजाचा दैदीप्य रथ तुझा सुटता । ह्या कालपथाच्या अतुट उतरणीवरता । नक्षत्रकणाच्या उठे धुराळा ।रता ॥ " हा जगाचा नाथ रथातून निघाला आहे. क्षितिज हा त्याचा रथ, काळ हा त्याचा मार्ग, सूर्य म्हणजे मशाली,—अशा थाटात

रथ चालला म्हणजे नक्षत्राचा धुरळा उडतो आणि मौज अशी दिसते कीं, "ह्या सूर्यशताच्या किती मशाली जळती । मधुनीच शतावधि चंद्रज्योति ह्या उडती । सरसरत बाण हे धूमकेतुचे सुटती ॥"

विश्वाचे विराट स्वरूप बुद्धीने आकलून त्याला काव्याचे मोहक रूप देण्यात सावरकर निष्णात आहेत. 'माळ गुफिताना' या कवितेत ते त्रिगुणाची, सूर्याची, नरमुंडाची, भूकंपाची —अशा माला गुफत आहेत. "माळ गुफिताना । ऐका कवनाला । गुफी कोण कशी माला । घाली जगदंबा । त्रिगुणातीताला । त्रिगुणी बिल्वदली माळा । प्रकृति देवि गुफी । देव विराटासी । नव नव सूर्य मालिकासी प्रलयकार काली । गुंफि महाकाला ती नरमुंडचंडमाला । उद्भवा घाली । घालि उद्भवाला । सृष्टि भूकंपाची माला ।"

'अनंताची आरती' करतानाहि सावरकरांची भावना असेच व्यापक स्वरूप धारण करते. नम्र मानव ईश्वराची पूजा कशी करतो ? तर "निरंजनासी निरंजनाचा देवा दीप तुला । दाविती देवा दीप तुला ॥ आकाशाच्या अंगणात तव । सूर्यसहस्त्री जो दीपोत्सव । पाजळिती हे पणती अपुली त्यास करू साजरा । दाविती, देवा दीप तुला ।" ईश्वर सर्वत्रच आहे, त्याला कोण काय अर्पण करणार ? "आईच्याची बागेमधुनी । ताजी ताजी वेचुनि वेचुनि । मुली गुंफिती आईच्याची वेणींतूनि फुला । दाविती देवा दीप तुला ॥" विशाल कल्पना व भक्तिपूर्ण भावना यांनीं नटलेलें हे चिमुकले पद मनोरम आहे.

## सामाजिक सुधारकाची भूमिका

राजकीय क्रांतिकारक हा आपला पहिला अवतार संपवून सामाजिक सुधारक या दुसऱ्या भूमिकेवरून हिंदूंच्या ऐक्याचे व संघटनेचे कार्य सावरकरांनीं आरंभिले. त्यासाठीं त्यांनीं 'हिंदूचे एकतागात' रचले, ते असे—

"तुम्ही अम्ही सकल हिंदू । बंधुबंधू । तो महादेवजी पिता आपुला चला तया वंदूं ॥ ध्रु ॥ ब्राह्मण वा क्षत्रिय चांग । जरि झाला । कसलेहि रूप वा रंग । जरि त्याला । तो महार अथवा मांग । सकलाला । ही

एकचि आई हिंदु जाति आम्हास तिला वंदूं ॥ " हिंदु समाजांतील अस्पृश्यता नष्ट करण्यासाठीं सावरकरांनीं खूप प्रचार व प्रयत्न केले. रत्नागिरी येथील एका मंदिरात हरिजनाचा प्रवेश झाला. तेव्हा समाज-सुधारक सावरकर 'सुतक युगांचे फिटले' अशी आनंदाची आरोळी ठोकतात व म्हणतात, " तुम्हि देवाच्या येउं दिलेंती दारीं । आभार जाहले भारी । तुम्हि वरदानीं शिवुनि पतित हा माथा । मळविलें पावना ज्ञाता । या ठेवु पदावरति पवित्रा ताता । दिधलाति पतित हा माथा । तुम्हि धर्माचे सूर्य कथुं किती नवला । सावली तमाची शिवला ॥ "

सावरकर हे राजकीय किंवा सामाजिक पुढारी आहेत म्हणून त्याच्या काव्याला नसते महत्त्व चिकटलेले आहे, असे मुळींच नव्हे. त्यांच्या नेतृत्वाचे वलय काढून टाकलें, तरी निर्भेळ काव्याच्या कठोर कसोटीलाहि पुरेपूर उतरण्याजोगेच सावरकराचे काव्य तेज:संपन्न व प्रतिभासंपन्न आहे. त्याच्या काव्यातील पंक्तीच्या पंक्ति महाराष्ट्राच्या जिव्हेवर नाचल्या; त्या जितक्या त्यातील इष्ट स्वातंत्र्य-भावनेच्या आविष्कारामुळें, तितक्याच त्यातील असामान्य काव्य-सौंदर्यामुळेहि.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) इतर सर्व कवि व सावरकर याच्या जीवनाप्रमाणे काव्यातहि फार मोठा भेद आहे, हा भेद कोणता ? तो का निर्माण झाला ?

( २ ) सावरकराच्या जीवनात दुर्दम आशावाद ओतप्रोत भरलेला आहे, याचें प्रतिबिंब त्याच्या कोणकोणत्या काव्यात दिसून येतें ?

( ३ ) 'सागरास' या कवितेचें रसग्रहणात्मक परीक्षण लिहा.

( ४ ) सावरकराचे कोणते पोवाडे फार गाजले ? त्यातील रसपरिपोष कवीनें कसा केला आहे तें स्पष्ट करा.

( ५ ) 'कमला' 'गोमंतक' हीं काव्ये वाचा व त्याचा गोषवारा लिहून काढा.

( ६ ) 'माझे मृत्युपत्र' 'मूर्ति दुजी ती' 'अनंताची आरती' या कवितातील कवीची भूमिका स्पष्ट करा.

# माधव जूलियन : : ३

आधुनिक कवीचे जे खास गुण मानले जातात, ते बहुतेक सर्व माधव जूलियन याच्या काव्यात आढळतात--आणि तेहि अगदीं ठळकपणाने. मानवी प्रेमाचें निःसकोच चित्रण जुने कवि फारसे करीत नसत.



राधाकृष्णादि देवादिकांच्या बुरख्यातूनच प्रणय-लीलाचे वर्णन ते करीत. पण नवे कवि तरुण-तरुणींच्या प्रेमाचा आविष्कार स्पष्टपणे करतात. या बाबतींत माधव जूलियन हे अग्रभागीं आहेत, इतके की, त्याच्या काहीं टीकाकारानीं त्याना ‘ प्रणयपंढरीचे वारकरी’ अशीच पदवी देऊन टाकली. दुसरे टोक क्रातीचे. राजकीय व सामाजिक क्रातीचे रण-शिंग आपल्या काव्यातून फुंकण्याचे एक वैशिष्ट्यच आधुनिक कविवर्गाचे होऊन बसले आहे. माधव जूलियन यानीं अशी नव्या युगाची, मानवधर्माची, समतेची व स्फूर्तीची तुतारी आपल्या अनेक काव्यातून जोराने फुंकली आहे.

## आधुनिक काव्याचीं लक्षणें

जीवनातील कोणताहि विषय काव्याला वर्ज्य आहे, असें आधुनिक कवि मानीत नाहींत. जगातील कोणत्याहि विषयावर आपल्या हृदयांतील

कसल्याहि भावना निर्भीडपणे माडणे हे त्याचे एक वैशिष्ट्य आहे. आत्मनिष्ठता हे माधव जूलियनच्या काव्याचे एक विशेष लक्षणच आहे. विविध वृत्तात आधुनिक कविता प्रगट होते. यमकाचें बधन कैक वेळा ती झुगारून देते. सुनीते, भावगीते, अशा लघु स्वरुपाने ती वावरते. पैठणीऐवजीं पाचवारी पातळेच ती अधिक पसंत करते. महाकाव्याकडे आधुनिक कवीचे फारसे लक्ष नाहीं. फारच तर, खडकाव्यापर्यंत त्याची धाव. सध्याच्या धावपळीच्या व अस्वास्थ्याच्या काळात वाचकालाहि अशीच, आपल्या बोलींत लिहिलेली, आपल्या सासारिक भावना रगविणारीं, चुटचुटीत लघुकाव्येच पचतात व आवडतात अशीं गज्जले व सुनीते माधव जूलियन यानीं खूप लिहिलीं आहेत. त्यात त्याची रसिकता, बहुश्रुतता, प्राजलता व निर्भीकता हे गुण स्वच्छपणे दिसतात.

## विशिष्ट कामगिरी

आधुनिक मराठी कवींमध्ये प्रा. माधवराव पटवर्धन याचे एक विशिष्ट स्थान आहे. त्याच्याइतका सशोधक बुद्धीचा, व्यासगी वृत्तीचा व ठाशीव भाषाशैलीचा दुसरा कवी अलिकडच्या काळात झालाच नाहीं. आपले काव्य पुनःपुन' घासून–पुसून, स्वच्छ करून, पैल् पाडून एखाद्या तेजस्वी हिऱ्याप्रमाणे रसिकाच्या हातीं देण्याचा माधवरावाना मोठा उल्हास ! सामाजिक सुधारणेसाठीं त्याच्या चित्ताची जी चडफड होई ती त्याच्या काव्यातून ततरमाप्रमाणे वाहत आहे. उलट तरुण अतःकरणातील प्रेम–भावनेचीं शीतल-रम्य कारंजींहि त्याच्या काव्यात सर्वत्र उडत आहेत. मराठी काव्याला जाति-वृत्ताची भक्कम व व्यवस्थित तटबंदी उभारण्याचे श्रेय खास माधवरावाचेच !

## फार्शी भाषेचा व्यासंग

' माधव जूलियन ' ह्या फसव्या टोपण नावानें प्रसिद्ध असलेल्या ह्या कवीचे नाव माधव त्रिंबक पटवर्धन असे होते. त्याचा जन्म बडोदे येथें

ता. ११ जानेवारी १८९४ रोजीं झाला. मुळशी पेठ्यातील आवळस हें त्याचें मूळगाव. तेथें त्याचें मराठी शिक्षण झालें. १९०३ सालीं ते पुनः बडोदें येथें गेले व १९०९ सालीं ते प्रवेश परीक्षेत उत्तीर्ण झाले. ऐच्छिक भाषा म्हणून फार्शीचा अभ्यास त्यानीं केला. वडिलानी त्याचेवर फार्शीची जबरदस्ती केली होती. शिष्यवृत्त्या पटकावून व शिकवण्या मिळवून माधवरावानीं कॉलेजचा अभ्यास नेटाने रेटला. १९११ सालीं ते इंटर-मध्ये उत्तीर्ण झाले त्यावेळीं त्यान फार्शीतील एक बक्षीस व पहिल्या वर्गाचे गुण मिळाले. १९१६ सालीं ते फार्शी व इंग्रजी हे विषय घेऊन बी. ए. झाले. १९१८ सालीं ते एम् ए ची परीक्षा दुसऱ्या वर्गात उतरले. त्यावेळींहि त्याचे विषय फार्शी व इंग्रजी हेच होते त्याच्या या फार्शीच्या व्यासगाचे फल म्हणजे १९२६ सालीं त्यानीं प्रसिद्ध केलेला फार्शी व मराठी कोश. त्यासाठीं सतत पाच वर्षे ते परिश्रम करीत होते. मराठींत हा कोश अजूनहि अद्वितीयच आहे.

## मानाचे तुरे

एम्. ए. झाल्याबरोबर त्याना पुणे येथील फर्गसन कॉलेजात फार्शीच्या प्राध्यापकाचे काम मिळाले. ते त्यानीं १९२४ सालापर्यंत केलें. नतर राजीनामा देऊन त्यानीं चार वर्षे हायस्कूलच्या शिक्षकीत घालविलीं. १९२८ सालीं कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजात फार्शीचे प्राध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली तेथे ते अकरा वर्षे होते. १९३३ सालीं नाशिक येथे कवि-संमेलन भरले. त्याचे अध्यक्षस्थान माधवरावाना देण्यात आलें. तसेच १९३६ सालीं जळगाव येथे ' महाराष्ट्र साहित्य समेलन ' भरलें. त्याच्या अध्यक्षपदाची माळहि माधवरावाच्या गळ्यात पडली. " छन्दोरचना " ह्या त्याच्या पाडित्यपूर्ण प्रबधामुळे मुंबई विद्यापीठानें माधवरावाना १९३९ सालीं " डॉक्टर " ( D Litt ) ही पदवी अर्पण केली. मराठी विषयात ही पदवी मिळविणारे माधवराव पहिले !

## दहा काव्य-ग्रंथ

सुमारें वीस वर्षे माधवरावानीं गद्य-लेखन व पद्य-लेखन केले. त्यांचे

दहा काव्य ग्रथ बाहेर पडले आहेत. १९२६ सालीं त्याचा 'विरह–तरंग' बाहेर पडला आणि तरुणाच्या जिव्हेवर खेळू लागला. १९२८ सालीं "सुधारक" हा त्याचा काव्य-ग्रथ प्रसिद्ध झाला आणि त्यातील नवविचाराचे धक्के महाराष्ट्राला बसूं लागले. "गज्जलाञ्जली, स्वप्नरजन, मधुलहरी व तुटलेले दुवे" ह्या पुस्तकात त्याच्या सुनीताचा व स्फुट कविताचा सग्रह झालेला आहे. उमर खय्यामच्या रुबायाचे भाषातरहि त्यानीं प्रसिद्ध केले फार्शीच्या अभ्यासात जन्म घालविलेल्या व नाव मिळविलेल्या माधवरावानीं आपल्या आयुष्याच्या अखेरीस भाषाशुद्धीचे मोठे आदोलन केले. परभाषाचे आक्रमण मराठी भाषवर होऊ नये आणि त्या आक्रमणामुळे मराठींतील जुने शब्द विसरले जाऊ नयेत ह्या प्रचाराचा त्यानीं धोशा लावला. त्यासाठीं "भाषा शुद्धि–विवेक" नावाचे स्वतत्र पुस्तकच त्यानीं लिहिले. त्यात त्यानीं आजच्या मराठींतून काढून टाकण्यास योग्य अशा बाराशे शब्दाची जत्रीहि दिली आहे. अशी महाराष्ट्र–शारदेची बहुविध सेवा करून हा पडित-कवि वयाच्या अवघ्या ४५ व्या वर्षीं, ता. २९ नोव्हेबर १९३९ रोजीं, पुणे येथे निधन पावला.

"मी 'काव्यं यशसे' म्हणूनि धरिली नाहीं करीं लेखणी। अर्थ हवा म्हणूनि नकलीं स्तोत्रे न मी गाइलीं॥" अशी आपली भूमिका माधवरावानी सागितली आहे. कीर्ति किवा पैसा याकडे लक्ष न देता माधवराव लेखन करीत. त्याचा स्वभाव जसा स्वाभिमानी व बाणेदार होता, तसेंच त्याचे साहित्यही घोटीव व ठाशीव आहे. मातृभाषेचा कडकडीत अभिमान, समाजसुधारणेचा तीव्र अभिनिवेश, प्रेम–भावनेचा स्वच्छंद अविष्कार आणि नव्या नव्या चाली व विषय—या विशिष्ट गुणामुळें माधवरावाची काव्यरचना म्हणजे मराठी भाषेतील एक सुंदर लेणें ठरलें आहे. महाराष्ट्रातील सुशिक्षित वर्गाचे तोड नवीन कवितेकडे वळविण्याचे श्रेय "रवि–किरण–मंडळा"स आहे आणि त्या श्रेयाचा मोठा वाटा माधवरावाना आहे.

## मातृभाषेचें स्तोत्र

स्वभाषा व स्वसंस्कृति याचा पटवर्धनाना गाढ अभिमान होता. मातृभाषेच्या मोठेपणाचे जे गीत त्यानीं रचले, ते तर आता सर्वतोमुखीं झालेले आहे. त्यातील स्वाभिमान, कृतज्ञता, महत्वाकाक्षा व विशाल दृष्टी हे गुण अलौकिक आहेत. मातृभाषेचे महिम्न-स्तोत्र गाताना ते म्हणतात—" मराठी असे आमुची मायबोली जरी आज ही राजभाषा नसे। नसो आज ऐश्वर्य या माउलीला, यशाची पुढे दिव्य आशा असे। जरी पचखडात ही मान्यता घे स्वसत्ताबळे श्रीमती इग्रजी, । मराठी भिकारीण झाली तरीहि कुशीचा तिच्या तीस केवी त्यजी ? ॥ " राज-भाषा म्हणून इग्रजीला व राष्ट्र-भाषा म्हणून हिंदीला मानाचे स्थान मिळाले असले, तरी मातृभाषा म्हणून प्रत्येक महाराष्ट्रीय आपल्या हृदयाच्या देव्हाऱ्यात मराठीचीच पूजा करील. " जरी मान्यता आज हिंदीस देई उदेले नवे राष्ट्र हें हिदवी, । मनाचे मराठे मराठीस ध्याती हिची जाणुनी योग्यता, थोरवी, । असू दूर देशावरी उत्तरीं वा असू दक्षिणी दूर तजावरीं । मराठी असे आमुची मायबोली, अहो ज्ञानदेवीच देखा खरी ॥ "

मराठीचे सर्व भक्त एका मायबोलीच्या कृपाछत्राखालीं बसू शकतात—मग ते राहणारे कोठलेहि असोत किंवा कोणत्याहि धर्माचे असोत. सर्व जगात आम्ही आमच्या मायबोलीला मान्यता मिळवून देऊ अशी प्रतिज्ञा करताना पटवर्धन म्हणतात, " मराठी असे आमुची मायबोली जरी भिन्न धर्मानुयायी असूं, । पुरी बाणली बंधुता अंतरंगीं, हिच्या एक ताटात आम्हीं बसू । हिचे पुत्र आम्ही हिचे पाग फेडू, वसे आमुच्या मात्र हृन्मंदिरीं । जगन्मान्यता हीस अर्पू प्रतापे हिला बैसवू वैभवाच्या शिरीं ॥"

आजमितीला इग्रजीसारख्या सपन्न भाषाच्या मानानें मराठी गरीब असेल, तर तिच्या ' लक्तराकडे ' पाहूं नका, तिचे रूप व चापल्य अद्वितीय आहे, ती ' पारतन्त्र्यात खंगली ' आहे, तिची ' थोर संपत्ती ' उपेक्षेमुळे बुडाली आहे, पण आम्ही सिंधु मंथून रत्नें काढूं आणि तिनें

तिला भुषवू, मग तिला जगातील भाषा खंडणी देतील, असा अकुंठ आशावाद कवीने या काव्यात ओतलेला आहे. कोल्हटकरांच्या 'महाराष्ट्र गीता 'प्रमाणेच पटवर्धनांचे हे भाषा-गीतहि महाराष्ट्र-लक्ष्मीच्या कंठातील एक तेजःपुंज रत्नहार आहे.

## महाराष्ट्राचा कडवा अभिमान

महाराष्ट्राचा जळजळीत अभिमान पटवर्धनांच्या अंगीं कसा खेळत असे हे त्यांच्या ' मराठबाणा ' या कवितेवरून स्पष्ट दिसते. महाराष्ट्राचे रूप व सामर्थ्य वर्णन करताना ते म्हणतात, ' महासिंधु याला असे पाठि-राखा, तसे साह्य सह्याचलाचे कडे। ' ' महाराष्ट्र हा कृष्णपाषाण देही, । परी लोहपाणीहि अंगात या।" महाराष्ट्राचे निर्माते छत्रपती शिवाजीमहाराज यांच्याविषयीं कवीने पुढील शब्दांत आपला आदर व्यक्त केला आहे. " सदावंद्य जो क्षात्रकर्मप्रणेता महाराष्ट्र-सम्राट शिवाजी प्रभू। तया पूज्य ती पूज्य तत्सेवकांला न का संत-माता महाराष्ट्र भू ? "

ज्ञानेश्वरींतील मराठी भाषा तर अमृतालाहि फिकी पाडणारी! ख्रिस्ती, मुसलमान वगैरे इतर धर्मांच्या अनुयायांनासुद्धा मराठींत काव्य-रचना करून तिला विविधतेचे सौंदर्य मिळवून दिले आहे. हा तिचा गुण गाताना कवि म्हणतो—" जिच्या ' अमृतातेहि जिंकील पैजा ' असा बोल ये प्रत्ययाचा निका। पहा भिन्नजातीय पुष्पाकरांहीं दिसे गालिचा की हिचा वाटिका। " मराठी भाषेच्या प्रेमामुळे तिचा कैवार घेण्यास कवि सदैव सिद्ध आहे. तो आपले ब्रीद जाहीर करतो —" मराठीस अन्याय कोठेहि झाला, स्वदेशीं-विदेशीं कुणीं गाजिले। मराठी कसा मी न संताप माझा धडाडे जरी तीव्र दुःखानिले ? । मराठी जनांचेच वर्चस्व राहो स्वतःच्या महाराष्ट्रदेशीं तरी -।, प्रसादे तुझ्या कोणती व्यक्त आशा करूं अन्य हे वंद्य वागीश्वरी ? ॥ "

'मराठा' माणसाची चतुरंग ब्रीदावली कवीने पुढील मोजक्या शब्दांनीं गाइली आहे—" भवानी आमुची आई, शिवाजी आमुचा राणा। मराठी आमुची बोली, गनीमी आमुचा बाणा॥ "

## वात्सल्याच्या छटा

वात्सल्य रसाचे तुषार अनेक कवितामध्ये कवीने उडवलेले आहेत पण त्या सर्वांत ‘ अगाई ’ या काव्यातील मातृभक्तीचा उमाळा काही विलक्षण आहे. एक आई आपल्या मुलाला निजविण्यासाठी रात्रीच्या वेळीं गाणे गात आहे. गाणे गातागाता तिला आपल्या स्वतःच्या आईची आठवण होते आणि ती म्हणते, “ तुज थोपटते, माडीवर मी घेते । झोकेहि हळूहळू देते । जर आईची माडी शिर टेकाया । तर इन्द्रपदहि ते वाया ! । मज दुर्मिळ ती जीवर ठेवुनि डोके । विसरूनि भोवतिल धोके, । वाटते यथेच्छ रडावे । अन् पदराखालीं दडावे, । झोपेत अथांग पडावे । ही प्राप्त तुला-नीज ! नसे जरि बाळा पाळणा आणि झोपाळा ॥ ”

आपल्या मुलासाठीं झिजताना आपल्यासाठीं अशाच प्रकारे झिजणाऱ्या आई–बापाची आठवण होणे किती स्वाभाविक ! त्या दुहेरी प्रेमाचे धागे राजकवि यशवंतानीं “ दैवते मायतात ” या कवितेत गुंफले आहेत. तेच कौशल्य पटवर्धनानीं या कवितेत दाखविले आहे, शेवटी ते म्हणतात, “ मज आईने हेच नभाचे लेणे । दाविले असेल मजेने । भरवित इवले काउचिऊचे घास–। रुचि काय तिच्या प्रेमास ! त्या प्रेमाची गोड गहन उत्कटता । या हृदयीं आता पटता । हा स्मारक बाल्यसुखाचा । हा स्मारक मातृसुखाचा । हा साक्षी मधु कुतुकाचा, । नमि नम्रता मी परिचित या चंद्राला । ये हृदयीं भाव–उमाळा ॥ ”

‘ प्रेमस्वरूप आई ! वात्सल्यसिंधु आई ! ’ असे गौरवगीत गाऊन माधवरावानीं ‘आईची आठवण’ केली आहे. ती कविता वाचून यशवंता-च्या काव्यातील काहीं काहीं शब्दाची, भावनाची व विचाराचीहि आठ-वण होण्यासारखी आहे. माधवराव म्हणतात, “ विद्या-धन–प्रतिष्ठा लाभ अता मला हीं । आईविणें परी मी हा पोरकाच राहीं । सारे मिळे परंतु आई पुन्हा न भेटे । तेणे चिंताच चित्तीं माझ्या अखंड पेटे ॥ आई तुझ्या वियोगे ब्रह्मांड आठवे गे । कैलास सोडुनी ये उल्केसमान वेगें ॥ ”

पोरक्या मुलाच्या मनात कोणत्या आशा नाचतात ? ‘ ही भूक

पोरक्याची होई न शात आई । पाहूनिया दुज्याचे वात्सल्य लोचनाहीं । वाटे इथूनि जावे, तूझ्यापुढे निजावें । नेत्रीं तुझ्या हसावे, चित्तीं तुझ्या ठसावें ।। ” शेवटीं ‘ परि येइ येइ वेगे ’ या यशवतांच्या शब्दात ते आळवतात, “ घे जन्म तूं फिरूनी । येईन मीहि पोटीं ।। ”

## कल्पनेचे विलास

भाषेचे अलंकार घडवून किंवा कल्पनेचीं फुले फुलवून आपली कविता शृगारण्याची हौस पंडित-कवि पटवर्धनाना फारशी नाहीं. तथापि काव्य म्हटले कीं, त्यात कल्पनेचें नर्तन आलेंच. रात्रीं रानात लुकलुकणाऱ्या काजव्याप्रमाणे त्याच्या काव्यांत अधूनमधून काहीं काहीं सुदर कल्पना चमकतात. ‘ चांदण्यातील हुरहूर ’ या कवितेत पृथ्वीदेवी चादण्याचे रेशमी वस्त्र ल्याली आहे अशी कल्पना करून ते म्हणतात— ‘ अमृताने सृष्टि न्हाली, । चद्रिकेचें क्षौम ल्याली, । हा हिजवर उधळे चूर रुप्याचा का हिम का कापूर ? ।। ”

बालकवीचा ’ निर्झर ’ प्रसिद्ध आहे. त्यात निसर्ग उड्या मारत आहे. पटवर्धनानींहि ‘ निर्झरास ’ ही कविता रचली आहे. त्यात त्याच्या स्वभावाचे वैशिष्टय दिसून येते. आरभीं “ तुझ्या हास्यात चमके । साऱ्या विश्वाचे चैतन्य-। धन्य माझे डोळे धन्य ! ।। ” असें म्हणून आपल्या हृदयातील निराशा आठवून ते विचारतात—“ बाळ, तुझ्या रे वाचून । कळणार तरी कुणा । भग्न अतरींच्या खुणा ? ।। ”

आशा कशी असते याचे वर्णन करताना ते लिहितात—“ प्रीतीच्या सुंदर बागांत् । सुमकंचुक घालुनि अगांत् । आशा बसली गाणीं गात् । वसंत रागातले आळवित मोहक मधुर स्वर रंगात् ।। ”

## सामर्थ्याचे पूजक

गाधीजींची अहिंसा शौर्याची, प्रतिकाराची व तेजस्वी आहे हे मर्म अचूक ओळखून पटवर्धनानीं त्याचा गुणगौरव “ महात्मा काय करील एकला ? ” या कवितेंत असा केला आहे—“ घेउनि सत्य, प्रीति, अहिंसा

याचा झेंडा करीं । सचरे गांधी देशावरी । खादी पटका, त्यावर चरका, अर्धा उघडा गडी । तोड दे जुलुमाला हरघडी ॥ सानथोर रंजलेगाजले याना हृदयीं धरी । योग हा अनासक्तिचा वरी । हा क्रांति कराया झटे राज्यधोरणीं । हा पुढे सरे कीं प्रथम मी पडो रणीं । हा हिरा न फुटणें हाणा घण ऐरणीं । भूतदयेचा सागर अथवा म्हणा दिसे चेवला । महात्मा करिल काय एकला ? ”

## ईश्वरापुढ नम्रभाव

पटवर्धन हे चिकित्सक वृत्तीचे व तार्किक बुद्धीचे होते. ईश्वराला मानवाने कसे पूजावे ? याविषयीं कुसुमाग्रजानी एक भावपूर्ण कविता केलेली आहे. तशाच मानवतेच्या प्रेमाने भरलेले ‘पोरक्या पोराचा धावा’ हें पटवर्धनाचें काव्य आहे. त्यात तो अनाथ पोर परमेश्वराला म्हणतो— “ कोणत्या स्वरूपीं प्रभो, तुला मी पाहूं ? । ये धाव आसवे पूस, पसर तव बाहू । तूं विश्वात्मक, तू गूढ, तुझी किती सत्ता । मी क्षुद्र जीव मज चोहींकडुनि इयत्ता । ससार जगाचा चालविशी तू बापा । मी स्वतःच-साठीं खपुनि टाकितो धापा । तूं सर्वशक्तिमान् सिंधू तुला भेटाया । मी बिंदु धडपडे, शोषी मज ही माया । जे प्रेम अनिर्वचनीय तेच तूं देवा । मी कुठे अनुभवू ? कशी करू तव सेवा ? ”

आईच्याच ठायीं ईश्वराची मूर्ति पहाणारा तो मुलगा म्हणतो— “ प्रेमाची गंगा क्षमाशील जी आई । तन्नेत्रीं, ओष्ठी, स्तनीं तुझी नवलाई । अनसूया माता किति पदवी ही मोठी । साकार ईश्वरी त्रिपुटी येई पोटीं । पोरकें पोर मी रडतो धाई धाई । मी करू कुणाच्या माडीवर अंगाई ‘ । खेळूनि गुदगुल्या करूं कवण जीवाला ? । गाळूनि अश्रू मी आणुं कुणास उमाळा ? । संपली चढणही, वृथा अता ती आस । परि व्हावें बालक, रुचे हेच जीवास ॥ ”

संसाराच्या भाराने चेपलेला पिता, दारिद्र्याला कटाळून म्हणतो— “ दिडकीसहि किति लागती अर्जे–आर्जवे । भागे न कष्ट कामाने । आणखी स्वभावार्जवे ॥ ” “ बाहेर चादणे पडे दुधासारखें । परि भरेल

का बाळाचे पोट या दुधाने सवे ? ॥ " " वाटते नको हे जिणे । ही पापभीरुता जाची । पैश्याच्या छत्राविणे ॥ " या काव्यात वात्सल्य व करुण हे दोन्ही रस भरलेले आहेत. 'विधवेचा बाळ' या कवितेतहि हेच रस खेळत आहेत.

## अन्य कवींचें गुण-ग्रहण

तांबे याच्या गुणाचे चहाते माधवराव होते. बोरकरानीं 'कविवर भास्करास' ही सुश्लिष्ट कविता लिहून ताब्याचा गौरव केला, तसाच पटवर्धनानींहि 'कवि भास्करास' या कवितेत केला आहे, तो असा—
" तू प्रसाद, तू रस खरा कवी । गा, बुडव जगत हे सुखासवीं ॥ "
" तृणीहि तुज सौदर्य आढळे । गळे अहता, भाव उचमळे । आनदाचा गंध दरवळे, हृटसमावि का वृथा हवी ॥ " " शोधाया जा शब्द कशाला । मोहुनि धावे प्रतिमाचाला । सगीताशीं रग मिळाला, चित्र-मालिका पहा नवी ॥ "

तांबेच काय पण सर्व कविवर्ग विषयीं पटवर्धनाना आपुलकी वाटत असे. कवीची गरिबी व अवहेलना ध्यानीं घेऊन ते एका कवितेत म्हणतात, " सोसावया अजि नकोच दुरुक्ति मारा । गेला कवीश्वर, बरा सुटला बिचारा ! ॥ " 'वृद्ध कवि' हे त्याचे काव्य तर अत्यत भावनापूर्ण आहे. जणु काहीं त्याच्या प्रौढ वयातील मनाचेच ते प्रतिबिंब आहे. त्याचें विडबन त्यानीं स्वतःच 'वृद्ध भटजी' या आपल्या कवितेत केले आहे. यावरून 'वृद्ध कवि' हे आपले काव्य त्याना किती आवडले असावे हें दिसून येते. या काव्यातील 'वृद्ध कवि' तरुण कवीना उद्देशून नम्रतेने म्हणतो—"मी झालो पिकले पान आणखी तुम्ही । टवटवीत सुमने नामी । काव्याच्या कल्पद्रुमीं ॥ या भाट उषेचे तुम्ही, गीत गा नवें, । क्रांतिचें पुढील तुम्हाला । सौदर्य दिसे, वानवे. ॥ शारदा दिव्य माउली थोर आपुली । अन् बाळे आपण सारीं । सोनुलीं तिचीं सानुलीं ॥ नाचलो खेळलो पुरा, अता भागलो । मी माडीवर आईच्या हा पहुडाया चाललो. " हीच कृतार्थतेची, समाधानाची वृत्ति माधवरावाना प्राप्त झालेली होती.

## वादळ उठविण्याची शक्ति

माधवरावाचे एक एक काव्य म्हणजे नवनवे वादळ ! ' विरह-तरंग ' हे त्यांचे पहिले खंड-काव्य किती वादग्रस्त ! डे व्ह ट्र सोसायटीने त्याला पारितोषिक देण्याचे नाकारले, पण पुढे मुंबई नागपूर विद्यापीठांनीं तें प्रवेश-परीक्षेसाठीं लावले. ' हे लांच्छनास्पद आहे, तिरस्करणीय आहे ' अशी टीका कोणी कोणी केली, तर कोणी ' कवीने आपल्या काव्य-कलेची बहार उडवून दिली आहे. ' अशी प्रशंसा केली, एवढेच नव्हे तर, काही चोखंदळ चिकित्सकांनीं असेहि मत प्रदर्शित केले कीं, "कित्येक बाबतींत कालिदासाच्या मेघदूतापेक्षाहि विरह-तरंग अधिक सरस आहे " कोणाला या खंडकाव्यांतील ' नायक निर्जीव ' वाटला, तर कोणाला ' नायिका अवास्तव ' दिसली. पण बहुतेक सर्व टीकाकारांना व वाचकांना या पहिल्याच काव्य-कृतीवरून कवीच्या लेखन-सामर्थ्याची जाणीव मात्र पटली हे खास.

या काव्याचे मूळ म्हणजे ' प्रियकराची विरह-पत्रिका ' या नावाचे १९१३ सालीं रचलेले पंचवीस श्लोक. त्याचा विस्तार करून २३२ श्लोकांचे हे खंडकाव्य १९२६ सालीं कवीने प्रसिद्ध केले. त्याची दुरुस्ती व सफाई कवीने खूपच केली अशा परिष्काराची कवीला मोठी हौस. सात वर्षांनीं दुसरी व नंतर पंधरा वर्षांनीं तिसरी आवृत्ति या काव्य-संग्रहाची निघाली.

## कॉलेजियनांची प्रणय-कथा

या छोट्याशा काव्यात प्रभाकर नांवाचा एक कॉलेज-तरुण आपली प्रेम-कहाणी सांगत आहे. वैशाख शुद्ध अष्टमीच्या दुपारपासून काव्यास प्रारंभ होतो आणि दुसरे दिवशीं सकाळीं नायक नायिकांचा विरह संपतो. आपल्या विफल प्रेमाचीं स्मृति-चित्रे नायक, स्वगत भाषणा-प्रमाणे, आठवून आठवून रंगवीत आहे. प्रार्थना-समाजिष्ट अशा सुधारकी कुटुंबांतील ' इंदु ' नावाच्या तरुण विधवेवर प्रभाकराचे प्रेम बसतें.

तीहि कॉलेजात शिकतच असते. कॉलेजातील टेनिसचे सामने, सहभोजने सहली, इत्यादि नाना निमित्तानीं त्या दोघाचा सहवास वाढतो व प्रेम-भाव बळावतो. ‘ थोराची, विदुषी, सुधारक–सुता ’ अशी इंदु असल्या-मुळे ती मोकळेपणानें वावरते. महाबळेश्वराच्या सृष्टि–सौंदर्यांतहि ते विहार करतात. त्यावेळीं प्रभाकर लग्नाची गोष्ट काढतो, तेव्हा इंदु नकार देऊन त्याच्यापासून दूर जाते. यामुळे नायकाच्या हृदयांतील ‘ विरह-तरगा ’स प्रारंभ होतो त्याला सर्वत्र इंदुच दिसू लागते. आणि ती कशी ? तर— “ जीचें भाषण मजु गुंजन जणूं कुंजीं करी कोयळ । जीचे अतर भाव-सुंदर जणूं ओथंबले मोहळ ॥ ” कोकिळेसारखा आवाज आणि मधा-सारखें हृदय–अशा गुणानीं नटलेली नायिका, तर नायक कसा ? तो स्वतःच आपले वर्णन करतो, “ जो क्रीडापटु, वेषभक्त, कवनप्रेमी, कला–चाहता, । ज्याला मासिक वेतनात बहुशा कष्टेच ये राहता, । आज्ञा एकच ज्यास धार्मिक गमे, सौंदर्य–धर्म चर ! । विद्यार्थ्यास अशा म्हणे कुणि महाविद्यालयीं ‘ मचर ’ ! ॥ ” मचर, किंवा रोमॅंटिक, अशा या तरुणालाहि समाज–सुधारणेचा ध्यास होतो. तो सागतो, “ होतों एक बडा सुधारक तदा विद्यार्थिकालात मी, । सर्वांगीण सुधारणा ध्रुव जया तारा निराशा–तमीं, । ”

## प्रेमाचें तत्त्वज्ञान

महाबळेश्वराच्या सृष्टि-सौंदर्यामुळे त्या दोघाना एकमेकाचे सौंदर्य विशेषच आकर्षक वाटूं लागले. तेथील उन्हातील सौम्यता, स्ट्रॉबेरी फळाची लाली आणि गुलाबाचे रंग–हे सारे आपल्या इंदूने उसने दिले आहेत अशी कल्पना करून नायक गुणगुणतो, “ तेथे ऊन तुझ्याकडूनि उसनी घे सौम्यतामाधुरी । ओठापासुनि रम्य ताबुस छटा स्वादिष्ट इष्टा-पुरी; । घेई रानगुलाब कान्तिच तुझी, ये बाह्य शोभा खरी । तो निर्गंध परी निराशच करी गे चित्र–काव्यापरी. ॥ ”

इंदु दूर गेली, तेव्हा उदारपणाने व खऱ्या प्रेमभावानें प्रभाकर तिचे कल्याणच चिंतितो व म्हणतो, “ कोठेही अस तू ! सुखी पण सखे,

आहेस ना इदु गे ? । ध्येयाचे वद, का तुझ्याहि फुटले स्वश्चापवर्णी ( = इंद्रधनुष्याच्या रगाचे ) फुगे ? । का वाटे तुज, देव मानुनि तुवा पाषाण आराधिला, । प्रेमाचा उलटा वियोगच भवीं सायास हा साधिला ? ॥ ” प्रभाकराला वाटे कीं, खरें प्रेम हे उदबत्तीप्रमाणे स्वतःला जाळील, पण दुसऱ्याला ताप देणार नाही, तो म्हणतो, “ अन्याला बुडवावया बिलगते ते प्रेम नाहीं खरे, । तत्स्वातत्र्य हिरावयास बघतें तें प्रेम नाहीं खरे, । स्वागे धूप जळूनि गधित करी वायूस, जाई वरी, । सेवा-धर्महि यापरीच जग हे आनददायी करी ॥ ”

## काव्यांतील दोष

तरुणाच्या प्रेमाचा आविष्कार या काव्यात कलात्मक पद्धतीने केला आहे. नायक—नायिकाचे स्वभाव उदार व उदात्त रगविले आहेत. पण या काव्यात कल्पकता व सुबोधता याचे प्रमाण फार कमी आहे. ‘सहलणें, कानगुजला, हळदुनी ’ असे नवे शब्द कवीने आपल्या टाकसाळींत पाडले आहेत, तसेच ‘ रुजी, हिंपुटी ’ वगैरे जुने शब्दहि वापरले आहेत. त्याच्याइतकेच अपरिचित असणारे ‘ कर्दा, वडाग ’ असे ग्रामीण शब्दहि त्यानीं योजले आहेत आणि ‘ स्वर्हानि ’ ( Paradise Lost ), ‘ शिरीषशील, शैलकाठिन्य ’ ‘ सौंदर्यधर्म चर ’ असा सस्कृतचा माराहि केला आहे. ‘प्रेमाची परिपूर्णता परिणयीं ’ अशा अनुप्रासयुक्त अर्थातर-न्यासाचा अर्थ किती काव्य—वाचकाना झटदिशीं कळेल ? शिवाय ‘ हृद्य मजा ’, ‘ खुर्चीसन्मुख ’, ‘ ज्वानीच्या अरुणोदयीं ’ असे शब्द—सकरहि मधूनमधून वाचकाला खटकतात. अशी भाषेची क्लिष्टता, कल्पना-शक्तीचा मर्यादितपणा आणि भाषालकाराची दुर्मिळता या तीन उणिवा त्याच्या पुढील काव्यातहि आढळतात.

## ‘सुधारका’ची पार्श्वभूमि

‘सुधारक’ या खंड—काव्याचा थाट काहीं वेगळाच आहे. एक कथा-सूत्र घेऊन त्यांत कवीने काव्याचे मणि ओवलेले आहेत. या मण्याची काति, वजन व आकार ‘ विरह-तरंगा’ हून अगदीं निराळा आहे. ‘सुधारकाची’

भाषा अगदीं सोपी व ओघवती आहे आणि वृत्त धावतें व सुटसुटीत आहे. ' घरास आली सरला बाला ' अशा सुगम ओळीमागून ओळी वाचताना आपण रे. टिळकांचीच एखादी काव्यकथा वाचीत आहों असा भास वाचकास होतो. प्रारभीं कथानकाला अशी पार्श्वभूमि जोडलेली आहे कीं, दिवाळीचे दिवस आहेत–'मधुर वस्तूची चगळ' आहे— ' खमग गप्पा ' चालल्या आहेत आणि परीक्षा तर दूर आहे—अशा ऐषआरामाच्या परिस्थितीत काहीं स्नेहीमडळी कडोविकडीचे वादविवाद करीत असताना एक अज्ञात कवि तेथे आले. ' देखा टेकाडेच सवाई । ' असे सुदर काव्य–गायन त्यानीं केले. ते काव्य म्हणजेच ' सुधारक '.

## शब्दांची चमत्कृति

व्यवहारातील ' चलनी ' भाषा कवीने सर्वत्र वापरली आहे. ' नंदी, भडमुजे, झब्बू, खाबू, गबू, ' इत्यादि काव्याला वावडे असणारे शब्दहि या आधुनिक कवितेत विनोदार्थ घातलेले आहेत. आणि ते त्या त्या पात्राना शोभणारेहि आहेत. ' हवेवर हवाला ' ' चहा चहाची ' अशा शब्दलीला थोड्याच आहेत. ' देशभक्तिचा ताठा ' धरून ' पायचाकी ( सायकल ), पाटाग ( ममता ), ' असे बरेच शब्द वापरले आहेत. पण काव्याला क्वचित् क्वचित् जी दुर्बोधता आली आहे, ती मुख्यत: संस्कृतच्या दडपणाने. ' तिची दुरत्यय ती वाग्यतता । ' अशा सस्कृत शब्दाचा आशय भरभर काव्य वाचणाऱ्याच्या गळीं कसा उतरणार ? ' भाषेचाहि कठिण तडाखा । मतामताचा काय कडाखा ।' असा पिंड या खडकाव्याचा आहे. तो अज्ञात कवि ' नवकवितेचा प्रेमळ पाठक । जुन्या कवींचा कृतज्ञ पाइक ' असा समतोल वृत्तीचा दाखविला आहे—किंबहुना माधवरावाच्या स्वभावाचेच ते प्रतिबिंब आहे. इंग्रजी शब्दसुद्धा मराठी पेहराव चढवून दत्तक घेण्याची माधवरावाना हौस होती ' नाशनिष्ठ ( = नॅशनॅलिस्ट ). कळप ( = क्लब ), मुक्ता ढवळे ( = पर्ल व्हाइट ) ' इत्यादि चमत्कृतिजनक शब्दामुळे काव्याला विनोदाची खुमारी आली आहे.

## उपहासाचा सुंदर नमुना

' सुधारक ' हे काव्य मुख्यतः उपहासपर आहे. समाजात सत्ता, विद्वत्ता व ऐश्वर्य यानीं मोठेपणास चढलेली माणसेसुद्धा किती वचना करतात व विसगत वर्तन ठेवतात हे यात तीक्ष्ण भाषेने रगविलेले आहे. थोरामोठ्याचो ढोंगे उघड्यानागड्या स्वरूपात कवीने चव्हाट्यावर माडलेली आहेत त्यामुळे ' कुत्सित सगळीकडे कुचाळी ' असा भास हें काव्य वाचताना दांभिक सुशिक्षिताना होणे साहजिकच आहे पण माधवरावानीं आपल्या प्रखर बुद्धिप्रकाशात समाजातील साप-विंचू उपहासाच्या चिमट्यानें धरून लोकापुढे माडले, हे त्याचे धैर्य अभिनंदनीय होय

कादंबरीप्रमाणे एकेका ' अध्यायात ' एकेका पात्राचा प्रवेश घडविलेला आहे. सर्व कथा अठरा अध्यायात सागितली आहे. पहिल्या अध्यायात रावबहादुर ठोसर याचे स्वभाव-चित्र सविस्तर रगविलेले आहे. हे ' बिलदर कायदेबाज ' होते. वकिली करून त्यानीं खूप पैसा मिळविला आणि समाज सुधारणेत भाग घेतला. ' सुधारणा पण यत्नी सक्रिय.' त्यामुळे पुनर्विवाहाचे वेळीं ते मागे सरले नाहींत. पाच यत्ता इग्रजी शिकलेल्या विमलेशीं त्यानीं विवाह केला. पहिल्या बायकोपासून झालेली त्याची मुलगी सरला. ही प्रि. अण्णासाहेब कर्वे याच्या कॉलेजात शिकून गृहीतागमा झाली. तिचे लग्न रंगराव देशमुख नावाच्या तरुण विधुराबरोबर झालें.

या कथेचा नायक वासू राजे. त्याचे अतर्बाह्य असे सविस्तर व मनोहर शब्द चित्र कवीने रेखाटले आहे विसावे वर्षीं विधवा झालेली सुशीला ही त्याची आई. नर्सचा धदा करून ती पोट भरी व मुलाचे शिक्षण चालवी. वासू मॅट्रिक झाला; त्यावेळींच सुशीलेला मृत्यु आला. वासू हा " प्रसन्न, राजस, विनीत, सालस " असा नायक दाखविला आहे. विचारामध्ये तो आगरकराचा सच्चा चेला आहे.

## सुंदर शब्दचित्रें

या काव्यातील दोन शब्द-चित्रे प्रेक्षणीय आहेत. फर्गसन कॉलेजातील

. पराजपे व प्रा. वासुदेवराव पटवर्धन—दोघेहि आपापल्या क्षेत्रात अग्रेसर. त्याचें वर्णन करताना कवि म्हणतो—" नच बहुवेषी वा कलिकारक । मूर्ति भव्य, सम उची जाडी । दोघाचे आवाज पहाडी । सारखीच वर्गात धडाडी । दोघे नास्तिक आणि सुधारक ॥ " यापैकीं प्रा. पटवर्धन हे जातिवत शिक्षक व अभिजात रसिक होते. त्याचे वर्णन विरोधाभासाने कवीनें केले आहे, ते असे—" भावबळे ज्वालामुखि पर्वत । परी शिरावर बर्फाचा थर । अरुण काति त्या भव्य मुखावर । हृदय कसे ते ? प्रसून, पत्थर । आणि गिरा ? मधुधारा, कर्वत ॥" त्याचे हृदय कधी फुलाप्रमाणे तर कधीं दगडाप्रमाणे भासे आणि त्याची भाषा म्हणजे कधीं करवतीची तर कधी मधाची धार ! त्याची सत्यनिष्ठा व सुधारकी बाणा याचे वर्णन पहा—"लेखन लहरींवर अवलबित । काहि म्हणो कुणि त्यास अडविणे । खिडारीं एल्गार चढविणे । निशाण सत्याचेच उभविणें । लोक बघुन हे होत स्तभित ॥ "

## कॉलेज-विद्यार्थ्याचें जीवन

बहुतेक सारे विद्यार्थी ऐष्रआरामी. त्यापैकीं बऱ्याच जणाना तेव्हा बालगंधर्वाचे विलक्षण वेड असे. बालगंधर्वाची मोहिनी का पडे, हें कवि पुढील मोजक्या शब्दानीं सागतो, " लबाड लाडिक डोळे हसतो । कुंद-कळ्याची नाजुक वेणी । ऐशी अधरीं दंतश्रेणी, । मान-लचक ती तर जिवघेणी । भोळिंखुळीं रंगात गवसती ॥ " नाटकाना आश्रय देणें निरनिराळ्या दृष्टींनीं अवश्य कसे आहे, हें उपरोधिक भाषेनें कवि कसे सागतो पहा—" यास नको का द्याया आश्रय ? । ललित कलाचा विकास कैसा । होइल गाडुन टाकुन पैसा ? । निधिवर नागापरी न बैसा, । अर्थ-शास्त्र हें म्हणे ' करा व्यय ' ॥ " अर्थशास्त्राच्या दृष्टीनें संपत्तीचा प्रवाह खेळता राहिला पाहिजे. तें तत्त्व विद्यार्थ्याच्या उधळपट्टीने पाळले जाते !

उपमा-उत्प्रेक्षा याचा दिपविणारा प्रकाश किंवा भिजविणारा वर्षाव माधवरावाच्या काव्यात फारसा आढळत नाहीं. पण मध्यरात्रींच्या शात वेळीं महाविद्यालय कसें दिसे याचें वर्णन करताना त्यानीं मनोरम उत्प्रेक्षा

केली आहे. ती अशी—" पहा उलटता मध्यनिशा ती, । दिसे तमाचा अथाग सागर । छात्रालय जणु जहाज त्यावर । प्रकाशमाला विलसे सुंदर । श्वासहि जणुं अवरोधी शाती ॥ "

सूक्ष्म व रेखीव वर्णन–शैलीचा कवीचा गुण अनेक ठिकाणीं दिसतो. कर्व्यांच्या कॉलेजभोवतींची वनश्री वर्णिताना कवि म्हणतो, " दूर सिंहगड आणि तोरणा, । मुठा नदीच्या पाटाखालीं । बागमळ्याची दाटी झाली, । सदैव वस्त्रे हिरवी ल्याली । अशी वनश्री खुले शोभना ॥ " त्या कॉलेजातील प्रि. वामनराव जोशी व प्रा. मायदेव याची शब्दचित्रे पहा—" किती दाविती गुरु ते कळकळ । रसज्ञ तार्किक नम्र विनोदी । कुणि शक्रातुन तत्त्वे शोधी । हाय कुणी कवि कर्टी गोडी । कुणि उद्योगी सदा धावपळ ॥ "

## विडंबनाची धार

पुण्यातील राष्ट्रीय पक्षाचे विडंबन करताना माधव जूलियन म्हणतात, " असावयाचे ऐसेच पुणे । अप्रामाणिक कार्मठ्याचे । अधिष्ठान राष्ट्रीय शाठ्याचे । दयानद हितवादी याचे । हाल पहा कीं, काहीं न उणे ॥ "

पुण्यात 'विद्येची तिथे अफाट पोई !' पहावें तिकडे संस्था व मडळें ! त्यातील दिखाऊपणावर टीका करताना कवि विनोदी सुरात म्हणतो, " जिकडे तिकडे मडळ, सस्था । रुमाल, डगला, शिष्ट उपरणें, । काहीं पोपटपचीं करणे, । बेताबेताने घर भरणे, । भाव हा पुन्हा–लय लय सस्ता. ॥ "

पुणे म्हणजे जशी विद्येची बाजारपेठ, तशीच विवाहाची उतारपेठ. वैशाखामध्ये तेथे लग्नाची धामधूम ! तिचे वर्णन कवीने पुढीलप्रमाणे केलें आहे—" विवाहपेठच पुणे शहर हें ! मालाची चहुकडून भरती, । लहानमोठे सवदे ठरती । बाप मुलींचे त्यातच मरती । तरुण झुराया नकोत विरहे ॥ " तसेच, " वैशाखाचे दिवस रजेचे । जरी उपरणीं-शाल् याचे । चौघडियांचे अन् सनयाचे । भुईनळ्याचे अन् हवयांचे रात्रदिन ते ऐन मजेचे ! "

सनातनी समाजाला विधवाचे केशवपन, सहगमन इत्यादि क्रूर चाली पसंत होत्या. त्याचा उपहास कवीनें पुढील शब्दानीं केला आहे–" भट-शाही ती गेली शिव शिव । बळजोरीचीं तीं सहगमने, । पतिमुक्तीस्तव तशींच वपने । इग्रजींत या कोठुन खपणे ? । धर्म नव्या सस्कृतींत निर्जिव । काय करावें ? गेली सत्ता. । भगवा झेडा पडला खालीं, । शास्त्रार्थाची होय टवाळी, । धर्माला कुणि नुरला वाली । सुधारकाना द्याया लत्ता. "

विलायतेस विद्या–सपादनासाठीं जाणारे तरुण परत येताना पदवी-बरोबरच गोरी बायकोहि आणतात व तिचा लकडा चुकविण्यासाटीं कोणी कोणीं तिला हजारो रुपये देतात. या सत्य प्रकारावर बारीकशी टीका करताना पटवर्धन लिहितात, " असावयाचा शिवाय मागे । विलायतेमधिं गोरा गोंधळ । सुवर्णपुष्पाची मग ओंजळ । द्यावी लागे म्हणत ' नको छळ' । नच अनुरागे पण उपरागे ।। "

ढोंगी सुधारक–वर्गावरहि कवीने ताशेरे झाडले आहेत. बोलघेवड्या सुधारकाचे वर्णन त्याने पुढील शब्दानीं केले आहे. " असेहि म्हणती सुधारणाप्रिय, । ' सुधारणा तर अवश्य व्हावी । इतरानीं ती परी करावी, । उघडपणे मी महती गावी । सहानुभूती दावुन सक्रिय !' ।।

## प्रेरक विचार

अशीच तीक्ष्ण टीका कवीने समाजावर 'तेथे चल राणी' या काव्यात सूचकतेने केली आहे. त्यात कवि म्हणतो, " भाळे न इथे प्रीति धना-विण कुणाला । ना माल गुणाला । लावण्य नसे जेथ जणू चीज किराणीं।। तेथे चल राणी ।। " मत्सराने ग्रासलेले हे जग सोडून संतोषाने भरलेल्या रानात जाऊन राहण्याची मनीषा कवि प्रगट करतो, " कोठे तरी रानात बसूं या नि हसू या । जेथे न असूया । संतोष पडूं दे न कुठे न्यून निधानीं ।"

पटवर्धनाचे बुद्धिवादी, स्वाभिमानी व चैतन्यपूर्ण विचार पहावयाचे असतील तर ' भ्रात तुम्हा का पडे ' हा गज्जल वाचावा. त्यात ते सिद्धांतरूप वाणीनें आदेश देतात, " कर्मयोगीं एक व्हा रे, नायकी वा गायकी । दावुनी घ्या लायकी । खानदानींतील नादाना, करीं घे फावडे ।।

जो करी कर्तव्य, घामेजूनि खाई भाकरी धन्य त्याची चाकरी। लेखणी बंदूक घ्या वा तागडी वा नागर। हिन्दवी व्हा चाकर। एक रक्ताचेच आहों साक्ष देई आतडें ॥ चूड घ्या अन् चेतवा हें रूढ धर्मांचे मढें। आचरा शांतिक्षमा, निंदोत ते जे निंदिती। संयमीला न क्षिती। वैरबाधा खास दिव्य प्रेममंत्राने झडे ॥ कायदा पाळा गतीचा, काळ मागे लागला। थांबला तो संपला। धावत्याला शक्ति येई आणि रस्ता सापडे ॥ ''

सेनापतीप्रमाणें असा आवेशपूर्ण आदेश देणाऱ्या कवीला स्वतःची जाणीव होते व तो विनयाने म्हणतो, " शब्द माझे बोबडे अन् ज्ञान माझें तोकडें। चित्त माझें बावडे ॥ " शब्द किंवा वृत्त फारसी असले, तरी त्यात भावना व विचार अस्सल मराठीच ओतण्यात माधवराव दक्ष असत. म्हणूनच ते ' भासे सुरई जरी इराणी। आहे पण ही मराठी ' असें रूपकाने सांगतात. त्यांच्या काव्यातील रस खास मराठी वृत्तींतून निघालेला आहे आणि म्हणूनच त्यांचे काव्य महाराष्ट्रात लोकप्रिय झालें आहे.

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) माधव जूलियन याच्या काव्याचे विशेष कोणते ते विस्तृतपणे लिहा.

( २ ) माधवराव पटवर्धनाचा जीवनवृत्तान्त थोडक्यात लिहा, त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथातील काहीं प्रमुख ग्रंथांची नावे लिहून त्यातील विषय कोणता ते स्पष्ट करा

( ३ ) ' आमुची मायबोली ' या कवितेचे रसग्रहणात्मक विवेचन करा.

( ४ ) ' विरहतरंग ' व 'सुधारक' या काव्यातील विषय स्पष्ट करून काव्य या दृष्टीने या दोन काव्याबद्दल तुम्हांस काय वाटते तें लिहा.

( ५ ) चिमुकली शांता, आईची आठवण, निर्झरास, खरा शूर, तेथे चल राणी, या गीतातील मध्यवर्ती कल्पना लिहा.

# राजकवि यशवंत : : : ४

"दुऱ्याखोऱ्यांतला" कवि 'राज-दर्बारा'स गेला, मोठी कीर्ति कमावून आला आणि अखेरीस 'राज-कवि'हि बनला; तरी पण तो सदैव लोक-कविच राहिला. श्रीसमर्थ रामदासस्वामी यांच्या वास्तव्याने



पवित्र बनलेल्या चाफळच्या परिसरात, तारळे या गावीं, ता. ९ मार्च १८९९ रोजीं, यशवत दिनकर पेंढरकर या लोक–राज–मान्य कवीचा जन्म झाला. श्रीशिवाजीमहाराजाच्या पराक्रमाचे पडसाद उमटविणाऱ्या त्या डोंगराळ मुलुखातच त्याचें बालपण गेले. या वयात यशवतरावाच्या मनावर धर्म, संस्कृति व इतिहास याचे जे संस्कार घडले, त्याचें फल 'देहाचा पूळ' वगैरे त्याच्या काव्यांत दृष्टीस पडतें. पूर्व-परंपरेवर पोसलेले असल्यामुळेंच त्याचे मन अभिमानानें व ऐटदारपणें 'स्वातंत्र्य–लक्ष्मीस भुजरा' करूं शकले.

## सुखदुःखांना सामुदायिक स्वरूप

खेड्यांतील जीवन व घरातील गरिबी यामुळें यशवंतरावांचें शिक्षण कसेंबसें इग्रजी सात इयत्तापर्यंतच झालें. शिक्षण होताच पोटाचा प्रश्न. मनात महत्त्वाकाक्षा व हृदयात काव्यलालसा उसळत असतांना त्यांना

नोकरीचा रस्ता पहावा लागला. तो भक्ति–शौर्याने स्फुरण पावणारा निसर्ग-रम्य चाफळ प्रांत त्यांना सोडावा लागला. त्या चाफळखोऱ्यातील माडवी नदीला ' तुझिया गानीं मला ऐकु दे दासाचा उपदेश ' अशी पुनः पुनः विनवणी करीत त्यांना आपल्या स्वातंत्र्यपूत मायभूमीकडे पाठ फिरवावी लागली व पुण्याची वाट धरावी लागली. पुणे येथे कारकुनी–नोकरीचे ' जू बैसले मानेवरी ! ' त्यांना अनुभव असा आला कीं, 'कारकुनी म्हणजे असेल-नसेल त्या अभिरुचीची राखरांगोळीच.' त्यातहि येरवडा येथील मुलांच्या बंदिशाळेत त्यांना खर्डेघाशी करावी लागली. पण जातिवंत कवीचे जीवंत मन अंतःस्फूर्तीनें इतके समर्थ बनलेले असते कीं, ते बाहेर आग पेटलेली असली, तरी अंतर्यामीं बाग फुलवू शकते. अग्निकणांतूनच कमळे फुलविण्याची जादू कविश्रेष्ठाच्या प्रतिभेत साठविलेली असते. तीच जादुगिरी करून यशवंतरावांनीं आपलीं वैयक्तिक सुखदुःखें काव्यांत अशा खुबीने मांडलीं कीं, त्यामुळे त्यामध्ये सार्वजनिक आकर्षण उत्पन्न व्हावें. बहुधा प्रत्येक वाचकाला ' राबलो वृथा संसार–सौख्य--विभ्रमीं ' असा उद्वेग आलेला असतोच. तो उत्कट भावनेने व प्रौढ भाषेनें कवीने मांडलेला पाहताच वाचकाच्या मनाला पोट उकला झाल्याचें समाधान लाभते. ' खोल भावनांचे गोड आविष्करण ' अशी जी साहित्याची व्याख्या केली जाते, तिचे प्रत्यंतर यशवंतरावांच्या अनेक काव्यांतून ठसठशीतपणे पहावयास सापडते.

## निराशेंतहि धैर्य

खडतर जीवनाचा मार्ग चालत असतांना नानाविध निराशेचे चटके यशवंतरावांना बसत गेले, हें साहजिकच आहे. ' माझ्या मनोरथाचा भंगून आस गेला ' अशी हळहळ त्यांना वाटू लागली. ' दुर्दैव--तीव्र–तापें हा भस्म जीव होई ' अशी किंकाळी त्यांचे अंतःकरण फोडू लागले. ' ही आग सभोतीं, श्रम केले विझवाया, गेले परि वाया ' अशी विफलता त्यांच्या चित्ताला घेरूं लागली. निराशेचा अंधार दाटला ! चोहोबाजूंनें

'कोंडमारा' झाला ! 'खिळखिळे कोसळे माझे घर टिकाव कुठवर धरूं ? ' अशी केविलवाणी भाषा त्याच्या मुखातून निघूं लागली. अखेर 'मृत्यूस' हाक मारून 'घाली न हुतूतू' अशी त्याची आळवणीहि त्यानीं केली. पण गडद अंधारानंतर तेजस्वी प्रकाश दिसूं लागला. पिचलेल्या अंत:करणातुन निघालेले कवीचे आर्त स्वरच ऐकून सारा महाराष्ट्र वेडावून गेला. कवीच्या निराशेंतहि धैर्याचे पाणी खेळू लागले. तो दुर्दैवाला आव्हान देऊं लागला, दुःखाला 'नको करू फुंफाट' म्हणून बजावू लागला, 'मरणा येउं नको आताच' असे आज्ञापूं लागला.

## राजा व प्रजा यांचा नजराणा

' कौटुंबिक कवि ' असा लौकिक कवि यशवंताना लवकरच लाभला. लघुकथाच्या क्षेत्रात श्री. य. गो. जोशी याचे जे स्थान, तेच नवकाव्यात श्री.य दि. पेंढरकर याना मिळालें. दोघेहि 'यशवतच!' कवि यशवंताचीं कवनें महाराष्ट्रातील खेड्यामधील झोपड्यापासून शहरातील राजवाड्यापर्यंत गुण-गुणलीं जाऊ लागलीं. त्याच्या ' सारगीवाल्या 'प्रमाणे त्याची कविता 'अंधार–सिंधु मंथुनी फेकिसी उडु–रत्ने की गगनी ' असा भास रसिकाना होऊं लागला. सुगम व संयमित अशी प्रसादपूर्ण काव्य–रचना ते जशी करीत, तसेंच प्रभावी काव्य–गायनहि करण्यास त्यानीं आरंभ केला. ऐतिहासिक काळात होनाजी–प्रभाकरादि शाहिराच्या लावण्या–पोवाड्याना हजारो श्रोत्याचें कडे जसे पडे; तसेंच यशवत-गिरीशाचें काव्य–गायन म्हटले कीं, तेथे आबालवृद्ध रसिकाची गर्दी उडे ! १९२१ सालीं बडोदे संस्थानात साहित्य–समेलन भरलें असता, त्यात कवि यशवंतानीं आपल्या काव्याची जी ललकारी सोडली, ती ऐकताच ' साऱ्या सभाजनानी या मानिले कृतीला ! ' नवाच तारा उदयास आला असा भास संमेलनांतील साहित्यिकांना झाला. त्या ताऱ्याच्या रम्य व दीप्तिमान तेजानें सर्वजण चकित व प्रसन्न झाले. ' मराठ्याच्या महालक्ष्मीला ' त्याने येथेच मुजरा केला आणि ' पुन्हा लावीन नाचाया महाराष्ट्रीं दऱ्याखोरीं ' असा विसार दिला. पुढें वीस वर्षांनीं कवीनेच अशी पावती दिली आहे कीं, " इथेंच

कीं माझ्या रागड्या वाणीचीं गाणीं। डोलविल्या माना कौतुकें ऐकुनि रसिकानीं॥" त्याच वर्षी कोल्हापूर येथें पहिलें 'महाराष्ट्र कवि-समेलन, भरलें असताना 'देहाचा पूल' हें वीर-रसाने रसरसलेले काव्य यशवंतानीं म्हणून दाखविले आणि मानाचे रौप्य-पदक पटकावले. तशीच 'पंचारती जनाची' त्याना गावोगाव ओवाळूं लागली.

## चिरंजीव आई !

ता. २२ जानेवारी १९२२ रोजीं त्याची अशी एक अलौकिक कविता जनतेपुढें आली कीं, त्यामुळें सारा महाराष्ट्र यशवंतावर मोहित झाला. ती कविता म्हणजे 'आई!' अवघ्या बेचाळीस ओळींचे हें काव्य म्हणजे यशवताच्या कीर्ति-मदिराचे तोरणच! आईने यशवंताना चिरजीवपद जसें दिलें, तसेंच यशवतानीं आईला चिरजीव करून सोडलें. आई नसते कोणास? कोणाची जीवत असेल, कोणाची नसेल-पण आईची स्मृति, आईची भक्ति-सर्व कालीं, सर्व स्थलीं, सर्वोच्च आहे, अथाग आहे, शाश्वत आहे. या सार्वजनिक भावनेला प्रसन्न व उत्कट रूप यशवतानीं आपल्या 'आई' या काव्यात दिले. त्यात प्रसाद आहे, भक्ति आहे, कारुण्य आहे, नाट्य आहे—हृदय हलविणारे, मन जिंकणारे, आत्मा प्रसन्न करणारे-सारे गुण त्या काव्य-कोहिनूरात साठविलेले आहेत "सुंदर रसाळ कविता-अशी कविता पुन: होणें नाही." अशी य कवितेची भलावण पडित-कवि माधव जुलियन यानीं केली. तोच अभिप्राय सर्व रसिकाचाहि पडला.

## काव्य-गायनाची मोहिनी

यशवंताहून अधिक उज्ज्वल कल्पकतेचे, आधिक मधुर पद-लालित्य किंवा अधिक विशाल ध्येयदृष्टीचे कवि महाराष्ट्र-शारदेच्या दरबारांत झ नाहींत, असें नाहीं; पण यशवंतांइतकी लोकप्रियता दुसऱ्या कोणत्य आधुनिक मराठी कवीच्या वाट्यास आली नाहीं. श्रोतृजनाच्या सु दुःखांना प्रौढ-गंभीर वाणीने वाचा फोडणाऱ्या त्याच्या कविता असंख्य

त्या लोकप्रिय होतच होत्या; पण सुगंधाला वाऱ्याची झुळुक भेटावी त्याप्रमाणें त्याच्या रमणीय काव्याला पोषक गायनाची जोड लाभली आणि म्हणून यशवताना कमालीची लोकप्रियता मिळाली. सर्वसामान्य कवि-जनाला न साजणारा त्याचा तो सुदृढ रुबाबदार देह, त्याचा तो गभीर पण सकंप असा आवाज आणि भावनेने फुललेल्या मुद्रेने व ऐटदार अभिनयानें काव्यातील शब्दन् शब्द सजीव करण्याचा त्याचा तो थाट—यामुळें त्याचे काव्य–गायन रसिकाचे चित्त तल्लीन करून सोडीत असे. अलीकडील भाव-गीत-गायनात गायनावरच भर फार असतो, पण यशवंताच्या काव्य-गायनात योग्य त्या शब्दावर योग्य तो जोर देऊन काव्यातील भाव मूर्तिमत उभा करण्यावर कटाक्ष असे. त्याचे वीरश्रीयुक्त काव्य ऐकून ज्याचे अतःकरण थरारून गेलें नाहीं, असा सुशिक्षित तरुण त्यावेळच्या महाराष्ट्रात सापडणे कठीण ! आणि त्याची 'आई !' ती कविता ऐकली नाहीं असा मराठीभक्त विरळा व ती ऐकून आपले डोळे न पुसलेला सहृदयहि विरळाच ! ' आई ' सारखीं काव्य–रत्नें साठविणाऱ्या त्याच्या ' यशोधन ' या काव्य–ग्रंथाच्या तीन आवृत्या अवघ्या चार वर्षांतच निघाल्या. हे यश मराठींत तरी अपूर्व होतें.

## भाट नव्हे, मंत्री

' रवि–किरण–मंडळा'चे तेज महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यात पसरविणारे यशवंत व गिरीश हे दोन तेजस्वी किरण होत. यशवतानीं बारा काव्य–ग्रंथ लिहिले व तीन गद्यग्रथहि रचिले. अलीकडे थोडेबहुत बालवाङ्मयहि यांनीं लिहिले आहे. त्याच्या या शारदोपासनेचा सत्कार राजा व प्रजा उभयतानींहि केला. १९४० सालीं ते बडोदे सस्थानाचे राजकवि झाले आणि १९५० सालीं मुंबई येथे भरलेल्या ' साहित्य–समेलना'चे अध्यक्षपद त्याना बहाल करण्यात आले. १९३९ सालीं बडोदें संस्थानाच्या सिंहासनावर श्रीमंत प्रतापसिंह याना राज्याभिषेक झाला. त्याचें वर्णन करणारा ' काव्य–किरीट ' हा ग्रथ यशवंतानीं लिहिला. त्यात ' भाटगिरी ' केलेली नसून वशिष्ट मुनींप्रमाणे राजाला प्रजारक्षणाचा

योग्य तो उपदेश निर्भीडपणे केला आहे. त्याच्या लेखणींत समर्थांच्या कमडलूंतील पाणी जसे खेळत आहे, तसेच श्रीशिवछत्रपतींच्या भवानी तलवारीचे पाणीहि तळपत आहे. रामशास्त्र्याच्या महाराष्ट्राचा वारसा त्यानीं पुढे चालविला आहे, असे म्हणण्यात फारशी अतिशयोक्ति नाही.

## स्वत्वाचा प्राण

यशवतांचीं सुखदुःखे वैयक्तिक असलीं, तरी त्याना सामाजिक आकर्षण आहे. त्याच्या काव्यात ‘ कटु निराशा माजलेली ’ असली, तरी तींत आशा व धैर्य आहे आणि त्याच्या काव्यात राज–भक्ति क्रीडा करीत असली, तरी लोक–सेवेचा विसर त्याना कधींच पडलेला नाहीं. गेलीं तीस वर्षे ते सतत काव्य–रचना करीत आहेत. बदलत्या काळाबरोबर त्याच्या काव्याचे विषय व रचनेचे प्रकार पालटले असले, तरी त्याच्या पोटातील त्याचा बाणेदारपणा व स्वाभिमान पूर्वींइतकाच धगधगीतपणे पेटलेला आहे.

## साहित्याचें ध्येय

सरस्वतीच्या दरबारात कोणताहि भेदाभेद नाही. हे तत्त्व यशवतानीं आपल्या ‘पाणपोई’ काव्यात आरंभींच पुढील शब्दानीं सागितले आहे—“येइ भाई येथ पाहीं घातली ही पाणपोई। धर्म-जाती कोणती ती भेद ऐसा येथ नाहीं। संसृतीचा हा उन्हाळा, तल्खली होई जिवाची। स्वेदबिंदू अश्रुधारा याविना पाणीच नाहीं ॥ ’

जीवनातील ताप नाहींसे करण्याचे सामर्थ्य साहित्याचे अंगी असते. हा महिमाच या कवितेंत कवीने गाईला आहे; त्याचबरोबर व्यक्तिशः स्वतःचा नम्रभावहि प्रगट केला आहे, तो असा—“आद्य जे कोणी कवी तत्स्फूर्तिच्या ज्या सिन्धु-गड्गा। आणिल्या वाहून खान्दीं कावडी त्यातील काहीं। पान्थ-सेवा-साधनीं हे व्हावयाते गार पाणी। मृत्तिकेचे मात्र माझे कुम्भ, ही माझी नवाई ॥ ओन्जळी, दो ओन्जळी आकण्ठ किंवा घे पिऊनी। हो जरा ताजातवाना, येउ दे सामर्थ्य पायीं। पावता तृप्ती मना स्वारता अड्गीं उमेदी। जो दुवा देशील पान्था तेवढी माझी कमाई ॥’

अशी कमाई यशवंतानीं गडगज करून ठेवली आहे हें त्याचे थोरपण. ससारात सुख–शातीचा झरा साहित्य-सेवा हाच कवीला वाटतो. हा बौद्धिक आनद आपल्याला अखड लाभावा म्हणून श्रीशारदेस त्रिवार वदन करून कवि म्हणतो, “संसारसौख्यीं समाधान नाहीं । तुझ्या गायनीं जे मला लाभतें । आतासर्वे सम्पदेचे सुखाचे । तुझ्या सेवनीं तोडिले पाश ते. आई ! कृपेची मला न्यूनता ती । नको दाखवूं हेंच मीं याचितों, । माते ! तुला वन्दितो भक्तिभावें । पुन्हा वन्दितों, वन्दितो, वन्दितो ! ॥ ”

## उत्प्रेक्षांच्या माला

यशवंताच्या कवितेनें पायात मजुळ शब्दांचें पैजण बाधलेले नाहींत; तसेंच उपमा–उत्प्रेक्षादि अलंकाराचे ओझेंहि तिच्या अंगावर घातलेले नाहीं. तथापि श्रीमत प्रतापसिंहाच्या राज्यारोहणासारखा महोत्सव वर्णा-वयाचा असताना ते ठेवणींतील दाग–दागिने बाहेर काढतात. ‘ राजाच्या चित्तातुन सकल्प प्रगटला’ या सूक्ष्म घटनेवर यशवंतानीं मनोहर उपमाची रम्यमाला गुंफली आहे, ती अशी–‘ प्रगटे उषःकालीं जसे रविबिम्ब कीं क्षितिजावरी, किंवा प्रफुल्लाब्जातुनी पसरे सुगध सरोवरीं, आम्रा वसन्तीं येतसे जैसा तरारुन मोहर, कीं आर्णव–क्षोभातुनी रत्नावली ये बाहिर ॥ रत्नातुनी झळके प्रभा, स्वर येति जै वीणेतुनी । सकल्प हा प्रगटे तसा नृपचित्त-कल्लोलातुनी ॥ ”

तसेच व्यतिरेक हा अलकार साधून त्यानीं शिवाजीच्या स्मारकाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. “ शिलालेख लेखाविण । कीर्तिध्वज वसनाविण । डिण्डिम कीं नादाविण । भासती जना तीं ॥ ” हे वर्णन वाचून ज्ञानेश्वरींतील ‘ चद्रमे जे अलाच्छन । मार्तड जे तापहीन । ’ इत्यादि ओव्याची आठवण कोणास होणार नाहीं ?

## महाराष्ट्राचा अभिमान

महाराष्ट्राचा अभिमान यशवंताच्या नसानसातून वहात आहे. महा राष्ट्राची सेवा आपल्या हातून घडावी व तो आपल्या मोठेपणानें खराखुरा ‘ महा–राष्ट्र ’ व्हावा, अशी तळमळ यशवंतांनीं ‘ माझा महाराष्ट्र ’ या

कवितेंत व्यक्त केली आहे. ते म्हणतात, " अमर्याद भूगोल विस्तारलेला किती त्यामधीं देश पुञ्जाळले । महाराष्ट्रभूचें परी त्यात माझ्या दिसे सम्प्रती तेज मन्दावले । तयासारिखा दिव्य तेजोगुणी हा महाराष्ट्र होईल केव्हा पुन्हा ? । महाराष्ट्र माते ! जना बुद्धि दे या तुझ्या वैभवोत्कर्ष-सवर्धना ॥ " शेवटीं ते इच्छा व्यक्त करतात, " महाराष्ट्र माझा ' असे आज आम्ही जरी जन्मलाभामुळे बोलणे । ' महाराष्ट्र माझा ' असे घातलेल्या कधीं भूषणाच्यामुळे बोलणे ? । "

## शाहिराची ऐट

महाराष्ट्राला एका काळीं ज्यानीं महत्–पदास चढविले, त्या शूर-वीरापुढें कवि आपलें मस्तक आदराने लववितो. अशा स्वातन्त्र्य–पोषक शूर–वीराचे एक प्रतीक या दृष्टीनेच बडोद्याच्या महाराणीसाहेबाकडे कवीनें पाहिले आणि ऐतिहासिक कालातील शाहीराच्या तडफेने त्यानें उद्गार काढले, " दऱ्याखोऱ्यातला आला कवी हा खास दर्बारा । मराठ्याच्या महालक्ष्मी तुला घे शाहिरी मुजरा । जगाचा मानितो स्वामी स्वताला मी महा मानी । असे शास्ता जनाचा मी परी माई तुझा भाट । दिपावे विश्व वाणीने, तुझ्या येथे न तो थाट । नभींच्या तारकाराशीं पदाघातें झुगारीन । परी स्वातन्त्र्यलक्ष्मी गे । तुझ्या पायीं सदा लीन ॥...
" समाधी लागली आहे म्हणोनी तोवरी बोल । मराठ्याच्या यशोगानीं मनाने स्फूर्तीने डोल ॥ "

निर्धारवंत उद्योग शीलाच्या स्पर्शाने काय चमत्कार घडतो, हें सागताना यशवत म्हणतात, " तुझ्या हातीं सुवर्णाचे मिळावे मोल मातीला । हिऱ्याचें तेजही तैसें चढावे गारगोटीला । दिसावी पावलाखालीं खड्याना तारका-कान्ती । विषारी; तीक्ष्ण काट्याचीं तुझ्या स्पर्शे फुले होतीं । मनीषा ही परी ठेवी मनीं या खूणगाठीसी । ग्रहाचे साह्य शूराला, यशःश्री पायिंची दासी ॥ "

## जनतेचा वकील

सिंहासनापुढें शिर लववणारा हा कवि प्रजेच्या वतीनें ताठ मान करून

बोलूं शकतो. ' काव्य–किरीटा 'मध्ये महाराजासाठीं देवाची प्रार्थना करताना कवि म्हणतो, " प्रभो, अमुच्या सामर्थ्य दे नृपाला । धीर देइल जें दीन–दुर्बलाला । भक्ति शक्तीची वाढवील लोकीं । गाजल्याना होईल पाठिराखी. ॥ " याहूनहि अधिक कडकडीत शब्दात कवीने राजधर्म उपदेशिला आहे तो असा—" शिरावरि हवा जया मुगुट, बसाया हवें जया तख्त । तयाने निराश्रितासाठीं । खपाया नको काय सक्त ? ॥ भुकेनें तडफडता कोणी । तयाचा शाप नृपाळाला ॥ " असाहि शास्त्रार्थ कवि सागतो.

## राष्ट्रभक्तांची आरती

श्रोत्याच्या अगावर रोमाच उभे करणारे वीरश्रीयुक्त जे काव्य प्रथम यशवतानी रचले, ते म्हणजे ' देहाचा पूल ' हे होय. शिवापूर येथे विजापूरचा मुसलमान सरदार तळ देऊन राहिला होता. त्याने आपल्या छावणीभोवती खदक खणून त्यात लाकडे पेटवलीं होतीं. हा आगीचा खदक ओलाडून शिवाजी आपल्या मावळ्यानिशीं त्या सरदारावर चालून गेला. त्यावेळीं त्या जळत्या खदकावर चार मावळ्यानीं आपलीं शरीरें पसरलीं. या आत्मत्यागाचे, स्वामिनिष्ठेचे, स्वातत्र्यभक्तीचे जे चित्र कवीने रगविलेले आहे, ते कोणाचेहि हृदय उचबळून टाकणारे आहे. आणि त्याचे काव्यगायन यशवत इतक्या तन्मयतेनें करीत कीं, ते ऐकताना श्रोत्याचे भान हरपून जात असे. शिवाजीनें आपली मान वळविण्याचा अवकाश कीं, " तों उभे राहिले झाले । रिपुरुधिरास्तव तान्हेले । जय भवानिचा गर्जोनी । धावले शिवाजीराजे । घेउनी जिवाचे दोस्त । तीनशे मावळे सर्जे । ते किरण तयाचे दिव्य । तो सहस्रकरसा साजे । स्थापक ते स्वातन्त्र्याचे । चालक ते जरिपटक्याचे । तारक ते शिवशाहीचे । " पुढें ' खदकावर आपले देह कोण टाकील ? ' असे ' निघताच शब्द बाहेर । जन निजले त्यावर चार ।" असा रोमहर्षक इतिहास वर्णन करून कवि विचारतो, ' का स्वराज्य तेव्हा झाले ? । का स्वराज्य साप्रत नुरलें ? ॥ '

अशा देशभक्त प्राणत्यागी शूरवीराना वदन करताना कवि म्हणतो, " सङ्गरीं वीराग्रणी जे धैर्यमेरु सङ्कटीं । जन्मले या भारती । राष्ट्रचक्रोद्धारणीं कर्णापरीं ज्याना मृती । गाउ त्याना आरती ॥ देह जावो देह राहो नाहिं ज्याना तत्क्षिती । लोकसेवा दे रती । आणि सौभद्रापरी देतात जे आत्माहुती । गाउ त्याना आरती ॥ "

शूर देशभक्ताचा काळ शिवाजीच्याच वेळीं होता असे नाहीं. टिळक–गाधींच्या स्वराज्य--सग्रामातहि पराक्रमी तरुण अहमहमिकेने पुढे आले. त्याना परक्या सरकारने तुरुगात डाबले तरी त्याचे धैर्य व ध्येय अभगच राहिले. अशा धैर्यशाली व ध्येयवादी स्वातत्र्य–भक्ताच्या अतःकरणातील विचार–तरग 'तुरुगाच्या दारात' या कवितेत यशवतानीं प्रगट केले, ते असे, " वाढु दे कारागृहाच्या भिन्तिची उन्ची किती । मन्मना नाहीं क्षिती । भिन्तिच्या उचींत आत्मा राहतो का कोन्डुनी । मुक्त तो रात्रदिनीं ! ॥ अग्निही वाटेल माते चन्दनाचे लेपन । कीं सुधेचे सिंचन । शृङ्खला पायात माझ्या चालताना रुमझुमे । घोष मत्रा त्रा गमे । लौकरी स्वातन्त्र्य-भानो ! भारतीं दे दर्शन । होउ तेव्हा पावन । "

## उपेक्षित वर्गाकडे लक्ष

'बंदिशाला' या खंडकाव्यातहि यशवंतरावानीं आपल्या राष्ट्रमातेविषयी गाढ भक्ति प्रगट केली आहे. त्या कथेतील नायक सजीव रणागणावर नोकरीसाठीं जातो. त्यावेळचे त्याच्या मुखातील राष्ट्रगीत अत्यत भावनापूर्ण व हृदयस्पर्शी आहे. ते असे—' वन्दन तुज मायभूमि ! हे अखेरचे ! न कळे तव दर्शन कधि फिरुन व्हायचें ! ॥ "

स्वत सबधीं संजीव म्हणतो, " मान उच्च करु पाहे कोवळी कळी । धडगत लागेल तिची केवि वादळीं ? । झिडकारुनि दिधले जे लेकरू तुवा । टाकलास ज्याचा तू तोडुनी दुवा । तरि त्याच्या नच खळती अश्रु नेत्रिंचे । वन्दन तुज मायभूमि हें अखेरचे ॥ ग्रीष्माचा दाह काय वाळल्या तृणा ? । राखेला जाळिल का अग्नि तो पुन्हा ? । परि तुझी न भेट मला व्हायची पुढें । ह्या शल्यें हे तुटतें मात्र आतडें ॥ "

## दांभिकतेवर टीका

‘ दिवंगताचे स्मारक ’ ही एक करुण–रसाने भरलेली काव्य–कथा आहे. मायभूमिचे एक थोर सुपुत्र दिवगत झाले. त्याच्या स्मारकाची सभा भरली असताना स्तुति–स्तोत्राची फैर झडली. स्मारकासाठीं पैशाची मागणी करण्यात आली. तेव्हा “ आवाहन हे होईल वाया कैसे पुण्य-स्मरणीं ? खिशात भराभर हात घातले श्रद्धाळू श्रोत्यानीं । वक्त्याचेहि सढळ आकडे आणि पटापट पडले. ” पण त्या दिवगत देशभक्ताच्या घरीं त्याची बायको आणि दोन लेकरे हालअपेष्टा भोगीत होतीं. त्याचें दैन्य दूर करण्याचा विचार कोण करतो ? “ दिवङ्गताच्या गेहीं तिकडे अश्रु टपाटप गळले ! कारण पुण्यस्मरणामाजीं चूर मृताची कान्ता । करीत होती दोन लेकरासवे मूक आकान्ता । ”

पैसे जमले, स्मारक-मदिर उभारले, त्याचे उद्घाटन समारंभाने झाले. त्या दिवशीं रात्री त्या देशभक्ताच्या बायकामुलाना घरातुन हाकलून देण्यात आले. तेव्हा “ फिरतफिरत तीं मन्दिराचिया येइ वळचणीखालीं । आणि लेकरे तिचीं पायऱ्यावरींच झोपीं गेलीं. ॥ ” सकाळीं भय्या आला व “ चलो, निकालो ’ असे खेसकला. ही काव्यकथा जितकी शोकपूर्ण आहे, तितकीच समाजाच्या दाभिक वृत्तीवर व अनास्था–बुद्धिवर टीका करणारी नाहीं काय ?

## आईची रसवत्ता

जसा गडकऱ्याचा ‘राजहंस’, तशी यशवताची ‘आई’. दोन्ही नाट्यगीतें करुण रसाने थबथबलेलीं आहेत—रसिकाच्या हृदयाचा ठाव घेणारीं आहेत पहिल्यात मातेचा मुलासाठीं शोक, तर दुसऱ्यात मुलाचा मातेसाठीं आक्रोश आहे. पहिल्याची भाषा बहुमोल अलंकारांनीं नटलेली आहे, तर ‘आईचे बोल साधे–सरळ–सोपे, पण अंतःकरण कापीत जाणारे आहेत. सुरुवातच अशी हृदय हलविणारी आहे–“आई’ म्हणोनि कोणी । आईस हाक मारी ती हाक येइ कानीं । मज होय शोककारी । नोहेच हाक, मातें । मार

कुणी कुठारी । आई कुणा म्हणूं मी ? । आई घरीं न दारीं ! ही न्यूनता सुखाची । चित्ता सदा विदारी । स्वामी तिन्ही जगाचा । आईविना भिकारी ॥ ”

त्या लहान आईविरहित मुलाच्या दृष्टीला आजूबाजूला सर्वत्र मातृ-प्रेमाचीं दृश्ये दिसतात, त्यामुळे त्याचे दुःख दुणावतें. पशु-पक्ष्यातहि हें मातृप्रेम त्याला दिसते, ते असें—“ चारा मुखीं पिलाच्या । चिमणी हळूच देई । गोठ्यात वासराना । ह्या चाटतात गाई । वात्सल्य हे पशूचे । मी रोज रोज पाहीं । पाहून अन्तरात्मा । व्याकूळ मात्र होई । वात्सल्य माउलीचे । आम्हा जगात नाहीं । दुर्भाग्य याविना का ? । आम्हास नाहिं आई ॥ ”

ही दृश्ये पाहून त्याला आईची अधिकच आठवण होते. आपल्या रोजच्या आयुष्यात आईने आनद कसा ओतला असता, याचे स्मरण होऊन तो म्हणतो, “ शाळेतुनी घराला । येता धरील पोटीं । काढून ठेविलेला । घालील घास ओठीं । उष्ट्या तशा मुखाच्या । धावेल चुम्बना ती ! कोणी तुझ्याविना गे । का ह्या करील गोष्टी ? । तुझ्याविना न कोणी । लावील साजवाती । साङ्गेल ना म्हणाया । आम्हा ‘ शुभम् करोति ’॥ ’

या मातृहीन बालकाला एक बहिण आहे. ती त्याच्याहून लहान आहे. अजाणपणामुळे तिला आईच्या वियोगाचे दुःख जाणवत नाहीं. त्यामुळें तर या बालकाला अधिकच भडभडून येते व तो म्हणतो, “ ताईस या कशाची । जाणीव काहिं नाहीं । त्या सान बालिकेला । समजे न यात काहीं । पाणी तरारताना । नेत्रात बावरे ही । ऐकूनि घे परन्तु । “ आम्हास नाहिं आई ” । साङ्गे तसे मुलींना । “ आम्हास नाहिं आई ” । ते बोल येति कानीं । “ आम्हास नाहिं आई ॥ ”

यशवंतानीं आपला सारा आत्माच या कवितेंत ओतलेला दिसतो. त्याच्या काव्याचा सर्वत्र जयजयकार झाला पण ते कौतुक पहावयाला आपली आई नाहीं, ही खंत जीवाला जाळीत होती, म्हणून ते म्हणतात, “गुम्फून पूर्वजांच्या । मी गाइले गुणाला । साऱ्या सभाजनानीं । या वानिले कृतीला । आई, करावया तूं । नाहींस कौतुकाला । या न्यूनतेमुळे ही ।

मज त्याज्य पुष्पमाला । पंचारती जनाची । ना तोषवी मनाला । परि जीव बालकाचा । तव कौतुका भुकेला ॥ ”

या काव्यातील करुण रसाचा उच्च बिंदू म्हणजे त्याचे अखेरचे कडवें; ते असे, “ येशील तू घराला । परतून केधवा गे । दवडू नको घडीला । ये ये निघून वेगे । हे गुन्तले जिवाचे । पायीं तुझ्याच धागे । कर्तव्य माउलीचें । करण्यास येइ वेगें । रुसणार मी न आता । जरि बोलशील रागे । ये रागवावयाही । परि येइ येइ वेगे ॥ ”

## अनुभूतीचे उद्गार

आईची थोरवी यशवंतानीं प्रथम भावनेने जाणली. पण पुढे तेरा वर्षांनीं स्वतःच्या अनुभवावरूनहि त्याना ती पटली. स्वतः मोठं झाल्यावर, आई किंवा बाप बनल्यावर, आपल्या मुलाचे कष्ट उपसल्यावर, त्याची शुश्रूषा अलोचन जागरणे करून केल्यावर मगच आपल्या आई-बापानीं आपल्यासाठीं असेच सायास सोसले असतील ही अनुभूति येते तिचे मार्मिक चित्रण ‘दैवते माय-तात’ या कवितेमध्ये यशवतानीं केले आहे. तें असे—“ आणि आता थाटल्या प्रपचात । अहो झालो आम्हीच माय-तात । माय–ताताच्या ह्याच भूमिकानीं । दिली तुमची थोरवी जाणवोनी॥ थिटया अमुच्या पङ्खात ऊब कोठे ? प्राण चिमण्याचा लोचनात गोठे ! आणि कळते सोसता ताण हाल । किती आम्हास्तव कष्टला असाल । दीप तेवावा जेवि अहोरात्र । मने निरलस जागला श्रान्तगात्र । मानहानी पत करुनि रोष लोकी । तुम्हीं केली नित पाठराखणी कीं ॥ शिळे–पाके सेवून सणावारीं । जुने–पानें लेवून घरींदारीं । सदा पुरवावे गोडधड मुलाना । असे अवघड ससार–यज्ञ जाणा ॥ ”

## उदात्त वात्सल्य

करुणाप्रमाणेच वत्सल रसहि यशवंत खेळवूं शकतात. बालकाच्या मुखाचें चुंबन घेताना किती उदात्त भावना असावयास पाहिजे, हें त्यानीं ‘मोक्षाचीं दारे’ या कवितेत सागितले आहे, ते असे —“ नको चुम्बन मज देउ तुझें बाळा ! नसे तितुकी शुद्धता मम मुखाला । नको त्या त्या अश्लील

शब्द–कोटी । प्रगट झाल्या माझिया सदा ओठीं ॥ खऱ्या–खोट्याचा कधि न विधिनिषेध । धरुन केला कटु वचे मर्म-भेद ॥ हवा दावाया स्वाभिमान जेथे । पुढे केले मुख दीनपणे तेथे । असे दूषित जे कैक कलकानीं । नव्हे चुम्बाया योग्य निर्मलानीं ॥ ”

परंतु दुसऱ्या दृष्टीने विचार करता बालकाच्या ओठातील अमृत प्राशन करणेंच कवीला योग्य वाटते. बालकाला ‘देवराय’ असें संबोधून कवि म्हणतो, “ येच अथवा ये बालदेवराया । काय दवडू हा पर्वकाल वाया ? स्वेच्छया तू सजलास चुम्बनास । कलङ्काचा मम कराया निरास ॥ ” शेवटीं कवि म्हणतो, “ अरे पापानो भुतानो, पळा रे ! पहा मोक्षाचीं मला खुलीं द्वारे ! ”

दुसऱ्या एका कवितेत कवि आपल्या अंगणात इंदुकलेने नाचावे–बागडावे ही वात्सल्यपूर्ण मनीषा प्रगट करताना म्हणतो, “ दवबिन्दू पडती चमकती हरित तृणावरती । पुष्पदलावरती जणूं ते शिम्पल्यात मोती ॥ अङगणात माझ्या घागऱ्या चरणींच्या तुझिया । ओघळुनी साऱ्या नर्तनीं सहजीं पसराव्या ॥ ” गवतावरील दव किंवा शिंपल्यातील मोती, तशा अंगणात मुलीच्या पायातील चांदीच्या घागऱ्या पसराव्या अशी कवीची लालसा.

मुलाची आईवरील माया ‘ आई ’ या कवितेतून ओसंडत आहे, तीच भावना इंदुकलेच्या पुढील उद्गारात खेळत आहे. “ नको सुमनशय्या, नको जरतारी शृंगार । कुबेरसदनींचे नको मणि–मोत्याचे हार ॥ आई-च्या अङकीं निरन्तर लोळण लाभावें । वत्सल नजरेची पाङघरुन झूल झोंपि जावे ॥ नको अन्नपाणी, भुकेला मुकेहि पुरतात । लालन–पालन हें मिळाल्या स्वर्गावर लाथ ! ”

सुधा ही चिमुकली बालिका. तिने लुटुपुटीचा स्वयंपाक केला. त्यातील भात म्हणजे फुलाच्या कळ्या. त्या पाहून वत्सल कवि आनंदाचे ढेकर देत देत म्हणतो, “ परि कुसकरलेल्या कळ्याचा वाढ आज भात । पुढचे पाहुं पुढे तृप्तता आज मला त्यात ! ”

यशवंताची ‘ आई ’ कधीं रागावेल का ? पण ती रागावली–मुलाला मारू लागली, तेव्हा ते मूल म्हणतें, “ मालुं नको ग । मी केल काय

तली ग ! " मुलाच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले, त्याचे वर्णन कवि पुढील उत्प्रेक्षानीं करतो " अश्रुबिंदु शिशुनयनामधुनी । टपटप खालीं गालावरुनी । ओसरले, जणु गगनातूनी । तारका तुटती । कीं फुले वेलिचीं गळतीं ?" माय–लेकराचा हा संग्राम किती चटदिशी संपला ? आणि तोहि कसा ? " जरी माय ती मारी वरुनी । तरि पायाशीं तिच्या बिलगुनी । मुखाकडे वर बिचकत बघुनी । वदे वेल्हाळ–"का देसी आई माल ?" या संग्रामाच्या समाप्तीनंतर दोन्ही लढाऊ पक्षाचा तह कोणत्या अटीवर झाला ? " घेई चटकन उचलुनि वरती । चुम्बुनि रडवी मोहक मूर्ती । पदराखाली स्तनि लावी ती । तिचेही झाले । अश्रूंनीं नयन मग ओले ॥ " आणि शेवटीं कवीने वात्सल्याचे असे सुंदर चित्र रेखाटले आहे कीं, " गालासन्निध गाल बिलगला । गळ्याभोंवती हात चिमुकला । दुजा आइच्या पुशि नयनाला । दृश्य हे बघुन । निवतील न का कविनयन ? ॥ "

## शारदेची आळवणी

याच वात्सल्याच्या भावनेने कवि सरस्वती–मातेची ' आळवणी ' करतो. ती अशी—" अदय काय होइ माय आपुल्या मुलावरी ? । आळवून आळवून । कण्ठ चालला सुकून । पाहणार अन्त काय आणि तोहि कुठवरी ? ॥ तव मुखास चंद्रकांति । लोचनात चंद्रज्योति । हेहि चांदणे, मलाच काजळी निशा परि ! ॥ कुरण दाट धेनु त्यात । घे न घास परि मुखात । बावरुन हम्बरेच वासरू जरी घरीं ॥ " शेवटीं कवि शारदेची प्रार्थना करतो, " तव कृपासुधातुषार । नन्दनवन उभविणार । खडकमाळ हे कपाळ पिकविणार तू खरी ॥ बोलु काहि तू नकोस । देउ वैभवे नकोस । फेक एक नजर मात्र मग नुरेन खापरी ॥ "

## शृंगारांतील सोज्वळपणा

यशवंत हे शृंगाराच्या गंधर्व–नगरींत भराऱ्या मारून प्रेमाच्या लकेऱ्या सोडणारे कवि नव्हेत. पण जेव्हा केव्हा ते प्रेमाच्या साम्राज्यात शिरतात, तेव्हा ते आपल्या सोज्वळ प्रतिभेची चमक दाखवितात. 'नौकाविहार'–मधील शब्दाचे लालित्य, भावनेची कोमलता आणि कल्पनेची प्रसन्नता

हे गुण गोविंदाग्रज–बालकवींची बरोबरी करणारे आहेत. एका चांदण्या-रात्री नदीतील नौकेवर बसून विहार करणारा नायक नायिकेला म्हणतो, “सखे ग, प्रशान्त किति यामिनी। ही तशीच जलवाहिनी ॥ ही विशाळता किति तरी। तव उदार हृदयापरी। करु विहार चल तीवरी॥ किति अथाग जल हे दिसे। तव अगाध अनुरागसें। मज जडे जयाचे पिसे॥” नदीच्या पाण्याची विशालता व सखोलता वर्णिता वर्णिता कवीने आपल्या सखीच्या हृदयाचे व प्रेमाचेही वर्णन किती मनोहर तऱ्हेने केले आहे! या काव्याची चाल मधुर आहे, त्याहून तिची वर्णनशैली मधुरतर आहे आणि त्याहून त्यातील भावना मधुरतम आहे.

नौकेतील नायक आपल्या सखीचा अनुनय करताना म्हणतो, “तव मुखीं छटा नाचती। जळि लहरि तशा धावती। तव मृदुता अनुकारिती॥ चमकत्या तरंगासवें। ही डुलेल नौका जवें। जशि रसिकजनीं कचनी॥” एकाद्या मजलशीत नाचणाऱ्या नर्तकीशीं नावेची तुलना कवीने येथे केली आहे, तर दुसरीकडे अष्टमीच्या चंद्रकोरेशीं त्या नावेचे साम्य दाखविले आहे. शेवटीं कवि आपल्या सखीला साक्षात् देवी लक्ष्मी मानतो व म्हणतो, “भववनात तू इन्दिरा। प्रगटलीस या पामरा। सुरपदास न्याया झणीं॥”

असेच दुसरे मनोहर प्रेमगीत म्हणजे ‘मनमोहिनी’. त्यातील नायक गुणगुणतो, “सदाकदा जातायेता तुला पाहियेलें। आज दर्शने परि तुझिया भाव नव उदेले॥ मिळे तुझ्या तन्मयतेमधि साक्ष कौतुकाची। जणू आरती तू धरिली स्नेहलोचनाची। जणू पुष्पवृष्टी केली अरुणकपोलाची॥”

तांबे यांच्याप्रमाणे यशवंतांनीं काहीं नाट्य–गीतें लिहिलीं आहेत. एका विवाहित स्त्रीच्या दारीं तिचा पूर्वीचा प्रियकर येतो, तेव्हा ती त्याला विचारते, “येसि कशाला दारीं। ऐसा ऐन दुपारीं?॥ बघसी इतुका। मज रोखुन का?। का तू भृग? चितारी?। छे, दिसतोस शिकारी॥

## गृहिणीचें चित्र

काव्य–कल्पनेतील सुंदर स्त्रीचे अलंकारपूर्ण वर्णन ‘प्रतिमा–लेखन’ या कवितेत यशवंतांनीं केले आहे. तें असे--“तू तशीच राहा उभी जराशीं

भिन्तींशीं रेलुनी । घेउ दे प्रतिमा मज काढुनी ॥ चंद्रिका सुगंधी देहीं तव जाहली । रत्नास मृदुलता देहीं तव लाभली । द्रवरूप सुधा ती द्युति-रूपा पावली अशा अलौकिक आश्चर्यांच्या रमता सम्मेलनीं । घेउ दे प्रतिमा मज काढुनी ॥ ”

परतु केवळ कल्पना-विलासात रमण्याची वृत्ति यशवंताची नाहीं. व्यवहाराच्या खडबडीत जमिनीवरून चालत जाणारे ते एक रसिक प्रापचिक आहेत. ‘तूच रमणी !’ या कवितेत यशवतानीं आपल्या गृहिणीचें जें शब्दचित्र रेखाटले आहे तेच बहुतेक सर्व वाचकवर्गास पटण्याइतकें खरेखरे आहे. कल्पनेचा सारा रंग पुसून व भाषेचे अलकार अगावरून काढून, ससारातील काबाडकष्ट करणाऱ्या गृहिणीचे सुखदुःख-मिश्रित्त चित्र त्यानीं रेखाटले, ते असे. “उन्हातान्हामाजीं अविरत जिने कष्ट करणे । तिच्या गालीं पद्मासम कुठुन लाली बहरणें ? ॥ कपाळीं चिन्तेचे ध्वज सतत तुझ्या फडकती । कपाळीं कष्टाचे ढग सतत तुझ्या डंवरती ॥ कितीही सौंदर्योद्धत झळकल्या मूर्ति भुवनीं । तुझ्या व्यंगानेही मज सहचरी, तूंच रमणी ! ”

एका गरीब गृहिणीला आपल्या पतिविषयीं किती प्रेमळ आस्था वाटते हें ‘ प्रतीक्षा ’ या काव्यात यशवतानीं रगविले आहे. पती घरीं येण्याची वेळ झाली तेव्हा “दार वाजले । उठुन धावलें । पाहिले, परतु नाहि कोणि पातले ॥ केशविरचनीं । हातुनी फणी । गळुनि पडे तरि न पटे शकुन का झणीं ! नाहणी-घरीं । उपसले जरी । ऊन पाणि निवुन जाय भान ना तरी ॥ जाळ फुरफुरे । पापणी स्फुरे । अजुन यायचे न कसें ! हृदय हे झुरे ॥ भाकरी करीं । चढत ना वरी । करपुनीहि जाय दुजी ही चुलीवरी ॥

## ग्रामीण प्रेमगीतें

ग्रामीण प्रेमगीते हे एक यशवताचें प्रशंसनीय वैशिष्ट्य आहे. खेड्या-तील शेतकरी जीवनातून रागडा शृंगार मोकळ्या अंगाने कसा वावरतो हें त्यानीं कौशल्यानें दाखविले आहे. त्यातील ‘न्याहरीचें गाणे’ रजतपटा-वरहि चित्रित झालें आहे. त्याचा आरंभ असा आहे—“ न्यारिचा

वकुत होईल । भैतरणी बिगिबिगि चाल । नाडगूरमुटीच्या आत । पोंचाया होवं ततं । सोडितिल हात बैलाला । धुण्डील नदर कोनाला । ”

तितकेंच लोकप्रिय झालेले यशवंताचे दुसरे ग्रामीण गीत म्हणजे 'प्रेमाची दौल्त '. त्यातील शब्द जितके समर्पक, तितकीच त्यातील भावना उत्कट आहे. नवरा नुकताच निवर्तला असता आपल्या पोटीं येणाऱ्या मुलाचे चिंतन करीत एक प्रेमी स्त्री म्हणते, “ ही तुझीच वाफळ म्हणुनि मला लै प्यारी। पिर्तीची आवड समग्राहुनि रे न्यारी । झालींत लक्तर तरीहि मन्ला गोड । पुरविते पिर्त पाहिजेल त्याचं कोड । ही तुझीच थाळी म्हणुनि चाटते राया । मज लागिर झाल म्हणती आयाबाया । हा तुझाच पावा, मोरवेलिची काठी । झोपते घेउनी रोजच पोटीं–पाठीं । हें तुझ्या डोइच जुन जरी मुण्डास । कुरवाळित बसत्ये, होतं माझं हासं । हें तुझ्या अडगचे जपुनि ठेविलं कुडत । ही दौलत माझी—येडच त्याच जडत ॥ ”

खेड्यातील वैभवाचे वर्णन ' घर ' या छोट्या कवितेत यशवतांनीं केले आहे. एका मुलीचा बाप नवरदेवाच्या पित्याकडे येऊन विचारतो, 'पोरिला हौस मोत्यार्ची । ती तुम्ही कशी पुरवाल ? ॥ ' तेव्हा वर-पिता अभिमानाने उत्तर देतो, “पडवीला कणगी पोती । मोती त्यामधि बिनमोल । दावणीस गार्याबैल । त्ये अम्हा हिरे अन् लाल । दरसाल । पिके येतात । खाण शेतात । तीच सोन्याची । बैसलीच गाठ जन्माची । ”

## निराशेचा सूर

निराशा ही एखाद्या जळूप्रमाणे यशवताच्या जीविताचे शोषण करीत होती. त्या निराशेचे उद्रेक अनेक कवितामधून बाहेर पडले आहेत. ते अतरींचे तळमळीचे बोल असल्याकारणाने त्यातून जिवत काव्याचे लोट वाहताना दिसतात. जग ज्याला जिवंतपणीं छळते त्यालाच त्याच्या मृत्यूनतर डोक्यावर घेऊन नाचतें, हे वैषम्य “ जगा ! तुझी सारी तऱ्हा सदा उफराटी ! ” अशा तीक्ष्ण शब्दानीं चित्रित करणारी ' जग-रहाटी ' ही त्याची कविता आहे. तींत ते चडफडून उद्गारतात; “ एक तरी बागेतील फूल कौतुकें देशील । बाळगिली आशा फोल । अता पुष्पराशीमाजीं बुडे ।

मात्र ताटी ! ॥" आणखी एक उदाहरण पहा—"आपुल्याच जाता। पायीं। पाडियले ठायीं ठायीं। केव्हढी ही आता घाई। चालविती द्याया खान्दा, मिरविती हातीं॥" आणखी विरोधी अनुभव कवि सांगतो, "ह्यातींत आगडोम्ब। विझविण्या एक थेम्ब। मिळाला न, आता कुम्भ। किती रिकामे हे होती तिलान्जलीसाठीं॥ मिळावया ऊब कोठे। झिजविता उम्बरठे। दार बन्द जेथे तेथे। धूपारती–शेजारती अता दिनराती !"

## निराशेची अंतिम अवस्था

"घरीं आणि दारी भरला घोर तिमिर सारा। एकही दिसेना कोठे व्योम-पटीं तारा !' अशा घनदाट निराशेने कवीचे मन आवून जाते—आणि त्याला स्वत:चेच भय वाटते. आपण हात लावला तर सोन्याची माती होईल, नक्षत्राच्या शिळा होतील अशा भीतीने तरुणाला आशीर्वाद देण्यालाहि तो धजत नाही. 'आशीर्वाद' या कवितेतील कवीची मन:स्थिति म्हणजे निराशेचा कडेलोट होय आपल्या सावलीने दुसऱ्याचे मंगल भवितव्य विटाळले जाऊ नये म्हणून तो दूर दूर राहतो. कटु निराशेतहि केवढी मधुर उदारता ही ! कवि म्हणतो, "तुज द्याया आशीर्वादा मी उचलू केंवि हात ?। करि काचन–रज हो वाळू। मग केंवि तुला कुरवाळू। जाईल काळवण्डूनी तव कान्ती जन्मजात॥ नाभि नक्षत्राची शोभा। धरि मी न पहाया लोभा। निखळतील मम नजरेने, भय नान्दे मानसात॥ उल्हास उकळतो जेथे। सुखपूर्ति खिदळते जेथे। प्रगटून कशाला तेथे मी पसरूं काळरात ? तू सजसी व्योमविहारा। जा विहङगमा परभारा। अणु–अणूत दूषित माझ्या वास्तव्ये येथ वात॥ माङगल्य मूर्त होवोनी। दिग्वि-जये ये परतोनी। अस्पृश्य तोवरी येथे मी बसतो बघत वाट॥"

## मृत्यूची विनवणी

कवीने आपुल्या अनुभवाचे 'गुलामाचें गाऱ्हाणे' गाइले आहे. ते बहुतेक नोकरीवाल्या वाचकाना पटण्यासारखेच आहे. ते असे–"जू बैसले मानेवरी। चाबूक हा पाठीवरी। ह्या कर्दमीं मार्गावरी। चौखूर धावावें

रि। हाकावया जो बैसला। सत्तामदे तो झिङ्गला। माया—दयेची आर्द्रता। नाहीं तयाच्या अन्तरीं॥"

सासारिक यातनाची पराकाष्ठा झाली, तेव्हा कवि देवापाशीं अखेरचे मागणे मागतो, ते असे—' राबलो वृथा ससारसौख्यविश्रमीं। ने प्रभो आपुल्या धामीं। जाहलो सर्वथा श्रमी। चालली जरी सत्पथे। तरि तुफान उलटे सुटे। सैराट तारु भडकते, विफल रुरतुमी।"

शेवटीं निराशेची सीमाच सपून कवि मृत्यूचीहि ' घाली न हुतूतू ' अशी विनवणी करतो. तो वैतागून म्हणतो, " हे जीवित कीं सासर, माहेर जिवाला—। तू एक जिव्हाळा। का चालवण्या दाविसि? दे गाढ मिठी तू। घाली न हुतूतू॥ ही आग सभोंती, श्रम केले विझवाया। गेले परि वाया, ना थेम्ब म्हणावाच जरी आणिक ओतू। घाली न हुतूतू॥"

## थोरांचें नैराश्य

केवळ वैयक्तिक संसारातच निराशा भेटते असे नाहीं. साऱ्या जगाचीहि घडी घालू पहाणाऱ्या मुत्सद्याना व महात्म्याना, सेनापतींना व राज्य-कर्त्यांना, द्रष्ट्याना व प्रेषिताना—आपल्या कार्यात बहुधा अपयशच आलेलें आढळते युद्धाने कोणतेहि प्रश्न सहसा सुटत नाहींत. तेव्हा राष्ट्र-नेत्याना वाटणारी निराशा ' युगवराचे पालुपद ' या कवितेत रगविली आहे. ती अशी, "घडी बसाया हवी जगाची ' नवीन सुदर शात निरामय। उरस्फोड का थोडी केली?। सिन्धु आटले किति शाईचे। थोरु मरुमान्दराचे। झिजले, गेले तामुन चिवुन। फेसहि आला ओटाभवती। पण—जमेच ना, घडेच ना। बनेच ना, पटेच ना।"

मानवतेसाठीं सुरू केलेल्या युद्धात मानवी भावना कशा ग्वाक होऊन जातात, याचे वर्णन करताना कवि म्हणतो, " निरोप देताना मातांचीं। विदीर्ण हृदये ठिबक—ठिबकती। थारोळीं रक्तांचीं जमतीं। घरीं नि समरीं नद्या वाहती। वाहुनि सुकती, फिरून वाहती। आणि वाहता गाणे गातीं। ताल जयाला पडघम धरती। शतके गेलीं ' युगेंहि गेलीं '! परन्तु त्याचे एक पालुपद। जमेच ना, घडेच ना,। पटेच ना, घडेच ना '!"

सुखदुःखाच्या कसल्याहि अवस्थेत चित्तात समाधान असू द्यावे, हा

संताना साजेसा उपदेश कवीने नदीच्या रूपकाचे द्वारे केला आहे; तो असा–" करिते का कधि खन्त । सरिता करिते का कधि खन्त ?" राङ्गत लोळत दौडत घोळत । कडेकपारींतुनी खळाळत । आक्रमित निज पन्थ ॥ मरुभूमींतुन दहनभूमितुन । गात चालली एकच गायन–' करू जग शोभावन्त ! ' ॥

## कर्तृत्वाला आवाहन

मात्र हे समाधान दुबळ्याचे, नाकर्त्याचे नाहीं. अशा समाधानी वृत्तींतून कर्तृत्व खुलले पाहिजे व पराक्रमाचे तेज झळकले पाहिजे, असा युक्तिवाद यशवंताच्या काव्यात रसरशीतपणे भरलेला आहे. ' बाणा ' या कवितेत ते मानवी कर्तृत्वाच्या अभिनिवेशाने म्हणतात. " काय होइ विन्मुख कैचा तरी देवराणा ? । उभे राहु आम्ही अमुच्या जरी परित्राणा ॥ योजिली अम्हास्तव त्याने जरी माळ जागा । कसू कम्बरा फुलवाया तेथ रम्य बागा । विफल यत्न झाले तरिही कधि न करूं त्रागा । भुलुनि तोच येइल अमुच्या पुष्पपरागाना ॥ दाविली तयाने किंवा जरी बन्दिशाळा । तिथे लावुनी तुळशीचे रोप पुजू त्याला । खलाच्याहि हृदयीं स्फुरवू भक्तिचा उमाळा । भासव् तया हे गोकुळ, नव्हे बन्दिखाना ॥ "

## उदात्त भावना

यशवंताच्या भावनेचा उदात्तपणा ' अन्य नको वरदान ' या कवितेत ठसठशीतपणे व्यक्त झाला आहे. ही सारी कविताच मुखोद्गत करण्यासारखी आहे. तींत तारुण्यातील कर्तृत्वाची ऐट आहे आणि तशीच वार्धक्यातील भक्तीची नम्र भावना पण आहे. आर्त, दुःखी, अपमानित अशाच्या सरक्षणासाठीं आपले सर्वस्व अर्पण करण्याची संताची वीर वृत्ति या कवितेत काठोकाठ भरलेली आहे. कवि म्हणतो, "अन्य नको वरदान । प्रभो, मज अन्य नको वरदान ॥ कोठे चिमणे बालक रडते । कोठें शोकीं कुटुम्ब बुडते । त्वरित तयाना रिझवायाते । द्या मजला अवधान । प्रभो मज अन्य नको वरदान ॥ तसाच येता प्रसङ्ग बाका । ' अहो, उठा जन लज्जा राखा ' । अशा दशदिशीं फुटतां हाका । द्या हातात कृपाण

प्रभो, मज अन्य नको वरदान ॥ घावामागुनि घाव बैसुनी । देह शोणितें निघता न्हाउनि । विह्वळता जन भवतीं मरणीं । न चळो धैर्य इमान । प्रभो, मज अन्य नको वरदान ॥ '

## कलेचा गौरव

थोर कलावंताच्या दर्शनानें कवीच्या भावना हेलावतात. मराठी रंगभूमीची सर्वश्रेष्ठ देवता म्हणून रसिकापुढे पचवीस–तीस वर्षे अपूर्व तेजाने तळपणारे बाल–गंधर्व याच्या गुणाचे वर्णन यशवंतानीं पुढील काव्यपूर्ण शब्दानीं केले आहे, " तुफान सिंधु नाचतो । अफाट वात खेळतो । त्वदीय गान ऐकता क्षणार्ध सर्व थाम्बले ॥ कवीन्द्रही नसून तू । मुनींद्रहि नसून तू । स्वगीत–योगसाधने जगास सर्व भारिले । "

याहिपेक्षा अधिक हृदयंगम वर्णन ' गायकास नजराणा ' या कवितेंत केले आहे. ' एकच प्याला ' नाटकात कारुण्यमूर्ति सिंधु दळण दळते व दळता दळता ' चंद्र चवथिचा ' ही ओवी म्हणते. तो प्रसंग किती करुण-रसपूर्ण आहे याचे वर्णन जातिवंत कवीच करू जाणे तसे कवि असलेले यशवंत यानीं अल्पाक्षरामध्ये, विरोधाभासाची गुंफण करून, पुढील प्रशस्तिपर कवन रचले आहे. " चन्द्र चवथिचा । रामाच्या ग बागेमध्यें चाफा नवतिचा ॥ गीत–गायनीं । शब्द ते न, अश्रुहार देसि गुम्फुनी । एक ओळ ही । निघता तव वदनातुनि डुलत अहिमहि ॥ यामिनि रडे । अश्रुबिंदु–चांदणेच पडत चहुकडे ॥ हृदय कढकढे । या गङ्गायमुनाना पूर बहू चढे । नगहि उपळले । ऐन वसन्तात मेघ नाभि उफाळले ॥ सजिव जड बने । जडतेला येइ जीव रडति मग वने ॥ गायका, तुला । अश्रूंचा नजराणा हाच अर्पिला ॥ "

बाल–गंधर्व हे तर लोकोत्तर नट, पण रात्रींच्या वेळीं रस्त्यातून सारंगी वाजवत फिरणारा सामान्य कलावंत पाहिला तरी यशवंताच्या भावना उचंबळून येतात. ते व गिरीश या दोघानींहि ' सारंगीवाला ' या एकाच विषयावर दोन कविता केल्या आहेत. यशवंतानीं आपल्या कवितेंत सारंगीवाल्याची स्तुति करता करता संगीत–कलेचे कार्य काय आहे–किंबहुना सर्वच कलाचे ध्येय कोणतें असावे, हे सूचित केले आहे;

एवढेच नव्हे तर समाजातील दैन्य, दारिद्र्य, विषमता वगैरे दोषावरहि टीकेचा झोत पाडला आहे. ' सारंगीवाला ' अंधाराचे मथन करून त्यातून जीं रत्ने निघतात तीं आकाशात फेकून देतो आणि तीच नक्षत्रे म्हणून चमकतात अशी उत्तुंग कल्पना करून कवि म्हणतो, " लागले हे दीप गगनीं । वादनाच्या मंजु गानीं । अन्धारसिन्धु मन्थुनी फेकिसी उडुरत्ने की गगनीं. ॥ " संसारात दुःखे भोगणाऱ्या जीवाचे समाधान करण्याचे कार्य कलावंत करतो हे सांगताना यशवंत म्हणतात, " तीव्र समरीं जीविताच्या । फुटति छाती ज्या जनाच्या । तू धन्वन्तरि, तीं हृदयें देशी सद्गीतीं सान्धवुनी ॥ " गरीब बिचारी आई ! थकली भागलेली हमालीण ! अशा दीनदुबळ्याना आनंद व उत्साह देणे हे कलेचे कार्य आहे. असे सांगताना कवि म्हणतो, " हे उपाशी मूल उठले । माउलीचे अश्रु प्याले । अङगाइ गावया तया हिण्डसी सारङ्गी वाजवुनी ॥ धूळ जीते शेज झाली । येथ निजली ही हमाली । चैतन्य द्यावया तिला उद्धारतव अवतरसी दिव्य मुनी ॥ " हेच ध्येय यशवंताच्या काव्य-रचनेचेहि आहे, नव्हे काय ?

## अभ्यासाच्या वाटा

( १ ) ' कवि यशवंत ' राजकवि ' झाले तरी सदैव लोककविच राहिले ' ' यशवंता 'च्या चरित्राच्या व काव्याच्या आधारे वरील विधानाचे समर्थन करा

( २ ) ' यशवंताच्या काव्यात निराशेचा सूर आहे असे तुम्हास वाटते का ? उत्तर कारणासह लिहा

( ३ ) ' रविकिरणमंडळ ' ही कवींची एक प्रसिद्ध संस्था आहे, तीबद्दलची माहिती गुरुजींच्या साहाय्याने मिळवा व लिहून काढा

( ४ ) ' आई ' या कवितेचे रसास्वादात्मक विवेचन करा.

( ५ ) ' पाणपोई,' ' देहाचा पूल,' ' गाउं त्याना आरती,' ' प्रेमाची दौलत,' ' अन्य नको वरदान ' या कविता अभ्यासा. त्यातील कल्पना थोडक्यात लिहा.

## कुसुमाग्रज : : : : ५

नव्या कल्पना, नवीं ध्येयें व नवे विषय घेऊन नवनवीन चालींत तीं रंगाविण्याचे सामर्थ्य ' कुसुमाग्रज ' या कवीने दाखविले. त्याच्या नावांत ' कुसुम ' असलें तरी त्याच्या काव्यात कोमलता फारशी नाहीं.



उकळत्या तेलात आपली लेखणी बुचकळूनच जणु कांहीं ते आपली कविता लिहीत असावेत असें वाटते. तांबे किंवा टिळक यानीं आपली कवने म्हणजे सुमने होत असे रसिकाना निवेदिले आहे, पण कुसुमाग्रजानाआपल्या कविता म्हणजे यज्ञातील समिधा वाटतात. त्याचे वर्णन त्यांनीं पुढील शब्दानी केले आहे. " समिधाच सख्या या, त्यात कसा ओलावा, कोठुन फुलापरि वा मकरंद मिळावा?। जात्याच रुक्ष या, एकच त्या आकांक्षा, । तव आंतर अग्नी क्षणभर तरि फुलवावा ! ॥ " रसिकांचा ' आंतर अग्नि ' फुलविण्याचे त्याचे सामर्थ्य अलौकिक आहे. राष्ट्रातच नव्हे तर सर्व जगात जी क्रांती सध्या चालू आहे, तिची तुतारी कुसुमाग्रजाच्या काव्यातून ऐकूं येते. आतापर्यंत दैन्याखालीं दडपलेला मानव जागृत होऊन अन्यायाच्या व जुलमाच्या शृङ्खला तोडू पहात आहे. त्याचे आशावादी व आवेशपूर्ण उद्गार त्याच्या काव्यातून स्पष्टपणें ऐकूं

येतात. " वाळू–रणिं ओढीत असे जीवन–रिक्षा " असा घाम गाळणारा कामकरी हाच उद्याचा शास्ता होणार आहे, असा विश्वास ते प्रगट करतात. "फुटलेल्या पणतींत जळे कोरडी ज्योत" असे जीवन कठणाऱ्या बहुसख्य किसान–कामगाराच्या भावना व आकाक्षा त्याच्या काव्यात तीक्ष्णतेने व ठळकपणे प्रगट झाल्या आहेत.

## गोदेचें तेजस्वी पाणी

आपल्या काव्यातून तेजोगगा वहाविणारे बॅ. सावरकर व गोविंद हे कवि ज्या गोदावरीचे काठीं जन्मले व तिचे श्रीरामानीं पावन केलेले पाणी प्याले, त्याच गोदावरीच्या काठावर कुसुमाग्रजाचे बालपण पोसले गेलें. त्याचे खरे नाव विष्णु वामन शिरवाडकर. त्याचा जन्म नाशिक येथे तारीख २७ फेब्रुवारी १९१२ रोजीं झाला. तेथेच त्याचे बी. ए. पर्यंतचे शिक्षण झाले. बी. ए. ची पदवी घेऊन ते वृत्तपत्र–व्यवसायात शिरले. त्या व्यवसायासाठीं त्यानीं प्रथम काहीं दिवस पुणे येथे काढले. नंतर ते मुंबई येथे गेले आणि नतर तेथेच त्यानीं वास्तव्य केलें. विसाव्या वर्षापासून त्यानीं काव्य–रचनेस आरंभ केला. पण त्याचेकडे सर्व महाराष्ट्राचे लक्ष एकदम खेचले गेले, ते ' क्रातीचा जयजयकार ' या तेजस्वी कवितेनें. १९३९ सालीं डमडम येथील तुरुंगातील राजबंद्यानीं अन्नत्याग करून मृत्यूला मिठी मारली. त्यावेळीं ब्रिटिश सरकारने चालविलेल्या अमानुष अत्याचाराना अजिक्य ठरणारे धैर्य ज्या राजबद्यानीं दाखविले, त्याच्या हृदयातील उत्कट व ऊर्जस्वल भावनाचे पाट या काव्यातून वहात आहेत. या काव्याच्या तेजाने मराठी वाचकाचे डोळे दिपले आणि त्यानतर ते कुसुमाग्रजाच्या सर्व काव्याचेच चाहते बनले. कुसुमाग्रजानीं काव्याप्रमाणेच कादबरी व नाटक या साहित्य–प्रातातहि सचार केला आहे. ' जीवन–लहरी ' हा त्याचा पहिला कविता–सग्रह जुन्या चाकोरींतूनच जाणारा आहे. पण ' विशाखा ' व ' किनारा ' हे त्याचे काव्यसग्रह मात्र त्याच्या ज्वलत गुणाचे प्रतिनिधी आहेत. त्याचीं सारीं वैशिष्टये त्यात तळपत आहेत. कालिदासाच्या

'मेघदूता 'चें भाषांतरहि त्यांनीं प्रसन्न भाषेमध्यें केलें आहे. 'वैष्णव' व 'जान्हवी' या त्यांच्या दोन कादंबऱ्या प्रसिद्ध असून 'वैजयंती' व 'दुसरा पेशवा' हीं त्यांचीं दोन नाटकें रंगभूमीवर आलेली आहेत.

## क्रांतीचा शाहीर

१९१५ सालापासून पांच वर्षे मराठी काव्याच्या साम्राज्यावर गडकऱ्यांनीं आपली सत्ता चालविली. त्यांच्या बरोबरीने रे. टिळक व बालकवि यांनींहि आपल्या मधुर काव्याची मोहिनी रसिकांवर घातली. पण या तिघा कविश्रेष्ठांच्या प्राणज्योती साधारणतः एकदमच विझल्या. त्यामुळे मराठी काव्यांत जो अंधार पसरला, तो निवारण्याचें कार्य 'रवि-किरण-मंडळानें' केलें. विशेषतः माधव जूलियन, यशवंत व गिरीश या त्रिमूर्तींनीं महाराष्ट्राच्या रसिकतेवर आपलें अधिराज्य चालविलें. त्यांच्या—इतकेंच प्रभावी पण स्वतंत्र आकर्षण तांबे यांचे होते. या कवींनीं दहा—पंधरा वर्षे रसिकांच्या मनावर राज्य चालविलें. त्यानंतर १९३५ सालापासून जे कवि नवयुगाचा झेंडा हातीं घेऊन पुढे सरसावले त्यांत कुसुमाग्रजांचें स्थान वरचें आहे. अनेक भाव-गीत-गायकांच्या मुखांतून त्यांची तेजस्वी काव्यें महाराष्ट्रांतील गांवोगांवींच्या हजारो श्रोत्यांच्या कानांमनांत भिरलेली व स्थिरावलेलीं आहेत. 'तिमिरांतुनी तेजाकडे' आपल्या वाचकांना नेणारीं हीं काव्ये जितकीं प्रकाशमान, तितकींच दाहकहि आहेत.

गेल्या वीस वर्षांत कुसुमाग्रजांनीं दोनशेंच्या आंतच कविता लिहिल्या. आपल्या प्रत्येक कवितेंत आपल्या विशेष गुणाचा काहीं ठसा असावा या इच्छेमुळे ते काव्य-रचना संयमानें करीत असावेत. 'विशाखा'नंतर दहा वर्षांनीं 'किनारा' प्रसिद्ध झाला. हीं दहा वर्षे म्हणजे १९४२ ते १९५२. हा काळ राष्ट्राच्या इतिहासांतील अत्यंत आणीबाणीचा-तीव्र प्रक्षोभाचा व विराट घटनांचा ! महाकाव्ये ज्यावरून ओंवाळून टाकावींत, असा हा काळ ! पं. नेहरूंनीं "Epic grandeur' असें वर्णन केलें तें याच काळाचें. पण या काळाचें आवाहन फारच थोड्या मराठी

कवीच्या अंतःकरणास जाऊन पोहचलें. त्यामध्ये कुसुमाग्रज हे अग्रगण्य होत. ते मानवता—प्रेमी आहेत आणि म्हणूनच क्रातिवादी आहेत. केशवसुतानीं ज्या सामाजिक क्रातीची तुतारी फुकली, ती आता पूर्णावस्थेस पोहचत आहे. राजकीय क्राति १९४७ सालीं शाततेच्या अभिनव मार्गाने घडून आली. पण अद्याप आर्थिक क्राति व्हावयाची आहे. समाजाच्या सर्वांगीण क्रातीची घोषणा कुसुमाग्रजाच्या काव्यातून ऐकू येते.

## निराशेचा शेवट

'टिळकाच्या पुतळ्याजवळ' गेले असताना कवीला सर्वत्र थैमान घालणारी निराशा आठवते. आणि तो म्हणतो, "उद्दाम निराशा करि ताडव हृदयात। घोंगावे वादळ जेवीं जीर्ण गडात, ॥ हे जीवन कसले, ही मरणाची माला। मासोळी झटते तोडायास गळाला, ॥" पण 'ती कणखर मूर्ति' पाहताच 'आतला शात गल्बला झाला।' कुसुमाग्रजाच्या कवितेत दुबळी निराशा आढळत नाही. केशवसुतापासून यशवतापर्यंत बहुतेक सर्व कवींना ग्रासणाऱ्या निराशेवर ते स्वार होतात. आशा व धैर्य या दोन डोळ्यानीं ते भविष्यकाळाकडे सतत पहात आहेत. वादळातून चाललेल्या जहाजावरील खलाशाना दूरवर नजर टाकिली असताना समुद्राचा किनारा दिसला म्हणजे जो हुरुप येतो तो वाचकाच्या चित्तात कुसुमाग्रज आपल्या काव्यानीं निर्माण करतात. सग्रामात घायाळ झालेल्या वीराला ते सागतात, "सरायास संग्राम आला अता। तपाची समोरी उभी सागता। युगाच्या श्रमाचा दिसे हा निवारा। आला किनारा।"

जीर्ण जगाचा विध्वस होत असलेला ते पाहतात. 'निरोप' या कवितेत ते म्हणतात, "ठावे न कोठे मज, काय झाले। गेले जळोनी मन मानवाचे। मागल्य सारे पडले धुळीत। चोहींकडे नर्तन हिंस्रतेचे।' जे जे गमे सुंदर जीवनात। त्याच्या शवाचा खच हो धरेला।" पण लगेच ते अशी आशा दाखवितात, "यज्ञामधे शतकातुनी। बलिदान सतत जाहले। ये देवता ज्वालातुनी। ते श्रेय आता लाभले! ॥"

कोणाचे हृदय श्रमलें असेल, कोणाच्या हृदयात अंधार कोंदला असेल, तर त्याला ते 'तारका'मध्ये आशा दाखवितात, "रुपेरी पिमाची रचती शेज। माझिया श्रमल्या हृदयासाठीं। प्रकाश–पुष्पाचे गुंफती हार। माझिया उदास अंधारासाठीं।"

## नवी चेतना

काव्यातील जुने विषय, जुने संकेत, जुन्या कल्पना यांचा वीट कवीला आला आहे. म्हणून तो 'नवे–जुने' या कवितेत आवेशाने सांगतो, "नवीन काहीं गा हो आता। जुने-जुन्याचे चर्वण सरु द्या। प्रतिभेचीं पाखरे आपुल्या। नव्या नभामधुनी भिरभिरुं द्या॥ तीं कमले ती, त्याच चांदण्या। तेच चांदणे, तोच सुधाकर। प्रेम तेच ते, त्या नवयुवती। तीं कुसुमे अन् तो कुसुमाकर॥"

साधा माणूस हाहि चैतन्याचा अंश आहे आणि सामान्य नागरिक हाहि समाजाचा प्रबळ घटक आहे, ही नवी जाणीव, ही व्यक्ति-स्वातंत्र्याची महती 'मातीचे घर' या कवितेत कुसुमाग्रज मुक्तकंठाने गातात आणि म्हणतात—"मातीचे पण तुझेच हे घर। कर तेजोमय बलमय सुंदर॥ तेज भरे जे ग्रहनक्षत्रीं। प्रकाशते जे दिवसारात्रीं। जीवनमय जे करी धरित्री। कण त्याचा मम उजळी अंतर। फुलांत उमलत, घनांत गर्जत, नदींत वाहत, वायुत विरहत। तेच तुझेपण होय इथे स्थित; नच घर माझे, तव हे मंदिर॥"

## लोक–देवतेला आवाहन

राष्ट्राला स्वातंत्र्य लाभण्यापूर्वीं जीं आंदोलने झालीं, त्यांना महाकालीच्या नृत्याची उपमा देऊन कवीनें १९४६ सालीं तिला आवाहन केले आहे. ते वाचून तांबे यांच्या रुद्राची आठवण कोणासहि होईल. कल्पना व आवेश या दोन्ही गुणानीं लखलखणारे त्यांतील दोन उतारे पहा—"तडिताचे बांधुन पायामधि पैंजण। उधळीत भोंवतीं नक्षत्रांचे कण। मेघांचे घुमवित मृदंग रणभीषण। मदांध सामर्थ्ये तुडवित ये निज चरणाखालीं। सहाराची सुवर्णघटका आली गे आली। हे लोक–देवते

क्रुद्ध तुझ्या नर्तने। डळमळो पृथ्विचा तोल नभीं भीतिने। राखेत लोळुंदे किरीट—सिंहासने। शापमुक्त त्या भूवर कर मानवता बलशाली। सहाराची सुवर्णघटका आली गे आली ॥ ”

## वीररसाचा उद्रेक

प्रक्षुब्ध लोक-देवतेच्या क्रोधाच्या लाटा थोपवून धरण्यासाठीं परके सरकार दडपशाही करीत होते, पुढाऱ्याना तुरुगात डाबीत होते, लाठी-माराने जखमी करीत होते, गोळीबाराने किंवा फासाने ठार करीत होते तरी ते देशभक्त गरजत, “ आहे अजिक्य हा निर्धार ! क्रूर काजळा चिरेबंद तट सभोवतीं बाधा। नाहीं विद्ध तरी होणार ! परजा सावळदड उभारा सूळ सगिनींचे। घ्याया निर्दय बलिदान। जखमावरचे रक्त पुसोनी गर्जत राहिल हा। रणाचे सूडाचे गान ॥ ”

जागे झालेले मानवत्व अजिक्य आहे मृत्यूलाहि जिकणारे आहे आणि ते स्वातत्र्याचा ध्वज आकाशात फडकविणार, हा हुतात्म्याचा ‘ अजिक्य निर्धार ’ ओजस्वी भाषेने कवि वर्णितात.

जागृत मानवतेचा हुकार ‘ मातीचा पुत्र ’ या काव्यातहि ऐकूं येतो. स्वसामर्थ्याची जाणीव झालेला मानव देवाना बजावतो, “ स्वर्गामधल्या हे गर्वोद्धत देवदैवतानो। दयेचे आज नको दान। पृथ्वीवरचा मानव मी हा उभारुनी बाहू देतसे तुम्हास आव्हान ॥ मातीचा मी पुत्र पुकारी स्वर्गाच्या दारीं। माझ्या जातीची महती। हिरावलेली परत मागतो स्वतत्रता माझी प्रतिष्ठा माझी जी होती ॥ ”

## मूक जनतेचा हुंकार

समुद्राच्या लाटामध्ये जहाजेच्या जहाजे गडप होतात, याचे वर्णन अनेक कवींनीं केले आहे. पण कुसुमाग्रजानीं मातीचेहि सामर्थ्य तसेंच विराट असल्याचे दाखविले आहे. सर्वांच्या पायाखालीं तुडविली जाणारी माती—पण ती मोठमोठे राजवाडे गिळून बसते. तशीच तुडविली गेलेली मूक जनता यापुढे राज्यसत्ता आपल्या पोटात पचनीं पाडील. त्याच्या ‘ मातीची दर्पोक्ति ’ अशी आहे—‘ प्रासाद भिडूं द्या गगनाला गर्वात। डोलूं द्या

पताका सत्तेच्या उन्मत्त । दौलती उठूं द्या प्राशुनि दुर्बळ रक्त । कोसळेल इमला समूळ एका रातीं । मातीवर चढणें एक नवा थर अर्ती ॥ "

ही झाली मातीची नुसती दर्पोक्ति; पण प्रत्यक्ष कृति ? ' आगगाडी व जमीन ' याच्या दाखल्यानें ती कृति कवीने भेदक रीतीने रगविली आहे. जमीन दडपीत, तिच्या अंगावरून वेगाने धावत व आनदाने शीळ फुंकत आगगाडी उन्मत्तपणें चालली आहे, पण जमीन खचताच ती उलटीपालटी होऊन तिचे तुकडे तुकडे होतात. ती प्रथम किती ऐटीने चालली आहे पहा—" शिरली घाटात । अफाट वेगात । मैलाचे अंतर । घोटांत गिळीत ।" पण आगगाडीच्या दडपशाहीने चिडून गेलेली जमीन सूडानें पेटली व तिने एक पूल ढासळला. "हवेंत पेटला । सुडाचा धुमारा । कोसळे दरींत । पुलाचा डोलारा ॥ " तेव्हा ' हजार शकले पडलीं खालतीं । ' १९३८ सालीं कवीने केलेले हें रूपक दहा वर्षाच्या आंत खरें झालें आणि मदोन्मत्त ब्रिटिश साम्राज्यशाहीला भारतीय भूमीने नामशेष करून टाकले.

## राज्यसत्तेला इषारा

१९४२ च्या ' चले जाव ' आंदोलनात तर ब्रिटिश सरकारने दडपशाहीचा अग्नि–वर्षाव केला. पावित्र्य चिरडले गेलें, माणुसकी ठार झाली ! अशा वेळींहि आशा व स्फूर्ति पुरवीत रहाण्याचे कार्य जीवंत कवीचें आहे. कुसुमाग्रज १९४३ सालीं लिहिलेल्या ' बलिदान ' मध्यें असें भाकित करतात, " धुंळीमधोनीं फुलतिल ज्वाला । धगधगतिल पाषाण । हें व्यर्थ न हो बलिदान् ! ॥ घराघरांतुन पथापथावर । पवित्रतेचें पडे कलेवर । माणुसकीच्या मुडद्यावरती थयथयले हैवान ! हें व्यर्थ न हो बलिदान् ! ॥ "

आणि तो 'क्रातीचा जयजयकार !' डोळ्यासमोर मृत्यु आ वासून उभा असतांनाहि त्या राजबंद्याचा आत्मविश्वास अमर व ध्येयनिष्ठा अढळ होती

याचे प्रभावी चित्रण कुसुमाग्रजांनी केलेले आहे. ते राजबंदी गरजतात— " क्रुद्ध भूक पोटात घालु द्या खुशाल थैमान । कुरतडु द्या आतडीं करूं द्या रक्ताचे पान । संहारक काळी, तुज देती बळीच आव्हान । बलशाली मरणाहुन आहे अमुचा अभिमान । मृत्युंजय आम्ही । आम्हाला कसले कारागार ? । अहो हे कसले कारागार ? । गर्जा जयजयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार ॥ "

मातृभूमीच्या मुक्ततेचे एकच वेड लागलेल्या या वीरांनीं आपल्या मायभूमीला अखेरचे वंदन केले आहे, ते असे–" श्वासांनो, जा वायू-संगे ओलांडुन भिंत । अन् आईला कळवा अमुच्या हृदयातिल खंत । सांगा वेडीं तुझीं मुले हीं या अंधारात । बद्ध करांनीं अखेरचा तुज करती प्रणिपात । तुझ्या मुक्तिचे एकच होते वेड परी अनिवार । तयाना वेड परि अनिवार । गर्जा जयजयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार ! "

असे तेजस्वी तरुण आपल्यासाठीं मारले जाणार म्हणून भारतमातेला शोक होईल. पण तो शोक अकारण आहे. असें सांगून कवि अशी आशा फुलवितो कीं, या हुतात्म्यांच्या हातांतील शृंखलांमुळेच भारत-मातेच्या पारतंत्र्याच्या शृंखला तुटणार आहेत आणि यांच्या बलिदानातून स्फूर्ति पावून नवे नेते जन्मास येतील व स्वातंत्र्याचा उषःकाल आपल्या राष्ट्राला दाखवितील. "कशास आई, भिजविसी डोळे उजळ तुझे भाल । रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल । सरणावरती आज आमुची पेटताच प्रेते । उठतिल त्या ज्वालांतुन भावी क्रांतीचे नेते । लोहदंड तव पायांमधले खळाखळा तुटणार । आई, खळाखळा तुटणार । गर्जा जय-जयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार । "

उकळत्या वीर–रसावर कारुण्याचा तवंग पसरविणारी ही कविता अनन्यसाधारण आहे.

## मानवतेचा धर्म

कुसुमाग्रजांनी चित्रित केलेला 'वैष्णव'हि हुतात्म्याच्या कोटींतीलच आहे. तो स्वतःचे स्वरूप सांगतो, "बलहीनाचा नत पाइक मी । प्रबलाचा नेता । उन्मत्ताचा अजिंक्य वरी । दलिताचा त्राता ॥" या वैष्णवाचा धर्म कोणता ? पूजा कोणती ? तर, "अभिमानाची, स्वतंत्रतेची । समतेची पूजा । प्रज्ञेची जाणीव मानणे हाच धर्म माझा ॥ जुमानितो ना जातिवर्ण मी । कर्मबंधने वा । एक मानतो मी मानवता । योग तिची सेवा ॥" मानवतेचा पूजक आणि समतेचा उपासक असा हा स्वतंत्र बुद्धीचा वैष्णव वीर आहे.

अशा मानवतेचा साक्षात्कार 'सहानुभूति' या काव्यात कवि घडवितो. रस्त्यावर भीक मागणाऱ्या अनाथाला भीक कोण घालतो ? तर दीन दरिद्री असा मजूरच ! तो "म्हणे, राहिन दिन एक मी उपाशीं । परी लाभू दे दोन घास यासी । खिसा ओतुनि त्या भुक्या ओंजळींत । चालु लागे तो दीनबंधु वाट । —आणि धनिकाची वाहने पथांत । जात होती तीं आपुल्या मदांत ।"

## आर्थिक वैषम्यावर टीकास्त्र

आपले खेड्यातील झोपडें सोडून एक बेकार माणूस भाकरीचा घास शोधण्यासाठीं शहरात गेला. तेथे भुकेने मरून तो पायवाटेला पडला. मृत्यूमुळे तो कोणकोणत्या यातनांतून सुटला हे 'बळी' या काव्यात सांगून कुसुमाग्रजांनीं सध्याच्या जीवन-संग्रामावर तीक्ष्ण टीका केली आहे. ते म्हणतात, "ना भुकेचा यापुढे आक्रोश पोटीं चालणे । याचनेचे दीन डोळे बंद झाले यापुढे ! यापुढे ना स्वाभिमाना लागणे आता चुडा । अंतराला आसुडाचे घाव माथीं जोखडें ! मानवाच्या संस्कृतीची काय लागे

ही ध्वजा । तीस कोटी दैवताच्या की दयेचे हें मढें ? मूक झालेल्या मुखानें गर्जतें का प्रेत हें । घालिती हे बंद डोळे का निखाऱ्याचे सडे ? ॥ ”

ही झाली बेकाराची दशा. पण कामगाराची कहाणी तरी काय निराळी आहे ? ‘ गुलाम ’मधील एक कामगार गिरणींतील चक्राचा बेहोष घोष ऐकून ऐकून कंटाळला–वैतागला आणि त्यानें “पाहिले सभोतीं फोडुनि अन् किंकाळी । चक्रात घातले मनगट आवेशात । ” त्याचा परिणाम काय झाला ? तर “ तनु दुभग झाली आणि थाबलें चाक । घंटाध्वनि घुमला गंभीर अवकाशात । ” कामगार तर मेलाच, पण त्याचें जीवन यंत्रमय करणारीं तीं शेकडों चक्रेंहि क्षणभर थाबलीं. जागी झालेली माणुसकी यंत्राचा जुलुम सहन करणार नाहीं अशी प्रेरणा देणारे हें काव्य प्रभावी आहे.

एका शेतकऱ्याच्या घरादाराचा “ लिलाव ” श्रीमंत सावकार करीत आहे. या करुण रसाचा कळस करणाऱ्या अखेरच्या ओळी अशा आहेत—“ भुके अर्भक अन् कवळुनी उरास । पदर टाकुनि त्या घेई पाजण्यास. । ऊर उघडे ते तिचें न्याहळोनी । थोर थैलींतिल वाजवीत नाणीं–। “ आणि ही रे । ” पुसतसे सावकार । उडे हास्याचा चहुंकडे विखार । ”

## भक्तिरसाचा उठाव

वीर व रौद्र या दोन प्रमुख रसाच्या अनुषंगाने कुसुमाग्रजांनीं करुण, भक्ति, वत्सल इत्यादि रस घोळले आहेत. ‘ भाक्तिभाव ’ या कवितेंत डॉ. टागोराच्या थाटात ते ईश्वराला आवाहन करतात, “ मिरवणूक ये वाजत गाजत । नृपापरी तूं तींत विराजत । दुमदुमती जयनाद तुझे नित । वैभव तें विसरून घडीभर स्वागत हें मम घेशिल का ? ॥ ”

ईश्वराची साक्ष डोंगराडोंगरातून, आकाशातून पटते; पण ईश्वराचें

स्वरूप मला कळत नाहीं असें कवि ' अज्ञात'मध्ये सांगतो आणि शेवटीं अशी शंका घेतो कीं, सारे मानव ज्याचा शोध करतात तो ईश्वर सत्य आहे कीं मृगजळाप्रमाणे मिथ्या आहे ? तो कसाहि असला तरी मानवाची प्रगतीच करीत आहे असा विश्वास कवीला वाटतो. तो म्हणतो, " गिरीदरींचीं गहन भव्यता । चरणखुणा तव त्यांत शोधता । लोहमार्ग त्यातून धडाडत धूर भरे गगनात । अससी सतत मला अज्ञात ॥ अथांग नीलामधून वरती । तुझ्या स्मिताचीं कमले फुलतीं । कृष्ण घनाचे ग्रासति कुंजर तोंच तया निमिषात् । अससी सतत मला अज्ञात ॥ अससि कुठें तू-अखंड मानवयात्रा तुज शोधते । अथवा अससी मृगजल, परि जें प्रगतिपथीं ओढते ! ॥ "

' पाउलचिन्हें ' मध्येंहि असाच संशयवाद कवि प्रगट करतो, तो असा-' गवसे न किनारा, फिरे जरी दर्यांत । शत शतकामधुनी शिडें उभारुन नाव ! स्मित करुन म्हणाल्या मला चांदण्या कांहीं, । तो मुक्त प्रवासी फिरत सदोदित राही । उठतात तमावर त्याचीं पाउलचिन्हें–। त्यानाच पुससि तूं, आहे कीं तो नाहीं ? "

## भक्तीचें आधुनिक स्वरूप

याच भावनेचा सुंदर विस्तार ' मी काय तुला वाहूं ' या रसार्द्र काव्यात कुसुमाग्रजानीं केला आहे. हे सारेंच काव्य म्हणजे एक उदात्त-रम्य भाव-गीत आहे, भक्ति-गीत आहे, संत-वचन आहे. कवीला पेंच असा पडला आहे कीं, " मी काय तुला वाहूं-तुझेंच अवघे जीवित-वैभव । काय तुला देऊं ? नक्षत्राच्या रत्नज्योती । तुझिया ओटीवर झळ-झळती । दीप रवीचे घरि, तुजपुढती–। वात कशी लावूं ?॥" सूर्यनक्षत्राच्या धन्यापुढे वाती काय लावाव्या ? तसेच समुद्राचा स्वामी असणाऱ्या ईश्वराला पाण्यानें स्नान कसे घालावे ? " सागर सारे तव बागेतिल । तृण-

पर्णावर जमलेले जल। दवबिंदूचे, शिंपुनि ओजळ। घालुं तुला न्हाऊ ?।" जगातील सारी पुष्प-सृष्टि ज्याच्या मुठीत, त्याला कळी वहावी कशी ? " चतुर फुलारी वसन्त फुलवित । तुजसाठीं सुमसचय अगणित । कशी लाजरी अर्धसुगधित । कळी करीं घेऊ ? ॥ " आणि ईश्वराला वस्त्र तरी कोणते अर्पण करावे ? चद्रानें आकाशाचा पट त्याचेसाठीं विणलेला आहे ना ? " झुलती तव सदनाच्या द्वारीं । साज उषेचे पट जरतारी । विणतो विधु अंबर चदेरी । वसन कुठे पाहू ? " आणि ईश्वराचे अलकार इंद्रधनुष्याचे ककण ? त्याच्या हातात आहे व शुक्रासारखा हिरा गळ्यात लकाकत आहे. " अलकार तुज शोधू कोठुन ?। शुक्र तुझ्या कठातिल भूषण । इद्रधनूचें सुरम्य-ककण । शृगारित बाहू ! ॥ "

पण आहे, एक वस्तु मात्र खास माझी आहे, ईश्वराला अर्पण करण्याजोगी आहे. ती म्हणजे प्रेमपूर्ण अश्रु — सर्व मानवाबद्दल वाटणाऱ्या सहानुभूतीचा अश्रु ! कवि म्हणतो, " एकच आहे माझी दौलत । नयनीं जो हा अश्रु तरंगत । मानवतेचे ज्यात मनोगत । तोच पदीं वाहू ? ॥ " ईश्वराच्या अगाध महिम्याचे व मानवाच्या कोमल भक्तिभावनेचे हे आधुनिक स्वरूप किती हृदयगम आहे.

## वक्रोक्तीनें टीका

त्या पारतंत्र्याच्या काळात परक्या सरकारच्या क्रौर्याला उघड नावे ठेवणेंहि धोक्याचे होते. म्हणून प्रा. शि. म. पराजपे याच्याप्रमाणे वक्रोक्तीचा आश्रय करून कुसुमाग्रजानीं 'मेघाची सेना' वर्णन केली आहे आणि त्यात ग्रीष्माचे रूपानें सरकारवर टीका केली आहे. ती अशी, " सार्वभौम हा ग्रीष्म बलोद्धत । चराचराला सुटला जाळित । अग्निपाश करकचून करतो धरणीची दैना ! चालली मेघाची सेना ! ॥

अशाच व्यंजनापूर्ण स्वराने कवि 'मेघास' म्हणतो, " गर्जत ये ओढित

ये आसुड तडितेचा । गर्वोन्नत माथा तो नमव भास्कराचा । लोकाग्रणि नमवि जसा मातल्या नृपाळा । " उपमान व उपमेय याची अदलाबदल करून, कवीने आपला भावार्थ किती कौशल्याने प्रगट केला आहे !

अशाच लक्षणेने मदांध साम्राज्यशाही व ध्येयनिष्ठ स्वातंत्र्य-लालसा यांचे द्वंद्व कवीने ' अहि-नकुल ' या काव्यात प्रभावी व ओजस्वी शब्दांनी रंगविले आहे. विषारी नाग जमिनीवरून चालला म्हणजे त्याचे परिणाम काय होतात हे कवि पुढीलप्रमाणे सांगतो, " मार्गावर याच्या लवत तृणाचीं पातीं । पर्णांवर सुमनें मोडुनि माना पडतीं । थरथरतीं झुडुपे हादरती नववेली । जणु गुलाम सारे या सम्राटापुढती ! "

सम्राटाला साप म्हणण्याऐवजीं सापाला 'सम्राट' म्हणून कवीने संबोधले आहे. त्या नागाची ऐटदार गति पहा—" चालला पुढे तो-काय ऐट ! आनंद ! । अग्नीचा ओघळ ओहळतो जणु मंद, । टाकली यमाने कट्यार वा कनकाची । चालली बळींचा वेध घेत ही धुंद ! ॥ चालला पुढे तो लचकत मुरडत मान, । अवतरे मूर्तिमान मल्हारातील तान ! । चांचल्य विजेचे, दर्याचे गांभीर्य । चालला मृत्युचा मानकरीच महान ! "

पण या मृत्यूच्या मानकऱ्याचाहि मृत्यु मुंगुसाने घडविला आणि 'वाऱ्यापरि गेला नकुल वनातुनि दूर.' १९३८ सालीं कुसुमाग्रजाच्या अशा राष्ट्रीय आकांक्षा फुलविणाऱ्या कविता सहृदय वाचकांना किती आशापूर्ण वाटल्या असतील !

## ध्येयनिष्ठेचें गौरव-गीत

आणि कवीचे भविष्य १९४७ साली साकार झाले. राष्ट्राला स्वातंत्र्य लाभले. स्वतंत्र भारताच्या तिरंगी ध्वजाचा कवीला केवढा अभिमान ! त्या ध्वजातील ' निळे चक्र ' हे हे प्रतीक घेऊन कवि आनंदानें गातो—

" धरतीच्या जखमी हृदयातिल । सुफलित स्वप्नें इथेंच होतिल । रक्षित मानव्याची दौलत । जागवुनी जागेल ॥ नक्षत्राच्या दिव्य पथातुन । इंद्रधनुष्याच्या वेशींतुन । निळे चक्र हें जाइल, जेथें । जगत नवे उमलेल!" अशा अपार आशावादाने व असीम अभिमानाने कुसुमाग्रजाचें काव्य फुललेले आहे.

चतुर ब्रिटिश सरकारच्या सात पहाऱ्यातून एकदम गुप्त होऊन स्वातंत्र्याचा अमृतकुंभ आणण्यासाठीं देशातरीं भरारी मारणाऱ्या सुभाषबाबूंना ' सुवर्ण-गरुडा ' या सूचक नावाने सम्बोधून कुसुमाग्रज अशी विशाल कल्पना करतात, " घन रात्रित जैसा घुसतो अग्नीशर । तिमिरावर फुलवित तेजाचा मोहर । अमरत्वाच्या सारंगीवर । छेडूनिया तात । काळ होऊनी शाहिर गाइल । तव गौरव-गीत ॥ "

सकटाची तमा न बाळगता आपले उद्दिष्ट निश्चयाने हस्तगत करू पहाणाऱ्या ध्येयनिष्ठ मानवाचा प्रातिनिधि म्हणून कवीने कोलंबस निवडला आहे. ' कोलंबसाचे गर्व-गीत ' या काव्यात तो ध्येयनिष्ठ निर्धाराचे उद्गार काढतो, ते असे—" काय सागरीं तारुं लोटले परताया मागे । असे का हा आपुला बाणा । त्याहुन घेऊ जळीं समाधी सुखे, कशासाठीं । जपावे पराभूत प्राणा ॥ कोट्यावधी जगतात जिवाणू जगती अन् मरती । जशीं तीं गवताचीं पातीं, । नाविक आम्ही परंतु फिरतो सात नभाखालीं ! निर्मितो नव क्षितिजें पुढतीं ! " समुद्र, त्याचा किनारा, त्यावरील वादळे, त्यातून दिसणारा दीपस्तंभ, त्यातील आशेची वात—याचीं वर्णने सुमाग्रजाच्या काव्यात वारंवार येतात. त्या सर्वांतून अदम्य आशावाद व अढळ ध्येयनिष्ठा याचाच संदेश ऐकू येतो. तो असा—" चला उभारा शुभ्र शिडे तीं गर्वाने वरतीं । कथा या खुळ्या सागराला । " अनंत अमुची ध्येयासक्ती अनंत अन् आशा । किनारा तुला पामराला । "

## कल्पनेंतील नावीन्य

कुसुमाग्रजाची कल्पकता भव्य आहे. त्यांत नावीन्याचे तेज झळाळत आहे. ती बहुविध रूपे धारण करूं शकते. आधुनिक युगातील एक चमत्कार म्हणजे जगाच्या कोनाकोपऱ्यातील वृत्ते व गीते ऐकविणारा रेडिओ. त्याच्या ' आकाशित लहरी ' वरून काय काय कानीं पडतें हे सागताना कवि म्हणतो, "दूरदूरचीं ऐकिव नगरे ! अज्ञाताच्या अथांगते-तुन । लुटून दौलत भरुन तारवे । येत पऱ्या या शिडे उभारुन । सान दिव्याचे छोटे बदर । सुवर्णनौका तिथे विसावुन । येत किनाऱ्यावरील घेउन भरलेले घट शिरीं ॥ " रेडिओतील ध्वनींच्या लहरी म्हणजे पऱ्या आहेत आणि त्या देशोदेशींच्या दौलतीने भरलेल्या घागरी डोक्यावर घेऊन घरोघर येत आहेत अशी मनोहर कल्पना कवीने केली आहे. रेडियोवरून युद्धाच्या वार्ता येतात, त्याना उद्देशून कवि म्हणतो, " फुलवित येती कणी अग्निच्या । ल्यात उधाचें भर रणागण । परि अवघ्यान्नी एक मनीषा—नक्षत्राच्या निळ्या पथातुन । व्योमनदीच्या जलात न्हाउन । चंद्रकराना वाट विचारित । करावयाला बोधन रजन । यावे माझ्या घरीं । आल्या आकाशित लहरी ! "

## उत्पेक्षांची माला

रेडियोसारखा नव्यातला नवा विषय ज्या कवीच्या कल्पकतेला खाद्य पुरवू शकतो; त्याला ताजमहालासारखे अमर सौंदर्याचें प्रतीक हा काव्याचा विषय का न वाटेल ? त्या प्रेमगर्भ व सौदर्य सिंचित कलाकृतीवर आपल्या कल्पनेची रुंजी घालण्यात कैक कवीची प्रतिभा रमली आहे—थकलीहि आहे. कुसुमाग्रज आपल्या कल्पनेच्या ताना घेऊन त्या कलामूर्तीचे गुण--गान पुढील उत्प्रेक्षानीं करतात, " वर पूर्ण चंद्रमा पसरी मायाजाल । वसुधेच्या वदनीं लहरे हास्य सलील । ते समूर्त होउन

तीरावर यमुनेच्या । ... विशाल ॥ काव्य मनोहर, हो रचनेत ... गमनी ... मिनार । व विहग कल्पना कलानंद बेहोष । ताठि समाधिस्थ हो पण कारुण्य अपार । कीं, ब्रह्मांडाच्या अथांग या कासारी । ग्रहनक्षत्रांची ... सारीं । या भू-पद्माच्या एक पाकळी वरती । हा थेंब दवाचा विल विमल रुपेरी ॥ "

हा शुभ्र ताजमहाल म्हणजे पृथ्वीचे हास्य आहे कीं सृष्टीचे ... आहे कीं कमळावरील दवबिंदु आहे ? अशा उत्प्रेक्षामागून उत्प्रेक्षा क... कवीला शेवटीं असा विचार सुचतो कीं, विलासी शहाजहानने ... 'असत्य प्रणय' केले असतील आणि आपल्या 'हीन देहल ...' कैक अ... अत्याचार केले असतील ?

नाशिककडील द्राक्षाच्या ... कवीने 'मायदेशचा वारा' मध्ये केले आहे, ते कल्पनामधुर आहे. हिरवीं वस्त्रे नेसलल्या व ... मोत्याचे हार घातलेल्या पऱ्याप्रमाणे द्राक्षाच्या वेली दिसतात अशी उत्प्रेक्ष करून कवि म्हणतो, " द्राक्षांचे बहरत बाग मनोहर जेथे । त्या सुनी वेली राग पऱ्यांची गमते । लेऊन उभ्या जणु हिरव्या नव वसनाते कटिकंठावरती वरती मौक्तिकहारा । हा काय माझिया मायदेशचा वारा ॥' तसेच पानमळे. त्याचे चित्र कवीने पुढीलप्रमाणे रेखाटले आहे—" नागवेलिचे मांडव शीतल शांत । विश्रांतिच जेथे झालेली विश्रांत । वि... रीवर नादेल सुरेल जीवनगीत । काळींत वाहती संथ रुपेरी धारा । काय माझिया मायदेशचा वारा ! "

विजेवर चालणारी व 'पोलादी पथ' तुडविणारी आगगाडी वेगा... धांवत असलेली पाहून कवीच्या मनात ज्या कल्पना ... 'वेगवती' मध्ये त्याने पुढीलप्रमाणे मांडल्या आहे...

तुफान धावत । मदांध जलदीच्या लाटावर, । तडितेचा कडकडतो आसुड दुभगुनी तिमिरांकित अंबर ! " समुद्राच्या लाटा व विजेचे आसूड हीं उग्र दृश्ये कुसुमाग्रजाचे लाडके विषय दिसतात.

## तीक्ष्णता

युद्धातील भीषणता व क्रूरता यांचें वर्णन उपरोधाचा आश्रय करून ..वे ' फेरीवाला ' या कवितेत करतो. फेरीवाला आनंदाने हाका देत तो, ' अमोल माझा माल, नको धन । रक्तमांस हे स्वस्त चालले । ..शाल या लुटण्याला ! आला आला फेरीवाला ! ॥ हा घट देखा, ..तिल शोणित । मेले तरि अद्याप उधाणत । उमद्या युवकाचे हो जीवित । रणांगणावर पिळून त्याचा । घट ताजा हा भरला । आला आला फेरीवाला ॥ " तरुण मर्दांचे रक्त वाया चालले ! तसेंच कोमल अबलांच्या ..ळ्यातील अश्रु ! " कुपींत या भरले जल कोमल । अ... अबलांच्या नेत्रांतिल ॥ "

बॉंब हल्ल्यात बेचिराख झालेल्या घराघरात प्रेमळ जोडप्याची राख झाली ! " मंजुषेत या राख मनोहर । उदात्त सोज्ज्वळ नैतिक नागर ! आग बरसता मुखी घरावर । मिठ्या मारुनी गळ्यात जळले । त्यांचा मिश्रित काला । आला आला फेरीवाला ॥ सहज बोट राखेतुन सारा । गृहसौख्याचा गोड उबारा । गुतुन राहे आंत बिचारा ! अदग्ध आशांचे काळे कण । लागति अजुनी कराला ! आला आला फेरीवाला ! " आणि युद्धाच्या संहारक शक्तीचा दुष्टपणा तीव्रतेने दाखविण्यासाठीं तरुणाचे रक्त व अबलांचे अश्रु यांच्या जोडीला कवीने बालकांच्या ललाटरेषाहि आणल्या आहेत. " जुनावट अथवा प्रौढ नको का ? । ही घ्या दुसरी संदुक देखा, । बाळजिवाच्या ललाटरेखा । फुलण्यापूर्वी फुटलेल्या हा मिळतो माल कुणाला ? । आला आला फेरीवाला ! ॥ " यापेक्षा

कोणत्या कडक शब्दानीं या संहारक शक्तींचा पाशवीपणा रंगविता येई
हिंदुस्थानची फाळणी झाली आणि मानवातील पशुता मोकाट सुट
वाघलाडग्यांना लाजविणारे अत्याचार बधुबधूंनीं केले. स्त्री पाहिली ना
मूल पाहिले नाहीं, सर्वांची ससेहोलपट झाली. त्या भीषणतेचे स्पष्ट ।-
दाबलेल्या रागाने व कोंडलेल्या चिडीने कवीने येथे काढलें असावे.

'सैगल' या चित्रपट-नटाचा गौरव करताना "घडिभर जागव अमुची अशीच मानवता' असे ते म्हणतात. "अशीच मानवता" जा वणारे स्फूर्तिशाली व ओजस्वी कवि ते स्वतः आहेत. यापुढे त्याच्या प्रं भेचे नवेनवे पैलू दृष्टीस पडतील अशी महाराष्ट्रीय रसिकाची अपे आहे. म्हणून कवि बोरकराच्या सुरात सूर मिसळून ते रसिक विनविता "नव्याने गा रे कुसुमाग्रजा !"

## अभ्यासाच्या वाटा

(१) 'क्रांतीचे शाहीर म्हणजे कवि कुसुमाग्रज' ही क्रांति कोणती कुसुमाग्रजानी आपल्या कोणकोणत्या कवितातून या क्रांतीचा पुरस्का केला आहे ?

(२) स्वातंत्र्य-लढ्याला पोषक अशा कोणत्या कविता कुसुमाग्रजानीं लिहिल्या ? त्यातील तुम्हास कोणती आवडते ? त्या कवितेतील काही चरण लिहा.

(३) सर्व मानवाबद्दल सहानुभूति म्हणजेच मानवता ही मानवता सध्याच्या समाजात दिसत नाही असे कुसुमाग्रज का म्हणतात ? ही मानवता निर्माण होण्यास काय उपाय ते सुचवितात ?

(४) 'वैष्णव' 'भक्तिभाव' 'आकाशित लहरी,' 'ताजमहाल' 'तेजाकडे,' या कवितातील आशय लिहा.

## या पुस्तकांतील
## लेखकांचीं कांहीं वाचनीय पुस्तकें

रे. ना. वा. टिळक

टिळकाची कविता

बॅ. वि. दा. सावरकर

सावरकरांची कविता

माधव जूलियन

१. सुधारक
२. गज्जलाञ्जलि

राजकवि यशवंत

१. यशोधन
२. यशोगंध
३. पाणपोई

कुसुमाग्रज

१. विशाखा
२. किनारा

★

# शिखरे-वाङ्मय

## चरित्रें

म. गांधींचें चरित्र
गाधी–जीवन–कथा
राष्ट्र–पिता गाधीजी
गाधी–रण–गीता
राष्ट्र–जनक टिळक
लोकमान्य टिळक
सुधारकाचार्य आगरकर
डॉ. राधाकृष्णन

## प्रबंध

गाधीजींचे रामराज्य
साम्राज्य व स्वराज्य
सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म
आजकालचे साहित्यिक

## कादंबरी

थोरली आई
आईची कृपा
भावनाचा नाच
जिवलग

## नाटकें

वैष्णवजन
आठ साल

## लघुकथा

क्राति–किरण
गंगेचे थेब